ॐ

श्रीमत् परमहंस

# स्वामी रामतीर्थ यांचे समग्र ग्रंथ

## खण्ड ३ रा



[ प्रथमावृत्तींतील भाग ५–६ ]

---

संपादक

कै० भास्कर विष्णु फडके, बी. ए.

व

कै० रामकृष्ण वासुदेव बर्वे, बी. ए.

---

प्रकाशक—गणेश महादेव आणि कंपनी

६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर

---

किंमत २॥ रुपये



# विषयानुक्रमणिका

विषय | पृष्ठें



## व्याख्यानें



---

# पारिभाषिक शब्दकोश

| | मराठी पारिभाषिक शब्द | इंग्रजी शब्द | पृष्ठ |
|---|---|---|---|
| १ | द्रव्यरूप कल्पना | एमिसरी थिअरी | २० |
| २ | लहरीरूप कल्पना | वेव्ह थिअरी | २० |
| ३ | चलनकलन | डिफरेंशल क्याल्क्युलस | २१ |
| ४ | संपृक्तता | सॅच्युरेशन | ७२ |
| ५ | प्रकाशलेखनपेटिका | क्यामेरा | १०० |
| ६ | कांचपट | प्लेट | १०० |
| ७ | प्रेरणा | फोर्स | १०७ |
| ८ | शब्दवाहक | टेलिफोन | ११४ |
| ९ | बाष्पयंत्र | स्टीम एंजिन | १७८ |
| १० | नियामक [ यंत्र ] | गव्हर्नर | १७८ |
| ११ | मानसशास्त्र | सॉयकॉलोजी | १७९ |
| १२ | परावृत्त क्रिया | रिफ्लेक्स ॲक्शन | १९२ |
| १३ | अस्थिर समतोलत्व | अन्स्टेबल इक्विलिब्रियम | १९८ |
| १४ | स्थिर समतोलत्व | स्टेबल इक्विलिब्रियम | १९९ |
| १५ | सामान्य समतोलत्व | न्यूट्रल इक्विलिब्रियम | १९९ |

# संन्यासगीत

( चाल:—नरजन्मामधिं नरा करुनि घे.)

वैराग्याचा त्रिशूल घेतां हातीं प्रिय शंकरा !
शांतिसुख चालत आलें घरा।
नसांनसांतुनि स्वतंत्रतेचा घोष होतसे महा
अहा ! आनंद काय हा अहा ! ।
दंवबिंदू चिमुकले मुलें मम, घन गर्जति अंबरीं
दिवाकरकरगण लीला करी ।
सळसळती तरुपर्णें त्यांशीं खेळ खेळतो कसे
पीत आरक्त रुक्म होतसे ।
चालः—फुंकिला रवीनें पवन विमल सुंदर ।
ने उचलुनि माझा विवेक वरचेवर ।
मी उडें विहंगम, गांठीं झणिं अंबर ।
निळ्या चकाकत आकाशाच्या कळसावरतीं जरा
थांबतों तेथें रसिकेश्वरा ! ॥ १ ॥
उडें बागडें हंसें रमें मी आनंदीं गुंगतों
शांतिसुख घ्याया रवि जात तों ।
स्वत्वनिधाना बळें त्वरेनें स्वतंत्र वसुधेश मी
सुखाला काय त्या स्थळीं कमी।
प्रेमाकर, आनंदार्णव शान्तीचें माहेर तें
मुक्तिसह सदा सुखानें रतें ।
विश्वमंदिरीं संन्यासी हें ! बघ विश्वेशा तया
करुनियां अंतर्मुख इंद्रियां ।
चालः—तव वक्षावरतां विकसो सुमनावली ।
हृदयांत विराजो विवेकरवि निर्मळीं ।
कर विस्तृत कर तव गगनाहुनि भूतलीं ।

ॐ तत् सत् ॐ गीतरवें भर विश्वकंठ सुंदरा !
डोलवो चराचराला गिरा ॥ २ ॥

मित्रा ! तुजला गेह नसे कां ? गेह कोणतें तुला
देतसे मोक्ष सांग हें मला ।
गगनाच्छादन, तृण तव शय्या, अन्न समय ज्यापरी
भलें वा बुरें नाणिं अंतरीं ।
खाद्यपेयसंपर्क न आत्म्या स्वरूप जो जाणतो
आपगा स्वैर, तेंवि होय तो ।
संन्यासी बा ! निर्भय होई, ॐ तत् सत् ॐ मुखें
म्हणोनी संतत राहों सुखें ।

चालः—त्या सत्य न कळतें, स्वप्नें पडतीं नव ।
ही जाया, सुत हा, मित्रसंपदाभव ।
तो पिता कुणाचा ? पुत्र कुणाचा शिव ? ।

निर्गुण तो सगुणांत वसतसे व्यापुनियां स्थिरचरा
वदे ॐ सत् सत् ॐ मुनिवरा ॥ ३ ॥

धुंडिसि कोठें त्या स्वातंत्र्या ? मित्रा ! जग हें तरी
काय तुज आणुनि दे तें करीं ? ।
करोनि सरशी पृथ्वी फिरसी, सारीं देवालयें
वृथा तीं ग्रंथसंग्रहालयें ! ।
वृथा करिसि बा शोध कशाला ? तुझ्याच हातीं असे
रज्जु जो तुजला ओढीतसे ।
पुरे पुरे तो शोक तुझा, तूं पौरुष आतां करीं
तुझें यश पाहत राहे हरी ।

चालः—तो अहंभाव तूं देई झुगारुनि पुरा ।
चल अद्वैताचें कवच घाल बा नरा ।
शिरिं खोंवीं उज्ज्वल धैर्याचा नवतुरा ।

ॐ तत् सत् ॐ मंत्र मुखानें वद संन्यासीवरा !
डोलवो चराचराला गिरा ॥ ४ ॥

शांति समस्ता, भीति न कोणा तुजपासुनियां मिळो
जगाची झडापिडा ती टळो।
गिरिशिखरावरि असोत कोणी, भूगर्भांतरि कुणी
'असें मी सर्वात्मा' हें गणीं।
स्वर्ग मृत्यु पाताल निराशा, आशा मजपासुनी
विचारें बंध टाकिं तोडुनी।
शरीर राहो, अथवा जावो, न गणीं; कृति संपली
कर्म हें बुडवो तरवो जलीं।
चालः—कुणि माळा घालो गळ्यांत, तुडवो कुणीं।
लक्ष्मी ही चपला मिळेल शून्या क्षणीं।
स्तुतिपाठक, निंदक, स्तुत्य, निंद्य नच गणीं।
'एकं सत्' या भावें राहीं संन्यासी! सुंदरा
वदे ॐ तत् सत् ॐ ही गिरा॥ ५॥
कीर्तिकाम, धनतृष्णा यांचा वास होत ज्या स्थळीं
सत्य हें शाश्वत, येत न मुळीं।
नारी पाहुनि पत्निभाव हा मनांत ज्याच्या उभा
मिळे नच तया मुक्तिचा सुभा।
क्रोध घालि श्रृंखला जया, नर अलिप्त ममत्वा धरी
अटक त्या मायाद्वारावरी।
नानाकारीं एकचि आत्मा स्वतंत्र जो अक्षय
सोडिं बा आशा तृष्णा भय।
चालः—'तें तूं असती' ही जाण खूण अंतरीं।
हे संन्यासी! तूं हो निर्भय यापरी।
घे स्वातंत्र्याचा दंड आपुल्या करीं।
ॐ तत् सत् ॐ मंत्र मुखानें वद संन्यासीवरा!
डोलवो चराचराला गिरा॥ ६॥
एकावांचुनि जगीं न कांहीं साक्षिदीप पूर्ण तो
नामातीत निराकार तो।

निर्गुण तो परमात्मा, त्यांतचि माया कोल्हाटिण
स्वप्नें पडती तिजला क्षण ।
द्रष्टा आत्मा निसर्गसम तो, भासतसे मुनिवरा
'तें तूं असासि;' जाण त्या परा ।
विरळ जाणती सत्या तत्त्वा, शेष निंदिती जनीं
हांसतिल तुला महंता! कुणी ।
चालः—परि लक्ष न देईं; स्थळोस्थळीं जाउनी ।
त्या अज्ञजनांना काढीं ध्वांतांतुनी ।
तो शोध सुखाचा, संकटभय सोडुनी ।
मायापटला दुरी झुगारुनि संन्यासी! सुंदरा
वदे ॐ तत् सत् ॐ ही गिरा ॥७॥
बल कर्मांचें सरे तोंवरी आत्मोद्धारा करीं
जावुं दे दिनरात्री यापरी ।
नलगे संभव, नलगे 'मी' 'तूं,' नलगे सुर मानव
होय मी सर्व, सर्व मी ध्रुव ।
पुनः पुन्हां किति सांगु तुला मी 'तें तूं असासी' नरा
झळकतो तुझ्याच हृदयीं हिरा ।
'कळतें, परि नच वळतें,' यातें बाध आणि मुनिवरा!
झळकतो तुझ्याच हृदयीं हिरा ।
चालः—ॐ तत् सत् ॐ हा मंत्र मुखानें वद ।
जो दावि निरंतर मुक्तिसुखाचें पद ।
षड्रिपूंस जिंकुनि जिरवी त्यांचा मद ।
स्वातंत्र्याचा नित्य फडकुं दे जरिपटका नरवरा!
पाहुनी हर्ष पूर्ण शंकरा ॥ ८ ॥

---

# रामतत्त्वम्

हे राजाधिराजा ! सर्व शरीरांत विलसमान होणाऱ्या हे आत्मरूपा ! हे सकलऐश्वर्यसंपन्ना ! अज्ञानरूपी निद्रेनें ग्रस्त होऊन स्वतःला देहाचा गुलाम बनवूं नको ! जागृत हो; आणि आपल्या परमात्मवैभवांत विलसत रहा. कारण, तूं परमात्मा आहेस; तद्व्यतिरिक्त दुसरें कोणीहि असणें शक्य नाहीं. अंतःसामर्थ्याचा आश्रय करून भीति, शंका आणि दौर्बल्य यांना झुगारून दे; व 'अहं ब्रह्मास्मि' या अनुभवावर आरूढ हो. तूं ईश्वरच आहेस. ईश्वर आणि मी तत्त्वतः एकरूप आहों, ही कल्पना, हा विचार तरी किती उदात्त आणि उन्नतिकारक आहे ! हा विचार सर्व दुःखांचा लय करतो, आणि सर्व तऱ्हेच्या चिंतेचें ओझें हलकें करतो. आत्मकेंद्रांतून च्युत होऊं नको. ग्रीसमधील गणितशास्त्रज्ञ आर्किमिडिज म्हणतो:—'जगाबाहेर एखादा आलंब मला मिळाला तर मी जगाला हालवून सोडीन !' हतभागी आर्किमिडिज ! बिचाऱ्याला हा आलंब सांपडूं शकला नाहीं. हा आलंब तुमच्या हृदयांत आहे; तुमचा आत्मा हा तो आलंब होय. त्याला पकडा, म्हणजे अखिल विश्वाला हालवून सोडण्याचें श्रेय तुम्हांला येईल.

# रामसुधा

मनुष्याच्या शीलामधील सामर्थ्य याचा अर्थ इतरांवर आपल्या शीलाचे संस्कार करण्याची शक्ति असाच असला पाहिजे. मनुष्याच्या ऐहिक उत्कर्षाचें बीज या सामर्थ्यांतच आहे, हें निर्विवाद आहे.

जीं तत्त्वें आपण प्रतिपादन करतों त्याप्रमाणें स्वतः वागण्यानें दुसऱ्यांवर संस्कार करण्याची शक्ति उत्पन्न होते. कारण, आपला उपदेश कृतींत आणण्याचा आपण प्रयत्न करूं लागलों म्हणजे आपल्याला स्वतःवर नवीन संस्कार करून घ्यावे लागतात व हे संस्कार इतरांच्या सुधारणेच्या कामीं उपयोगी पडतात.

कोणत्याच प्रकारचें कर्तव्य नसतां कार्य करीत रहाणें, याला वेदान्त म्हणतात.

स्वतः जगणें आणि दुसऱ्याला जगूं देणें हें वेदान्ताचें धोरण आहे.

आपल्या रथाच्या घोड्यांचे लगाम श्रीकृष्णाच्या हातांत देणारा अर्जुन, हें वेदान्तानुसार वर्तन करण्याचें उत्कृष्ट उदाहरण आहे.

वेदान्ती महात्म्याची भिस्त केवळ सत्यावर असते; अनुयायांच्या संख्येवर नसते. यामुळें शिष्यांची खोगीरभरती करण्याच्या खटाटोपांत तो कधीं पडत नाहीं.

मानवी जिव्हेनें शब्दोच्चार करण्याचें काम सोडून दिलें म्हणजे प्रत्यक्ष पाषाणांनाहि वाचा फुटते !

दिनकराप्रमाणें तुम्हीं नेहेमीं दाते व्हा. व अशा रीतीनें वागूं लागलां म्हणजे सर्व जगाला आकर्षण करण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगांत येईल.

बादरायण सूत्रांमध्यें अज्ञानापूर्वीं अध्यासासंबंधानें—देहात्मबुद्धीच्या विपरीत ज्ञानासंबंधानें विवेचन करण्यांत आलें आहे; व याचें कारण उघड आहे. अज्ञान हें दुःखरूप नसून अध्यास दुःखरूप आहे. सुषुप्ती-मध्यें अज्ञान असतें, पण अध्यास नसतो, यामुळें सुषुप्ति दुःखरूप नाहीं.

क्षुद्र भीति आणि शंकेखोरपणा यांत मनुष्यानें आपल्या वेळाचा अप-व्यय करावा, हें गैर आहे. पशु, पक्षी, वृक्ष यांच्याइतका तरी स्वाभिमान मनुष्याला असला पाहिजे. वारा, पाऊस, ऊन यांबद्दल ते कधीं तक्रार करतांना आढळत नाहींत; याचें कारण, त्यांचें निसर्गाशीं तादात्म्य असतें हें होय. हाच कित्ता मनुष्यानें गिरवला पाहिजे.

जोंपर्यंत उदारता हा मनुष्याचा सहज धर्म बनला नाहीं, तोंपर्यंत साक्षात्काराची गोष्ट बोलावयास नको. कृपणाला आत्मानुभव होणें सर्वथा अशक्य आहे.

सौंदर्य हें नेहेमीं निर्ममत्वाच्या सम प्रमाणांत असतें. याचें उदाहरण लहान मूल. सामर्थ्य किंवा सौंदर्य हें त्यागाचें परिणत स्वरूप आहे.

वैराग्याचें रहस्य बरोबर समजलें असेल तर ऐश्वर्यसंपन्न होणें, हें कंगाल होण्याइतकेंच सोपें आहे, असें दिसून येईल.

जीवनार्थ कलहांत काय टिकूं शकतें? प्रेम!

सर्व नद्या ज्याप्रमाणें समुद्रांत जाऊन मिळतात, त्याप्रमाणें जगांतील यच्चयावत् प्रेमाचा प्रवाह प्रेमस्वरूपी परमेश्वराला जाऊन मिळतो.

मुक्त पुरुष तोच कीं, ज्याच्या आत्मानुभवाचा प्रकाश जगांतील सर्व वस्तूंना प्रकाशित करतो; व ज्याच्यापासून ईश्वरी प्रेमावांचून दुसरें कांहींहि बाहेर पडत नाहीं.

---

# राम बादशहाचा जाहिरनामा !

सर्वतऱ्हेचे मोह आणि दुर्बलता यांच्या अतीत होऊन आपलें ईश्वरत्व प्रस्थापित करा. ज्या महात्म्याला स्वानुभव झाला आहे, त्याला रस्ता देण्यासाठीं सर्व जगानें बाजूला झालेंच पाहिजे! सर्व जगाचें आधिपत्य करा; नाहींतर तें तुमच्यावर आधिपत्य गाजवील. संशय किंवा वेडगळ धर्मसमजुती यांना थारा देणारांना जगांत यत्‌किंचितहि आशा नाहीं. त्यांची आत्मप्रौढी फोल आहे. आपल्या परमात्मस्वरूपाबद्दल तुम्हांला शंका आहे काय? हृदयांत असली शंका असण्यापेक्षां छातींत बंदुकीची गोळी घुसलेली पतकरली! तुमचें धैर्य गलित झालें आहे काय? तसें असेल, तर असलें हृदय बाहेर खेंचून झुगारून द्या. आत्मस्वरूपाकडे धैर्यानें आणि आनंदानें मोर्चा वळवा. तुम्हीं भीतिग्रस्त झालां आहांत काय? पण भितां कोणाला? आत्मस्वरूपाला? तो तर तुमचा अनादिसिद्ध हक्क आहे! भितां कोणाला? मनुष्याला? तसें असेल, तर तें निखालस दौर्बल्य आहे! भितां कोणाला? पंचमहाभूतांना? त्यांच्यावर स्वामित्व गाजवा! भितां कशाला? स्वतःला? तसें असेल, तर त्या भीतीचें कारणच नाहीं. 'अहं ब्रह्मास्मि' हा जयघोष करून स्वराज्यपदावर आरूढ व्हा!

———

ॐ

# स्वामी रामतीर्थ-खण्ड ३ रा

## प्रस्तावना

### खरे वीर पुरुष !

'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' या सिद्धान्ताशीं तद्रूप होणें, हा अनुभव आपल्या अंगीं बाणून घेणें, व त्याचा जगांत प्रसार करणें याच्या-इतकें महत्त्वाचें, पण दुष्कर काम दुसरें कोंणतेंहि नाहीं. समरांगणांत शत्रूंच्या हजारों सैनिकांबरोबर लढणाऱ्या योद्ध्यांपेक्षां मनोरूपी किल्ल्याला वेढा देणाऱ्या, कामक्रोधादि प्रबळ शत्रूंचे हल्ले परतवून त्यांचा पाडाव करणाऱ्या वीरांचें काम किती तरी पटीनें कठीण आहे. जगांतील शरीरधारी शत्रु आणि मनांतील अशरीरी शत्रु यांच्या सामर्थ्यांत, शस्त्रास्त्रांत आणि लढण्याच्या पद्धतींत केवढें अंतर आहे ! युद्धभूमीवरील शत्रूंच्या हालचाली दिसूं शकतात, व म्हणून त्यांचा प्रतिकारहि करतां येतो. परंतु कामक्रोधादि षड्रिपूंच्या हालचाली दिसूं शकत नाहींत; व मनोरूपी किल्ल्यावर हे शत्रू अचानक रीतीनें चढाई करून केव्हां आणि कसे छापे घालतात, हें समजणें अवघड असल्यामुळें त्यांचा प्रतिकार करणें जड जातें. जमिनीवरील जलदबारी तोफांतून सुटणाऱ्या प्रचंड गोळ्यांनीं आणि वातावरणांत संचार करणाऱ्या विमानांतून फेंकल्या जाणाऱ्या स्फोटकांनीं जितका संहार केला जातो, त्यापेक्षां किती तरी जास्त षड्रिपूंकडून प्रत्यहीं होत असतो. बाह्य शत्रूंच्या सुधारलेल्या हत्यारांनीं केल्या जाणाऱ्या जखमा कालांतरानें भरून येऊं शकतात; पण अंतःशत्रूंकडून केल्या जाणाऱ्या जखमा बऱ्या करणारें रुग्णालय या दृश्य जगतांत एकहि नाहीं. बाह्य आणि अंतःशत्रूंच्या सामर्थ्यांमध्यें असा फरक असल्यामुळें असल्या प्रबळ आणि समर्थ शत्रूंशीं सामना करून त्यांना वेतसवृत्तीचा आश्रय करावयास लावणारे महात्मेच खरे वीरपुरुष होत ! व जगांत जर कोणाच्या पराक्रमांचीं व विजयांचीं स्तुतिस्तोत्रें गावयाचीं असतील तर तीं अशा महात्म्यांचींच गाणें

योग्य आहे, व हीं स्तोत्रेंसुद्धां उगीच गावयाचीं आहेत, असें नाहीं. आतां वर्णन केलेल्या पद्धतीचा एक महात्मा उत्पन्न झाला असतां, जगाचें जितकें शाश्वत कल्याण होऊं शकतें, तसेंच खऱ्या सुधारणेचा आणि उन्नतीचा मार्गदर्शक या नात्यानें जनतेला अशा महात्म्यांचा जितका उपयोग होऊं शकतो, तितका उपयोग हजारों योद्धयांचा किंवा वीरांचा होणें शक्य नाहीं. ज्याच्या ठिकाणीं शुद्धसत्त्वगुणाचा उत्कर्ष झाला आहे, अशा महात्म्यापासून आकाशांत उदय पावलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें रमणीय आणि आल्हादक किरण आविर्भूत होऊन त्यांच्यायोगानें सर्वत्र शांतता आणि शीतलता नांदूं लागते; व जगाला जर कशाची जरूर असेल तर सत्त्वगुणाची आणि शान्तीचीच आहे. रजोगुणाचा आणि तमोगुणाचा प्रभाव काय असतो, हें आज आपल्याला प्रत्यक्ष दिसतच आहे! ऐहिक महत्त्वाकांक्षेच्या विषवृक्षाचें बीज मनुष्याच्या अंतःकरणांत एकदां रुजलें म्हणजे कालांतरानें कां होईना, पण त्याचा प्रचंड वृक्ष बनून त्यापासून कडु फळेंच उत्पन्न व्हावीं, यांत आश्चर्य नाहीं. तमोगुणविशिष्ट ऐहिक आकांक्षा जगाच्या शान्ततेचा भंग करते, आणि सत्त्वगुणविशिष्ट आध्यात्मिक आकांक्षा मनुष्यांना व राष्ट्रांना खऱ्या शान्ततेकडे आणि उन्नतीकडे नेते. हा अनुभव आजकालचा नव्हे; तो अनादिसिद्ध आहे. या अनुभवाचा दूरदृष्टीनें विचार करूनच आर्यांनीं आपल्या संस्कृतीची दिशा निश्चित केली आहे, व वेदान्त हें त्यांच्या संस्कृतीचें अत्यंत मधुर व चिरंतन फल होय. अशा या वेदान्ताला जन्म देणारी आर्यभूमि आणि तींत रहाणारे आर्य लोक खरोखर धन्य होत!

वेदान्ताचा जगांत प्रसार करण्याचें महत्कार्य आर्यांनीं हजारों वर्षांपासून आजमितीपावेतों केलें आहे, व आर्यांचा जर कांहीं विशेष असेल तर तो यांतच आहे. या वेदान्तधर्माची परंपरा अत्यंत विपन्नस्थितींत राहूनहि कायम राखणारे आणि तिचा सर्वत्र प्रसार करणारे वीर महात्मे आजपर्यंत या पुण्यभूमींत वेळोवेळीं होऊन गेले, व श्री स्वामी रामतीर्थ हे या परंपरेंतील अगदीं अलीकडचे पुरुष होत. सध्यांच्या भौतिक सुधारणेच्या युगांतहि वेदान्त जिवंत आहे, आणि पाश्चात्य विद्युत्प्रकाशाच्या लखलखाटानें तो दिपून गेलेला नाहीं; एवढेंच नव्हे तर या विसाव्या शतकांतहि वेदान्तसूर्याला आपला प्रकाश जगावर पाडावयाचा आहे, ही गोष्ट स्वामींनीं सिद्ध केली, व अशा रीतीनें वेदान्तज्ञानाकडे जगाचें लक्ष वेधलें. या श्रेष्ठ व लोकोत्तर कामगिरीमुळें स्वामीं-

च्या उपदेशाकडे लोकांचें दिवसेंदिवस अधिकाधिक लक्ष लागून त्यांना आपल्या उन्नतीचा मार्ग स्पष्टपणें दिसूं लागेल, यांत तिळमात्र संशय नाहीं.

वेदान्त अंगीं बाणणें आणि त्याचा दिव्य संदेश सर्वत्र पसरविणें हें काम अत्यंत कठिण आहे, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. श्री तुकाराम महाराज यांनीं या बाबतींत काढलेले अभंगोद्गार पुढील प्रमाणें आहेतः—

रात्रीं दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन ॥ १ ॥
जीवांही आगोज पडती आघात। येऊनियां नित्य नित्य करी ॥ २ ॥
तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें। अवघ्यांचें काळें केलें तोंड ॥ ३ ॥

या मुद्यासंबंधानें स्वामींचें काय म्हणणें आहे, तें पुढील उताऱ्यांवरून वाचकांच्या लक्षांत येईल. स्वामी म्हणतातः—‘सत्यामध्यें मुरून गेलेल्या लोकांनो! बहुजनसमाज आपल्या विरुद्ध आहे व आपल्याला कोणाचीच मदत नाहीं, असें पाहून घाबरून जाऊं नका. परंपरागत अज्ञानांधःकारांत मुरून गेलेला बहुजनसमाज, हे दिनकरा! तुला निमंत्रणच करीत आहे. सत्याशीं, ब्रह्माशीं तन्मय व्हा. मग हजारों मनुष्य तुम्हांला विरोध करूं लागले, तरी त्याबद्दल फिकीर करूं नका. परंतु बहुजनसमाज तरी आपल्या बाजूचा नाहीं असें कां मानतां? बहुजनसमाज केव्हांहि तुमच्याच बाजूचा आहे. पृथ्वीवरील पाषाण, वृक्ष, नद्या, वायूच्या झुळुका, आकाशांतील सूर्य आणि तारे हे तुमच्या बाजूला आहेत. अनंत काल तुमचा आहे. सर्वव्यापी निसर्ग तुमचेंच समर्थन करीत आहे. आपल्या प्रतिपक्ष्यांकडून तुम्हीं वेष्टिलेले नसून तुम्हींच त्याला वेढा दिलेला आहे. दैवावर हल्ला करून तुम्हीं त्यांना जिंकलें आहे. जें न्याय्य आहे त्याच्यांत सामर्थ्य उत्पन्न होऊन तें स्वतःचें समर्थन करील, व अखेर विजयी होईल, असा निसर्गाचा संदेश आहे. सत्य हें कठोर आहे; स्पर्श करतांच फुटणारा पाण्याचा बुडबुडा नाहीं, हें लक्षांत ठेवा. एखाद्या पायचेंडूप्रमाणें तुम्हीं त्याच्यावर कितीहि लाथा मारल्यात, तरी तुमचा खेळ आटोपल्यावर त्याच्या स्वरूपांत यत्किंचितूहि बदल झालेला नाहीं, असेंच तुम्हांला दिसून येईल. जगावर ईश्वराची सत्ता आहे, व सर्वसमर्थ सत्याचाच अखेरीस विजय होणार! ‘अहं ब्रह्मास्मि’ या सत्य सिद्धान्ताचा जयघोष करण्याला कचरूं नका.’

‘फक्त सत्याशींच स्नेह जोडा. मग त्यामुळें तुम्हांला कोणाचें साहाय्य मिळालें नाहीं तरी बेहेत्तर आहे. सत्याकरितां जगा आणि सत्याकरितांच मरा! सत्या-

च्या उच्च शिखरावर तुम्हांला एकटेंच रहावें लागलें म्हणून काय झालें? त्यां ठिकाणीं आत्मसूर्य हा तुमचा स्नेही आहेच; व त्याशिवाय दुसरा कोणताहि स्नेही जोडण्याचें मनांत आणूं नका. कालांतरानें तुम्हांला हजारों स्नेही मिळ-तील, व त्यांना तुमच्यापासून प्रेरणा मिळेल. अशा रीतीनें उत्पन्न होणारी संस्थाच स्वाभाविक होईल. संस्था निर्माण करण्याची हांव बाळगून सत्याशीं तडजोड करूं नका. शेंकडों अनुयायी किंवा भक्त आपल्याभोंवतीं गोळा करावे, अशी रामाची इच्छाच नाहीं. सत्स्वरूपाशीं तद्रूप होणें एवढेंच रामाचें काम आहे. सत्याचें समर्थन करण्यासाठीं इतरांची जरूरी नाहीं. तें स्वतःच आपलें समर्थन करीत असतें. सूर्योदयाची बातमी जगाला देण्यासाठीं इतरांचें काम काय? मी सत्याचा प्रसार करीत नाहीं; मला प्रेरणा करून तें आपला आपणच प्रसार करून घेत आहे!'

भौतिकशास्त्रें आणि वेदान्त यांची सांगड घालून वेदान्ताचे त्रिकाला-बाधित सिद्धान्त भौतिकशास्त्रांच्या भाषेंत मांडण्याची अपूर्व कामगिरी स्वामींनीं केली; व अशा रीतीनें विसाव्या शतकांतील विचारांना नवी दिशा लाविली; ही गोष्ट आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या स्वामींच्या समग्र ग्रंथांपैकीं चार भागांवरून कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखी आहे. पहिल्या तीन भागांत वेदान्तगिरीवर आरूढ झाल्यानंतर जीं ठळक ठळक स्थानें सहज दिसतात, त्यांचें विहंगमदृष्टीनें स्वामींनीं वर्णन केलें आहे. मृत्यूनंतर होणाऱ्या स्थितीसंबंधानें भिन्न भिन्न धर्मांचीं मतें व त्यांमधील तारतम्य दाख-विण्यांत आलें आहे. तसेंच, मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे, हें तत्त्व पाहिल्या भागांत सिद्ध करण्यांत आलें आहे. दुसऱ्या भागांत वेदान्त आणि भौतिकशास्त्रें यांचा संबंध, पुनर्जन्माचा कौटुंबिकसंबं-धाच्या दृष्टीनें विचार, वगैरे मुद्दे आले असून तिसऱ्या भागांत मायेचें वर्णन, अर्थात् मायेची अनिर्वचनीयता दाखविली गेली आहे. चौथ्या भागांत सुखाच्या उगमस्थानासंबंधानें ऊहापोह करण्यांत आला आहे. सध्यां जो पांचवा भाग वाचकांच्या हातीं पडत आहे, त्यांत स्वामींच्या इंग्रजी ग्रंथांतील 'पुरुषार्थाचें मूळ' या मथळ्याखालील पांच व्याख्यानें आलीं असून 'आरण्यक संवादांत' दोन गोष्टी आल्या आहेत. इतकी प्रस्तावना करून वाचकांपुढें असलेल्या पांचव्या भागांतील व्याख्यानांकडे वळूं.

# विषयप्रवेश

—:०✽०:—

## प्रवृत्तिपर वेदान्त

स्वामींचे समग्र ग्रंथ वाचीत असतां त्यांत ठिकठिकाणीं प्रवृत्तिपर वेदान्ताचें विवेचन करण्यांत आलें आहे, असें दिसून येतें. आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या भागांतून कांहीं प्रसंगीं प्रवृत्तिपर वेदान्ताचा ओझरता उल्लेख आलेला आहे व वाचकांपुढें असलेल्या या भागांतील बहुतेक सर्व व्याख्यानें, व विशेषतः 'उत्कर्षाचें रहस्य' व 'यशाची गुरुकिल्ली' हीं व्याख्यानें प्रवृत्तिपर वेदान्ताच्या सूत्रामध्यें ग्रथित केलीं गेलीं आहेत, व अशा रीतीनें तयार झालेला हा व्याख्यानसुमनांचा हार उत्कर्षेच्छूंनीं निरंतर कंठांत वागविला असतां त्यापासून त्यांचें कल्याण झाल्याशिवाय निःसंशय रहाणार नाहीं. असो; प्रवृत्तिपर वेदान्त या शब्दांचा स्वामींनीं जो अनेक प्रसंगीं उपयोग केला आहे, तो करण्यांत त्यांचा अभिप्रेत अर्थ काय आहे, आणि या वेदान्ताची व्याप्ति कोठपर्यंत आहे, असा प्रश्न उत्पन्न होतो; व त्यासंबंधानें या ठिकाणीं थोडा विचार करणें आवश्यक आहे.

'यशाची गुरुकिल्ली' या अमेरिकेंतील व्याख्यानांत स्वामींनीं असे उद्गार काढले आहेत कीं, 'वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत आणणें हीच यशाची गुरुकिल्ली होय! वेदान्त कृतींत आणणें, वेदान्ताच्या नियमांप्रमाणें चालणें म्हणजेच प्रवृत्तिपर वेदान्त! आणि यशाचें रहस्य तरी हेंच होय.प्रत्येक शास्त्राचीं औपपत्तिक आणि क्रियात्मक अशीं दोन अंगें असतात. तशीं वेदान्तशास्त्रालाहि आहेत. परंतु आज आपण वेदान्ताच्या दुसऱ्या अंगाचा—क्रियात्मक भागाचा—प्रवृत्तिपर वेदान्ताचा विचार करूं.' यावरून तसेंच पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत स्वामींचा वेदान्त या मथळ्याखालीं जें विवेचन आलें आहे, त्यावरून स्वामींचें म्हणणें काय आहे, हें साधारणपणें वाचकांच्या लक्षांत येईल. परंतु या मुद्यासंबंधानें विशेष स्पष्टीकरण स्वामींनीं स्वतःच एके ठिकाणीं केलेलें आहे व त्यावरून या मुद्यावर चांगला प्रकाश पडणारा असल्यामुळें सदरहू उतारा वाचकांस सादर करीत आहों. स्वामी म्हणतात:—'कुजट पाण्यानें भरलेल्या डबक्याप्रमाणें आळशी न बनतां धैर्यानें आणि नेटानें कार्यतत्पर व्हा; कामाची कशी तरी वेळ न बळता

सर्व क्रिया लीलेनें होऊं द्या; संशयग्रस्त स्थितींत न राहातां चित्त शांत आणि स्वस्थ असूं द्या; आपसांत फूट पडूं न देतां संघशक्तीचा आश्रय करा; परंपरागत रूढीचें गळ्यांत लोढणें अडकवून न घेतां कालानुसार सुधारणा करीत जा; रिकामी प्रौढी न बाळगतां व वटवट न करतां अंतःकरणांत खरी व दृढ कळकळ असूं द्या; काल्पनिक मनोराज्यांत भराऱ्या न मारतां वास्तविक स्थितींतील काव्याचा आस्वाद घ्या; 'बाबावाक्यं प्रमाणं' या गतानुगतिकत्वाच्या तत्त्वाला फांटा देऊन प्रमाणशुद्ध तत्त्वें ग्रहण करा; वेदान्ताच्या सिद्धान्ताची पोपटपंची न करतां जिवंत ज्ञान अंगीं बाणवून घ्या! ह्यालाच प्रवृत्तिपर वेदान्त असें म्हणतात.'

आत्मानुभव झाल्यानंतरहि जगाला उपयोगी पडणाऱ्या आणि त्याला उन्नत करणाऱ्या उदात्त स्वरूपाच्या क्रिया होत राहणें, हाच वास्तविक प्रवृत्तिपर वेदान्त होय. परंतु, वेदान्ताच्या सिद्धान्तांचा साक्षात् अनुभव न होतांहि मनुष्यांच्या हातून कमीजास्तप्रमाणानें उदात्त आणि लोकोपयोगी क्रिया होऊं शकत नाहींत असें नाहीं. अशा तऱ्हेच्या क्रिया होऊं शकतात व त्यांचें महत्त्व लोकदृष्ट्या त्या त्या मानानें कमीअधिक असतें. यालाच अ-प्रत्यक्षरीतीनें वेदान्त कृतींत उतरणें म्हणतात. अशा दृष्टीनें युरोपांतील आणि अमेरिकेंतील लोक प्रवृत्तिपर वेदान्ताचे अनुयायी आहेत, व यामुळें भौतिकदृष्टीनें त्यांची भरभराट होत आहे, असें स्वामींनीं सांगितलें आहे. परंतु ऐहिक उत्कर्षाच्या या उपपत्तीबरोबर त्यांनीं असा स्पष्ट इषारा देऊन ठेवला आहे कीं, अशाप्रकारची उन्नत्ति आत्मानुभवाच्या—वेदान्ताच्या पायावर उभारली गेल्याशिवाय ती शाश्वत होऊं शकणार नाहीं. वेदान्ताचें महत्त्व याचसाठीं आहे. सारांश, एकतर्फी प्रवृत्तीचें आणि ऐहिक उत्कर्षाचें स्तोम माजविणें, किंवा ऐहिक उन्नतीकडे बिलकुल लक्ष न देणाऱ्या वैयक्तिक आत्मोन्नतीचें महत्त्व वर्णन करणें हा—प्रवृत्तिपर—वेदान्त हे शब्द वापरण्यांत स्वामींचा हेतु नसून वेदान्ताच्या पायावर उभारल्या जाणाऱ्या उन्नतीचा आणि उत्कर्षाचा उपदेश करणें हा आहे; व अशा दृष्टीनें स्वामींचे ग्रंथ वाचले असतां त्यांच्या प्रतिपादनांतील गर्भितार्थ वाचकांच्या मनांत उतरल्याशिवाय रहाणार नाहीं.

## कर्मयोग

प्रवृत्तिपर वेदान्त या शब्दसमुच्चयाचा उपयोग करण्यांत स्वामींचा हेतु काय

आहे, हें पाहिल्यानंतर कर्मयोगासंबंधानें त्रोटक विचार होणें जरूर आहे. कारण प्रवृत्तिपर वेदान्तांत कर्मयोगाचें स्थान महत्त्वाचें आहे. कर्म कसें करावें, हा एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे, व हा कर्मयोगांतील विषय असल्यामुळें त्याचें विवेचन करणें आवश्यक आहे. वास्तविक विचार केला तर कर्म कसें करावें, असा प्रश्न करणें बरोबर नाहीं. कारण, कर्म हें स्वभावानुरूप—पूर्वसंस्कारानुरूप होत असतें. अर्थात् जें स्वभावतःच होत असतें तें कसें करावें, हें म्हणणें बरोबर नाहीं. शरीरादिकांकडून कर्म होत असतां कोणत्या तऱ्हेची बुद्धि राखावी, असा प्रश्न करणें बरोबर आहे, व क्रिया निष्काम आणि ईश्वरार्पणबुद्धीनें होणें हें त्याचें उत्तर आहे, व हीच कर्मयोगाची किल्ली आहे. कर्मयोग असें प्रतिपादन करतो कीं, शरीर हें प्रारब्धानुसार कर्मामध्यें गुंतलेलें असणारच; परंतु अशा रीतीनें कर्म होत असतां ईश्वरप्राप्तीविरहित सर्व हेतु बुद्धींतून काढून टाकून कर्म प्रारब्धानुसार होतें, या भावनेनें देहाभिमानाचा—कर्मकर्तृत्वाच्या क्षुद्र अहंकाराचा निरास करण्याचा मनुष्यानें अभ्यास केला पाहिजे. कर्मांतील कर्तेपणाची भावना नाहींशी करीत जाणें, देहाभिनाला फांटा देत जाणें ही कर्मयोगांतील मुख्य व महत्त्वाची गोष्ट आहे, व कर्म ईश्वरार्पण होण्याचें इंगित यांतच आहे. अशा रीतीनें प्रयत्न करीत गेलें असतां—बुद्धीनें अभ्यास करीत राहिलें असतां कर्मांतून नैष्कर्म्याची बुद्धि क्रमाक्रमानें मनुष्याच्या अंगीं बाणूं लागते. यत्नाचें वास्तविक वर्म न समजल्यामुळें मनुष्य पुष्कळ वेळां भलत्याच प्रयत्नाच्या नादीं लागतात, व त्यामुळें त्यांची फसगत होते. 'मुख्य यत्न विचाराचा' असें श्री समर्थांनीं म्हटलें आहे. परमार्थांतील पौरुषप्रयत्न याचा अर्थ आत्मानात्मविचार करणें असा आहे, हें श्रीसमर्थांच्या वरील अर्थपूर्ण वचनावरून व्यक्त होत आहे, व असल्या प्रयत्नाची, अर्थात् विचाराची वेदान्ताला आवश्यकता आहे. अशातऱ्हेनें प्रयत्न करून कामांतून कमातीत स्थितीकडे—आत्मसाक्षात्काराच्या दिव्य आनंदाकडे मनुष्यानें क्रमशः मजल मारीत गेलें पाहिजे, व अखेरीस 'एकमेवाद्वितीयम्' या अद्वैतस्थितीशीं तद्रूप झालें पाहिजे, व हेंच वेदान्त व्यवहारांत आणण्याचें प्रत्यक्ष ध्येय आहे.

## निसर्गांत वेदान्त

जें हृदयांत असतें तेंच बाहेर दिसतें, असा सिद्धान्त आहे. निसर्ग हा एक ईश्वरनिर्मित मार्मिक आदर्श असून तो आपल्या अंतःकरणांतील वृत्तीचें

छायाचित्र आपल्या पुढें तत्काल उभें करतो. किंवा भूतमात्रांचीं हुबेहुब चित्रें काढून देणारा निसर्ग हा एक दिव्य चित्रकार आहे, असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. व हें कामहि तो आपखुषीनें आणि चित्रग्राहकांकडून कशाचीहि अपेक्षा न करतां करीत असतो. परंतु इतकेंच करून तो थांबत नाहीं. प्राणिमात्रांचीं चित्रें रेखाटीत असतां त्यांच्यातील व्यंगांची जाणीव उत्पन्न करून देऊन त्यांना ज्ञानदान देण्याचें कामही तो अव्याहत करीत असतो. या दृष्टीनें निसर्ग हा जीवांचा हितोपदेशक गुरु आहे. हें ज्ञानदानाचें काम निसर्ग करतो हें खरें; पण तें कोणाला ? तर ज्यांचा विवेकाचा डोळा उघडला असेल त्यांना. शेक्सपिअरनें म्हटल्याप्रमाणें ‘ ज्ञानी मनुष्याला अरण्यांतील वृक्षांत आपणापाशीं प्रेमसंवाद करणाऱ्या जिव्हा, पर्वतांतून वहाणाऱ्या निर्झरांत तात्त्विक वाङ्मय आणि पाषाणांत धर्मग्रंथ यांचें दर्शन घडतें. ’ शेक्सपिअर याचें हें वर्णन स्वामींच्यासारख्या वेदान्तनिष्ठ महात्म्याला तंतोतंत लागूं पडतें. वेदान्ताशीं अहोरात्र तन्मय झालेल्या स्वामींना निसर्गांत आत्मप्रतिबिंब दिसतें, व त्याचें दर्शन ते आपल्याला करून देतात. याचें प्रत्यंतर स्वामींच्या ग्रंथांत जागजागीं दिसून येतें, व या भागांतील व्याख्यानांमध्यें आलेल्या कांहीं उदाहरणांवरून हीच गोष्ट दिसून येत आहे. तळें व नदी यांचा एक काल्पनिक संवाद स्वामींनीं दिला असून त्यावरून निरहंकारबुद्धीनें सतत कर्म करण्यासंबंधाचा आणि त्यागासंबंधाचा उपदेश केला आहे. जगांतील पदार्थांचे रंग कसे दिसतात, यासंबंधाची शास्त्रीय उपपत्ति सांगून त्यावरून वेदान्तांतील त्याग हेंच उत्कर्षाचें आणि यशाचें रहस्य आहे, असें तत्व त्यांनीं प्रतिपादिलें असून, तें खरोखर हृदयंगम आहे. जगांतील सर्वतंत्रेच्छ्या मनुष्यांना आपापल्या विषयांत जेव्हां जेव्हां स्फूर्ति होते, तेव्हां तेव्हां ती कशी होते, यासंबंधानें विवेचन करीत असतां वातावरणांतील संपृक्ततेच्या स्थितीशीं स्फूर्तिपूर्वी होणाऱ्या स्थितीचें साम्य त्यांनीं मार्मिक रीतीनें दाखविलें आहे. सूर्य हा सर्व जगाच्या कौतुकाचा विषय होऊन बसलेला आहे. जगांतील मोठमोठ्या कवींना प्रेरणा करण्याचें काम तो अनादिकालपासून करीत आहे. चराचरांतील सर्व जीवनाचा सूर्य हा झराच आहे. व ज्योतिषशास्त्रवेत्त्यांनीं सूर्यापासून होणाऱ्या आपल्या या ग्रहमालेंतील शतशः घडामोडी प्रतिक्षणीं कशा होत आहेत, याचें वर्णन केलें असून सूर्याचें सर्वोपयोगित्व सिद्ध केलें आहे. वेदान्ताचा तर सूर्य हा आत्माच आहे. परमात्म्याच्या सत्तेंत अनंतकोटि ब्रह्मांडांची उत्पत्ति, स्थिति

आणि लय हीं कसकशीं होत असतात, याचें वर्णन वेदान्तग्रंथांतून नेहेमीं सूर्याच्या दृष्टांतानें करण्यांत येत असतें, व स्वामींनींहि परमात्म्याचें ऐश्वर्य आणि सर्व करून अकर्तेपणाची—अलिप्तपणाची आणि साक्षित्वाची स्थिति सूर्याच्या दृष्टांतानें अनेक स्थळीं वर्णन केली आहे. परंतु, स्वामींच्या काव्यप्रतिभेनें याच्याहिपुढें मजल मारिली आहे. त्यांनीं सूर्याला वेदान्तनिष्ठ महात्मा बनविला आहे. इतकेंच नव्हे तर, सर्व स्वामींचा स्वामी बनविला असून, सूर्याच्या आरक्त किरणांचें आणि संन्याशाच्या भगव्या पोशाखाचें साम्य फार बहारीनें दाखविलें आहे.

## स्फूर्तीचें इंगित

सर्व स्फूर्तींचा झरा आत्मा हाच आहे. व जगांतील कवि, कल्पक, शास्त्रज्ञ व तत्त्ववेत्ते वगैरे सर्वांना जेव्हां जेव्हां स्फूर्ति होते, तेव्हां तेव्हां तिचा उदय आत्म्यापासूनच होतो. आत्म्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि वस्तूपासून स्फूर्ति होणें शक्य नाहीं. कारण, तद्व्यतिरिक्त दुसरी वस्तूच अस्तित्वांत नाहीं. कोणत्याहि विषयांत स्फूर्ति होण्याला देहाभिमान नाहींसा व्हावा लागतो, देहाचा विसर पडावा लागतो, व आत्मानुभवांतहि ही स्थिति व्हावी लागते. अशा रीतीनें सामान्य स्फूर्ति आणि आत्मानुभव यांत साम्य आहे. किंबहुना स्फूर्ति ही आत्मानुभवाची ठिणगीच आहे, असें म्हटलें तरी चालेल. परंतु आत्मसाक्षात्कार होणें आणि बौद्धिक विषयांशीं तादात्म्य पावणें यांत अंतर आहे; व तें हें कीं, बौद्धिक विषयाशीं तन्मय होण्यांत देहाचा जो विसर पडतो, तो अप्रत्यक्ष असतो. परंतु आत्मसाक्षात्कारांत जो देहाचा निरास व्हावयाचा असतो तो जाणूनबुजून व्हावयाचा असतो. परंतु तें कसेंहि असलें तरी देहाचा तात्पुरता निरास झाल्याशिवाय कोणत्याहि विषयांत मनुष्याला स्फूर्ति होऊं शकत नाहीं.

## प्रार्थनेचें रहस्य

वेदान्त हें अत्यंत उदात्त आणि व्यापक असें तत्त्वज्ञान असल्यामुळें त्याचें रहस्य ज्यांच्या बुद्धींत बाणलें आहे, त्यांना जगांतील इतर धर्मांचें हृद्गत चांगल्यारीतीनें समजावें, यांत आश्चर्य नाहीं, व स्वामींची स्थितीहि अशीच आहे. त्यांनीं बायबलांतील अनेक महत्त्वाच्या वचनांचा खुलासा केला असून त्यामुळें ख्रिस्ती लोकांच्या दृष्टीनें त्यावर नवा प्रकाश पडला आहे, व ही गोष्ट

दिल्ली येथील रेव्हरंड अँड्र्यूज यांनीं मांजलबुद्धीनें कबूल केली आहे. स्वामींच्या इंग्रजी ग्रंथांना त्यांनीं एक मार्मिक प्रस्तावना जोडली असून त्यांत स्वामींच्या ठिकाणीं दिसून येणाऱ्या प्रतिभासंपन्न कवित्वाचा आणि सरस प्रतिपादन-शैलीचा रे. अँड्र्यूज यांनीं गौरव केला आहे. बायबलांतील कित्येक वचनांचा स्वामींनीं जो उलगडा केला आहे, त्या संबंधानें ते म्हणतात:–' स्वामींच्या व्याख्यानांतील अद्वैतप्रतिपादन खिस्ती विचारांत मुरलेल्या लोकांना जरी कसेसेंच वाटलें, तरी बायबलांतील कांहीं तत्त्वांवर स्वामींनीं नवा आणि अद्भुत प्रकाश पाडिला आहे, यांत शंका नाहीं.' व याचें प्रत्यंतर म्हणून ' आमची रोजची भाकर आम्हांला दे,' व ' मनुष्य केवळ भाकरीनेंच जगणार नाहीं,' या दोन वचनांचा स्वामींनीं जो मेळ घातला आहे, त्याचा उतारा त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत दिला आहे. ' आमची भाकर आम्हांला दे ' या प्रार्थनावाक्याचा अर्थ आमचा योगक्षेम–चरितार्थ नीट चालूं दे, असा सामान्यतः समजला जातो; परंतु हा अर्थ बरोबर दिसत नाहीं, व तसा अर्थ केल्यास ' केवळ भाकरीनेंच मनुष्य जगणार नाहीं,' या बायबलां-तील दुसऱ्या एका वचनाशीं त्याचा विरोध येईल. दुसरी गोष्ट अशी कीं, ' आमची भाकर आम्हांला दे, ' ही प्रार्थना ज्यांना आपल्या योगक्षे-माची चिंता करण्याचें कारण नाहीं, अशा धनिकांनीं आणि राजेमहाराजां-नींहि करावयाची आहे, व अशांनीं ' आमची भाकर आम्हांला दे, ' ही प्रार्थना करणें विसंगत होईल. अर्थात्, या प्रार्थनेचा अर्थ निराळा असला पाहिजे, व तो म्हटला म्हणजे ' माझें म्हणण्यासारखें असें या जगांत कांहीं नाहीं, जें जें आहे तें तें सर्व ईश्वराचें आहे,' अशी बुद्धि मनांत बाळगणें, हा असला पाहिजे, व हा अर्थ अत्यंत सयुक्तिक आहे. ' तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु ' या वाक्यांत जो निरहंकारित्वाचा भाव आहे, तोच बायबलांतील ' आमची रोजची भाकर आम्हांला दे,' या वचनांत असला पाहिजे.

' मागा म्हणजे मिळेल' व ' ठोका म्हणजे उघडेल ' याहि बायबलांतील वचनांचें रहस्य स्वामींनीं स्पष्ट करून दाखविलें आहे. मनुष्याची प्रत्येक इच्छा केव्हांना केव्हां तरी परिपूर्ण झालीच पाहिजे. परंतु इच्छा पूर्ण होण्यापूर्वी त्या इच्छेचा त्याग झाला पाहिजे, व असें झालें तरच ती पूर्ण होईल. इच्छेचा त्याग ही इच्छेचा विषय प्राप्त होण्याची मुख्य अट आहे, व ' मागा म्हणजे मिळेल' या वचनाचा हेतुहि त्यागबुद्धि शिकविण्याचा असला पाहिजे; व ही गोष्ट ' दुःखा-

शिवाय अपत्यदर्शन नाहीं' या बायबलांतील दुसऱ्या एका वचनावरून उघड दिसते. अपत्यदर्शन होण्यापूर्वीं प्रसूतिवेदना होतात व त्या होत असतां अपत्याची इच्छा सर्वस्वी नाहींशी होते; व असें झालें म्हणजे अपत्याची उत्पत्ति होते. प्रसूतिवेदना याचा लक्षणेनें वैराग्य असा अर्थ घेतला पाहिजे, व वैराग्याशिवाय—त्यागाशिवाय कोणत्याहि वस्तूची प्राप्ति होत नाहीं, असा सिद्धान्त आहे. ईश्वराची प्रार्थना केली म्हणजे कोणतीही वस्तु प्राप्त होते, असें जे म्हणतात, त्याचा अर्थ निष्कामतेमुळें कोणत्याहि वस्तूची प्राप्ति होते असाच घेतला पाहिजे. अशा रीतीनें बायबलांतील वचनांचा खुलासा करून मनुष्य पूर्णपणें निष्काम झाला म्हणजे त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात; अर्थात्, आत्मानुभवाच्या निरतिशयसुखाची त्याला प्राप्ति होते; अशा आशयाचें विवेचन स्वामींनीं केलें आहे.

---

# प्रस्तावना

—:*:—

## मानवी जन्माची सार्थकता

आत्मज्ञान संपादन करून शाश्वत आणि निरतिशय सुखाची मोक्षस्थिति प्राप्त करून घेणें, हें मनुष्यजन्माचें इतिकर्तव्य आहे. ईश्वरानें विश्वाचें जें हें अवाढव्य सूत्र उत्पन्न केलें आहे, त्यांतील हेतुहि जीवांची क्रमाक्रमानें उत्क्रान्ति आणि उन्नति होऊन त्यांनीं अखेरीस पूर्णस्थितीला जावें, हाच असला पाहिजे. ही पूर्णत्वाची आणि नित्यानंदाची दिव्यस्थिति प्राप्त करून घेण्याची शक्यता फक्त मनुष्यजन्मांतच असल्यामुळें विश्वांतील यच्चयावत् भूतयोनीं-मध्यें मनुष्ययोनि श्रेष्ठ गणली गेली आहे; व आजपर्यंत होऊन गेलेल्या आर्यपरं-परेंतील सत्पुरुषांनीं नरदेहाचें जें एवढें महत्त्व वर्णन केलें आहे, तेंहि अशाच दृष्टीनें आहे. मनुष्य हा बुद्धिविशिष्ट प्राणी आहे, आणि जगांतील इतर प्राण्यां-पेक्षां ज्ञान प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं जास्त आहे, ह्या गोष्टी निर्विवाद आहेत. परंतु व्यवहारोपयोगी ज्ञान हीच जर मनुष्याच्या श्रेष्ठतेची कसोटी मानण्यांत येत असेल, तर तिचें महत्त्व फारसें मोठें आहे, असें कोणालाहि म्हणतां येणार नाहीं. कारण, उपजीविकेचे पदार्थ श्रमानें पैदा करणें, प्रसंगा-करितां त्याचा संग्रह करणें, विषयसुख भोगणें वगैरे गोष्टी कमीजास्त मानानें

मनुष्याप्रमाणें पशुपक्ष्यादिकांमध्येहि दिसून येतात; व असल्या बाबतींत मनुष्याचें बुद्धिकौशल्य पशुपक्ष्यादिकांपेक्षां थोडेसें जास्ती दिसून येत असलें, तरी त्याबद्दल मनुष्याच्या बुद्धीचें विशेष कौतुक करण्याचें कारण आहे, असें नाहीं. ज्ञानासंबंधानें मनुष्याला मोठी घमेंड असते; पशुपक्ष्यादिकांना अंकित करून घेऊन त्यांच्यावर आपल्याला ताबा चालवितां येतो, अशी मनुष्य नेहमीं प्रौढी मिरवितो. मनुष्याची ही प्रौढी अन्वर्थक आहे असें मानलें तरी त्यांत पुरुषार्थ कोणता ? उत्क्रान्तिदृष्ट्या आपल्यापेक्षां निसर्गतःच कमी दर्जाच्या प्राण्यावर मनुष्याला सत्ता गाजवितां येत असली तरी त्यांत मनुष्यानें भूषण मानावें हें खरोखर अप्रशस्त आहे ! व या सत्ता गाजविण्यांतील हेतु पाहिला तरी तोहि क्षुद्र आणि क्षणभंगुर सुखप्राप्ति हाच आहे;व हा हेतु अभिनंदनीय आहे, असें कोणाला म्हणतां येणार नाहीं. निदान इतकें निश्चित आहे कीं, हें कांहीं मनुष्याच्या मोठेपणाचें लक्षण नव्हे. अशाश्वत विषयांची प्राप्ति करून घेणें हें मनुष्यदेहाचें इतिकर्तव्य खास नाहीं; मनुष्यांच्या बुद्धीचें जें वास्तविक श्रेष्ठत्व आणि महत्त्व आहे, तें इतर प्राण्यांवर सत्ता गाजविण्यांत नसून त्याच्या बुद्धीला तत्त्वज्ञानासारख्या गहन विषयांचें आकलन करतां येतें, व अशा रीतीनें नित्य आणि निर्विषय आनंदाची स्थिति प्राप्त करून घेतां येऊन आत्मदृष्टीनें अखिल भूतमात्रांवर प्रेम करतां येतें, यांतच आहे. व मानवी जन्माची जर कांहीं सार्थकता असेल तर ती हीच असली पाहिजे. ईश्वरावर प्रेम करणें याचा अर्थ ईश्वरी दृष्टीनें भूतमात्रावर प्रेम करणें असाच आहे. आणि मनुष्याला जर कांहीं हक्क असेल तर तो ईश्वरनिर्मित भूतांची सेवा करणें हाच आहे ; त्याच्यावर सत्ता गाजविणें हा निःसंशय नव्हे ! ईश्वरानें सृष्टि निर्माण करण्यामध्यें जो हेतु धारण केला आहे, तो ज्याच्या व्यापक बुद्धींत उतरला व आत्मसाक्षात्कार करून घेऊन तत्त्वदृष्टीनें जो विश्वांतील भूतमात्रांवर प्रेम करूं लागला, अशा मनुष्यालाच सृष्टिरचनेचें कोडें उलगडलें आहे व त्याच्या ठिकाणीं पूर्ण स्थिति बाणली आहे, असें म्हणण्याला हरकत नाहीं.

ज्या देहामध्यें मनुष्याला आपली पूर्ण उन्नति करून घेतां येऊन शाश्वतपदाची प्राप्ति करून घेतां येते, त्याचें महत्व वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे. श्रीसमर्थ म्हणतातः—

धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पाहाहो ।
जो जो कीजे परमार्थ लाहो । तो तो पावे सिद्धीतें ।।

या नरदेहाचेनि संमंधें । बहुत पावले उत्तम पदें ।
अहंता सांडूनि स्वानंदें । सुखी जाले ॥
देह परमार्थी लाविलें । तरीच याचें सार्थक जालें ।
नाहीं तरी हें व्यर्थची गेलें । नाना आघातें मृत्युपंथें ॥

'इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।' असें भगवंतांनीं अर्जुनाला सांगितलें आहे. याचा अर्थ हा कीं, मनुष्यदेह हें एक क्षेत्र आहे, व या क्षेत्रामध्यें पेरलेलें कर्मरूपी बीज अनंतपटीनें वाढण्याची शक्यता आहे. ही शक्यता इतर प्राण्यांच्या देहांमध्यें नाहीं. बीज हें एकाच वेळीं कार्य आणि कारण असूं शकतें. पूर्वीच्या बीजाचें तें कार्य असतें व पुढें उत्पन्न होणाऱ्या बीजाचें तें कारण असतें. म्हणजे तें शेतांत पेरलें असतां त्याची पाहिजे तेवढी वाढ होऊं शकते. परंतु धान्याचा उपयोग जसा पेरण्याकडे केला जातो त्याप्रमाणें खाण्याकडेही केला जातो. अशा रीतीनें धान्याचा उपयोग दोन्ही तऱ्हेनें करतां येतो. प्रारब्धकर्म हेंही एक प्रकारचें धान्य आहे, व त्याचा उपयोग मनुष्यदेहाव्यतिरिक्त बाकीच्या सर्व देहांमध्यें सुखदुःख भोगण्यापुरता होत असतो. मनुष्याशिवाय बाकीच्या सर्व योनी केवळ भोगयोनि होत. पूर्वसंस्कारांनुरूप सुखदुःखांचे भोग भोगावे, इतकेंच त्यांचें कार्य आहे. परंतु मनुष्यदेह हें एक क्षेत्र असल्यामुळें प्रारब्धकर्मफलांच्या भोगाबरोबर त्यांतून नवे संस्कार उत्पन्न होऊं शकतात. या नव्या संस्कारांना-भावी जन्मांच्या या बीजशक्तीला वेदान्ताच्या भाषेंत क्रियमाण असें म्हणतात. हें क्रियमाण ज्या मानानें चांगलें किंवा वाईट असेल त्या मानानें मनुष्याची भविष्यकालीन स्थिति उन्नतीची किंवा अवनतीची होत असते, असा नियम आहे. वामनपंडित यांनीं म्हटल्याप्रमाणें मनुष्यदेह हा मोक्षाचा दारवंटा (उंबरठा) आहे. * अर्थात्, उन्नति किंवा अवनति मनुष्यजन्मांतूनच होत असते. नरजन्माचें

---

* नाना योनींत फिरती । ते नरदेहींच कर्में सारिती । बंधमोक्ष दोनी प्राप्ती । मनुष्यदेहीं ॥ बऱ्या अथवा वाइटा । सर्वत्र जावया येथोनि वाटा । आणि मोक्षाचा दारवंटा । मनुष्य देह ॥ केलीं नाना शरीरें । संतोष मानिला नाहीं ईश्वरें । नरदेह देखोनी आदरें । संतोषला ॥ येथें ब्रह्मविद्येची प्राप्ती । ब्रह्म आत्मत्वें अवलोकिती । याकरितां करुणामूर्ति । संतोषला ॥ आपणासि जाणावें आपण । हेंच नरदेहाचें थोरपण । माझें तुझें हें अवलक्षण । सर्वां देहीं ॥
(निरूपणसागर, अ. ४)

हें महत्त्व निरंतर मनांत वागवून जे पुरुष ह्या संसारसागरांतून तरून जाण्याचा प्रयत्न करतात, आणि स्वतः ब्रह्मानंदाची दिव्यस्थिति अनुभवून इतरांनाहि त्याचे अंशभाक् करितात तेच सत्पुरुष होत; व अशांनांच 'जन्मा आलें त्याचें, आजि फळ झालें साचें,' असे धन्यतेचे उद्गार काढतां येतात.

मनुष्यजन्माचें हें इतिकर्तव्य स्वामींच्या पुढील उद्गारांत प्रतिबिंबित झालें आहे. ते म्हणतातः—'भ्रमनिमग्न लोकांनो! आपल्या आत्मस्वरूपाला विसरूं नका. क्षुद्र वासनांना अंतःकरणांत थारा कां देतां? अखिल चराचराशीं—ईश्वरी ऐश्वर्याशीं आपलें तादात्म्य करून घ्या. हजारों गोपींशीं एकसमयावच्छेदेंकरून क्रीडा करणारा कृष्णच तुम्हीं आहां! समुद्रांत आणि राजवाड्यांत, उपवनांत आणि अरण्यांत, समरांगणांत आणि एकान्ताच्या खोलींत अशा सर्व ठिकाणीं तुमचें सर्वव्यापी स्वरूप भरून राहिलें आहे. अत्युच्च पर्वतांच्या शिखरांवरून राम मोठ्यानें आक्रोश करून सांगत आहे कीं, दैन्य आणि दारिद्र्य यांच्या नांवानें खडे फोडणाऱ्या लोकांनो! तुम्ही निःसंशय सच्चिदानंदस्वरूपी आहां—साक्षात् रामच आहां. देहाभिमानाच्या कारागृहांत आपल्याला बद्ध करून घेऊं नका. जागृत व्हा! जागृत व्हा! मोहरूपी निद्रेला बाजूला सारून जगरूपी स्वप्नाला झुगारून द्या. अखिल विश्वांत ज्याला वास्तविक सत्यता आहे, तें तत्त्व तुम्हींच असतां विपत्ति आणि दैन्य यांच्या चिखलांत विनाकारण कां लोळतां? आत्मसाक्षात्कार करून घ्या, म्हणजे तुमचीं सर्व दुःखें विलय पावून तुम्हीं मूर्तिमंत आनंद, यच्चयावत् आनंदाचा केंद्र बनाल; मग तुमचें वांकडें जगांत कोण करूं शकणार? निदान रामाकरितां तरी विलंब न लावितां आत्मज्ञान संपादन करा. आत्मज्ञान हेंच जर तुमचें प्राप्तव्य आहे, तर तें शक्य तितक्या लवकर प्राप्त करून घ्या. सुखाकरितां तुमची अहोरात्र धडपड चालली नाहीं काय? सुखाकरितांच तुम्ही अविश्रांत परिश्रम करीत नाहीं काय? परंतु या सर्व परिश्रमांतून केवळ श्रमाशिवाय तुमच्या पदरांत काय पडतें? इंद्रियांच्या योगानें सुख प्राप्त करून घेण्याच्या व्यर्थ नादीं लागून आपलें हंसें करून घेऊं नका. इंद्रियांच्या गुलामांनो! बाह्य जगांत सुख शोधण्यासाठीं वणवण करीत फिरूं नका; कारण, अविनाशी सुखाचा सागर तुमच्या अंतःकरणांत आहे; निरतिशय आनंदाचें उगमस्थान तुमच्या हृदयांत आहे; तुमचें सच्चिदानंदस्वरूप हेंच अमृताचें अमृत आहे. अशा त्या अमृतोदधींत आपलें मन आणि हें जग यांना पार विरून जाऊं द्या, आपल्या क्षुद्र अहंकाराला फांटा देऊन परमात्मस्वरूपाच्या

दिव्य आनंदांत मुरून जा. लाडक्यांनो ! या मर्त्यशरीराच्या भिकार झोंपडीची इतकी पर्वा कां करतां ? या अनात्मवस्तूचें पुढें कसें होईल, या चिंतेला अंतःकरणांत यत्किंचित्‌हि थारा देऊं नका; सर्व ऐहिक नात्यागोत्यांच्या भ्रामक कल्पनेला रजा द्या. जे नेत्र ईश्वराचें दर्शन करून घेत नाहींत त्यांच्या खांचा झाल्या तरी पुरवल्या ! ज्या अंतःकरणांत वासनांचा रोग प्रवल झाला आहे तें कींव करण्यालाच योग्य आहे. सर्व नास्तिकपणाचा मल अंतःकरणांतून काढून टाका; व आपल्या पारमार्थिक ऐश्वर्याचा अवलंब करा; व असें झालें म्हणजे जगाची स्तुति किंवा निंदा तुमच्या आनंदाचा भंग करूं शकणार नाहींत; आणि विषयांचा क्षुद्र आनंद किंवा दुःख तुमच्या चित्ताची समता बिघडवूं शकणार नाहीं. परमात्मभावाला आपल्या हृदयरूपी नौकेंत बसवा व झाडून सर्व विषयांना तेथून हांकलून लावा. देहाभिमानरूपी किनाऱ्याला रामराम ठोका; विवेकाचें शीड उभारा व त्यांत ईश्वरी प्रेमाचा—वैराग्याचा वायु भरून जाऊं द्या; व अशा रीतीनें आपल्या नौकेला ईश्वरी साक्षात्काराच्या भरसमुद्रांत यथेच्छ विहार करूं द्या ! ईश्वरी परमामृतांत बुडून गेलेला मनुष्य खरा सुखी होय ! परमात्मस्वरूपाच्या दिव्य आनंदानें उन्मत्त झालेला मनुष्यच खरा भाग्यवान् होय ! जगरूपी भ्रमाच्या अतीत होऊन निरतिशयसुखांत मग्न झालेला पुरुषचा जगाला केव्हांहि वंदनीय होय ! '

अशा रीतीनें नरदेहाचें महत्त्व स्वामींच्या शब्दांनीं वर्णन केल्यानंतर या भागांतील विषयांकडे वळूं.

## विषयप्रवेश

या भागांतील व्याख्यानें ' आत्मसाक्षात्काराचीं साधनें ' या मथळ्याखालीं आलीं आहेत. हीं व्याख्यानें वाचणाऱ्या जिज्ञासू वाचकांच्या मनांत असा प्रश्न स्वाभाविकच उत्पन्न होईल कीं, आत्मसाक्षात्काराचीं कोणतीं साधनें स्वामींनीं प्रतिपादन केलीं आहेत ? या प्रश्नांचें उत्तर देण्याच्या हेतूनें पुढील विवेचनाचा उपक्रम करण्यांत येत आहे.परंतु तसें करण्यापूर्वीं स्वामींच्या एकंदर व्याख्यानांसंबंधानें आणि लेखांसंबंधानें थोडासा खुलासा करणें अवश्य आहे. हा खुलासा येणेंप्रमाणें:—( १ ) स्वामींच्या समग्र ग्रंथांपैकीं तीन चतुर्थांश भाग व्याख्यानरूपाचा आहे व हीं व्याख्यानें सुद्धां अमेरिका, जपानसारख्या परकीय देशांत झालेलीं आहेत. ( २ ) या देशांतील पूर्वपरंपरा आणि आर्यांची पूर्वपरंपरा यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे; व अशा भिन्नधर्मीय आणि भिन्न मतांनुयायी

लोकांच्यापुढें स्वामींना व्याख्यानें द्यावयाचीं असल्यामुळें वेदान्ताच्या सामान्य तत्त्वांचें विवेचन करून वेदान्ताचें महत्त्व त्यांच्या मनावर ठसविणें भाग होतें. व ह्यासाठीं जगांतील धर्मांचा तुलनात्मक विचार करण्याची पद्धति त्यांना स्वीकारावी लागली. (३) याचा स्वाभाविकपणेंच असा परिणाम झाला आहे कीं, स्वामींच्या व्याख्यानांतून तात्त्विक आणि औपपत्तिक विवेचनाचा भाग विशेष प्रमुखत्वानें आला आहे, व प्रत्यक्ष तत्त्वजिज्ञासा उत्पन्न होण्यापूर्वीं वेदान्ताच्या मुख्य मुख्य तत्त्वांचें विवेचन करणाऱ्या व्याख्यानांची फार आवश्यकता असते. (४) अमेरिकेसारख्या परकीय देशांतच कां होईना, पण स्वामी विवेकानंद यांच्या प्रमाणें कर्म, उपासना, ज्ञान वगैरे विषयांसंबंधानें एकेका ठिकाणीं स्वामींच्या व्याख्यानमाला झाल्या असत्या, तर त्यांतून वेदान्ताच्या सर्व अंगांचें सांगोपांग विवेचन त्यांना करतां आलें असतें; व त्यामुळें वेदान्ताच्या औपपत्तिक भागाबरोबर आत्मानुभवाच्या साधनांचा आमूलाग्र विचार एकत्र होऊं शकला असता; परंतु स्वामींचीं व्याख्यानें अशा रीतीनें झालेलीं नाहींत. (५) हिमालयांतील एकांतवासांत असतांना आत्मानुभवाची स्थिति बाणल्यानंतर सर्व जगांत वेदान्ताचा प्रसार करण्याची एक लहर त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली, व त्या लहरीबरोबर सुमारें तीन चार वर्षांच्या अवधींत जें कांहीं कार्य व्हावयाचें तें झालें. हें कार्य अपुरें राहिलें आहे, हें स्वामींनींहि एका ठिकाणीं कबूल केलें आहे. त्यांच्या मनांतून आपल्या विचारांना जास्त पद्धतशीर स्वरूप द्यावयाचें होतें, व कांहीं कांहीं विषयांच्या रूपरेषाहि त्यांनीं आंखून ठेवल्या होत्या; परंतु अकालीं देह पडल्यामुळें सर्व गोष्टी तशाच राहून गेल्या ! (६) अशी स्थिति असल्यामुळें आत्मसाक्षात्काराच्या साधनासंबंधानें एकत्र विचार केलेला स्वामींच्या ग्रंथांतून आढळून येत नाहीं. असें आहे, तरी पुढें दिलेल्या साधनासंबंधानें स्वामींनीं विवेचन केलें नाहीं असें नाहीं. व 'आत्मसाक्षात्काराचीं साधनें' या मथळ्याखालीं जरी या भागांतील व्याख्यानें आलीं आहेत, तरी पुढील भागांतूनहि या विवेचनासंबंधानें विवेचन आलें नाहीं, असें कोणी समजूं नये.

## साधनचतुष्टय

विवेकिनो विरक्तस्य शमादिगुणशालिनः ।
मुमुक्षोरेव हि ब्रह्मजिज्ञासायोग्यता मता ॥ (विवेकचूडामणि)

मनुष्याच्या अंगीं साधनचतुष्टय बाणल्याशिवाय ब्रह्मज्ञानाचा अधिकार येत नाहीं, असा वेदान्तशास्त्राचा अबाधित सिद्धान्त आहे. हीं चार साधनें म्हटलीं म्हणजे (१) नित्यानित्यवस्तुविवेक; (२) इहामुत्रफलभोगविराग; (३) शमादिषट्क संपत्ति; व (४) मुमुक्षा हीं होत. यांच्या व्याख्या पुढें दिल्याप्रमाणें आहेत :—

(१) विवेक :—नित्यमात्मस्वरूपं हि दृश्यं तद्विपरीतगम् ।
एवं यो निश्चयः सम्यग्विवेको वस्तुनः स वै ॥ (अपरोक्षानुभूति)
आत्मस्वरूपची नित्य, दृश्य सर्व अनित्य हें ।
जो निश्चय बरा ऐसा, नित्यानित्यविवेक तो । (वामनपंडित)

(२) वैराग्य :—ब्रह्मादिस्थावरान्तेषु वैराग्यं विषयेष्वनु ।
यथैव काकविष्टायां वैराग्यं तद्धि निर्मलम् ॥ (अपरोक्षानुभूति)
ब्रह्मादिकपदें तुच्छें दुःखदोषानुदर्शनें ।
वाटती काकविष्टाशीं तेंचि वैराग्य निर्मळ ॥ (वामनपंडित)

(३) शमादि सहा साधनें :—
शम :—सदैव वासनात्यागः शमोऽयमिति शब्दितः ।
(अपरोक्षानुभूति)
यत्नें जो वासनात्याग सदा, तो शम बोलिजे । (वामनपंडित)
दम :—निग्रहो बाह्यवृत्तीनां दम इत्यभिधीयते । (अपरोक्षानुभूति)
बाह्यवृत्ती इंद्रियांच्या कोंडणें, दम बोलिजे । (वामनपंडित)
उपरमः—विषयेभ्यः परावृत्तिः परमोपरतिर्हि सा । (अपरोक्षानुभूति)
विषयांपासूनि मन परतावें, निवृत्ति ते । (वामनपंडित)
तितिक्षा :—सहनं सर्वदुःखानां तितिक्षा सा शुभा मता ।
(अपरोक्षानुभूति)
सोसणें सर्व दुःखांचें, तितिक्षा बोलिजेतसे । (वामनपंडित)
सहनं सर्वदुःखानामप्रतीकारपूर्वकम् ।
चिंताविलापरहितं सा तितिक्षा निगद्यते ॥ (विवेकचूडामणि)
सोसणें सर्व दुःखांचें, अप्रतीकारपूर्वक ।
चिंताविलापरहित तितिक्षा तीस बोलिजे ॥
श्रद्धा :—निगमाचार्यवाक्येषु भक्तिः श्रद्धेति विश्रुता । (अपरोक्षानुभूति)

श्रद्धा ते कीं मनीं भक्ति श्रुतीची गुरुउक्तिची । (वामनपंडित)

समाधान :—चित्तैकाग्र्यं तु संलक्ष्ये समाधानमिति श्रुतम् ।
(अपरोक्षानुभूति)

एकाग्रचित्त लक्षावें, तें समाधान बोलिलें । (वामनपंडित)

(४) मुमुक्षा :—संसारबंधनिर्मुक्तिः कथं स्यान्मे कदा प्रभो ।
इति या सुदृढा बुद्धिर्वक्तव्या सा मुमुक्षुता ॥ (अपरोक्षानुभूति)
संसारबंधापासूनी सुटें देवा कसा कधीं ? ।
दृढबुद्धि अशी तीव्र मुमुक्षा तेचि बोलिली ॥ (वामनपंडित)

वरील साधनांशिवाय विचार हें एक साधन म्हणून सांगण्यांत आलें आहे.

विचार :—कोऽहं कथमिदं जातं को वै कर्ताऽस्य विद्यते ।
उपादानं किमस्तीह विचारः सोऽयमीदृशः । (अपरोक्षानुभूति)
मी कोण ? हें कसें झालें ? कर्ता कवण या जगा ? ।
याचें उपादान काय ? हें जाणावें विचार हा ॥ (वामनपंडित)

## श्रवण, मनन व निदिध्यास

वरील साधनचतुष्टयानें संपन्न झाल्यामुळें ज्याला आत्मसाक्षात्काराचा किंवा ब्रह्मानुभवाचा अधिकार प्राप्त झाला आहे, अशा मनुष्यानें ' तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया । उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ' या भगवद्गीतेंतील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सद्गुरूकडे जाऊन त्याच्यापासून आत्मतत्त्वाचें श्रवण करावें, व मनन आणि निदिध्यास यांच्यायोगानें आत्मसाक्षात्कार करून घ्यावा; व तदनंतर निरंतर अभ्यासानें ब्रह्मानंद वृत्तींत बाणवून घ्यावा. साधनचतुष्टयानें संपन्न असलेल्या मनुष्याला साक्षात्कार होण्याला फारसा वेळ लागत नाहीं; परंतु साधनचतुष्टयसंपन्नता अंगीं येणें ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. श्रवण, मनन व निदिध्यास यांची या कामीं विशेषच अपेक्षा आहे; इतकेंच नव्हे तर श्रवणादिकांच्या अभावीं तीं साधनें प्राप्त होणें आणि ब्रह्मानुभव बाणणें या गोष्टी अशक्यच आहेत. अशा दृष्टीनें विचार केला असतां, साक्षात्कार होण्याला श्रवण, मनन व निदिध्यास हींच मुख्य साधनें आहेत, असें म्हणणें भाग आहे.

' आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः । ' अशी बृहदारण्यकश्रुति आहे. याचा अर्थ हा कीं, आत्म्याचें सर्वत्र दर्शन झालें पाहिजे;

व त्यासाठीं त्याचें निरंतर श्रवण, मनन व निदिध्यासन होणें अवश्य आहे. अर्थात् आत्म्याचें दर्शन—सर्वत्र ब्रह्मभाव होणें हें ध्येय असून श्रवण, मनन व निदिध्यास हीं त्यासाठीं करावयाचीं साधनें आहेत.

## विवेक

साधनचतुष्टयामध्यें विवेकाला अग्रस्थान देण्यांत आलें आहे, व तें यथायोग्यच आहे. कारण, विवेक हें मुख्य साधन असून तो वैराग्याचाहि आधार आहे. आत्मवस्तूचें ग्रहण आणि अनात्मवस्तूचा त्याग हीं विवेकाचीं अंगें असल्यामुळें अनात्म आणि भ्रामक विषयांबद्दल वैराग्य उत्पन्न होण्याला विचाराची अत्यंत आवश्यकता आहे. 'विचारावांचूनि न पाविजे समाधान।' असें श्रीतुकाराममहाराज बजावून सांगत आहेत. बुद्धि निरंतर विचारप्रवण होणें, ही आत्मसाक्षात्कार होण्याची आणि तो वृत्तींत बाणण्याची मुख्य अट आहे. जिज्ञासूनें जो निरंतर विचार करावयाचा त्याची दिशा—'जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्' या भगवदुक्तींत दर्शित करण्यांत आली आहे. जन्म, मृत्यु, जरा, व्याधि वगैरे सर्व दुःखरूप असून तीं उत्पन्न होण्याला कारण आपण आहों, आपल्या अज्ञानामुळेंच तीं उत्पन्न झालीं आहेत असें अहर्निश चिंतन करणें हें ज्ञानप्राप्तीचें अत्यंत महत्वाचें साधन आहे. जोंपर्यंत प्रपंच हा सुखरूप आहे आणि विषयसुख हेंच खरें सुख आहे, अशी मनुष्याची भावना आहे, तोंपर्यंत वेदान्ताचे सिद्धान्त फोल आहेत, किंवा निदान बौद्धिक करमणुकीपलीकडे त्यांचा प्रत्यक्ष व्यवहारांत फारसा उपयोग नाहीं, असें मनुष्याला वाटणें सरळ आणि स्वाभाविक आहे, व जगांतील बहुतेक मनुष्यांची स्थिति अशीच असते. निरंतर विषयसुखांत दंग होणाऱ्या मनुष्यांनीं तर वास्तविक पाहिलें असतां पशूंनाहि लाजविलें आहे! आतां एवढी गोष्ट मात्र खरी कीं, मनुष्य हा बुद्धिमान् प्राणी असल्यामुळें विषयसुखांचें हिडिस स्वरूप सुधारणेच्या गोंडस आणि भपकेदार नांवाखालीं झांकून टाकण्याचा तो नेहेमीं प्रयत्न करीत असतो, व पशूंमध्यें हें बुद्धिकौशल्य नाहीं, ही गोष्ट प्रांजलपणें कबूल केली पाहिजे! परंतु भपकेदार नांवानें वस्तूचें वास्तविक स्वरूप बदलत नाहीं आणि शवावर फुलें उधळण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी त्याची भेसुरता यत्किंचितहि कमी होऊं शकत नाहीं! परंतु सामान्य मनुष्यांची प्रवृत्ति कांहींहि असली तरी या जगांत असे कांहीं भाग्यवान् लोक आढळून येतात कीं, जे आपल्या स्वतःच्या आणि इतर लोकांच्या

दुःखमय स्थितींचा विचार करून सर्व ऐहिक विषय दुःखरूप आणि आद्यंतवंत आहेत, अशा विचारानें बुद्धीचा निश्चय करतात; आणि विषयाबद्दल विरक्त होऊन जगांतील सुखदुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे जाण्याचा मार्ग स्वतः आक्रमण करून इतरांनाहि आत्मकल्याणाचा बोध करतात. प्रपंचांत दुःखाचे प्रसंग कोणालाहि येत नाहींत असें नाहीं; परंतु ज्यांच्या ठिकाणीं सारासारविचार करण्याची शक्ति फारशी विकास पावलेली नसते, अशा मनुष्यांना प्रपंच हा दुःखरूप आहे, हा विचारसुद्धां सहन होत नाहीं; व त्यामुळें दुःखाचे आणि विपत्तीचे आघात झाल्यानंतर असे मनुष्य जरी किंचित्काल विव्हळलेले दिसतात, तरी विवेकाच्या आणि आत्मोन्नतीच्या मार्गाकडे त्यांचें पाऊल पडत नाहीं. अशा रीतीनें मनुष्यप्राणी मायेच्या मृगजळांत पोहत आहेत; व विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, या मायेच्या समुद्रांत पुनः पुन्हां गटंगळ्या खात आहेत. परंतु जे विचारवंत पुरुष असतात ते या मायेचें वास्तविक स्वरूप ओळखून तिच्या अतीत होण्याकरितां एकहि उडी न मारतां व आपलें अंग न भिजवितां या तीरावर उभें राहूनहि मायेच्या पैलतीराला जाऊन पोहोंचतात! ज्या विवेकाचा अवलंब केल्यानें अशा तऱ्हेची दिव्यानंदाची उदात्त आणि स्पृहणीय स्थिति मनुष्याला प्राप्त होऊं शकते अशा, विवेकाला साधनचतुष्टयामध्यें अग्रस्थान देण्यांत यावें, यांत मुळींच आश्चर्य नाहीं.

## वैराग्य

सामान्यतः लोकांची अशी समजूत असते कीं, वैराग्य म्हणजे विषयांचा प्रत्यक्ष त्याग करणें; परंतु ही समजूत चुकीची आहे. वास्तविक विचार केला तर भूमीवरून चालणाऱ्या मनुष्याला ज्याप्रमाणें भूमीचा त्याग करतां येणें शक्य नाहीं, त्याप्रमाणेंच जगांत आणि पंचमहाभूतांच्या खोळींत राहणाऱ्या मनुष्याला बाह्यविषयांचा सर्वस्वी त्याग करतां येणें शक्य नाहीं. इंद्रियगोचर होणारे सर्व पदार्थ हे विषयच होत व त्यांचा प्रत्यक्ष त्याग कसा होणार? दुसरी गोष्ट अशी कीं, मनुष्य आपल्या समजुतीप्रमाणें विषयांचा त्याग करण्याचा प्रयत्न करूं लागला, तरी त्याच्या मुळाशीं विषयांसंबंधाचें वैराग्य असतेंच असें नाहीं. बाह्य विषयांचा त्याग आणि वैराग्य यांचा नियमानें नित्य संबंध असतोच असें नाहीं इतकेंच नव्हे तर पुष्कळ वेळां अशी स्थिति असते कीं, बाह्यतः विषयांचा त्याग करण्याच्या प्रयत्नांत चित्तामध्यें मनुष्य विषयांचें ग्रहण करीत असतो. कारण, विषय हे सत्य आहेत व त्यांचा त्याग प्रत्यक्ष झाला पाहिजे, अशी त्यांची

भावना असते. या भावनेच्या पायावर केला जाणारा त्याग हें खरें वैराग्य नसून तो वैराग्याचा फक्त आभास असतो. वैराग्य म्हणजे वैताग किंवा त्रागा खास नव्हे. मर्त्य लोकापासून सत्यलोकापर्यंतची सर्व विषयसुखें दुःखरूप आणि अनित्य आहेत; इतकेंच नव्हे तर इंद्रियगोचर होणारे सर्व विषय तत्वतः मिथ्या आहेत, या भावनेच्या पायावर उभारलें जाणारें वैराग्यच खरें वैराग्य असून तेंच कायम टिकतें. सर्व विषय अनित्य आहेत, या दृढभावनेमुळें चित्तांतून विषयांचा निरास होणें —विषयांवरील आसक्ति नाहींशी होणें यालाच निर्मल वैराग्य म्हणतात. एखादा हापुसचा आंबा मनुष्यापुढें आणिला असतां तो खाण्याची इच्छा त्याच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावी, हें स्वाभाविक आहे, व अशा स्थितींत ती इच्छा मनुष्यानें प्रयत्नानें क्षणभर दाबून टाकली, तरी ती त्याच्या चित्तांतून नाहींशी झाली, असें म्हणतां येणार नाहीं. परंतु तो आंबा गोकाकचा लांकडी आंबा आहे, असें एखाद्या मनुष्यानें त्याला सांगितलें असतां, आंबा खाण्याची इच्छा त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होणें शक्य नाहीं. यावरून विषय दुःखरूप आहेत, इतकेंच नव्हे तर मिथ्या आहेत या दृढ भावनेपासून उत्पन्न होणारें वैराग्य कसें सहज असतें, ही गोष्ट दिसून येईल.

'इंद्रियार्थेषु वैराग्यम्,' या शब्दांनीं भगवंतांनीं वैराग्याचें दिग्दर्शन केलें आहे; व 'एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा'—म्हणजे, हें ज्ञान असून त्याच्या विपरीत भावना असणें हें अज्ञान होय, असें भगवंतांनीं सांगितलें आहे. विषयांबद्दल वैराग्य असणें हें ज्ञान आहे; याचा अर्थ हा कीं, अनात्मवस्तूचा चित्तांतून निरास करणें हें ज्ञानाचें साधन आहे, व हें साधन फार महत्त्वाचें आहे. स्वामींनीं ह्या साधनासंबंधाचें केलेलें वर्णन फार मार्मिक असून यथायोग्य आहे. जोंपर्यंत विषयांच्या भ्रामकतेसंबंधाची भावना उत्पन्न होऊन मनुष्याला विषयांबद्दल तिटकारा वाटूं लागला नाहीं, तोपर्यंत त्याच्या ठिकाणीं परमार्थासंबंधाची आवड उत्पन्न होऊं शकत नाहीं, परंतु मनुष्यावर दुःखांचे आणि विपत्तींचे आघात करून वैराग्याचा त्रिशूळ मनुष्यांना आत्मोन्नतीकडे जोरानें खेंचून नेत असतो. ईश्वरी नियमच असा आहे कीं, प्रत्येक मनुष्यानें आपली आध्यात्मिक उन्नति करून घेतलीच पाहिजे. कारण, तो त्याचा अनादिसिद्ध हक्क आहे. जगांतील यच्चयावत् जीव ईश्वराच्या अनिर्वचनीय मायेमुळें आत्मस्वरूपांतून च्युत झालेले आहेत. अर्थात्, ते केव्हां ना केव्हां तरी आपल्या मूळस्वरूपाप्रत जाऊन पोहोंचलेच पाहिजेत. आकाशांतील मेघांतून पडलेला पाण्याचा बिंदु पृथ्वीवर येतो, व पृथ्वीव-

रील नद्यांशीं एकरूप होऊन समुद्रांत मिसळून जातो; परंतु सूर्याचे किरण त्याला तेथून खेंचून बाष्परूपानें आकाशाच्या स्वतंत्र वातावरणांत पुन्हां नेऊन सोडतात! सूर्याची जगांतील कामगिरी अशा तऱ्हेची आहे, व हीच कामगिरी वैराग्याचा त्रिशूळ नेहेमीं करीत असतो. दुःखांच्या आणि विपत्तींच्या संगिनींचे मारे करीत करीत तो मनुष्यांना त्यांची इच्छा असो किंवा नसो, शाश्वत जीविताच्या स्थितीकडे लवकर किंवा उशीरानें, पण निश्चयानें नेल्याशिवाय राहात नाहीं व मनुष्याचें जर कांहीं शहाणपण असेल तर तें हा ईश्वरी नियम ओळखून आपली लवकर उन्नति करून घेणें यांतच आहे!

'जगांत दुःख कां,' व 'लोकांना दुःखें, विपत्ति, यातना भोगाव्या कां लागतात,' असा एक प्रश्न नेहेमीं करण्यांत येत असतो. लोकांची सामान्यतः अशी समजूत असते कीं, जगांतील दुःखाची उत्पत्ति हा एक मोठा अन्याय आहे. परंतु सूक्ष्मदृष्टीनें विचार केला असतां ही समजूत चुकीची आहे, असें दिसून येतें. ईश्वरी साम्राज्यांत अन्यायाला जागाच नाहीं. ईश्वर प्रेमस्वरूपी आहे; अर्थात् अत्यंत सदय आहे. परंतु तो नुसताच सदय नाहीं, तर तो समहि आहे. समत्व आणि सदयत्व हे ईश्वराचे धर्म आहेत, व खरा न्यायीपणाहि तोच कीं, ज्यांत समता आणि सदयता—न्याय आणि दया यांचा योग्य संयोग झालेला असतो. ईश्वरी नियम असा आहे कीं, जो मनुष्य निसर्गाच्या नियमांप्रमाणें वागतो त्याची उन्नति होऊन त्याला पूर्ण सुख प्राप्त होतें. परंतु जो मनुष्य निसर्गाच्या नियमांचें उल्लंघन करतो, त्याला आपल्या पातकांबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागतें. मनुष्य जगांतील भासमान् होणाऱ्या विषयांवर अवलंबून राहूं लागला म्हणजे ईश्वरी नियमानुसार त्याच्या प्रेमाचे विषय त्याच्यापासून हिरावून घेतले जातात; व आपल्या प्रेमाच्या विषयांचा वियोग आणि तज्जन्य दुःख मनुष्याला सहन करावें लागतें. अशा रीतीनें दुःखाचे आघात होत असतां जगांतील दुःखाच्या अतीत होण्याचा मार्ग काय आहे, यासंबंधानें मनुष्याच्या मनांत विचार घोळूं लागतात व यामुळें तो हळूहळू उन्नतीचा मार्ग आक्रमण करतो. जगांतील दुःखासंबंधाची उपपत्ति अशी आहे; वैराग्याचा त्रिशूळ जें काम करतो तें हें; व यांतच त्या त्रिशूलाची सदयता आहे. जगांतील दुःखांबद्दल ईश्वराला जबाबदार धरणें आणि त्याच्यावर निर्दयतेचा आरोप करणें, हाच वास्तविक अन्याय आहे! ईश्वर हा सम आहे, तो चराचरांतील सर्व घडामोडींचा आणि हालचालींचा साक्षी असून त्यांपासून

सर्वथा अलिप्त आहे. सूर्याच्या सत्तेंत ज्याप्रमाणें सर्व भूतांची उत्पत्ति, स्थिति आणि लय होत असतात, त्याप्रमाणें परमात्म्याच्या सत्तेंत सर्व चराचराची घडामोड चाललेली आहे; व परमात्मा हा सूर्याप्रमाणें तटस्थ आहे. ईश्वर मनुष्याचें कर्म उत्पन्न करीत नाहीं; फक्त त्याच्या सत्तेंत कर्माचें फल प्राप्त होत असतें; व कर्मानुसार दुःखाचें फल भोगावें लागलें तर त्याबद्दल ईश्वराला जबाबदार न धरतां, मनुष्यानें आपल्या अज्ञानालाच जबाबदार धरलें पाहिजे! सूर्याच्या सत्तेंत सर्व वस्तु प्रकाशित होतात व त्याच्या सत्तेंत एकाच वेळीं अनेक कार्यें होत असतात. ग्रीष्मऋतूंतील सूर्याच्या प्रखर किरणांपासून ज्याप्रमाणें मृगजळ उत्पन्न होतें, त्याचप्रमाणें पृथ्वीवरील सर्व झाडांना टवटवी आणणारा वसंतऋतुहि उत्पन्न होतो. अशा रीतीचीं शेंकडों लोकोपयोगी कार्यें त्याच्यापासून दरक्षणीं उत्पन्न होत असतां, त्यांचा विचार न करतां सूर्य मृगजळ उत्पन्न करून आपल्याला फसवतो, अशी तक्रार हरिणांनीं करावी, हें गैरशिस्त नाहीं काय? मृगजळाचें वास्तविक स्वरूप न ओळखल्यामुळें हरिणें मृगजळाच्या पाठीस लागत असलीं, तर त्याचा दोष त्यांच्या अज्ञानाकडे आहे, सूर्याकडे खास नाहीं! याच न्यायानें भ्रामक विषयांचें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें मनुष्यांना दुःखें आणि विपत्ति भोगाव्या लागल्या तर त्याचा दोष त्यांच्या स्वतःच्या अज्ञानाकडे आहे, ईश्वराकडे नाहीं. ईश्वराचें दयाळुत्व निसर्गांत सर्वत्र ओतप्रोत भरलेलें आहे. ज्याला डोळे असतील त्याला तें दिसेल आणि कान असतील त्याला तें ऐकूं येईल, व ईश्वरी नियमांप्रमाणें वागून तो आत्मोन्नति करून घेईल.

## श्रद्धा

साधनचतुष्टयांतील तिसरें अंग शमादिकांचा अभ्यास हें आहे. या सहा साधनांपैकीं बहुतेक सर्व विवेक आणि वैराग्य यांच्या अंगभूत असून त्यांच्यामुळें साध्य होणारीं असल्याकारणानें त्यांच्या संबंधानें निराळा विचार करण्याचें कारण नाहीं. शमादि सहा साधनांमधील श्रद्धेसंबंधानें मात्र थोडासा विचार करणें अवश्य आहे. श्रद्धा हें निःसंशय तारक तत्त्व आहे. श्रद्धा हें परमार्थप्राप्तीचें बीज आहे. ज्या मनुष्याची जशी श्रद्धा असेल त्याप्रमाणें त्याची भावी स्थिति होत असते. कारण, पुरुष हा श्रद्धामय आहे. 'श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः।' असें भगवंतांनीं अर्जुनाला सांगितलें आहे. परंतु श्रद्धेसंबंधानें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, जगांतील हव्या त्या वस्तूवर किंवा विषयावर विश्वास ठेवणें,

ही श्रद्धा नसून ती केवळ माया आहे, व तिचा परिणाम दुःखांत झाल्याशिवाय राहात नाहीं. साधनचतुष्टयांत जी श्रद्धा सांगितली आहे, ती सच्छास्त्र आणि सद्गुरु यांच्या वचनावरील श्रद्धा होय. ईश्वराचें अस्तित्व मानणें, आणि त्याची भक्ति केल्यानें मोक्षस्थिति प्राप्त होईल अशी दृढ भावना असणें, हीहि श्रद्धाच आहे. ही श्रद्धा मनुष्याला भवसागरांतून तरून जाण्याला कारणीभूत होते; व असली श्रद्धा ज्याच्या अंतःकरणांत नसेल त्याची उन्नति होणें शक्य नाहीं.

## मुमुक्षा

प्रत्येक मनुष्याला सुखाची इच्छा असते, व मोक्ष ही नित्यसुखाची स्थिति असल्यामुळें प्रत्येक मनुष्याला एका दृष्टीनें मोक्षाची इच्छा आहे, असें म्हटलें तरी चालेल. परंतु नुसत्या सुखाच्या इच्छेला 'मुमुक्षा' असें वास्तविक म्हणतां येणार नाहीं. कारण, मुमुक्षेमध्यें बंधाची तीव्र जाणीव उत्पन्न झालेली असते; तसेंच आत्मानुभवाशिवाय मोक्षस्थिति प्राप्त होऊं शकत नाहीं, असें श्रवणादिकांच्या योगानें सम्यग्ज्ञान झालेलें असतें; व अशा रीतीनें उत्पन्न होणाऱ्या मोक्षाच्या तीव्र इच्छेलाच मुमुक्षा असें म्हणतात.

## सत्संग

आत्मानुभव होण्याला सत्संग हें अत्यंत महत्वाचें साधन आहे. नवविधा-भक्तीमधील श्रवणभक्ति ही पहिली आहे, व श्रवण म्हटलें म्हणजे गुरूची आवश्यकता आलीच. सत्संगाशिवाय आत्मसाक्षात्कार होणें शक्य नाहीं, हा सिद्धान्त श्री समर्थांनीं अतिशय स्पष्ट आणि जोरदार शब्दांत सांगितला आहे. ते म्हणतातः—

असो जयासी मोक्ष व्हावा, तेणें सद्गुरू सेवावा ।
सद्गुरूवांचोनि मोक्ष पावावा, हें कल्पांतीं न घडे ॥ १ ॥

तसेंच वामनपंडित सांगतातः—'वेदान्तही वाचलिया कळेना, तें [ आत्मतत्व ] श्रीगुरूवांचुनि आकळेना.'। व श्रवणाचें महत्व याचसाठीं आहे. परंतु या संबंधानें ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, शिष्यानें गुरु करावयाचा नसतो, तर तो ईश्वरी कृपेनें प्राप्त व्हावयाचा असतो; व अशा रीतीनें खऱ्या गुरूची प्राप्ति झाली नाहीं, तोंपर्यंत मनुष्यानें सत्पुरुषांच्या ग्रंथांचें श्रद्धेनें परिशीलन करणें, आणि ईश्वराची भक्ति करणें, या साधनांनीं आपली पात्रता वाढवीत राहावें, हेंच युक्त आहे. अभ्यासानें आपली योग्यता वाढविणें हें काम आपल्या स्वाधीन असून तें आपण करावें, व पुढील काम सर्वसमर्थ आणि करुणाघन ईश्वराकडे सोंपवावें.

## भक्ति

सत्संगाशिवाय आत्मज्ञानप्राप्ति नाहीं हें जितकें खरें आहे, तितकेंच ईश्वरानुग्रहाशिवाय सत्संग प्राप्त होऊं शकत नाहीं, हेंहि खरें आहे. विवेकवैराग्यादि सर्व साधनें ईश्वरभक्तीनें प्राप्त होऊं शकतात, असें श्रीमच्छंकराचार्य सांगतात.

स्ववर्णाश्रमधर्मेण तपसा हरितोषणात् ।
साधनं प्रभवेत्पुंसां वैराग्यादिचतुष्टयम् ॥
( अपरोक्षानुभूति )

स्ववर्णाश्रमधर्मातें अर्पितां हरि तोषतो ।
त्या तपें साधतीं चारी वैराग्यादिक साधनें ॥
( वामनपंडित )

या मुद्यासंबंधानें योगवासिष्ठांत पुढील श्लोक आलेला आहेः—

यवन्नानुग्रहःसाक्षाज्जायते परमेश्वरात् ।
तावन्न सद्गुरुं कश्चित् सच्छास्त्रमपि नो लभेत ॥

याचा आशय रंगनाथांच्या पुढील ओंवींत आला आहेः—ईश्वरानुग्रहें विषयविरक्ति । ईश्वरानुग्रहें शमदमप्राप्ति । ईश्वरानुग्रहें विमलभक्ति । साधुसंगति ईश्वरानुग्रहें ॥ १ ॥

यावरून साधनचतुष्टय अंगीं बाणणें, तसेंच सत्संग प्राप्त होऊन शास्त्रहृद्गत समजणें वगैरे सर्व गोष्टी ईश्वरभक्तीपासून प्राप्त होतात, हें ठरतें. आत्मज्ञान होण्याचें तर ईश्वरभक्ति हें एकच साधन आहे, दुसरें कोणतेंहि नाहीं, हा सत्पुरुषांनीं वेळोवेळीं सांगितलेला सिद्धान्त प्रत्येक जिज्ञासूनें अवश्य लक्षांत बाळगला पाहिजे. ‘अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ।’ असें भगवान् अर्जुनाच्या मिषानें सर्वांना सांगतात. या अनित्य आणि दुःखरूप मर्त्यलोकांत ईश्वरभक्ति हेंच मनुष्याचें श्रेष्ठ कर्तव्य आहे असें यावरून ठरतें. आतां, ईश्वराची भक्ति कशी करावी, नामस्मरणाचें रहस्य काय, वगैरे मुद्यांसंबंधानें विवेचन करणें हा एक स्वतंत्र विषय आहे; व त्यासंबंधाचें विवरण पुढील भागांतून यथानुक्रमें करण्यांत येईल.

## आत्मसाक्षात्कार केव्हां होईल ?

जिज्ञासूच्या मनांत असा एक प्रश्न नेहेमीं येत असतो कीं, आपल्याला आत्मसाक्षात्कार केव्हां होईल ? या विषयासंबंधाचीं साधुसंतांचीं वचनें पाहिलीं

तर तीं निरनिराळीं आहेत, असें दिसून येतें. सद्गुरूची भेट झाली म्हणजे ज्ञानप्राप्तीला मुळींच वेळ लागत नाहीं; कारण, 'आपणांसारिखे करिती तात्काळ। नाहीं काळ वेळ तयांलागीं ॥' असा सद्गुरूचा महिमा आहे, असें एका ठिकाणीं म्हटलेलें आढळतें; तर दुसऱ्या ठिकाणीं 'तुका म्हणे नाहीं चालत तांतडी। प्राप्तकाळ घडी आल्यावीण ॥' म्हणजे साक्षात्काराच्या बाबतींत उतावीळ होऊन उपयोगी नाहीं; कारण, योग्य वेळ आली व आपली तयारी झाली म्हणजे साक्षात्कार झाल्याशिवाय राहाणार नाहीं, असें म्हटलेलें आढळून येतें. अशा तऱ्हेचीं वचनें परस्परविरोधी आहेत असें वाटून जिज्ञासूच्या मनांत शंका उत्पन्न होतात व आत्मसाक्षात्काराची वेळ कांहीं ठरलेली आहे कीं काय व असल्यास ती कोणती? असे प्रश्न स्वाभाविकपणेंच उत्पन्न होऊन ते जिज्ञासूला गोंधळून टाकतात. या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, चित्तांतून रजतमादि अशुभ संस्कार पूर्णपणें नाहींसे होऊन तें शुद्ध झालें म्हणजे त्याक्षणीं आत्मसाक्षात्कार होतो. साक्षात्कार होण्याला चित्तशुद्धि आणि प्रत्यग्वृत्ति होणें अवश्य आहे, एवढी गोष्ट निःसंशय ठरलेली आहे. परंतु, ही स्थिति अमुक वेळीं होईल असें निश्चयानें सांगतां येणार नाहीं. ही स्थिति प्राप्त करून घेणें अभ्यासाधीन आहे; अर्थात्, ज्या मानानें मनुष्य तीव्रतेनें अभ्यास करील त्या मानानें साक्षात्काराची स्थिति लवकर येऊं शकते. या मुद्यावर जास्त प्रकाश पडण्यासाठीं दोन तीन ब्रह्मसूत्रें व त्यांवरील श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्यांतील प्रस्तुत विषयाला आवश्यक असलेला भाग संक्षेपरूपानें यापुढें दिला आहे. सदरहू भाग धर्ममार्तंड काशीनाथ वामन लेले शास्त्री यांच्या शारीरभाष्याच्या ग्रंथांतून घेतला आहे व पुढें दिलेल्या सूत्रांचें सविस्तर विवरण जिज्ञासु वाचकांनीं सदरहू ग्रंथांतून वाचावें, अशी विनंति आहे.

आवृत्तिरसकृदुपदेशात् । लिङ्गाच्च । ( ब्र. सू. ४।१।१-१।२ ) 'श्रवणादि मानसकर्मांची आवृत्ति विवक्षित आहे. कारण, श्रुतिमध्यें तसा अनेकदां निर्देश केलेला आहे. लिंगावरूनहि श्रवणादिकांची आवृत्ति सिद्ध होत आहे,' असा या सूत्रांचा अभिप्राय आहे. 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः । (आत्माच दर्शनार्ह आहे, व त्याचें ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां आचार्य व शास्त्र ह्यांच्यापासून प्रथम आत्मविषयक श्रवण करावें, नंतर त्याचें मनन करावें व तदनंतर त्याचें निरंतर ध्यान करावें.) तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत । (विवेकी पुरुषानें आत्म्याचें ज्ञान करून घ्यावें व वैराग्यादि साधनांनीं तें पूर्ण करावें.) सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः।

( आत्म्याचें ज्ञान करून घ्यावें व त्याचेंच विज्ञान करून घ्यावें. ) ह्या व अशा प्रकारच्या श्रुतिसंबंधानें श्रवणादि मानसकर्म एकेकदांच करावें, किंवा त्यांची आवृत्ति करावी, असा संशय उपस्थित होतो.

पूर्वपक्षी:—प्रयाजादिकांप्रमाणें ( श्रवणादिकांचें अदृष्ट फल असल्यामुळें ) श्रवणादि मानसकर्म एकेकदांच करावें, व तसें केल्यानें शास्त्रानें विहित असलेलें कर्म केल्यासारखें होईल. आवृत्तिवाचक शब्द श्रुतिमध्यें नसतांना श्रवणादिकांची आवृत्ति करूं लागल्यास शास्त्रांत नसलेलें केल्यासारखें होईल.

सिद्धान्ती:—श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः । इत्यादि प्रकारचे अनेकदां उपदेश ज्यांत आहेत, अशा श्रुति दर्शविल्या आहेत.

पूर्वपक्षी:—असें असलें तरी 'श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः । ' या तीन शब्दांनीं जीं तीन कर्में करावयास सांगितलीं आहेत त्यांची एकेकदां आवृत्ति करावी. श्रवण, मनन, निदिध्यास हीं अनेकदां करावीं, असें ह्या श्रुतिमध्यें विवक्षित नाहीं. वेद, उपासीत इत्यादि प्रकारचे एकेकदांच उपदेश ज्या श्रुतिवाक्यांमध्यें आहेत, त्यांमध्यें तर आवृत्ति विवक्षित नाहीं, हें तर उघडच आहे.

सिद्धान्ती:-श्रवणादि प्रत्ययांची आवृत्ति करणें अवश्य आहे. कशावरून म्हणाल तर अनेकदां तसा उपदेश असल्यावरून. 'श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः ' इत्यादि प्रकारचा जो अनेकदां उपदेश एकाच श्रुतिमध्यें आहे, तो प्रत्ययावृत्ति सुचवीत आहे.

पूर्वपक्षी:—श्रुतिमध्यें जीं श्रवणादि कर्में सांगितलीं आहेत तीं सर्व एकेकदां करावीं, असें सांगितलें आहे.

सिद्धान्ती:—हें म्हणणें बरोबर नाहीं. श्रवणादिकांचें पर्यवसान ज्ञानप्राप्तीमध्यें व्हावयाचें असल्यामुळें तें प्राप्त होईपर्यंत त्यांचें पुनःपुन्हां अनुष्ठान होणें अवश्य आहे. दृष्टफल देणाऱ्या कंडनादि कर्मांचें पर्यवसान ज्याप्रमाणें तंडुलादिकांच्या निष्पत्तीमध्यें होतें, त्याचप्रमाणें ज्ञानोत्पत्तिरूप दृष्टफल देणाऱ्या श्रवणादिकांचें पर्यवसान ज्ञानोत्पत्तीमध्यें आहे ; आणि हीं कर्में पुनःपुन्हां केल्यानेंच फलद्रूप होणारीं आहेत. शिवाय, आवृत्तिरूप गुण ज्या क्रियेमध्यें गर्भित आहे, अशीच क्रिया उपासन व निदिध्यासन या शब्दांनीं दाखविली जात असते. 'गुरूची उपासना करतो,' 'राजाची उपासना करतो,' असे जे प्रयोग व्यवहारामध्यें केले जातात, ते गुरुप्रभृतींच्या शुश्रूषेविषयीं जो सर्वदा तत्पर असतो त्याच्याच संबंधानें केले जातात. त्याचप्रमाणें 'प्रोषितनाथा ( जिचा नाथ प्रवासाला गेलेला

आहे अशी ) स्त्री, पतीचें ध्यान करीत असते ; ' असा प्रयोग जी पतीचें उत्कंठेनें निरंतर स्मरण करते तिच्याच संबंधानें होत असतो. उपनिषदांमध्यें विद् व उपास् या धातूंचे प्रयोग एकाच अर्थानें केलेले आढळून येतात. कांहीं ठिकाणीं उपक्रमामध्यें विद् धातूचा प्रयोग असून उपसंहारामध्यें उपास् धातूचा प्रयोग असतो, तर कोठें उपक्रमामध्यें उपासीत असें पद असून उपसंहारामध्यें वेद असें पद असतें. तस्मात् ज्या श्रुतिमध्यें वेद, उपासीत इत्यादिकांपैकीं एकाच शब्दानें विधान केलेलें असतें, त्या श्रुतिमध्येंहि आवृत्तिच विवक्षित असल्याचें सिद्ध आहे. 'श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः ' इत्यादि प्रकारच्या श्रुतींत तर प्रत्ययाचा अनेक वेळां उपदेश आलेला असल्यामुळें तो आवृत्तींचा सूचक आहेच आहे. लिङ्गावरूनहि श्रवणादि प्रत्ययांची आवृत्ति सिद्ध होत आहे. उद्गीथोपासनेसंबंधाच्या श्रुतिमध्यें ' पर्यावर्तयत् ' असें पद आहे. पर्यावर्तन म्हणजे पुनः पुन्हां विवक्षित भावना करणें. सर्व उपासनांच्या ठिकाणीं उद्गीथोपासनेंतील ध्यानसादृश्य असल्यामुळें सर्व उपासनांमध्यें प्रत्ययाची आवृत्ति सिद्ध होत आहे.

पूर्वपक्षीः—ज्या प्रत्ययांचें फल साध्य आहे त्यांच्यासंबंधानें आवृत्ति असो ; कारण, आवृत्तीमुळेंच त्यांचें विशेष फल साध्य होण्याचा संभव आहे. परंतु स्वभावतःच नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त असें परब्रह्मच आपण आहों, असें ज्ञान उत्पन्न होण्यासाठीं आवृत्ति काय म्हणून ?

सिद्धान्तीः—तत्त्वमसि, असें एकदां श्रवण करतांच ब्रह्म मी आहें, असा साक्षात्कार श्रोत्याचे ठिकाणीं होणें शक्य नसल्यामुळें श्रवणादिकांची आवृत्ति मानणें भाग आहे.

पूर्वपक्षीः—पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण आवृत्तीनेंहि ती गोष्ट होणें अशक्यच आहे. तत्वमसि या प्रकारचें वाक्य एकदां ऐकल्यानंतर तें साक्षात्कार उत्पन्न करण्यास असमर्थ असेल, तर त्याच वाक्याची आवृत्ति झाली असतां त्यापासून श्रोत्याच्या ठिकाणीं साक्षात्कार उत्पन्न होईल, ही आशा व्यर्थ आहे.

सिद्धान्तीः—तत्वमसि हें वाक्य ऐकतांच ब्रह्मात्मत्वाचा अनुभव घेण्यास जो समर्थ असेल त्याच्याविषयीं आवृत्ति व्यर्थ होईल ; परंतु जो समर्थ होणार नाहीं त्याच्यासंबंधानें आवृत्तीचा उपयोग आहेच. छान्दोग्योपनिषदामध्यें श्वेतकेतूनें पुनः पुन्हां प्रश्न केल्यावरून त्याच्या गुरूनें तत्वमसि एवढ्याच वाक्याचा अनेक वेळां उपदेश केला आहे. तत्वमसि हें वाक्य त्वं पदार्थाचें तत् पदार्थत्व कथन करीत आहे. वाक्यार्थज्ञान हें पदाच्या अर्थाच्या ज्ञानावर नेहेमीं अवलंबून असतें ; व

म्हणून तत् व त्वं ह्या पदांचा खरा अर्थ निश्चित् होण्यासाठीं शास्त्र व युक्ति यांचा अवलंब करणें अवश्य आहे.

ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबन्धे तद्दर्शनात् ( ब्र. सू. ३।४।१६–५१ ) ' सुरू झालेल्या ज्ञानोत्पत्तिसाधनाला कांहीं प्रतिबंध नसल्यास ह्या जन्मींहि ज्ञान होतें. कारण, श्रुतिमध्यें तसें दृष्ट आहे '; हा या सूत्राचा अर्थ आहे. ज्ञान ह्या जन्मींच साध्य होत असतें किंवा पुढल्या कोणत्या तरी जन्मांत तें प्राप्त होतें, असा प्रश्न उत्पन्न होतो.

पूर्वपक्षी:—ह्याच जन्मीं ज्ञानरूपी फल प्राप्त होत असतें. ज्ञान हें श्रवणादिकां-पासून उत्पन्न होतें; व पुढल्या जन्मीं ज्ञान प्राप्त व्हावें अशा उद्देशानें ह्या ज्ञान-साधनांविषयीं या जन्मीं कोणीहि प्रवृत्त होत नाहीं; ह्याच जन्मामध्यें ज्ञान प्राप्त व्हावें अशा उद्देशानें जो तो श्रवणादि साधनांचा अवलंब करतांना दिसतो. यासाठीं ज्ञान ह्या जन्मींच होतें असें ठरतें.

सिद्धान्ती: —प्रस्तुतप्रतिबंध नसल्यास ह्या जन्मींहि ज्ञान उत्पन्न होऊं शकतें. नाहीं तर प्रतिबंधक्षय होईपर्यंत ज्ञान होऊं शकत नाहीं. ज्ञानाला प्रतिबंधक होणारीं पातकें दोन प्रकारचीं असतात. (१) प्रारब्धफलक, म्हणजे ज्यांच्या फलाला आरंभ झालेला आहे अशीं व (२) अप्रारब्धफलक, म्हणजे ज्यांच्या फलाला आरंभ झालेला नाहीं अशीं. जीं पातकें प्रारब्धफलक असतात, त्यांचा क्षय फलोप-भोगानेंच होत असतो, व तसा क्षय झाल्याशिवाय विविदिषा म्हणजे आत्म-विषयक ज्ञान प्राप्त करून घेण्याची इच्छाच उत्पन्न होत नाहीं. परंतु ज्या पात-कांचा फलारंभ झालेला नसतो, त्यांचा क्षय श्रवणादिकांच्या अनुष्ठानांनीं होत असतो; व निदिध्यासनाचा परिपाक होईपर्यंत त्यांचा प्रतिबंध संभवनीय असतो. श्रवणायापि.........कुशलानुशिष्टः ( कठोपनिषद् ) ही श्रुति आत्म्याचें दुर्बो-धत्व दर्शवीत आहे. पुष्कळांना आत्म्यासंबंधाचें श्रवणहि दुर्लभ असतें. कारण, आत्मप्रतिपादन करणारा आचार्य दुर्लभ असतो. पुष्कळांना आत्म्यासंबंधाचें श्रवण करूनहि ज्ञान होत नाहीं. कारण, आत्म्याचें ज्ञान करून घेणारा कुशल असावा लागतो. तात्पर्य, वेदान्तश्रवण झाल्यानंतरहि जर फलारंभ झालेलें ध्यान-प्रतिबंधक पातक असेल, तर भोगानें त्याचा क्षय होईपर्यंत ध्यानसंपत्ति संभवनीय नसल्यामुळें आत्मज्ञान होणें दुर्लभ आहे. गर्भाशयामध्यें अस-तांनाच वामदेवाला ब्रह्मस्वरूप प्राप्त झालें, असें सांगणारी श्रुति, पूर्वजन्मांत करून ठेवलेल्या साधनांमुळें जन्मांतरीं ज्ञान उत्पन्न होत असल्याचें

दर्शवीत आहे. कारण, गर्भाशयामध्यें असणाऱ्याच्या हातून त्यावेळीं कोणत्याहि प्रकारच्या ज्ञानसाधनांचें अनुष्ठान होणें शक्य नाहीं. 'योगाभ्यास करीत असतां मृत्यु आल्यास पुरुषाला कोणती गति प्राप्त होत असते,' असें अर्जुनानें विचारलें असतां बाबारे, 'शुभकर्म करणाऱ्या कोणालाहि दुर्गति प्राप्त होत नाहीं, असें सांगून व पुनरपि 'त्याला पुण्यलोकप्राप्ति होते व तो साधुकुलामध्यें जन्माला येतो;' असें सांगून 'त्या साधुकुलांत जन्मल्यानंतर पूर्वदेहसंबंधी बुद्धियोग त्याला प्राप्त होतो,' येथपासून तों 'अनेक जन्मांनीं सिद्ध होऊन तो ज्ञानी मोक्षाला जातो,' येथपर्यंत भगवान् वासुदेवानें गीतेमध्यें हेंच दर्शविलें आहे. तस्मात्, ज्ञानोत्पत्ति या जन्मीं किंवा जन्मांतरीं होणें हें प्रतिबंधक्षयावर अवलंबून आहे, असें सिद्ध होतें.

### साक्षात्काराची स्थिति

आत्मसाक्षात्काराची स्थिति खरोखर अद्भुत आहे. परंतु या दिव्य स्थितीचें शब्दांनीं यथास्थित वर्णन करणें अशक्य आहे. 'यतो वाचो निवर्तन्ते, अप्राप्य मनसासह' या शब्दांनीं साक्षात्काराची स्थिति वर्णनातीत आहे, असें श्रुति सांगत आहे. ज्या परब्रह्माच्या ठिकाणीं जाण्याच्या प्रयत्नांत मन पांगुळतें, ज्या ठिकाणीं द्रष्टा, दृश्य व दर्शन, ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान वगैरे त्रिपुटी पार मावळून जातात, अशा ठिकाणीं शब्दाला रिघाव मिळणें अशक्य व्हावें, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ज्या स्थितीचें वर्णन 'नेति' 'नेति' या निषेधक शब्दांपलीकडे श्रुतीलाहि करतां येत नाहीं, त्या ठिकाणीं मनुष्यानें केलेलें कोणतेंहि वर्णन निःसंशय अपुरेंच ठरणार, हें अगदीं उघड आहे. परंतु वास्तविक स्थिति अशी आहे तरी शब्दाचा पल्ला जेथपर्यंत जाऊन पोहोंचूं शकतो, तेथपर्यंत मनुष्य आपल्या अनुभवाचें वर्णन केल्याशिवाय कधींहि राहात नाहीं, व 'नेति' 'नेति' शब्द उच्चारण्यांत श्रुतीचा आशयहि ब्रह्म हें वर्णनातीत परंतु स्वसंवेद्य आहे, असें दर्शित करण्याचाच आहे. सत्पुरुषांनीं केलेल्या साक्षात्काराच्या वर्णनाकडेहि अशाच दृष्टीनें पाहिलें पाहिजे.

साक्षात्कार होण्याला शुद्धसत्त्वाची आवश्यकता आहे, व चित्त शुद्धसत्त्वमय झाल्याशिवाय आत्मदेवाचें दर्शन होऊं शकत नाहीं, असा सिद्धान्त आहे; व तो मुण्डकोपनिषदांतील पुढील मंत्रांत आला आहे:—'न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा। ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः॥' यासंबंधानें योगवासिष्ठांत असा श्लोक आहे:—'न शास्त्रैर्नापि

गुरुणा दृश्यते परमेश्वरम् । दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्वस्थया धिया ।' याचा अर्थ हा कीं, वास्तविक पाहूं गेलें तर शास्त्र किंवा गुरु ह्यांच्या योगानें परमेश्वरांचें दर्शन होत नाहीं; तर बुद्धि सत्त्वांत स्थिर झाली म्हणजे तिच्या योगानें आत्म्याचें दर्शन घडतें. अशा रीतीनें बुद्धीला शुद्धसत्त्वाची भरती येऊं लागली म्हणजे जी स्थिति होते ती दृष्टान्तानें वामनपंडितांनीं अशी वर्णन केली आहे:—

जैशा विशाळ दरडी, सरितादि तीरीं,
त्यांचें नदींत दिसतें प्रतिबिंब नीरीं ।
येऊनि पूर दरडीवरि जाय पाणी
तेव्हां न देखति जळीं प्रतिरूप कोणी ॥
तें ओहोटोनि जळ ये सरितेंत जेव्हां,
भासे पुन्हां दरडिचें प्रतिबिंब तेव्हां ।
पाणी नदीमधिल बुद्धि तसी शरीरीं
जीवात्मता—दरडिचें प्रतिबिंब नीरीं ॥
सर्वत्रही धरणिबिंब अनंत जैसें
मिथ्या शरीर सरितादिकरूप तैसें ।
मातीच सत्य कलशादि असत्य रूपें,
पृथ्वी खरी नदितटाक मृषा ( असत्य ) स्वरूपें ॥
आधार एक धरणी उदकासि जैसी
चैतन्य-भूमि उदकोपम बुद्धि तैसी ।
आधार होउनि जळीं प्रतिरूप रूपें
पृथ्वी तसी द्विविध बुद्धिस चित्स्वरूपें ॥
दृष्टान्त येरिति तथापिहि एकदेशी
चैतन्य सर्वगत बुद्धिजळीं प्रकाशी ।
बिंबावरी प्रसरते शुभ बुद्धि जेव्हां,
बिंबैक्य पावत असे प्रतिबिंब तेव्हां ॥ [कर्मतत्त्व, अ. ४]

वरील उताऱ्यावरून ही गोष्ट उघड होत आहे कीं बुद्धिरूपी नदीला शुद्धसत्त्वाचा पूर आला म्हणजे प्रतिबिंब अर्थात जीवदशा नाहींशी होऊन बिंबात्मताच

शिल्लक रहाते! अशावेळीं जी दिव्य आनंदाची स्थिति होते, तिचें वर्णन पुढील अभंगांत आलें आहेः—

स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण,
अंतरींची खूण पावूनीयां ।
पुंजाळले नेत्र झाले अर्धोन्मीलित,
कंठ सद्गदित रोमांच आले ।
चित्त चाकाटिलें स्वरूपामाझारीं,
न निघे मःघारीं सुखावलों ।
सुनील प्रकाश उदेजला दीन,
अमृताचें पान जीवनकला ।
शशिसूर्या झाली जीवें ओवाळणी,
आनंदा दाटणी आनंदाची ।
तुका म्हणे सुखें प्रेमेसीं डुल्लत,
विरालों निश्चितीं निश्चितीनें ॥

ही परमानंदाची अलौकिक स्थिति ज्या भाग्यवानांना अनुभवावयास सांपडते त्यांच्या तोंडून स्वाभाविकपणेंच पुढील धन्यतेचे उद्गार निघतात!

आजि अनंदुरे एकी परमानंदूरे,
जया श्रुति 'नेति' 'नेति' म्हणति गोविंदूरे । ध्रु० ।
विठोबाचीं वेडीं आम्हां आनंदू सदा
गाऊं नाचूं वाजवुं टाळी रंजवुं गोविंदा ।
सदा सण सांत आम्हां नित्य दीवाळी,
आनंदें निर्भर अमुचा कैवारी बळी ।
तुका म्हणे नाहीं जन्ममरणाचा धाक,
संत सनकादिक अमुचें पाहति कौतुक ॥ १ ॥



# स्वामी रामतीर्थ-खण्ड ३ रा

## उत्कर्षाचें रहस्य

[टोकिओ येथील वाणिज्य महाविद्यालयांत दिलेलें व्याख्यान.]

वन्धूंनो !

### रहस्य ओळखा !



त्कर्षाचें रहस्य या विषयावर कीं, ज्यांत जपाननें भरतवर्षापेक्षां जास्त अधिकार प्राप्त करून घेतला आहे, अशा विषयावर भरतवर्षांतून आलेल्या एका परकी मनुष्यानें तुम्हांला उपदेश करण्याचा आव घालावा, हें प्रथमारंभीं मोठें चमत्कारिक दिसेल नाहीं बरें! परंतु, तें कसेंहि असो; मी आज जो तुमच्यापुढें उभा राहिलों आहें, तो गुरु या नात्यानें असून त्याला अनेक कारणें आहेत.

एखादी गोष्ट युक्तिप्रयुक्तीनें व्यवहारांत आणणें हें निराळें, व तींतील रहस्य यथार्थ रीतीनें समजणें हें निराळें. आजकालच्या स्थितींत ज्या तत्त्वांचा अवलंब केला असतां राष्ट्र भरभराटीस येऊं शकतें, त्यांचा अवलंब करून एखाद्या राष्ट्रानें आपली ऐहिक उन्नति करून घेतली, तरी तेवढ्यानें ती टिकाऊ झाली, असें म्हणतां येणार नाहीं. राष्ट्रांतील लोकांना—बहुजनसमाजाला—उन्नतीचें खरें रहस्य आणि महत्त्व यथोचित रीतीनें समजलें नसेल, योग्य

उपपत्तीच्या भक्कम पायावर तिची इमारत उभारली गेली नसेल, तर तें राष्ट्र अधोगतीस जाण्याची भीति असते. एखादा मजूरसुद्धां रसायनशास्त्रांतील एखादा प्रयोग ठराविक पद्धतीनें करूं शकेल; म्हणून तेवढ्यावरून तो रसायन-शास्त्रज्ञ झाला असें कोणीहि म्हणणार नाहीं. कारण, तो जी क्रिया करतो, त्या क्रियेची उपपत्ति त्याला माहीत नसते. बाष्पयंत्रांत कोळसे मारणारा मनुष्यहि तें यंत्र चालवूं शकतो; परंतु तेवढ्यानें तो यंत्रशास्त्रज्ञ झाला असें म्हणतां येत नाहीं. कारण, यंत्रकलेचीं मूलतत्त्वें त्याला माहीत नसतात. केवळ बाह्य कवाईत करून तो यंत्र चालवीत असतो. एका वैद्याची गोष्ट तुम्हीं ऐकली असेलच. हा वैद्य जखमेवर पट्टया बांधी; आणि आठ दिवस त्या भागाला तरवारीचा स्पर्श करून जखमा बऱ्या करीत असे. जखमेवर पट्टी बांधल्यामुळें बाहेरच्या हवेचा तिच्यावर परिणाम होत नसे, व अशा रीतीनें स्वाभाविकपणें ती भरून येई. परंतु जखम बरी होण्याचें हें इंगित त्याला माहीत नसल्यामुळें, तरवारीच्या स्पर्शानेंच जखम बरी होते, तरवारींतच अद्भुत गुणकारी शक्ति आहे, असें तो म्हणे; व रोग्यांनाहि तेंच खरें वाटे! त्याची तशी समजूत असल्यामुळें, प्रत्येक रोगावर तो पट्टीचाच उपयोग करीत असे. त्यामुळें पुढें पुढें त्याची फजीती होऊं लागली. कारण, प्रत्येक रोग पट्टीनें बरा होणार कसा? पट्टी बांधण्यांतील हेतु किंवा रहस्य त्याला समजत नसल्यामुळें पुढें त्याला यश येईनासें झालें; व त्याचें लोकांत हंसें होऊं लागलें म्हणून राम म्हणतो कीं, प्रत्येक क्रियेबरोबर त्या क्रियेचीं मूलतत्त्वें पद्धतशीर रीतीनें समजावून घेणें अत्यंत आवश्यक आहे. सम्यक् क्रिया आणि सम्यक् उपपत्ति, विधि आणि त्याचें रहस्य यांची नेहमीं सांगड पाहिजे; तीं हातांत हात घालून असलीं पाहिजेत. तुम्हांला उपदेश करावयास येण्याचें हें एक प्रबळ कारण आहे. दुसरें असें कीं, जपान हा माझा देश आहे, व जपानांतील लोक हे माझे देशबांधव आहेत, असें मी समजतों. तुमचे पूर्वज पूर्वकालीं भरतवर्षांतून इकडे आलेले आहेत, हीं गोष्ट सयुक्तिक प्रमाणांनीं सिद्ध करून देतां येण्यासारखी आहे. अर्थात् तुमचे पूर्वज ते माझे पूर्वज; व अशी स्थिति असल्यामुळें बन्धु या नात्यानें तुमच्याशीं प्रेमसंवाद करण्याकरितां मी या देशांत आलों आहें. परकी म्हणून आलेला नाहीं. दुसऱ्या एका दृष्टीनें विचार केला तरी तुम्हांला उपदेश करण्याचा अधिकार मला पोहोंचतो. माझा जन्म-स्वभाव, माझ्या संवयी आणि मनःप्रवृत्ति, माझ्या आवडीनिवडी, व माझ्या

अंगचें प्रेम या सर्वांचा विचार केला असतां मी जपानीच आहें, अशी माझी भावना आहे. एवढा अल्प प्रस्ताव करून आजच्या विषयास राम सुरवात करीत आहे.

उत्कर्षाचें रहस्य हें वास्तविक अगदीं उघडें आहे. या विषयाची प्रत्येक-जण आपापल्यापरीनें कांहींतरी उपपत्ति सांगतच असतो. उत्कर्षाच्या तत्त्वांचें विवेचन आणि उद्घाटन यापूर्वींहि कदाचित् कित्येक वेळां तुम्हीं ऐकलें असेल. परंतु हा विषयच इतका महत्त्वाचा आहे कीं, लोकांच्या मनावर त्याचा उत्तम रीतीनें ठसा उमटावा, यासाठीं त्याचें विवेचन कितीहि आणि कितीदां केलें तरी तें थोडेंच होणार आहे.

## दीर्घोद्योग

उत्कर्षाचें रहस्य कशांत आहे, यशस्वितेचें मुख्य अंग कोणतें, असा प्रश्न आपण निसर्गालाच करूं या. खळखळ आवाज करीत जोरानें वाहात जाणाऱ्या निर्झरांच्या रूपानें निसर्गानें उघडून ठेवलेले दिव्य ज्ञानग्रंथ, तसेंच पाषाणांवर खोदून ठेवलेले सृष्टिदेवीचे धर्मोपदेश, असें जाहीर करतात कीं, मनुष्यांनो, कर्म करा, अनवरत कर्म करा, दीर्घोद्योग करा. सृष्टींतील सर्व पदार्थ दीर्घोद्योगाचें तत्त्व सदैव आपल्या अंतःकरणांत ठसवीत असतात. प्रकाशामुळेंच भोंवतालच्या पदार्थांचें आपणांस ज्ञान होतें, ते आपणांस दिस-तात. सर्व जीवांच्या जीवनाला मुख्य आधार प्रकाशच होय. या प्रश्नावर, यशाच्या रहस्यावर स्वतः प्रकाश काय प्रकाश पाडतो, तें आपण पाहूं या! उदाहरणार्थ, आपण अगदीं सामान्य तऱ्हेचा प्रकाश—घरांतील तेलाचा दिवा घेऊं या. दिव्याच्या उत्कर्षाचें आणि तेजाचें रहस्य, तो तेल व वात खर्च होईल म्हणून भीत नाहीं, यांत—या स्वार्थत्यागांत आहे. त्याच्या तेजस्वितेचें गौप्य निःस्वार्थता हेंच होय. तेल आणि वात यांच्या रूपानें तो अहंकाराला—जीवनाला सारखा जाळून टाकीत असल्यामुळें, अगदीं स्वाभाविकपणें तो प्रकाशमय होऊन जातो. अहंभाव गळाल्यावर शुद्ध चैतन्याशिवाय—प्रकाशाशिवाय दुसरें काय रहाणार! यावरून दिवा—प्रकाश आपणांस हेंच सांगत असतो कीं, देहाची पर्वा करा, त्याच्या ठिकाणीं आसक्त व्हा, म्हणजे तत्क्षणीं तुम्हीं मालवलांच म्हणून समजा. विषयोपभोग आणि ऐषआराम यांत दंग होऊन, ख्यालीखुशालींत आणि चैनबाजींत आयुष्याचे सोन्यासारखे दिवस फुकट घालवाल, तर तुम्हांला पुढें यशाची बिलकुल

आशा नाहीं; तुम्हीं ठार बुडालांत, अशी आपल्या मनाशीं खूणगांठ बांधा. कारण, निरुद्योगीपणा ही मरणाचीच तयारी होय! उद्योग—सततोद्योग म्हणजेच जीवित. सांचलेल्या पाण्याचें डबकें पहा, नाहीं तर वहात्या पाण्याचा नदीप्रवाह पहा; दोघांत केवढें महदंतर आढळून येतें. नदीचें स्फटिकासारखें शुभ्र पाणी नेहमीं ताजें, स्वच्छ, पिण्याजोगें आणि आल्हादकारक असें असतें; तेंच डबक्यांतील पाणी गढूळ, घाणेरडें, कुजट, वास मारणारें आणि तवंग आलेलें असें असतें. तें पाहतांच मनुष्याला किळस येतो. आपणांस यश यावें, आपला उत्कर्ष व्हावा, अशी तुमची इच्छा असेल, तर नदीप्रवाहाप्रमाणें सततोद्योगाचें वळण तुम्हीं गिरवा. वात किंवा तेल खर्च होईल म्हणून जो भीत असेल, तीं संपतील म्हणून जपून ठेवूनच जो त्यांना कुजवीत असेल, त्याला जगांत यशाची बिलकूल आशा नाहीं, हें निश्चित आहे. म्हणून राम म्हणतो कीं, मित्रांनो! तुम्हीं वाहत्या पाण्याचें धोरण स्वीकारा; आणि नदीप्रवाहाप्रमाणें, प्रसंगानुरूप आपण स्वतः बदलून, तसेंच परिस्थितीला योग्य वळण देऊन, वळणावळणांनीं मोठ्या धैर्यानें आणि उत्साहानें पुढें पुढें सरत जा. उद्योग, दीर्घोद्योग, अविश्रांत परिश्रम हेंच यशःप्राप्तीचें मुख्य साधन आहे.* कालच्याहून आज चांगली आणि आजच्याहून उद्यां अधिक चांगली अशी प्रगतिपर आणि श्रेयस्कर अशी आपली दिनचर्या असली पाहिजे.

यशाचें हें पहिलें अंग लक्षांत ठेवाल, त्याप्रमाणें व्यवहारांत वागाल, तर थोर होणें हें लहान होण्याइतकेंच सोपें आहे, असें तुम्हांला आढळून येईल!

## आत्मयज्ञ

प्रत्येकाला पांढरे शुभ्र पदार्थ आवडतात. शुभ्र वस्तूंच्या ठिकाणीं सर्व लोकांचें प्रेम दिसून येतें; सर्वांच्या प्रेमाचे ते विषय होऊं शकतात. पांढऱ्या पदार्थांचाच सर्वत्र उत्कर्ष व जयजयकार होतो; असें कां? ह्याचा आतां आपण विचार करूं. काळे पदार्थ कोणालाच आवडत नाहींत, त्यांचा जो तो अव्हेर, तिरस्कार आणि द्वेषच करतो; अशी खरोखर वस्तुस्थिति आहे. ती नाहीं असें कोणालाहि म्हणतां येणार नाहीं. या वस्तुस्थितीची बरोबर उपपत्ति लावणें जरूर आहे. पदार्थविज्ञानशास्त्र सर्व रंगांची उपपत्ति लावतें. निळा, पांढरा असे जे निरनिराळे रंग आपणांस दिसतात त्यांतील तत्त्व किंवा तथ्य काय, हें पदार्थविज्ञानशास्त्र

---

* नोद्यमेन विना राज्यं न सुखं न च वै यशः ॥ —देवीभागवत, पंचमस्कन्ध, अ. ५.

शिकल्यानें समजतें. वास्तविक पाहूं गेलें तर जो रंग तांबडा म्हणून दिसतो, तो खरोखर तांबडा नसतो; हिरवा म्हणून दिसतो तो खरोखर हिरवा रंग नसतो, काळा म्हणून भासतो, तो काळा नसतो; सारांश, जो जो रंग म्हणून आपणांस दिसतो, तो तो वस्तुतः दिसतो तसा नसतो. तांबड्या गुलाबाच्या फुलाचा रंग किती मनोहर असतो! परंतु, तांबड्या रंगाचें परावर्तन केल्यानें, त्या रंगाचा त्याग केल्यानेंच गुलाबाचें फूल तांबडें व नयनमनोहर दिसत असतें. सूर्यकिरणांमध्यें एकंदर सात रंग आहेत. त्यांतील तांबडा खेरीजकरून बाकीचे सर्व रंग गुलाबाचें फूल शोषून आपलेसें करून घेतें, फक्त तांबडा रंगच तें आपलासा करून घेत नाहीं. त्या रंगाचा मोठ्या औदार्यानें तें त्याग करतें आणि म्हणूनच तें तांबडें दिसतें. झाडांचीं हिरवीं पानें सूर्यकिरणांतील हिरवा खेरीजकरून बाकी सर्व रंग शोषून घेतात; ह्या हिरव्या रंगावर आसक्ति न ठेवतां औदार्यपूर्वक त्या रंगाचा तीं त्याग करतात; तो रंग परावृत्त करतात. या स्वार्थत्यागामुळेंच तीं पानें इतकीं सतेज आणि हिरवींगार दिसतात. काळ्या पदार्थांच्या ठिकाणीं सूर्यकिरणांतील सर्व रंग शोषून घेण्याचा धर्म असतो. कोणताहि रंग तें यत्किंचित् सुद्धां परावृत्त करीत नाहींत; औदार्य आणि स्वार्थत्याग यांची जातच त्यांच्या ठिकाणीं नसते. एका किरणाचा सुद्धां ते त्याग करीत नाहींत. सूर्यापासून जितका प्रकाश त्यांना प्राप्त होतो, त्यांतील अल्पांशसुद्धां ते खर्च करीत नाहींत. म्हणून सृष्टिदेवता तुम्हांला बजावून सांगते कीं, स्वतःच्या प्राप्तींतून आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना जो यत्किंचित्हि देत नाहीं, आपल्या ऐश्वर्यांत इतरांना वांटेकरी करण्याचें जो साफ नाकारतो, तो काळा—कोळशाप्रमाणें काळाकुट्टच दिसणार! त्याग हाच प्राप्तीचा खरा मार्ग आहे.* जें जें कांहीं आपणांस प्राप्त होईल तें तें तत्क्षणीं आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांस वांटून टाकणें, अर्थात् सर्वस्वीं त्यागवृत्ति ठेवणें, हेंच शुभ्र होण्याचें—जगन्मोहकतेचें मुख्य साधन आहे. शुभ्र वस्तूंच्या ठिकाणीं दिसून येणारा निःस्वार्थतेचा हा धर्म तुम्हीं संपादन करा, म्हणजे प्रत्येक कामांत तुम्हीं यशस्वी झालांच म्हणून समजा. आतां शुभ्र पदार्थ याचा अर्थ काय? युरोपांतील लोक? केवळ युरोपांतील लोकच नव्हे, तर पांढरा स्वच्छ आरसा, पांढरें शुभ्र मोतीं, पांढरें कबूतर, पांढरें बर्फ, शुद्धता आणि

---

*तरि स्वधर्मा आतीतें । जें जें मिळेल आपणयातें ।
तें तें दीजे बहुतें । सन्मानयोगें ॥—ज्ञानेश्वरी, अ. १८।९१

पावित्र्य यांचे वाचक म्हणून जे जे पदार्थ आहेत, ते ते सर्व त्यागाच्या बाबतींत तुमचे गुरु होत. स्वार्थत्यागाचा गुण या पदार्थांपासून शिका, तो अंगीं बाणून घ्या आणि दुसऱ्यापासून तुम्हांला जें जें प्राप्त होत जाईल तें तें परत दुसऱ्यांनाच वांटीत जा. जो जो प्रकाश तुम्हीं संपादन कराल, तो तो प्रकाश तुम्हीं पाडीत जा.× सर्व प्रकाश आपणच शोषून घेण्याची स्वार्थी वृत्ति ठेवूं नका; म्हणजे तुम्हीं ऐश्वर्यसंपन्न व्हाल. बीजाचा वृक्ष होण्यापूर्वीं बीजाला स्वतः मरावें लागतें. फलोत्पत्ति हें त्यागाचें परिणत स्वरूप होय. ज्या मानानें ज्ञानाचा प्रकाश लोकांवर आपण अधिकाधिक पाडीत असतों, आपण संपादन केलेलें ज्ञान मनःपूर्वक इतरांना सांगत असतों, त्या मानानें आपण स्वतः अधिक उन्नत व संपन्न होत असतों, हा सिद्धान्त आहे.* जगांतील सर्व आचार्य ह्या सिद्धान्ताची साक्ष पटवितील.

## निरहंकारत्व

विद्यार्थ्यांचा हा अनुभव असतो कीं, महाविद्यालयांतील साहित्यचर्चात्मक संस्थांतून भाषण करीत असतांना 'मी व्याख्यान देत आहें,' हा अहंकाराचा विचार जेव्हां प्रमुखत्वानें त्यांच्या डोक्यांत येतो त्या वेळीं भाषण फिकें पडतें. कोणतेंहि काम करीत असतांना त्या कामाशीं तद्रूप व्हा, स्वतःला पूर्णपणें विसरून जा, म्हणजे त्या कामांत तुम्हांला यश आलेंच पाहिजे. एखाद्या विषयाचा तुम्हीं विचार करीत असाल तर त्या विचाराशीं पूर्ण तादात्म्य करून घ्या, तद्रूप व्हा, म्हणजे तुम्हांला यश आलेंच पाहिजे. कोणतेंहि कार्य करीत असतांना तद्रूप होणें हाच यशाचा एकच उपाय आहे.

मी मुक्त होईल केव्हां ? जेव्हां 'मी' नाहींसा होईन तेव्हां,÷ हा मुद्दा बरोबर मनांत ठसण्याकरितां राम आतां एक गोष्ट सांगत आहे. एकदां दोन तरुण रजपूत वीर सैन्यांत नोकरी मागण्याकरितां दिल्लीच्या अकबर बादशहाकडे गेले. 'सैन्यांत मोठ्या दर्जाची नोकरी मागण्यासारखे आपल्या अंगीं काय गुण आहेत ?' असा बादशहानें त्यांना प्रश्न केला. 'आम्हीं मोठे तरवार-

---

× आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव ॥ —रघुवंश.

* ह्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोति वृद्धिं पराम् ॥ —नीतिशतक.

÷ त्यक्त्वा ममाहमिति बन्धकरे पदे द्वे । —धन्याष्टकम्.

मोक्ष रोकडाच व्हावा । तेथें अभिमान सांडावा ॥ —रामदास.

बहादुर आहोंत,' असें त्यांनीं उत्तर दिलें. 'तुमचें शौर्य माझ्या प्रत्ययास आणून द्या,' असें त्यावर बादशहा बोलला. बादशहाच्या तोंडून हे शब्द निघण्याचा अवकाश; लगेच दोघांनींहि सरकन् म्यानांतून तरवारी उपसल्या. त्याबरोबर दरबारांत विजेप्रमाणें लख्ख प्रकाश पडला. तो प्रकाश त्यांच्या शौर्याचाच होय. लगेच दोघांनींहि एकमेकांच्या तरवारींचीं टोंकें एकमेकांच्या छातीवर धरलीं. मोठमोठ्या तपस्व्यांतहि आढळून न येणाऱ्या विलक्षण शांततेनें त्यांनीं तरवारी एकमेकांच्या छातींत खुपसल्या, आणि आपलें वीर्य बादशहाच्या प्रत्ययास आणून दिलें. दोघांचे देह जमिनीवर निश्चेष्ट पडले, चैतन्यांत चैतन्य मिळालें; आणि त्यांचें शौर्य कसोटीस लागलें! या सुधारलेल्या काळांत, अशा तऱ्हेचा प्रसंग आपणांस किळसवाणा वाटेल. पण गोष्टींतील तात्पर्याकडे आपण लक्ष द्यावें, एवढ्याकरितांच ती सांगितली आहे. तें तात्पर्य हें आहे कीं, कार्य करीत असतांना स्वतःला विसरून जा, स्वतःच्या देहाची पर्वा करूं नका. 'अहं'चा यज्ञ करा म्हणजे यश तुमचेंच आहे. हा नियम अन्यथा होणें शक्य नाहीं. प्रत्यक्ष यशाची प्राप्ति होण्यापूर्वीं यशाच्या वासनेचा पूर्ण निरास—बींमोड झाला पाहिजे, असेंच ह्या गोष्टीवरून उघड होत नाहीं काय?

## सर्वात्मभाव

सर्वात्मभाव हें यशस्वितेचें महत्त्वाचें अंग आहे. दुसऱ्यांवर प्रेम करणें, आणि दुसऱ्यांच्या प्रेमाचा विषय होणें, हेंच जीविताचें मुख्य साध्य आहे. स्वतः जिवंत रहाण्याकरितां हातानें शरिराच्या इतर अवयवांवर प्रेम केलें पाहिजे. इतर अवयवांशीं तो फटकून राहील, आणि माझ्या कमाईचा फायदा सर्व शरीरानें कां घ्यावा, अशा तऱ्हेचा अहंकारमूलक स्वार्थी विचार त्याच्या डोक्यांत शिरेल, तर त्याची धडगत नाहीं; अशानें तो नाश पावलाच पाहिजे. कारण, या स्वार्थवृत्तींत सुद्धां कायमपणा राखावयाचा म्हटलें तर हाताच्या परिश्रमानें मिळविलेलें—मग तें कलमबहाद्दुरीनें मिळविलेलें असो, कीं तरवारबहाद्दुरीनें मिळविलेलें असो—अन्नपाणी त्यानें तोंडाच्याद्वारें सेवन करतां कामा नये, तर हातालाच भोंक पाडून त्याच्या वाटे स्वतःला लागणारें सर्व पोषक द्रव्य ग्रहण केलें पाहिजे; इतर अवयवांना आपल्या कमाईचे वांटेकरी होऊं न देण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे. हातानें अशा रीतीनें अन्नपाणी आंत पोंचविल्यास तो कदाचित् पुष्ट होईल; परंतु तो पुष्टपणा म्हणजे गांधिलमाशी चावून येणारी सूजच होय! व असला पुष्टपणा उपकारा-

पेक्षां अपकारच अधिक करील. कारण, सूज म्हणजे कांहीं पुष्टि नव्हे! असला दुखरा हात या स्वार्थीपणामुळें निकामी झालाच पाहिजे, हें निश्चित आहे. शरीरांतील इतर अवयवांशीं आपलें पूर्ण तादात्म्य आहे, असा जेव्हां तो अनुभव करून घेईल, आपलें हित आणि सर्व शरीराचें हित हीं एकच आहेत, तीं भिन्न नाहींत, असा ज्या वेळीं त्याला अनुभव येईल, आणि त्याप्रमाणें तो वागूं लागेल, तेव्हांच तो वास्तविक पुष्ट होईल. सहकार्य म्हणजे प्रेमाचें व्यक्त स्वरूप होय. सहकारितेच्या उपयुक्ततेसंबंधानें तुम्हांला विशेष सांगण्याची जरूरी नाहीं. सहकार अगदीं अंतःकरणापासून असूं द्या, प्रेमपूर्ण असूं द्या. तुम्हीं प्रेमरूप व्हा, म्हणजे तुम्हांला यश आलेंच पाहिजे. आपल्या गिऱ्हाइकांचें हित तें आपलेंच हित अशी ज्या व्यापाऱ्याची समजूत नसते, त्याला यश येणें कधींहि शक्य नाहीं. धंद्यांत वरकत येण्याला गिऱ्हाइकांविषयीं दुकानदाराच्या मनांत प्रेमबुद्धि असणें जरूर आहे. त्याचें अंतःकरण सर्वस्वीं गिऱ्हाइकांच्या फायद्याकडे लागलेलें असलें पाहिजे.

## समाधान

समाधान हेंहि यशाचें एक प्रधान अंग आहे. मित्रांनो! तुम्हीं स्वभावतःच आनंदी आहां. तुमच्या प्रफुल्लित चेहऱ्यांवरील हास्य पाहून रामाला अत्यंत आनंद होतो. खऱ्या मनुष्यत्वाच्या उमलणाऱ्या कळ्याच तुम्हीं आहांत; मूर्तिमंत आनंदच तुम्हीं आहांत. हीच वृत्ति, हीच उल्हासित वृत्ति अखेरपर्यंत कायम ठेवा, एवढेंच रामाचें तुम्हांला सांगणें आहे. आतां ही उल्हसित वृत्ति अखेरपर्यंत कशी कायम ठेवतां येईल, या संबंधानें आपण विचार करूं.

कार्य करीत असतांना भावी फलाकडे लक्ष ठेवूं नका. यशापयशाचा विचार न करतां, फलाची आकांक्षा न धरतां कार्याकरितां कार्य या दृष्टीनेंच परिश्रम करीत जा. कर्म हेंच कर्माचें उत्तम पारितोषिक आहे. गतकालाविषयीं खेद न करतां, किंवा भावी कालाविषयीं मनांत चिंता न वाहतां, चालत्या काळांत नेटानें आणि हिंमतीनें परिश्रम करीत रहा; व या धोरणानें तुम्हीं उद्योग करीत राहिलां, म्हणजे कोणत्याहि परिस्थितींत तुम्हीं आनंदीच राहाल. आपण जमिनींत बीं पेरलें आणि त्यांत जर जीव असेल, तर त्याच्या पोषणाला व वाढीला लागणारीं हवा, पाणी, माती वगैरे सर्व द्रव्यें आपोआप त्या बियांकडे धांवून येतील, असा साम्याकर्षणाचा अनुल्लंघनीय नियम आहे. आनंदानें आणि उल्हासानें काम करणाऱ्या मनुष्याला सर्व तऱ्हेचें सहाय्य

देण्याला निसर्ग हा बांधलेला आहे. **'आपल्या अंगीं असलेल्या ज्ञानाचा योग्य उपयोग करणें हाच अधिक ज्ञान संपादन करण्याचा मार्ग आहे.'** हातांतील प्रकाशाचा योग्य उपयोग करणें, हाच पुढील मार्ग प्रकाशित करण्याचा खरा उपाय आहे. कल्पना करा कीं, एका अंधाऱ्या रात्रीं तुम्हांला दहा कोस चालून जाणें आहे. आतां तुमच्या हातांतील दिव्याचा प्रकाश फक्त दहा पावलेंच पडतो. अशा वेळीं पुढील सर्व रस्ता काळोखाचा आहे, म्हणून भांबावून जाऊं नका. हातांतील दिव्याच्या साहाय्यानें दहा पावलें चाला, म्हणजे पुढील दहा पावलांच्या वाटेवर प्रकाश पडलेला आहे, असें तुम्हांला आढळून येईल. पुढील मार्ग प्रकाशित करण्याची तुम्हांला खटपटच करावी लागणार नाहीं. तुम्हीं जों जों पाऊल टाकाल, तों तों त्याच्या दहा पावलें पुढें दिव्याचा प्रकाश पडतच राहील. प्रकाश नाहीं अशी एकहि जागा वाटेंत तुम्हांला आढळणार नाहीं. याचप्रमाणें खऱ्या कार्यकारी मनुष्याला—कर्मयोद्ध्याला सृष्टीच्या या अनुल्लंघनीय नियमानुसार मार्गांत एकहि काळोखाची जागा आढळत नाहीं. त्याची गति कुंठित करणारा एकहि प्रत्यवाय येत नाहीं.* अशी जर स्थिति आहे, तर कार्य कसें होईल, या व्यर्थ चिंतेनें आपली स्वाभाविक प्रसन्नता तुम्हीं नाहींशी कां करावी? पोहतां न येणारा मनुष्य एकदम एखाद्या तळ्यांत पडला असतां, घाबरून न जातां आपल्या चित्ताची स्थिरता कायम ठेवील तर तेवढ्यानेंच तो बुडणार नाहीं. मनुष्याचें विशिष्टगुरुत्व पाण्यापेक्षां कमी असल्यामुळें पाण्याच्या पृष्ठभागावर मनुष्य आपोआप तरंगत राहूं शकतो. परंतु सामान्य मनुष्यें गोंधळून जातात, आणि तरंगण्याचा प्रयत्न करण्यांतच तीं आपल्याला बुडवून घेतात! याच न्यायानें यशाविषयींची चिंता हींच पुष्कळ वेळां अपयशाला कारणीभूत होते.

फलाची आकांक्षा—फलासक्ति आपणांमध्यें कां उत्पन्न होते, याचा आतां आपण विचार करूं. फलाच्या मागें लागणें, हें आपली छाया पकडण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे. छायेच्या मागें मनुष्य कालाच्या अंतकालापर्यंत—अनन्तकालापर्यंत जरी धांवत राहिला, तरी ती त्याच्या हातीं लागणें शक्य नाहीं. तो जसजसा धांवत जाईल तसतशी त्याची छायाहि त्याच्यापासून दूर दूर पळत जाईल. परंतु छायेच्या मागें लागलेल्या या मनुष्याला छायेकडे



* नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥—गीता, अ. २।४०.

पाठ फिरवूं द्या, सूर्याभिमुख होऊं द्या, म्हणजे काय चमत्कार होतो तो पहा! ज्या छायेच्या मागें मनुष्य लागला होता, ती छाया त्याच्याच मागें धावूं लागेल. यशाकडे पाठ फिरविलीत, आरंभलेल्या कार्याचे परिणाम काय होतील, याचा विचार सोडून दिलात, फलाची आकांक्षा न धरतां आपलें सर्व सामर्थ्य हातीं घेतलेल्या कार्याकडे लावलेंत, म्हणजे यश तुमच्या पाठीस लागत येईल; इतकेंच नव्हे तर कुत्र्यासारखें तें तुमच्या मागून धांवत येईल; तुमचा पिच्छा सोडणार नाहीं, हा अनुभव आहे; म्हणून यशाच्या मागें लागूं नका. यश हेंच आपलें प्राप्तव्य आहे, अशी भलतीच समजूत करून घेऊं नका; आणि अशी वृत्ति केलीत, तरच यश तुमचा पाठलाग करीत येईल. न्यायाधिशाला पक्षकार, वकील, चोपदार यांना हजर रहाण्याविषयीं कधीं आमंत्रणें करावीं लागतात का ? कधीं नाहीं. न्यायमूर्ति न्यायासनावर विराजमान होण्याचाच काय तो अवकाश; लगेच वकील, पक्षकार, भालदार, चोपदार, यांनीं न्यायमंदिर गजबजून जातें, मित्रांनो ! यशाच्या बाबतींतहि हाच न्याय लागू आहे, अत्यंत उल्हासानें—पूर्ण आत्मनिष्ठेनें आपलें कर्तव्य बजावीत जा, म्हणजे यशाला लागणारीं सर्व उपकरणें आपोआप तुमच्या चरणाशीं लोटांगणें घालीत येतील.

## अभय

अभय हेंहि यशाचें एक महत्त्वाचें अंग आहे. या सिद्धान्ताचा प्रत्यक्ष व्यवहारांत तुम्हीं अनुभव घ्यावा, असें रामाचें आग्रहाचें सांगणें आहे. सर्व मृगांचा राजा जो सिंह त्याला एका दृष्टिपातानें माणसाळतां येतें. शत्रूंना एका दृष्टिक्षेपानें शांत व निर्वैर करतां येतें. तसेंच, निर्भयपणाच्या एका झटक्यासरशीं यशाला काबीज करतां येतें. हिमालयाच्या दऱ्यांतील किर्र झाडींतून राम पुष्कळ वेळां फिरला आहे. तेथें वाघ, आस्वलें, लांडगे वगैरे हिंस्र पशु, तसेंच सर्प इत्यादिक त्याला आढळून येत असत. परंतु कोणापासूनहि रामाला इजा पोहोंचूं शकली नाहीं. एखादा हिंस्र पशु समोर येतांक्षणींच न डगमगतां राम त्याच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पहात असे. दृष्टीला दृष्टि मिळाली कीं, तो क्रूर म्हटला जाणारा पशु भेदरून तेथून दूर पळून जाई. अशी निर्भयता बाणून घ्या, म्हणजे तुम्हांला कोणीहि इजा करूं शकणार नाहीं.

मांजराला पहातांच कबूतर आपले डोळे मिटतें. डोळे मिटण्यांत कदाचित् त्याची अशी समजूत असावी कीं, ज्याअर्थीं आपल्याला मांजर दिसत नाहीं, त्याअर्थीं मांजरालाहि आपण दिसत नसूं. परंतु याचा परिणाम काय होतो? मांजर कबुतरावर झडप घालतें, आणि त्याचा फडशा उडवतें. निर्भयपणानें वाघालाहि माणसाळतां येतें. परंतु, जो भितो त्याला मांजरहि मारूं शकतें. तसेंच, हेंहि तुम्हीं पाहिलें असाल कीं, ज्याचा हात कांपरा असतो, त्याला एका भांड्यांतील पातळ पदार्थ दुसऱ्या भांड्यांत नीट ओततां येत नाहीं. तो पदार्थ सांडल्याशिवाय राहात नाहीं. परंतु, ज्याचा हात कांपत नाहीं, ज्याचा हात स्थिर आणि निर्भय असतो, त्याला एक थेंब खालीं सांडल्याशिवाय पदार्थ एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत ओततां येतो. या सर्व गोष्टींवरून निर्भयपणा हें यशाचें एक प्रधान अंग आहे, ही गोष्ट वक्तृत्वपूर्ण शब्दांनीं निसर्ग तुम्हांला शिकवीत नाहीं काय?

एका आरमारी जहाजावर एकदां एक पंजाबी शिपाई भयंकर रोगानें आजारी पडला. तेव्हां तेथील वैद्यानें त्याला जहाजावरून समुद्रांत फेंकून देण्याचा हुकूम केला. वैद्य हे कधीं कधीं देहान्तशिक्षा देत असतात. यमराज सहोदरच ते! वैद्यानें केलेला हुकूम शिपायाच्या कानीं पडला. निरुपाय झाला आणि जिवावर बेतली म्हणजे सामान्य प्राण्यांत सुद्धां निर्भयपणाची चमक दिसून येते, असा अनुभव आहे. मृत्यूचा हुकूम ऐकतांच त्याच्या अंगांत विलक्षण सामर्थ्य संचारलें. तो एकदम उठून उभा राहिला. त्याची भीति पार नाहींशी झाली. तो तडक वैद्याकडे गेला आणि आपल्या हातांतील छोटी बंदूक त्याच्यावर रोंखून म्हणाला, 'मी आजारी आहें? तुम्हीं मला आजारी ठरवितां काय? मी तुम्हांला याक्षणीं ठार करतों!' लगेच वैद्यानें त्याला आरोग्याचा दाखला दिला. निराशा हा दुबळेपणा आहे, म्हणून तो टाकून द्या. सर्व सामर्थ्य निर्भयपणामुळें प्राप्त होत असतें. हे रामाचे शब्द पूर्णपणें लक्षांत बाळगा आणि निर्भय होण्याचा प्रयत्न करा.

## स्वावलंबन

उत्कर्षाचें शेवटलें—अनुक्रमानें शेवटलें, पण महत्त्वानें पहिलें—अंग उत्कर्षाचें जीवनतत्त्व, यशाची खरी गुरुकिल्ली स्वावलंबन किंवा स्वाधीनता होय. एखाद्या मनुष्यानें एका शब्दामध्यें आपलें सर्व तत्त्वज्ञान सांगा, असें मला म्हटलें, तर त्यांला मी सांगेन कीं, स्वावलंबन हाच तो शब्द होय. स्वावलंबन

याचा खरा अर्थ आत्मज्ञान—अध्यात्मज्ञान हा आहे. जगांतील लोकांनो ! ऐका. आत्मज्ञान संपादन करा. ही गोष्ट अगदीं निश्चित आहे, अक्षरशः खरी आहे, कीं तुम्हीं आपली उन्नति स्वतःच करून घेऊं लागलां, आत्मज्ञानाच्या पायावर उभें राहूं लागलां, म्हणजे ईश्वराची मदत तुम्हांला झाल्याशिवाय राहणार नाहीं. तुम्हांला मदत करणें हें ईश्वराला भाग आहे. तुम्हीं स्वतः **ईश्वर** आहां; तुमचा आत्मा हाच अनंत, सर्वशक्तिमान्, सच्चिदानंदस्वरूपी आहे, ही गोष्ट सिद्ध करून देतां येईल. हें तत्त्व तुम्हांला प्रत्यक्ष अनुभवतां येण्यासारखें आहे. हें परमात्मतत्त्व, तुमचें तें सत्स्वरूप तुम्हीं स्वतः प्रयत्न करण्याचीच फक्त वाट पहात आहे. आपल्या स्वतःवर, आपल्या आत्म्यावर अवलंबून राहा, म्हणजे तुम्हांला पाहिजे त्या गोष्टी निःसंशय प्राप्त करून घेतां येतील; तुम्हांला अशक्य असें जगांत कांहींच शिल्लक राहणार नाहीं.

सिंहाला वनराज असें म्हणतात. सिंह हा मोठा स्वावलंबी आहे. त्याच्या ठिकाणीं दिसून येणारा धीटपणा, शक्ति आणि बेफिकिरी त्याच्या आत्मविश्वासाचाच परिणाम होय. अडचणींना तो जुमानीतच नाहीं. हा आत्मविश्वास नसल्यामुळें हत्तीची काय दुर्दशा होते ती पहा ! ज्यांच्या प्रचंडपणावरून ग्रीक लोकांनीं ज्यांना प्रथमदर्शनीं 'हालचाल करणारे पर्वत' असें सार्थ नांव दिलें, त्या हत्तींना शत्रूंची नेहमीं भीति वाटत असते. यामुळें ते कळप करून राहतात, आणि झोंपी जाण्याच्या वेळीं कांहीं हत्तींना पहाऱ्यावर ठेवतात. स्वतःच्या सामर्थ्यावर किंवा कर्तबगारीवर त्यांच्यापैकीं कोणाचाच विश्वास नसतो. ते स्वतःला दुबळे समजतात ! आणि 'जशा भावना तशीं फळें,' या नियमाप्रमाणें ते दुबळेच बनतात, सिंहाच्या एका आवेशाच्या झडपेसरशी ते भेदरून जातात आणि सगळा कळपच्या कळप सैरावैरा धावूं लागतो. केवळ शक्तीच्या दृष्टीनें पाहिलें तर एकेकटा हत्ती—हा हालता चालता पर्वत—शेंकडों सिंहांना पायांखालीं चिरडून टाकूं शकेल. परंतु आत्मश्रद्धा नसल्याकारणानें त्या सामर्थ्याचा कांहींएक उपयोग होत नाहीं.

## 'जा, जा' कीं 'या, या ?'

दोन भावांची एक फार बोधपर गोष्ट सांगतात. दोघांनाहि वडिलार्जित मालमत्ता सारखी सारखी मिळाली होती. पण कांहीं वर्षांनीं एक भिकेस लागला व दुसऱ्यानें आपली दौलत वाढवून दुप्पट केली. भिकारी झालेल्या भावानें लक्षाधीश झालेल्या भावाला, "तूं लक्षाधीश कां आणि कसा झालास,'

असा प्रश्न केला असतां, तो भाऊ म्हणाला, "तूं प्रत्येकाला 'जा, जा' असें म्हणत असस, आणि मी 'या, या' असें म्हणत असें." याचा अर्थ असा कीं, तो भिकेस लागलेला भाऊ आपल्या नोकरांना अमक्या ठिकाणीं जा, अमुक कर, तमुक कर, असें सांगत असे; आणि स्वतः परांच्या गादीवर लोळत राही. दुसरा भाऊ स्वतः काम करीत असे; यामुळें 'या, आपण हें काम करूं या', असें म्हणून तो नोकरांना आपल्या मदतीस बोलावीत असे. हा दुसरा भाऊ आपल्या स्वतःच्या सामर्थ्यावर अवलंबून राही; यामुळें त्याचे नोकरचाकर आणि संपत्ति हीं वाढतच गेलीं. पहिला भाऊ नोकरांना 'जा, जा' असें म्हणत असे. स्वाभाविकच धन्याच्या हुकमाप्रमाणें नोकर निघून गेले; तसेंच त्या नोकरांबरोबर त्याची आज्ञा शिरसावंद्य करून त्याची लक्ष्मीहि त्याला सोडून गेली आणि बिचारा एकटा राहिला! 'जा, जा' हें रामाचें धोरण नसून 'या, या' हें रामाचें धोरण आहे. 'या आणि माझ्या यशाचे व सुखाचे वांटेकरी व्हा', असेंच राम म्हणतो. मद्बंधूंनो, मित्रांनो, आणि देश-बांधवांनो! कर्माप्रमाणें फल मिळालेंच पाहिजे, हा सिद्धान्त आहे. मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे. माझे विचार प्रकट करण्याला तुम्ही जपानी लोक असेच ज्यास्त प्रसंग आणून द्याल, तर धर्मग्रंथांतील दंतकथांवर, व काल्पित गोष्टींवर विश्वास ठेवून आपला केंद्र-सर्व शक्तीचा आणि कर्तबगारीचा केंद्र आपणांबाहेर आहे, असें मानण्यास एकहि सयुक्तिक कारण नाहीं, हें तुम्हांला सिद्ध करून देतां येईल. आपल्या सर्व दुःखांना कारण आपले आप-णच असतों. गुलामसुद्धां स्वातंत्र्यामुळेंच गुलाम होतो! आपलें दैव ठरवि-ण्यास आपण पूर्ण मुकत्यार आहों. आपण सर्वस्वी स्वतंत्र आहों. ही स्वतंत्रताच आपल्या उत्कर्षाला कारण होते; तसेंच या स्वतंत्रतेमुळेंच आपण अनेक दुःखें आपणांवर ओढून घेतों व या स्वातंत्र्यामुळेंच आपण आपल्याला गुलाम बनवितों! अशी जर स्थिति आहे, आपलें दैव ठरविणें हें जर आपल्या हातीं आहे, सुखदुःख जर आपणच निर्माण करतों, तर दुःखें आलीं म्हणून आपण कुरकुर कां करावी, आणि दैवाच्या नांवानें कां रडावें? व्यक्तिदृष्ट्या, आणि समष्टिदृष्ट्या आपली मुक्तता करून घेण्याकडे या स्वातंत्र्याचा आपण उपयोग करून कां घेऊं नये!

## अत्यन्तिक श्रेयाचें रहस्य

जो धर्म राम जपानांत घेऊन आला आहे, तो धर्म बुद्धानें कांहीं शतकां-

पूर्वी इकडे आणलेल्या धर्माहून भिन्न नाहीं. परंतु, आधुनिक कालाला अनुसरून एका विशिष्ट दृष्टीनें त्याची पुन्हां मांडणी केली पाहिजे. पाश्चात्य भौतिकशास्त्रें आणि तत्त्वज्ञान यांच्या प्रकाशांत त्या धर्माचें दिव्यत्व लोकांच्या प्रत्ययास अधिक स्पष्ट रीतीनें आणलें पाहिजे. या माझ्या धर्माचा मूलभूत सिद्धान्त जर्मन कवि गटे यांच्या पुढील शब्दांनीं मांडतां येण्यासारखा आहे. तो म्हणतोः "मनुष्याच्या आत्यन्तिक श्रेयाचें रहस्य, त्याचें अत्यंत श्रेष्ठ कर्तव्य काय आहे, हें मी तुम्हांला सांगतों. माझ्यापूर्वी या जगाला अस्तित्व नव्हतें. त्याची उत्पत्ति माझ्यापासून आहे. तो केवळ मी आपल्या कल्पनेनें उत्पन्न केलेला खेळ आहे. सूर्यानें समुद्रांतून निघून आकाशांत उदय पावावें, ही माझी करामत होय. एकदां हें तत्त्व प्रत्यक्ष अनुभवास आणून घ्या, म्हणजे तुम्हीं त्याक्षणींच मुक्त आहां. या रहस्याचें एकदां प्रत्यंतर घेऊन पहा, म्हणजे तुम्ही सदोदित यशस्वी व्हाल. या द्वैताचा रसास्वाद घ्या, म्हणजे प्रत्यक्ष अंधारकोठड्याहि दिव्य बनून जातील!"

ॐ! ॐ!! ॐ!!!



# यशाची गुरुकिल्ली

( सानफ्रान्सिस्को येथील 'गोल्डन गेट हॉल' मध्यें तारीख २६ जानेवारी १९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान )

## केवळ नामभेदामुळें वाद!



एकदां पंतोजीनें शाळेंतील तीन विद्यार्थ्यांना एक अधेली दिली, आणि ती आपसांत बरोबर वांटून घ्या असें सांगितलें. मुलांनीं त्या पैशांचा कांहींतरी खाण्याचा पदार्थ घ्यावा असें ठरविलें. हे तीन मुलगे तीन निरनिराळ्या राष्ट्रांतील होते. एक इंग्लंडांतील, दुसरा हिंदुस्थानांतील, व तिसरा इराणांतील होता. तिघांनांहि एकमेकांची भाषा पूर्णपणें समजत नसे. त्यामुळें कोणता पदार्थ विकत घ्यावा, हें ठरविणें त्यांना कठीण झालं. आपण ह्या पैशाचें एक वाटरमेलन विकत घेऊं या, असा तो इंग्रज मुलगा आग्रह करूं लागला. हिंदु मुलगा म्हणाला, 'छे! छे! तें कांहीं नाहीं, मला हिन्दवाना आवडतें; तेव्हां तेंच आपण विकत घेऊं या.' इराणी मुलगा म्हणाला, 'मला वाटरमेलनहि नको, आणि हिन्दवानाहि नको, आपण आपलें तरबूज घेऊं, म्हणजे झालें.' एक काय म्हणतो हें दुसऱ्या दोघांना बरोबर समजत नसल्यामुळें काय विकत घ्यावें याचा कांहींच निश्चय होईना. ज्याला त्याला आपल्या आवडीचा जिन्नस घ्यावा असें वाटे; दुसऱ्या दोघांच्या आवडीनावडीचा कोणीच विचार करीना. माझ्याच पसंतीचा जिन्नस घ्यावा असा प्रत्येक हट्ट घेऊन बसला. अर्थात् कोणता जिन्नस घ्यावा, यासंबंधानें त्यांच्यांत तंटा माजून राहिला. आपसांत भांडत भांडत ते बाजाराकडे चालले होते. जातां जातां इंग्रजी, फारसी, आणि हिंदुस्थानी ह्या तिन्ही भाषा येणाऱ्या एका गृहस्थाच्या शेजारून ते पुढें गेले. मुलांचें भांडण ऐकून या भाषाकोविदाला मोठी मौज वाटली. तो त्यांना म्हणाला, 'तुम्हीं उगाच भांडतां कशाला? तुमचें भांडण मी तोडून

देतों.' त्या गृहस्थाचें भाषण ऐकून मुलांना फार आनंद झाला. तिघांनींहि आपल्याला काय हवें तें त्याला सांगितलें व त्याच्या निकालाप्रमाणें वागण्याचें खुषीनें कबूल केलें. त्यांच्याकडून अधेली घेऊन तो म्हणाला, 'मी आतां मंडईत जाऊन तुम्हां प्रत्येकाला हवा तो जिन्नस घेऊन येतों. तोंपर्यंत तुम्ही येथेंच कोंपऱ्यावर उभे रहा.' लगेच मंडईत जाऊन एक भलें मोठें कलिंगड त्यानें विकत घेतलें; आणि तें उपरण्यांत लपवून ठेवून, मुलें उभीं होतीं त्या ठिकाणी तो आला. प्रथम त्यानें त्या इंग्रज मुलाला हांक मारली. त्याच्या दृष्टीस पडूं न देतां हळूच त्या कलिंगडाचे त्यानें तीन तुकडे केले. त्यांतील एक तुकडा त्या मुलापुढें करून तो म्हणाला, का, तुला हेंच पाहिजे होतें ना?' वाटरमेलन पाहतांच तो मुलगा फार खुष झाला. मोठ्या संतोषानें आणि कृतज्ञते नें त्यानें तो तुकडा आपल्या हातांत घेतला, आणि हेंच मला पाहिजे होतें,' असें म्हणून आनंदानें उड्या मारीत तो निघून गेला. नंतर त्या गृहस्थानें त्या इराणी मुलाला जवळ बोलावलें आणि धोतरांतून दुसरा तुकडा काढून तो त्याच्यापुढें केला आणि 'तुला तरबूज पाहिजे होतें ना?' असा प्रश्न केला. तरबूज पहातांच तो मुलगा फार खुष झाला आणि 'अरे, खरेंच तरबूज! हेंच मला हवें होतें,' असें म्हणून आनंदानें नाचत निघून गेला. नंतर त्या हिंदु मुलाला जवळ बोलावण्यांत आलें. राहिलेला तिसरा तुकडा त्याला देऊन तो गृहस्थ म्हणाला, 'बाळा, हाच पदार्थ तुला पाहिजे होता ना?' 'हो, हाच! हिन्दवाना तें हेंच. आणि हेंच मला पाहिजे होतं.' तोहि खुष झाला आणि आनंदानें नाचूं लागला.

## नामरूपाचा पडदा बाजूला सारा

त्या मुलांत तंटा आणि वाद कां बरें उत्पन्न झाला? त्यांच्या भांडणाचें बीज कशांत होतें? केवळ नांवामुळें त्यांच्यांत गैरसमज आणि भांडण उत्पन्न झालें. हीं नांवें काढून टाका, नामरूपाचा पडदा बाजूला सारून त्यांना आधारभूत असलेलें सत्तत्व शोधून काढा, म्हणजे गैरसमजाला आणि भांडणाला अवकाशच रहाणार नाहीं. ह्या तीन मुलांपैकीं एकाला वाटरमेलन पाहिजे होतें, दुसऱ्याला तरबूज पाहिजे होतें आणि तिसऱ्याला हिन्दवाना पाहिजे होतें. पण हीं तीन निरनिराळीं नांवें एकाच पदार्थाचीं होत, ह्या तिन्ही नांवांना आधारभूत वस्तु एकच आहे, तिन्ही शब्दांनीं लक्षित पदार्थ कालिंगडच होय. आतां कदाचित् असें होऊं शकेल कीं, इराणांतील तरबुजाची गोडी इग्लंडांतील कलिंगडाहून थोडी निराळी

असेल किंवा हिंदुस्थानांत उत्पन्न होणाऱ्या कलिंगडापेक्षां इंग्लंडांतील कलिंगडें थोडीं निराळीं असतील; परंतु रंगांत किंवा रुचींत थोडा फरक असला; तथापि फळ तेंच, पदार्थ तोच. आकारांत किंवा चवींत थोडासा फरक असूं शकेल; परंतु हा थोडा फरक हिशेबांत घेण्यासारखा नाहीं.

त्या भाषाकोविदाला त्या मुलांचें भांडण पाहून जशी मौज वाटली, त्याप्रमाणें निरनिराळ्या धर्मांतील विरोध, गैरसमज, वादविवाद व भांडणें पाहून रामाला हसूं येतें. ख्रिस्ती लोक यहुदी लोकांशीं भांडत असतात. यहुद्यांचे महंमदीयांशीं खटके उडतात. मुसलमान सनातन धर्मीयांशीं झगडतांना दिसतात. ब्राह्मण बुद्धांना नांवें ठेवीत असतात; आणि उलट बुद्धधर्मीय वैदिकधर्मावर शिव्यांचा वर्षाव करीत असतात. हा मतामतांचा गलबला मोठ्या गंमतीचा आहे! या सर्व तंट्यांचें आणि गैरसमजाचें मूळ मुख्यतः नांवांत असतें. नांवाचा पडदा बाजूला सारा आणि त्या पडद्याच्या मागें पहा. त्या त्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या निरनिराळ्या धर्मांचें रहस्य समजावून घेण्याचा प्रयत्न करा, प्रत्येक धर्माचें साध्य काय आहे तें पहा, म्हणजे त्यांत तुम्हांला विशेष फरक आढळून येणार नाहीं.

## तत्त्वान्वेषण करा

व्याख्यानांतून पुष्कळदां राम, वेदान्त या शब्दाचा उपयोग करीत असतो, परंतु या शब्दानें, वेदान्त या नांवानें कित्येक लोक बुजतात; आणि रामाचीं व्याख्यानें मुळीं ऐकूंच नयेत, असें त्यांना वाटतें; रामाच्या व्याख्यानांविषयीं त्यांचा विपरीत ग्रह होतो. रामाप्रमाणेंच दुसरा एखादा धर्मोपदेशक येऊन तो बुद्धाच्या नांवानें उपदेश करूं लागतो. तुमच्या कानांना गोड न लागणारें बुद्धदेवाचें नांव तो पुढें करीत असल्यामुळें, त्याचा उपदेश ऐकूं नये असें तुम्हांला वाटतें. परंतु मित्रांनो! कृपा करून अधिक विचारशीलता अंगीं बाणून घ्या. या विसाव्या शतकांत केवळ नांवानें आपण बुजून जातां कामा नये. नामरूपाच्या अतीत होण्याची वेळ आतां नजीक येऊन ठेपली आहे! तुम्हांला राम जो उपदेश करतो किंवा दुसरा एखादा धर्मोपदेशक जो उपदेश करील, त्यांत तथ्य किती आहे, हें पाहाण्याकडे तुमचें लक्ष असूं द्या. अमुक असें म्हणतो, एवढ्यावरच हुरळून जाऊन फसूं नका! नांवाला बळी पडून भलतीकडेच वाहात जाऊं नका. प्रत्येक गोष्ट सत्यान्वेषणाच्या कसोटीला लावून पाहा. नांवाचा आश्रय न करता स्वतः त्या [illegible] सत्याच्या पायावर

ती उभी राहूं शकते कीं नाहीं, याचा आपल्या मनाशीं चांगला विचार करा. एखादा धर्म अत्यंत प्राचीन आहे, एवढ्यावरूनच त्याचा अंगीकार करूं नका* तो अत्यंत प्राचीन असला म्हणून तोच तेवढा खरा असें थोडेंच आहे! प्राचीनता ही कांहीं सत्याची कसोटीं नव्हे. कधीं कधीं जुनीं झालेलीं घरें पाडून टाकावीं लागतात व जीर्ण झालेलीं वस्त्रें जीर्ण म्हणूनच फेंकून द्यावीं लागतात! एखादा सिद्धान्त किंवा तत्त्व अगदीं नवें कां असेना, पण तें बुद्धीच्या कसोटीला उतरत असेल, तर चकचकीत दंवबिंदूंनीं खुलणाऱ्या गुलाबाच्या ताज्या फुलाप्रमाणें तें अत्यंत आल्हादकारक व आदरणीयच होय. परंतु केवळ नवीनतेच्या सबबीवर कोणत्याहि धर्माचा तुम्ही स्वीकार करूं नका. सर्व नव्या वस्तु नेहमीं चांगल्याच असतात असें नाहीं! कारण, कालाच्या कसोटीला त्या उतरलेल्या नसतात. तसेंच, मनुष्यजातींतील बहुतांश एखाद्या धर्माचा अनुयायी असला, तथापि संख्येच्या जोरावर फसले जाऊं नका. बहुमत एखाद्या धर्माच्या बाजूचें आहे, एवढ्याच कारणाकरितां त्या धर्माचा स्वीकार तुम्ही करूं नका. कारण, खरें पाहूं गेलें तर जगांतील पुष्कळ लोक नेहमीं सैतानाचे अनुयायी असतात, असें म्हणण्यास काय हरकत आहे? उदाहरणार्थ, एके काळीं गुलामगिरींत दूषणीय असें कांहींच नाहीं, असें इकडील बहुजनसमाजाला वाटत असे; परंतु तेवढ्यावरून गुलामगिरीची संस्था निर्दोष आहे, असें आज कोणी म्हटल्यास ते रास्त होईल काय? कांहीं निवडक लोक एखाद्या धर्मावर विश्वास ठेवतात म्हणूनहि त्या धर्माचा तुम्ही अवलंब करूं नका. बहुमतांप्रमाणें अल्पमतहि चुकूं शकतें. कारण, ज्यांना निवडक लोक म्हणून म्हणण्यांत येतें, तेहि कधीं कधीं अज्ञानानें फसून जाऊन भलत्याच धर्माचा स्वीकार करतात. ज्यानें सर्वसंगपरित्याग केला आहे, अशा एखाद्या महान् यतीनें एखादा धर्म प्रतिपादन केला आहे, म्हणूनहि त्याचा तुम्ही अवलंब करूं नका. कारण, असें पुष्कळ यती आढळून येतात कीं, ज्यांनीं खरोखर सर्वस्वाचा त्याग केलेला असूनहि खऱ्या ज्ञानाच्या–ब्रह्मज्ञानाच्या नांवानें ज्यांच्याजवळ आंवळ्याएवढें पूज्यच असतें! एवढेंच नव्हें तर ते केवळ धर्मवेडे माथेफिरू असतात. राजामहाराजांनीं एखादा धर्म प्रतिपादन

*पुराणमित्येव न साधु सर्वम् । न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ॥
सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते । मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥—कालिदास.

केला आहे, म्हणूनहि त्याचा तुम्ही स्वीकार करूं नका. कारण, ऐहिक ऐश्वर्यानें संपन्न व परिपूर्ण असणारे राजेमहाराजे आध्यात्मिक ऐश्वर्याचे बाबतींत अगदीं कंगाल असतात ! अत्यंत पवित्र आणि निष्कलंक अशा सज्जनानें एखादा धर्म सांगितलेला आहे, म्हणूनहि त्याचा तुम्हीं अंगीकार करूं नका. कारण, अत्यंत थोर पुरुषहि सत्याचे यथार्थ प्रतिपादन करण्यांत कित्येक वेळां चुकलेले असतात. एखाद्या मनुष्याची पचनशक्ति फार दांडगी असेल. परंतु अन्न पोटांत गेल्यावर त्याचा परिपाक कसा होतो, तें कसें पचलें जातें, या वैद्यकीय ज्ञानाचा त्याला गंधहि नसणें शक्य आहे. अत्यंत सुंदर, मनोवेधक व नयनमनोहर असें चित्र काढणारा चित्रकार स्वतः अत्यंत कुरूप असूं शकतो. कांहीं लोक दिसण्यांत अगदीं कुरूप असतात; तथापि, अत्यंत उज्ज्वल अशीं तत्त्वें त्यांच्या ग्रंथांतून प्रतिपादिलेलीं आढळतात. प्रख्यात ग्रीक तत्त्ववेत्ता सॉक्रेटीस हें या बाबतींत उदाहरण आहे. आंग्ल तत्त्ववेत्ता फ्रान्सिस बेकन * याचें नांव तुम्हीं ऐकलें असेलच, त्याचें खासगी वर्तन वाखाणण्यासारखें

---

* बेकन प्रख्यात आंग्ल तत्त्वज्ञ ( १५६०–१६२६ ). नवसाधन ( नोव्हम ऑर्ग्यानम् ) हा बेकनचा सर्वांत नामांकित व श्रेष्ठ ग्रंथ असून त्यांत सृष्ट पदार्थांचें खरें ज्ञान कसें संपादन करावें, शास्त्रीय शोधांच्या कामीं कोणत्या साधनांचा उपयोग करावा, याचा त्यानें विचार केला आहे. शास्त्रीय शोधांच्या बाबतींत बेकनच्या पूर्वींच्या शास्त्रज्ञांचा तर्कावर, युक्तींवर व आप्तवाक्यावर विशेष भर असे. कोणताहि शास्त्रीय सिद्धान्त किंवा शोध प्रस्थापित करण्यापूर्वी तद्विषयक शक्य तितक्या अधिक गोष्टींचा शोध व तपास करून, तसेंच साधकबाधक सर्व प्रमाणें पाहून व स्वतःची खात्री करून घेऊन मग तो सिद्धान्त ते प्रस्थापित करीत नसत; तर कांहीं विवक्षित गोष्टी पाहून तेवढ्यावरून ते सामान्य सिद्धान्त बांधीत. निगामी तर्कशास्त्रपद्धतीचाच ते अवलंब करीत. याच्या उलट सदर ग्रंथांत बेकननें असें प्रतिपादन केलें आहे कीं, कांहीं विशेष गोष्टींच्याच परीक्षणावरून तद्विषयक सार्वत्रिक सिद्धान्त बांधणें चुकीच असून प्रत्येक सिद्धान्ताला पद्धतशीर आणि विस्तृत परीक्षणाची व प्रत्यक्ष प्रयोग करून पाहण्याची अत्यंत आवश्यकता आहे. अर्थात् खऱ्या शास्त्रीय ज्ञानाला आगामी तर्कशास्त्राची अत्यंत आवश्यकता असून, आगामी तर्कशास्त्र हेंच खऱ्या शास्त्रीय ज्ञानाचें मुख्य साधन आहे, असें या ग्रंथांत बेकननें स्पष्टपणें व

नव्हतें; त्याची नीतिमत्ता विशेष प्रशंसनीय नव्हती;+ तथापि 'नवसाधन या नांवाचा अद्वितीय ग्रंथ त्यानें जगाला अर्पण केला. आगमनात्मक तर्कशास्त्राची पद्धति त्यानेंच प्रथम जोरानें पुढें आणली. त्याचें तत्त्वज्ञानहि अत्यंत उदात्त व श्रेष्ठ दर्जाचें होतें. सारांश हा कीं, मनुष्याचें बाह्यसौंदर्य, त्याचें चारित्र्य आणि त्याचें तत्त्वज्ञान यांत नेहमीं मेळ असतोच असें नाहीं. एखाद्या विख्यात पुरुषानें एखादें मत प्रतिपादन केलें असलें म्हणून तेवढ्यानें त्या मतावर विश्वास ठेवूं नका. आयझाक् न्यूटन हा मोठा शास्त्रज्ञ होता. त्याच्या वेळीं त्याच्या तोडीचा जाडा पंडित सर्व युरोपखंडांत दुसरा कोणीहि नव्हता. तथापि, आपणांस पदार्थ कसे दिसतात, ह्यासंबंधाची त्याची उपपत्ति चुकीची आहे. त्याची द्रव्यरूप कल्पना* आधुनिक शास्त्रज्ञांना मान्य नाहीं.

---

जोरानें प्रतिपादन केलें आहे. यामुळेंच बेकनला युरोपांतील आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचा जनक, असें म्हणतात.

+ 'मनुष्यकोटींतील अत्यंत उच्च, तेजस्वी, परंतु नीच' या शब्दांनीं पोप कवीनें बेकनची संभावना केली आहे.

* आपणांस पदार्थ कसे दिसतात या संबंधानें कित्येक शतकांपासून तज्ज्ञांत दोन कल्पना रूढ आहेत: (१) द्रव्यरूप कल्पना, (२) लहरीरूप कल्पना. न्यूटन हा द्रव्यरूप कल्पनेचा पुरस्कर्ता होता. त्याचें म्हणणें असें कीं, प्रकाशमान पदार्थ अत्यंत विरल अशा गुरुत्वशून्य पदार्थांचे सूक्ष्म कण सर्व दिशांनीं नेहमीं टाकितात. ते अत्यंत वेगानें सरळ रेषेंत पुढें जातात. ते नेत्रांत शिरून नेत्रपटलावर कार्य करतात; आणि त्यामुळें पदार्थ आपणांस दृष्टिगोचर होतात. लहरीरूप कल्पनेचे पुरस्कर्ते असें मानतात कीं, सर्व पदार्थ व आकाशांतील सर्व रिक्त स्थळें अत्यंत चपल व स्थितिस्थापक अशा तेजोवाहक इथर या नांवाच्या पदार्थानें व्यापिलेलीं आहेत. पदार्थांचे कण अत्यंत वेगानें आंदोळून पावतात व या आंदोलकगतीमुळे पदार्थ प्रकाशमान झालेले आहेत. त्यांच्या कणांची ही गति इंथरास पोहोंचून त्यामध्यें लहरी उत्पन्न होतात व त्या लहरी सर्व दिशांनीं पसरतात. याप्रमाणें ही लहरीरूप गति नेत्रपटलास पोहोंचून आपणांस पदार्थ दिसतात. या दोन्ही कल्पना अद्याप कल्पनाच आहेत. तथापि द्रव्यरूप कल्पनेपेक्षां लहरीरूप कल्पना तज्ज्ञांना अधिक संमत आहे.

तसेंच, त्याची चलनकलनपद्धति * लिब्निट्सच्या पद्धतीइतकी निर्दोष समजली जात नाहीं. कोणत्याहि वस्तूचें किंवा कोणत्याहि धर्माचें प्रथम नीट परीक्षण करा. त्यांतील गुणदोषांची छानणी करून नंतरच त्याचा स्वीकार करा. स्वतः त्यांना कसोटीला लावून पहा.. चिकित्सक बुद्धीच्या चाळणींत त्यांना चाळा. बुद्ध, महंमद, ख्रिस्त किंवा कृष्ण यांना आपले विचारस्वातंत्र्य विकून टाकूं नका. बुद्धानें कांहीं विशिष्ट सिद्धान्त प्रतिपादन केले असतील. ख्रिस्तानें कांहीं निराळेच सांगितले असतील, महंमदानें कांहीं तिसरेच शिकविले असतील, त्यांचें करणें योग्य आणि युक्तच होय. ते ज्या कालांत होऊन गेले त्या कालाला अनुरूप असाच त्यांनीं उपदेश केला. तत्कालीन धार्मिक प्रश्नांचा त्यांनीं उहापोह केला; आपल्या समजुतीप्रमाणें सत्यासत्याचा त्यांनीं निर्णय केला. त्याची कृति त्यांना सर्वस्वी भूषणास्पद होय. परंतु त्यांचा काल आतां राहिलेला नाहीं. वर्तमान कालांत आपण राहात आहों. यासाठीं प्रत्येक सिद्धान्त आपला आपण तपासून सत्याच्या कसोटीस लावून, आपणांस पटवून घेतला पाहिजे. अपणांपुढील प्रश्न आपले आपण स्वतः सोडविले पाहिजेत. मोठ्यांच्या नांवानें दिपून जाऊं नका. स्वतंत्रवृत्ति अंगीं बाणून घ्या; आणि प्रत्येक वस्तूवर स्वतःच्या ज्ञानाचा प्रकाश पाडून त्या प्रकाशांत तिच्या गुणदोषांची चिकित्सा करा. तुमच्या पूर्वजांनीं एखाद्या विशिष्ट धर्मावर विश्वास ठेवला असेल; त्यांच्या काळीं त्या धर्मावरच विश्वास ठेवणें त्यांच्या कदाचित् हिताचें असेल; परंतु तो काळ आतां राहिलेला नाहीं. स्वहिताचा विचार तुमचा तुम्हींच केला पाहिजे; तें तुमच्या पूर्वजांचें काम नव्हे. तुमच्या पूर्वजांनीं ज्या विशिष्ट धर्मावर विश्वास ठेवला, त्या धर्माच्या आश्रयानें ते हा भवसागर तरून गेले असतील; किंवा कदाचित् नसतीलहि. त्याचा आज विचार करीत बसण्याचें कारण नाहीं. परंतु तुमच्या उन्नतीचा

---

+ चलनकलनः ग्रहांच्या मार्गांतील अतिसमीप बिन्दूंतील गतीच्या वेगाच्या चलनाचें ( फरकाचें ) कलन ( गणित ) हा उच्च गणिताचा भाग आहे. ग्रहांची त्यांच्या कक्षेच्या किंवा वक्राच्या कोणत्याहि बिन्दूंतील तात्कालिक गति शोधून काढण्याकडे चलनकलनाचा उपयोग करतात. न्यूटनची चलनकलनाची पद्धति आणि लिब्निट्सची चलनकलनाची पद्धति यांत नांव व संज्ञा यांशिवाय वास्तविक कांहीं भेद नाहीं.

मार्ग—तुमच्या मोक्षाचा मार्ग तुम्हींच ठरविला पाहिजे. जीं जीं धर्ममतें किंवा जे जे सिद्धान्त तुमच्यापुढें मांडण्यांत येतील त्यांचें स्वतः परीक्षण करा. तीं मतें कोण प्रतिपादन करतो, इकडे लक्ष देऊं नका. आपलें विचारस्वातंत्र्य झुगारून देऊं नका. तुमच्या पूर्वजांपुढें एखाद्या विशिष्ट धर्माचींच मतें मांडण्यांत आलीं असतील. परंतु आज निरनिराळे धर्म, निरनिराळे सिद्धान्त, निरनिराळीं शास्त्रें आणि तत्त्वज्ञानें तुमच्यापुढें मांडलीं जात आहेत. तुमचा हा धर्म पूर्वकालीं तुमच्यापुढें मांडण्यांत आला होता, एवढ्यावरूनच जर तो तुमचा होतो, तर त्याच विचारसरणीनें बुद्धाचा धर्म तुमच्यापुढें सांगितला तर तोहि तुमचाच होत नाहीं काय? त्याच न्यायानें रामानें तुम्हांला वेदान्त सांगितला, तर तेवढ्याच कारणानें वेदान्तहि तुमचाच होत नाहीं काय?

## सत्य हें सर्वांचें आहे

सत्य हें कोणाच्याहि एकट्याच्या मालकीचें नाहीं. सत्यावर एकट्या येशूचाच मालकीहक्क पोहोंचूं शकत नाहीं. म्हणून त्याच्या नांवानेंच सत्याचा उपदेश करतां कामा नये. 'हें येशूचें सत्य' असें सांगणें केव्हांहि रास्त होणार नाहीं. तसेंच सत्य हें एकट्या बुद्धाच्याहि मालकीचें नाहीं. अर्थात् तें त्याच्या नांवावर कोणीहि विकतां कामा नये. सत्य हें महंमदाचेंहि नाहीं. श्रीकृष्णाच्या किंवा अन्य कोणाच्याहि मालकीचें तें नाहीं. सत्य हें सर्वांच्याच मालकीचें आहे. त्यावर प्रत्येकाचा एकसारखाच हक्क आहे. सूर्यप्रकाशाप्रमाणें तें सर्वांचें आहे. पूर्वी दुसरा कोणी उन्हांत बसला असला, म्हणून आज आपण सूर्यप्रकाशांत बसूं नये, असें थोडेंच आहे! प्रकाशाचा आनंद घेण्याचा आपणांसहि तितकाच अधिकार आहे. एखाद्या निर्झराचें स्वच्छोदक दुसरा प्राशन करतो, म्हणून आपण तें प्राशन करूं नये, असें कसें होईल! निर्झरोदकाचें तुम्हींहि यथेच्छ प्राशन करा. जगांतील सर्व धर्मासंबंधानें तुमची अशाच प्रकारची वृत्ति असली पाहिजे. शेजाऱ्यापाजाऱ्यांची धनदौलत व ऐश्वर्य हीं आपल्याला मिळालीं तर बरें, असें विनदिक्कत आपल्या मनांत येऊं शकतें; परंतु ऐहिक संपत्तीपेक्षां उघड उघड श्रेष्ठ अशी आध्यात्मिक संपत्ति एखाद्या शेजाऱ्यानें आपण होऊन देऊं केली असतां आनंदानें तिचा स्विकार न करतां, उलट त्याच्याशीं भांडण्यास व विरोध करण्यास आपण तयार होतों, हें आश्चर्य नव्हे काय? तुमच्यावर वेदान्ती म्हणून छाप मारण्याकरितां राम वेदान्ताचा

येथें उपदेश करीत नाहीं. तो रामाचा केव्हांहि उद्देश नाहीं. राम काय म्हणतो तें सावधानतेनें श्रवण करा. त्याच्या उपदेशाचें मनन करा, तो आपलासा करा. रामाचा वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत आणा, मग त्याला तुम्हीं खिस्तिपंथ हें नांव दिलेंत, तरी त्याची रामाला पर्वा नाहीं. कारण, नांवांत काय आहे! जो वेदान्तधर्म राम अमेरिकेंत आणीत आहे, तो तुमच्या बायबलांतहि आहे. अत्यंत प्राचीन अशा धर्मग्रंथांतहि तो सांगितला आहे; इतकेंच नव्हे तर अगदीं अलीकडील शास्त्रीय व तत्त्वज्ञानपर ग्रंथांतूनही त्याचेंच प्रतिपादन केलेलें आहे. राम जो धर्म इकडे आणीत आहे तो तुम्हांला रहदारीच्या रस्त्यांतून लिहिलेला आढळेल. झाडांच्या पानांवर त्या धर्माचे सिद्धान्त तुम्हांला दिसून येतील; ओढे व नद्या त्याच धर्माचें सदा गीत गात असतात, वारे त्याच धर्माचें गुह्य तुमच्या कानांत सांगत असतात, तुमच्या रक्तवाहिन्यांतून आणि नसानसांतून त्याच धर्मीचे सिद्धान्त स्फुरण पावत असतात; सारांश, तुमचा नित्याचा व्यवसाय आणि तुमचें अंतःकरण यांच्याशीं ज्याचा निकट संबंध आहे, असाच धर्म राम तुमच्यापुढें मांडीत आहे. या धर्माचे नियम पाळण्यास विशिष्ट प्रार्थनामंदिरांत जाऊन उपासना करण्याची जरूरी नाहीं; तुमच्या स्वयंपाकघरांत, तुमच्या दिवाणखान्यांत, नित्यव्यवहारांत; सारांश, सर्व ठिकाणीं आणि सर्व बाबतींत पाळण्यांचा असा हा धर्म आहे. या धर्माला पाहिजे तर वेदान्त हें नांव देऊं नका; पाहिजे तर दुसरेंच नांव द्या; कारण नांवांत कांहींच महत्त्व नाहीं. वेदान्त या शब्दाचा अर्थ तत्त्वाचें तत्त्व, ज्ञानाचा अंत हा आहे. सत्य हें तुमचेंच आहे. तुमच्यापेक्षां रामाचा त्यावर अधिक हक्क आहे, असें नाहीं. तें जितकें हिंदूंचें आहे, तितकेंच तें तुमचेंहि आहे. ते वास्तविक कोणाचेंच—कोणाच्याहि ताब्यांत नसून, सर्वांवर त्याचा ताबा आहे.

## प्रवृत्तिपर वेदान्त

हा वेदान्त आचरणांत आणल्यानें जीविताचा मार्ग सुखाचा कसा होतो, तसेंच आपले सर्व व्यवहार आल्हादकारक कां होतात, याचा आतां आपण विचार करूं. आज आपण प्रवृत्तिपर वेदान्त किंवा पर्यायानें यशाची गुरुकिल्ली हा विषय घेऊं. वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत आणणें हीच यशाची गुरुकिल्ली होय. वेदान्त कृतींत आणणें, वेदान्ताच्या नियमांप्रमाणे

चालणें, म्हणजे प्रवृत्तिपर वेदान्त आणि यशाचें रहस्य तरी हेंच. प्रत्येक शास्त्राचीं औपपत्तिक आणि क्रियात्मक अशीं दोन अंगें असतात. तशीं तीं वेदान्तशास्त्रालाहि आहेत. आज आपण वेदान्ताच्या दुसऱ्या अंगाचा, क्रियात्मक भागाचा, प्रवृत्तिपर वेदान्ताचा विचार करूं.

## वेदान्तावरील आक्षेप

वेदान्त हा निराशावाद शिकवतो, वेदान्तानें लोक हताश, निराश, नेभळे, आळशी व सुस्त बनतात, असा कित्येक लोकांचा वेदान्तावर आक्षेप आहे. या आक्षेपकांना रामाची एवढीच प्रार्थना आहे कीं, वेदान्ताचा उपदेश मनुष्यांच्या अंगांत नवीन चैतन्य, नवा उत्साह, नवें सामर्थ्य उत्पन्न करतो, त्यांना कर्तृत्ववान् करतो किंवा नेभळे करतो, याचा निर्विकार बुद्धीनें स्वतःशीं निवाडा करा. आपली बुद्धिमत्ता आणि मार्मिकता दुसऱ्याला विकून दुसऱ्याच्या मतांवरून भलतेंच मत बनवून घेऊं नका. स्वतः हिंदुलोक वेदान्ताप्रमाणें वागतात कीं नाहीं, हा प्रश्न करण्याचें तुम्हांला कारण नाहीं. वेदान्तावर एकट्या हिंदूंचीच मालकी नाहीं; त्यांच्याच खास मालकीचा कांहीं तो नाहीं, तर तो सर्वांच्या सारखाच मालकीचा आहे. वेदान्त सर्व जगाचा आहे, असें राम तुम्हांला स्पष्टपणें सांगत आहे. वेदान्तावर तुमचाहि जन्मसिद्ध हक्क आहे. उद्योगधंद्यांत, तुमच्या औद्योगिक जीवनक्रमांत तुम्हीं अमेरिकन लोक वेदान्त बऱ्याच प्रमाणानें अमलांत आणतां आणि म्हणूनच औद्योगिक बाबतींत तुमची भरभराट होत आहे. तुम्हांप्रमाणें हिंदी लोक व्यापारांत वेदान्त पाळीत नाहींत आणि म्हणूनच भौतिक ऐश्वर्याच्या दृष्टीनें, संपन्नतेच्या बाजूनें ते तुमच्याहून फार मागसलेले आहेत.

## वेदान्ताचें सामर्थ्य

खोटा किंवा विपर्यस्त वेदान्त राम अमेरिकेंत आणीत नसून, निसर्गाच्या मूळ उगमापासून निघालेला शुद्ध, अविकृत आणि अविपर्यस्त असाच वेदान्त, वेदांताचे मूलभूत सिद्धान्त, त्यांच्या शुद्ध स्वरूपांत राम तुम्हांपुढें मांडीत आहे. चिकित्सक आणि निर्विकार बुद्धीनें ह्या प्रश्नाकडे पहा, म्हणजे वेदान्त किती लोकोत्तर व चमत्कृतिजनक आहे, तसेंच प्रत्येक व्यवसायांत वेदान्तामुळेंच यशस्विता कशी प्राप्त होते, प्रत्येकजण नकळत वेदान्ताच्या मार्गाकडे

कसा खेंचला जात असतो व वेदान्ताच्या आज्ञा कित्येक वेळां अजाणतां तो कशा शिरसावंद्य करीत असतो, हें तुम्हांला कळून येईल.

यशस्वितेचीं रहस्यें अनेक आहेत, तिचीं निरनिराळीं अंगें व स्वरूपें आहेत. त्यांतील एकेक अंग किंवा तत्त्व क्रमशः घेऊन त्याचा वेदान्ताशीं, आर्यांच्या धर्मग्रंथांतून दिलेल्या वेदान्ताच्या विवरणाशीं काय संबंध पोहोंचतो, याचा आपण आतां विचार करूं.

## 'सततं कुरु कर्म त्वम्.'

कर्म, अनवरत कर्म, चिकाटी हीच यशाची गुरुकिल्ली आहे, हें उघड आहे. 'ठोका, घणानें ठोका,' हें यशस्वितेचें आद्य तत्त्व होय. उद्योग केल्याशिवाय, दीर्वोद्योगाशिवाय तुम्हांला यश येणें केव्हांहि शक्य नाहीं. जीवनकलहांत आळशी व निरुद्योगी मनुष्याला टिकाव धरतां येणें शक्य नाहीं. जीवनार्थ संग्रामांत त्याचा चुराडा होणें, अपरिहार्य आहे. या ठिकाणीं वेदान्तावरील एक ठरीव आक्षेप डोळ्यांसमोर येतो. हा आक्षेप असा आहे कीं, वेदान्त-दृष्ट्या आत्मा हा निश्चल, अविकार्य आणि शुद्ध असा आहे. आत्म्याच्या या वर्णनाचा आणि अखंड कर्माच्या उपदेशाचा मेळ तुम्ही कसा घालतां? परमात्मस्वरूपाची शांति आणि प्रसन्नता अंगीं बाणवून घेण्यास सांगून, तसेंच वैराग्याचा उपदेश करून, वेदान्त हा आलस्याची आणि निष्क्रियतेची प्रवृत्ति लोकांत अप्रत्यक्षपणें तरी उत्पन्न करीत नाहीं काय? तो लोकांना आळशी आणि निरुद्योगीच बनवीत नाहीं काय? पण कर्माचें खरें स्वरूप किंवा वैराग्य यासंबंधानें लोकांचा भयंकर गैरसमजच या आक्षेपाच्या मुळाशीं आहे.

## कर्म म्हणजेच योग

आतां, आपण कर्म म्हणजे काय, याचा विचार करूं. कर्म, अविरत कर्म म्हणजे वेदान्तदृष्ट्या विश्रांतिच होय.* कर्म आणि विश्रांति हे शब्द विरोधाचा आभास उत्पन्न करतात. परंतु त्यांत वास्तविक विरोध नाहीं. कारण, मनापासून केलेलें प्रत्येक कर्म विश्रांतिरूपच होय.

---

* कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्॥ गीता ४।१८

एखादा दीर्घोद्योगी मनुष्य घ्या. तो ज्या वेळीं एखादें महत्त्वाचें काम करीत असतो, कामांत गढून गेलेला असतो, त्या वेळीं त्याच्या चेहऱ्याकडे लक्षपूर्वक पहा. तुमच्या डोळ्यांना तो कामांत गुंतलेला दिसेल; फार परिश्रम करीत असलेला दिसेल; परंतु त्याच्या स्वतःच्या दृष्टीनें तो अकर्ता असतो. दूर अंतरावरून इंद्रधनुष्य पहाणाऱ्या डोळ्यांना त्यांत निरनिराळे सुंदर रंग दिसतात. परंतु जवळ जाऊन पाहिलें असतां तेथें एकहि रंग दिसत नाहीं. त्यांतलेंच हें आहे. **नेपोलियन, वॉशिंग्टन,** यांच्यासारखा एखादा अद्वितीय योद्धा ज्यावेळीं रणांगणावर लढत असतो, आपल्या युद्धकौशल्याची आणि मर्दपणाची समरांगणावर शिकस्त करीत असतो, त्या वेळीं त्याची स्थिति काय असते, याचा विचार करा. त्याच्या शरीराकडून संहाराची क्रिया यंत्रवत् होत असते. युद्धांत तो इतका गर्क होउन गेलेला असतो कीं, 'मी लढाई मारीत आहे,' अशा तऱ्हेचा कर्तृत्वाचा विचार पार नाहींसा झालेला असतो; अशा प्रकारची अभिमानाची वृत्ति त्याच्या ठिकाणीं पार मावळलेली असते. क्षुद्र अहंकाराला तेथें अवकाशच नसतो. शत्रूच्या संहाराकडे वृत्तीचा लय लागल्यामुळें संहाराची क्रिया शरीराकडून अगदीं यंत्रवत् होत असते. सारांश काय कीं, अनवरत कर्म हें अजाणतां अत्यंत श्रेष्ठ अशा योगाकडे आपणांस नेत असतें; आपणांस मोठे योगी बनवीत असतें.

## अहंता सोडा

सहज किंवा प्रसंगप्राप्त कर्मांत मग्न राहून आपला देहभाव विसरावा, अनवरत कर्माच्या क्षुद्र अहंकाराच्या आपण अतीत व्हावें, असाच वेदान्ताचा उपदेश आहे.ऽ शरीर आणि मन हीं कार्यांत इतकीं गढून जावींत कीं, आपण कार्य करीत आहों, याचें भानहि आपणांस राहूं नये. 'मी काव्यरचना करीत आहें,' ही मीपणाची वृत्ति ज्यावेळीं कवीच्या डोक्यांतून पार नाहींशी होते, क्षुद्र अहंभावाचा ज्यावेळीं त्याच्या ठिकाणीं निरास होतो व तो तत्कालीन कल्पनेशीं पूर्णपणें तादात्म्य पावतो, त्याचवेळीं खरी कवित्वस्फूर्ति त्याला होऊं शकते; प्रासादिक, ओजस्वी आणि प्रतिभासंपन्न काव्य तेव्हांच त्याच्या लेखणींतून निघूं शकतें. उच्च गणितांतील विकट प्रश्न सोडविणाऱ्या एखाद्या



ऽ कर्मणैवहि संसिद्धिमास्थिता जनकादयः । गीता, अ. ३।२०.

बुद्धिमान् विद्यार्थ्यांचा अनुभव विचारा म्हणजे तो असेंच सांगेल कीं ज्या वेळीं एखादा कूटप्रश्न सोडविण्यांत मी अगदीं गढून जात असें, त्या वेळीं 'मी प्रश्न सोडवीत आहें', ही वृत्तिच नाहींशी होत असे, तेव्हांच प्रश्न भराभर सुटत आणि सर्व शंका निवारण होत. हा अहंभाव ज्या मानानें अधिकाधिक नाहींसा होऊं शकेल, ज्या मानानें ह्या क्षुद्र अहंकाराच्या तुम्ही अतीत होऊं शकाल, त्या मानानें अधिकाधिक भूषणास्पद व वैभवशाली कृत्यें तुमच्या हातून होत जातील.

## वेदान्तामुळेंच यशःप्राप्ति

मनःपूर्वक दीर्घ परिश्रम करून त्याच्यायोगानें अहंभावरहित होणें, कर्मानेंच कर्मातीत स्थितीला, निरहंकारत्वाच्या स्थितीला जाऊन पोहोंचणें, अर्थात् परमात्मा किंवा ईश्वर याच्याशीं पूर्णपणें तदाकार होणें, हाच वेदान्ताचा उपदेश आहे. जेव्हां एखादा विचारवंत, तत्त्वज्ञ, कवि, शास्त्रज्ञ किंवा कलाभिज्ञ आपल्या कामांत इतका गर्क होऊन जातो, इतका तन्मय होतो कीं, त्याला देहभान राहात नाहीं, अर्थात् त्याचें व्यक्तित्त्व पूर्णपणें नाहींसें होतें, तेव्हांच परमात्मस्वरूपी वादनाचार्य त्या ईश्वरस्वरूपी लीन झालेल्या विचारवंताच्या, तत्त्वज्ञाच्या, कवीच्या, शास्त्रज्ञाच्या किंवा कलाभिज्ञाच्या देहरूपी किंवा मनोरूपी वाद्याला आपल्या हातांत घेऊन गती छेडूं लागतो. मग त्यांतून लोकोत्तर व स्वर्गीय ध्वनि बाहेर पडतात. दिव्य संगीत त्यांतून बाहेर येतें आणि तेव्हांच सदरहू तत्त्वज्ञाला किंवा कवीला ईश्वरी प्रेरणा झाली आहे, असें लोक म्हणूं लागतात. परंतु वास्तविक पाहतां, अशा वेळीं तत्त्वज्ञाच्या किंवा कवीच्या ठिकाणीं मी तूं हा भेदभावच राहात नाहीं. त्याच्या दृष्टीनें कर्तेपणाचा किंवा भोक्तेपणाचा स्वतःच्या ठिकाणीं त्या वेळेपुरता तरी पूर्ण अभाव असतो. वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत आणणें तें हेंच. अजाणतां वेदान्त कृतींत उतरल्याचींच हीं उदाहरणें आहेत.

## वनवासाची जरूरी नाहीं

वेदान्तांत सांगितलेला योग प्राप्त करून घेण्याकरितां अरण्यांत जाऊन एकान्तवास करण्याची किंवा अस्वाभाविक अशा हठयोगाच्या तालमीचा अभ्यास करण्याचीहि जरूरी नाहीं. ज्या वेळीं एखाद्या कर्मांत तुम्ही गढून जातां, तुमचा अहंकार पूर्णपणें नाहींसा होतो, त्या वेळीं योगाचे जनक,

प्रत्यक्ष योगेश्वर शंकरच तुम्हीं बनतां. वेदान्तदृष्ट्या देह किंवा मन म्हणजे कांहीं तुम्हीं नव्हें; तें तुमचें खरें स्वरूप नव्हें. आणि या सिद्धान्ताचा तुम्ही ज्या वेळीं प्रत्यक्ष अनुभव घेतां, अर्थात् एखाद्या कामांत गढून गेल्यामुळें देह आणि मन यांचा जेव्हां तुम्हांला पूर्णपणें विसर पडतो, तेव्हांच तुमचें खरें ऐश्वर्य प्रकट होते, श्रेष्ठ प्रकारची कामगिरी त्याच वेळीं तुमच्या हातून घडून येते, हा तुमचा अनुभव नाहीं काय?

## कर्माची व्याख्या

आतां कर्म म्हणजे काय, हें दिव्याच्या किंवा प्रकाशाच्या दृष्टान्तानें स्पष्ट करण्यांत येत आहे. एखादा धुराचा किंवा तेलाचा दिवा घ्या. प्रकाश हा अत्यंत प्रखर, झगझगीत, चकचकीत व डोळे दिपविणारा, अत्यंत शोभायमान व वैभवशाली असा असतो. दिव्याच्या ठिकाणीं हें तेज व ही शोभा कशामुळें येते? स्वार्थत्यागामुळें; अनवरत कर्माच्या योगानें व अहंभावाचा निरास केल्यामुळें वात आणि तेल यांचे बाबतींत दिव्याला हात आखडता धरूं द्या, म्हणजे मग प्रकाश पडेल काय? तो स्वतः अंधारांत गुरफटला जाईल आणि जिकडे तिकडे अंधारच पसरेल. त्याचें तें पूर्वींचें तेज आणि शोभा हीं कोठच्या कोठें पार नाहींशीं होतील. स्वतःचें तेज पडण्याकरितां दिव्यानें एकसारखें जळत राहिलें पाहिजे, अव्याहत रीतीनें आत्मयज्ञ केला पाहिजे, तेल आणि वात वांचवून कधींहि चालणार नाहीं! वेदान्त तरी हेंच सांगतो. आपणांस यशःप्राप्ति व्हावी, आपली भरभराट व्हावी, उत्कर्ष व्हावा, अशी जर तुमची इच्छा असेल, तर तुमच्या नित्य आणि नैमित्तिक कर्मांत, प्रत्येक व्यवहारांत या क्षुद्र शरीराचा होम केला पाहिजे; ज्ञानाग्नींत देहभावाची आहुति दिली पाहिजे. हें क्षुद्र शरीर रोज कामाला लावून टाकलें पाहिजे. राबवून राबवून शरीर आणि मन हीं नाहींशीं करून टाकलीं पाहिजेत. शरीर आणि मन यांचा होम करा, त्यांना सुळावर चढवा, अनवरत कर्म करीत जा, म्हणजे मग तुमच्यामधून दिव्यप्रकाश चमकूं लागेल. तेलवातीप्रमाणें शरीर व मन जाळणें याचेंच नांव कर्म. आत्मस्वरूपाच्या दृष्टीनें शरीर आणि मन हीं मिथ्या आहेत, तो केवळ भ्रम आहे; हा अनुभव करून घेणें, हेंच खरें कर्म. देह आणि मन यांच्या अतीत होणें, त्यांच्या पलीकडे आपलें खरें स्वरूप आहे, हें ओळखणें म्हणजेच वेदान्तदृष्ट्या कर्म होय.

## प्रापंचिकांचा योग

देहाभिमान नाहींसा होतो, अहंवृत्ति गळून जाते, त्या वेळींच खरी व महत्त्वाची कामगिरी आपल्या हातून घडते. अहंकाराला सुळीं दिल्याशिवाय लोकोत्तर व उदात्त कृत्यें घडणें शक्य नाहीं. गांधीलमाशी ज्या वेळीं आपणांस दंश करते, त्या वेळीं आपलें सर्व सामर्थ्य, आपलें जीवित ती नांगीमध्यें एकवटीत असते. स्वरूपांत स्थिर झालेल्या परिणतप्रज्ञाला कवित्वस्फूर्तीकरितां कवितादेवीचे उंबरठे झिजविण्याची आवश्यकता नाहीं, असें प्लेटोनें एके ठिकाणीं म्हटलें आहे, व तें अगदीं खरें आहे. सारांश काय कीं, सर्व प्रकारचें वैभव, उत्कर्ष आणि यश हीं वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत आणल्यानेंच प्राप्त होत असतात. **अनवरत कर्म, अविश्रांत परिश्रम, सततोद्योग हाच प्रापंचिकांचा अत्यंत श्रेयस्कर धर्म, श्रेष्ठतर योग होय.** कर्म करून अकर्ता, ही अकर्तात्मबोधाची उच्च स्थिति प्राप्त होते, तेव्हांच जगाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची, जगताला, अत्यंत उपकारक, अशी श्रेष्ठ प्रकारची कामगिरी आपल्या हातून होऊं शकते.

आतां कर्मासंबंधानें दुसरा प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, कोणत्या वृत्तीचा आणि कोणत्या मार्गाचा अवलंब केला असतां, यशस्वी कर्म आपल्या हातून अगदीं सहज होत जाईल? 'कर्म करा, कर्म करा' म्हणून सांगणें सोपें आहे. परंतु कर्म प्रत्यक्ष करणें तितकेंच अवघड आहे. आपण नामांकित चित्रकार व्हावें किंवा प्रख्यात बीनकार व्हावें, अशी प्रत्येकाची इच्छा असते; परंतु इच्छेप्रमाणें प्रत्येकजण नामांकित चित्रकार किंवा बीनकार होत मात्र नाहीं. असें कां होतें? मनुष्याच्या हातून इच्छेप्रमाणें कर्म कां होत नाहीं? त्याची अकर्माकडे प्रवृत्ति कशी होते? तसेंच कर्म करण्यांत, परिश्रम करण्यांत; मनुष्याला आनंद कशामुळें वाटतो? परिश्रमाच्या ठिकाणीं आल्हादकता कोठून येते? पुष्कळ वेळां असें होतें कीं, ज्या वेळीं काम करावें असें आपल्या मनांत येतें, त्या वेळीं तें आपल्या हातून होत नाहीं. सर्वांच्या अनुभवांतली ही गोष्ट आहे. त्याप्रमाणेंच, कित्येकदां काम करण्याकडे प्रवृत्ति नसूनहि, कामाविषयीं मनांत उल्हास नसून सुद्धां, नामांकित कामगिरी आपल्या हातून होऊन जाते. हाहि तुम्हांला अनुभव असेलच. आपल्या अंगांतील कर्तृत्वशक्तीचें नियमन करणारी, तिला हवी तशी वांकवणारी, अशी एक श्रेष्ठ व

दिव्य शक्ति आपल्या ठिकाणीं आहे, ही गोष्ट तुमच्या कधीं लक्षांत आली आहे काय ? किती तरी वेळां असें होत नाहीं काय कीं, सकाळीं उठल्याबरोबर आपली वृत्ति अत्यंत उल्लसित व प्रसन्न असते, बाह्य सृष्टीशीं चित्त पूर्णपणें एकतानता पावलेलें असतें, अगदीं अवर्णनीय अशी मनाची वृत्ति असते. मनाची अशी वृत्ति असतांना एखादा कवि किंवा तत्त्वज्ञ लेखणी घेऊन लिहूं लागतो आणि त्याच्या लेखणींतून उदात्त आणि उज्ज्वल काव्याचा किंवा तत्त्वज्ञानाचा प्रवाह वाहूं लागतो. मनाची सुप्रसन्नता असल्याशिवाय एखादा चित्रकार एखादें सुंदर आणि मनोवेधक चित्र तयार करूं म्हणेल, तर तें कधींहि होणार नाहीं. त्या वेळीं त्याची धडपड व परिश्रम हीं व्यर्थ होतील. पुढें एखादे दिवशीं असें होतें कीं, सकाळीं उठल्याबरोबर त्याला मोठा उल्हास वाटूं लागतो, काम करण्याची आंतून जणूं काय प्रेरणा व स्फूर्ति होऊं लागते व तो आनंदानें आपलें कलम घेऊन बसतो आणि अत्यंत मनोवेधक व नयनमनोहर असें चित्र तो तयार करतो. असाच सर्वांचा अनुभव नाहीं काय ?

## निरहंकार बना

या उदाहरणावरून हें सिद्ध होतें कीं, आपल्यांतील कर्तृत्वाचा पूर्ण विकास करणारी, पूर्णत्वानें त्याचें आविष्करण करणारी, अशी एक श्रेष्ठ शक्ति आपणामध्यें असते. ही शक्ति तुम्ही संपादन कराल, निहंकारवृत्ति अंगीं बाणून घ्याल तर तुमची कर्तृत्वशक्ति नेहमीं संपूर्णपणें प्रकट होत जाईल. तुम्हीं हातीं घेतलेलें काम सर्वस्वी पूर्ण आणि निर्दोष असेंच होईल. ही श्रेष्ठ शक्ति व हें रहस्य वेदान्त तुम्हांला स्पष्ट करून दाखवीत आहे. बाह्य विश्वाशीं पूर्णपणें एकतानता पावणें, परमात्म्याच्या दिव्य संगीताशीं आपला सूर मिळवून घेणें, स्वार्थी वासना किंवा क्षूद्र अहंकार यांच्या अतीत होऊन परमात्मस्वरूपांत लीन होणें, हेंच यशाचें रहस्य होय. परमात्मस्वरूपांत स्थिर होणें हीच यशाची गुरुकिल्ली होय. याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. तुमच्या ठिकाणीं असलेल्या दिव्य तेजाचें किंवा अद्भुत शक्तीचें ज्ञान करून घेतल्यावर तुमचें प्रत्येक काम अद्भुत आणि लोकोत्तर होऊं शकेल.



एखादा चित्रकार किंवा शिल्पकार फिरावयास गेला असतां रस्त्यानें नानाप्रकारचे चेहरे त्याच्या दृष्टीस पडतात. त्यांतील एकाचे पाणीदार आणि

तेजस्वी डोळे पाहून तो थक्क होतो आणि अगदीं सहज त्या डोळ्यांची आकृति त्याच्या मनःफलकावर रेखली जाते. जरा पुढें गेल्यावर दुसरा मनुष्य त्याला आढळतो. त्याच्या हनुवटीचें वळण त्याला फार पसंत पडतें. लगेच त्या हनुवटीचा ठसा त्याच्या मनांत उमटतो. पुढें तिसराच एक इसम एक चित्र विकत घेण्यासाठीं त्याच्या दुकानीं येतो. चित्र घेऊन तो निघून जातो, परंतु आपला सुंदर केशकलाप हरवून तो चित्रकाराच्या मनांत जाऊन बसला आहे, याची त्याला दादहि नसते! कांहींतरी काम घेऊन आणखी एक गृहस्थ त्या चित्रकाराकडे येतो. चित्रकार त्याचें काम करून देतो, परंतु त्याबरोबरच त्याच्या सुंदर कानांची ठेवण हरण करून घेतो, अशा रीतीनें त्याला नकळत त्याचें मन काम करीत असतें. निरनिराळ्या लोकांचे डोळे, हनुवटी, केंस व कान हे आपलेसे करून घेत असतांना, आपण असें करीत आहों, ही कर्तृत्वाची—अभिमानाची वृत्ति त्याच्या ठिकाणीं जागृत नसते. डोळे, कान वगैरेंची ठेवण व वळण हीं तो डोक्यांत खोदून ठेवीत असतो; परंतु हें त्याच्या नकळत, अगदीं सहज, अबुद्धिपूर्वक होत असतें. हें झाल्यावर पुढें एके दिवशीं तो चित्रकार आपल्या चित्रशाळेंत चित्र काढण्यासाठीं बसतो. लोकांच्या मनांत भरण्यासारखें चित्र तयार करण्याचा त्याचा हेतु असतो व अशा वेळीं पहिल्या मनुष्याचे ते पाणीदार व तेजस्वी डोळे, दुसऱ्याचें तें सुंदर नाक, तिसऱ्याचा तो सुंदर केशकलाप, हीं सर्व त्याच्या डोळ्यांपुढें उभीं राहतात, त्या चित्रांत तीं एकवटतात आणि त्याचा परिणाम असा होतो कीं, स्वतःच्या कल्पकशक्तीच्या जोरावर काढलेल्या अगदीं नवीन आणि अप्रातिम चित्रांनाहि मागें सारणारें असें एक नामांकित चित्र त्याला तयार करतां येतें. हें नामीं काम कसें बरें घडून आलें? हें काम त्या चित्रकारानें—त्या विशिष्ट व्यक्तीचें होतें काय? नाहीं. अहंकारवृत्तींत तें चित्र तयार झालेलें नाहीं. 'मी हें चित्र काढीत आहे,' या कर्तृत्वाच्या कल्पनेच्या अतीत होऊन, जींत स्वार्थीपणाची आणि अहंकाराची यत्किंचित् छटाहि नाहीं, अशा निरहंकार वृत्तीनें राहिल्याकारणानेंच असलीं सर्वोत्तम कामें होऊं शकतात. परंतु चित्रकाराचें मन द्वेष आणि लोभ—ज्याला लोक कधीं कधीं चुकीनें प्रेम हें गोंडस नांव देत असतात—यांनीं ग्रस्त होऊन जाऊं द्या, म्हणजे द्वेषलोभांनीं वेधली गेल्यामुळें त्याची अवलोकनशक्ति संकुचित, कलुषित व विकृत होईल व ती आपलें काम बरोबर करणार नाहीं; मनःस्थिति बिघडल्यामुळें उत्तमोत्तम कामें करण्यास तो

अपात्र होईल, त्याच्या ठिकाणची, अलिप्तपणाची, तटस्थपणाची किंवा साक्षित्वाची वृत्ति नाहींशी होईल; अहंकाराचा पगडा बसून चित्ताची समाधानवृत्ति ढांसळून जाईल. परमात्मस्वरूपाशीं संलग्न ठेवणारी व्यापक दृष्टि जाऊन संकुचितपणा उत्पन्न करणारी रागद्वेषाची कल्पना उदित होईल; व अशा स्थितींत, या वृत्तींत, निरनिराळ्या लोकांच्या चेहऱ्यांतील अवयव सहजगत्या स्मृतिमंजूषेंत संग्रहित करून ठेवण्याचें काम त्याच्या हातून होणार नाहीं. कारण, त्याच्याठिकाणची वेदान्ताची निरहंकारवृत्ति निघून गेली आणि तिच्या बरोबरच उत्तमोत्तम चित्रें काढण्याची दिव्यशक्ति—यशाची गुरुकिल्लीहि निघून गेली.

या विवेचनावरून ही गोष्ट तुमच्या लक्षांत येईल कीं, तुमचें काम जितकें जितकें अधिक निरभिमानपणानें होईल, 'हें मी करीत आहें' या अहंवृत्तीच्या जितके तुम्ही अधिक अतीत व्हाल, मालकीच्या आणि स्वामित्वाच्या कल्पनांचा जितका अधिक त्याग कराल, संचयाच्या आणि खुषामतीच्या वृत्तीचा जितका मोड कराल, क्षुद्र अहंकाराचा जितका निरास कराल, तितकें तुमचें काम अधिक चांगलें व यशस्वी होत जाईल. कर्मांकरितांच कर्म करा, असें वेदान्ताचें सांगणें आहे. आरंभिलेलें कार्य यशस्वी व्हावें, अशी तुमची इच्छा असेल, तर पुढें काय होईल याकडे लक्ष देऊं नका; परिणामाची काळजी करीत बसूं नका. साधन आणि साध्य यांची एकात्मता, वृतींत बाणली पाहिजे. साधन हें साध्याइतकेंच महत्त्वाचें आहे, हें मनांत वागवून कर्म करीत जा. सदासर्वकाळ आत्मस्वरूपांत स्थिर रहा, असें वेदान्त सर्वांस सांगत आहे. शरीर हें नेहमीं कामांत गुंतलेलें असून, अन्तःकरण स्थिर आणि निश्चल असूं द्या. शरीराला गतिशास्त्राचे नियम लागू असल्यामुळें तें नेहमीं चंचलच असणार. परंतु आत्मा हा वास्तविक स्थिरच आहे. तरी याचा अनुभव करून घेऊन निश्चल स्थितींत राहण्यास शिका. स्वार्थमूलक अस्वस्थतेमुळें आपलीं सर्व कामें बिघडून जातात. कर्में करून अकर्ते राहण्याचा अभ्यास करा, म्हणजे कर्म हीच तुमची पराशांति, निर्वाणस्थिति होईल.

## आत्मयज्ञ



एकदां एक तळें आणि नदी यांच्यामध्यें मोठा वाद सुरू झाला. तळें नदीला म्हणालें, " अगे नदी, आपली सर्व जलरूपी महान् संपत्ति सागराला अर्पण

करण्यांत तुझ्या हातून मोठा अविचार होत नाहीं कां ? समुद्राला देऊन आप-ल्या संपत्तीची अशी व्यर्थ उधळपट्टी करूं नकोस. कारण, तुझ्या संपत्तीची त्याला गरज नाहीं. समुद्राइतका बेपर्वा आणि कृतघ्न दुसरा कोणीच नसेल ! मोठ्या कष्टानें संग्रह करून ठेवलेला सर्व खजिना जरी तूं त्याच्या घशांत ओतीत राहिलीस तरी त्याचा खारटपणा थोडाच जाणार आहे ? त्याचें पाणी आज जितकें खारट आहे तितकेंच पुढेंही राहील. उघडच आहे ; गाढवाला गुळाची चव काय ? म्हणून म्हणतों, बाई, आपल्या संपत्तीची उधळपट्टी न करतां तिचा संचय करून ठेव." आतां व्यवहाराच्या दृष्टीनें पाहिलें तर तळ्याचें म्हणणें शहाणपणाचें होतें, व प्राकृतांची विचारसरणीहि अशीच फलाकडे दृष्टि देणारी असते. परिणामाकडे नजर पोहोंचविण्याविषयीं तळ्याचा त्या नदीला उपदेश होता. परंतु नदी कांहीं लेंचीपेची नव्हती ! वेदान्ततत्त्वज्ञानांत ती पूर्णपणें मुरलेली होती. तळ्याचें व्यावहारिक ज्ञान किंवा पांडित्य ऐकून ती म्हणाली, "मी फलाकडे किंवा परिणामाकडे बिलकूल लक्ष देत नाहीं. फलाचा विचारच माझ्या डोक्याला कधीं स्पर्श करीत नाहीं. यश किंवा अपयश यांची मला मुळींच पर्वा नाहीं. कर्म करीत राहणें मला आवडतें, म्हणून मी सारखें कर्म करीत राहत्यें. कर्माकरितां कर्म हें माझें तत्त्व आहे. उद्योग करीत राहणें हें माझें ध्येय असून, उद्योगशीलता हेंच माझें जीवन होय. माझा आत्मा मूर्ति-मंत कर्तृत्वच आहे, म्हणून मला नेहमी कर्म करीत राहणें भाग आहे." ती नदी कर्म करीत राहिली, प्रत्यहीं लाखों घागरी पाणी समुद्रार्पण करण्याचा क्रम तिनें तसाच चालू ठेवला. या गोष्टीला तीन चार महिने होऊन गेले नाहींत, तोंच त्या कंजूष आणि काटकसरी तळ्यांतील पाणी आटून गेलें, व आंतील चिखल कुजून त्याला दुर्गंधी सुटली. ती इतकी कीं, त्याच्याजवळ जाण्याचीहि सोय उरली नाहीं. नदीचें पाणी मात्र पहिल्याप्रमाणें स्वच्छ आणि वाहतें होतें. कारण, तिच्यांतील बारामाही झरे आटून गेले नव्हते. नदीच्या उगमस्थानचा खजिना पूर्ववत् भरून टाकण्याकरितां समुद्राच्या पृष्ठभागावरील पाणी वाष्परूपानें खेंचून घेण्याचें काम सूर्यकिरण धिमेधिमे आणि बिनबोभाट करीत होते. तसेंच, नैर्ऋत्यवारे आणि व्यापारी वारे समुद्रांतून पाणी काढून, तें सावकाश गाजावाजा न करितां व कोणाच्याहि नजरेस न येतां नदीच्या उगमस्थानीं नेऊन भरीत होते. अर्थात् त्या ठिकाणीं ताज्या पाण्याचा भरपूर पुरवठा होता.

## आपमतलबी बनूं नका

म्हणून वेदान्त म्हणतो कीं, त्या तळ्याचें आपमतलबी धोरण स्वीकारूं नकां. ‘ माझें कसें होईल, माझ्या कामाचें काय होईल, ’ अशा तऱ्हेची चिन्ता क्षुद्र मनुष्यें करीत असतात. पुरुषानें नेहेमी कर्म करीत राहणें भाग आहे. हें ध्यानांत ठेवून केवळ कर्माकरितांच कर्म करीत जा. कर्मांतच तुमचें उद्दिष्ट असूं द्या. कर्मालाच तुम्ही अंतिम मानूं लागलां, म्हणजे मनःक्षोभ करविणाऱ्या आणि अत्यन्त दुःख देणाऱ्या मलिन व पापी वासनांपासून तुम्ही मुक्त व्हाल, अशी वेदान्त तुम्हांला खात्री देत आहे. तुमचें मत नेहेमी कार्यव्यापृत असलें म्हणजे वासनांचा त्यांत शिरकाव होणार कोठून? निरपेक्षबुद्धीनें कर्म करणें हाच वेदान्तप्रतिपादित वैराग्याचा अर्थ होय. परिणामाविषयीं उगाच काळजी वाहूं नका; लोकांकडून मोबदला मिळण्याची अपेक्षा ठेवूं नका ; लोकांचा अनुकूल अभिप्राय पडतो, कीं ते झणझणीत टीका करतात याची पर्वा करूं नकां. तसेंच, आपला प्रयत्न लोकप्रिय होईल किंवा नाहीं, याचाहि विचार करीत बसूं नका; परिणामाकडे बिलकूल लक्ष देऊं नका. कर्म हेंच उद्दिष्ट समजून कर्म करीत रहा. अशा रीतीनें आपणांला आपल्या वासना नाहींशा करावयाच्या आहेत. चित्ताला अस्वस्थता आणणाऱ्या वासना मारून टाकण्यांचा, निर्वासन होण्याचा आपणांस प्रयत्न करावयाचा असून, कर्म टाळण्याचा प्रयत्न करावयाचा नाहीं. निरपेक्ष-बुद्धीनें तुम्हीं कर्म करूं लागलां, म्हणजे तुमच्या उद्योगाला किती दिव्य स्वरूप प्राप्त होईल बरें! चित्तक्षोभ करणारे मनोविकार आणि सर्व प्रकारचे मोह यांवर कर्म, कर्मातिशय हेंच हटकून गुणकारी आणि दिव्य असें औषध आहे. परंतु कर्माची ही प्रशंसा अभावात्मक आहे. कर्माचे आतांपर्यंत आनुषंगिक व अप्रत्यक्ष फायदेच पुढें मांडण्यांत आले. मनापासून कर्म केलें असतां जो प्रत्यक्ष आनंद प्राप्त होतो, ती प्रत्यक्ष मोक्षाची एक ठिणगीच होय. आपणांस न कळतां क्षणमात्र झालेला तो स्वरूपानुभवच होय. हा क्षणैक आनंद कर्माची भावात्मक प्रशंसा होय. कर्मापासून प्रत्यक्ष होणारा फायदा तो हाच.

## निर्वासनतेचा उपाय

ईश्वरार्पित कर्माच्या योगानें आपलें मन शुद्ध, निष्पाप होऊन परमात्म-

स्वरूपाशीं संलग्न होऊं लागतें. परमात्मस्वरूपाशीं तादात्म्य पावल्यानें होणारा आनंद हेंच कर्माचें अत्युच्च व निश्चित पारितोषिक होय. कार्य करतांना क्षुद्र व स्वार्थी हेतु पुढें ठेवून उत्साहवर्धक अशा या ईश्वरी ठेव्याला, स्वरूपानुभवाच्या आनंदाला दूषित करूं नका, स्वार्थतेचें गालबोट त्याला लावूं नका. ऐश्वर्याच्या महत्त्वाकांक्षा आणि भोगविलासांच्या क्षुद्र वासना आपल्या प्रगतीचा वेग वाढवीत नसून उलट खुंटवीत असतात, तिला मागें खेंचीत असतात, हें लक्षांत ठेवा. फलाची आकांक्षा किंवा दुसऱ्याकडून मिळणाऱ्या क्षुद्र बक्षिसांचा मोह हीं कार्याच्या चांगुलपणाला किंवा कौशल्याला पोषक नसून घातुकच आहेत. एखादें काम मन लावून केलें असतां त्यापासून तत्काल होणाऱ्या आनंदापेक्षां कोणतीहि बक्षिशी, किंवा प्रशंसा अधिक कल्याणकारक किंवा उत्साहवर्धक असूं शकणार नाहीं; म्हणून राम म्हणतो कीं, कर्मापासून तत्काल प्राप्त होणाऱ्या वैराग्याकरितां, अध्यात्मनिष्ठेकरितां किंवा भक्तिसुखाकरितां कर्म करीत जा, स्वर्गादि लोकांतील क्षुद्र आणि क्षणभंगुर सुखाकरितां कधींहि कर्म करूं नका. जबाबदारीचें ओझें बाळगूं नका किंवा फलाची-बक्षिसाची आकांक्षाहि बाळगूं नका. आतां, व येथेंच आनंद भोगणें, हेंच तुमचें अन्तिम असूं द्या. 'आधीं अंगीं पात्रता आणा, मग इच्छा करा' असें तुम्हीं म्हणतां; परंतु वेदान्त म्हणतो कीं, अंगीं पात्रता आणा म्हणजे झालें. मग इच्छा करण्याचें कारणच नाहीं.' घराच्या कामाला येणारा दगड वाटेंत इकडे तिकडे पडून राहात नाहीं, हा सर्वांचा अनुभव आहे. तुमच्या अंगीं पात्रता आली म्हणजे प्रत्येक इच्छित वस्तु तुमच्याकडे चालून आलीच पाहिजे, असा ईश्वराचा दुर्लंघ्य नियम आहे. दिवा तेवत असला म्हणजे त्या ठिकाणीं पतंग यावयाचेच, त्यांना निमंत्रणपत्रिका पाठविण्याचें कारण नाहीं. दिव्यानें फक्त तेवत रहावें, म्हणजे झालें. पतंगांच्या झुंडींच्या झुंडी आपोआप त्याच्याभोंवतीं जमतील. ज्या ठिकाणीं जिवंत पाण्याचा झरा असतो, तेथें लोक आपोआप जातात. लोकांची पर्वा करण्याची झऱ्याला गरज नाहीं. चंद्रोदय झाला म्हणजे चांदण्याची मौज पाहण्याकरितां लोक आपण होऊन बाहेर उघड्यावर येतात. म्हणून राम म्हणतो, मित्रांनो, कर्म करा! अनवरत कर्म करा! सारखें घण मारीत रहा! देहाचें मिथ्यात्व आणि परमात्म्याचें वास्तविकत्व अनुभूत करून घेण्यासाठीं कर्म करा! लौकिकदृष्ट्या उद्योगाच्या पराकाष्ठेला तुम्हीं जाऊन पोहोंचलां, एकाद्या कार्यांत अगदीं तल्लीन झालां, म्हणजे कैवल्याच्या माधु-

रीचा आस्वाद तुम्हांला सहज मिळेल; या देहाला आणि क्षुद्र अहंकाराला उद्योगाच्या सुळावर चढवून त्याला ठार केलात, म्हणजे यशस्विता तुमचा शोध काढीत तुमच्या घरीं चालून येईल. तुमच्याकडे येऊन तुमचें कौतुक करणाऱ्या लोकांची मग वाण पडणार नाहीं. ख्रिस्ताच्या जिवंतपणी त्याला कोणी विचारलें नाहीं. पूजनीय आणि वंदनीय होण्याकरितां प्रत्येकानें सुळावर चढलें पाहिजे; त्याचा देहभाव—अहंभाव गळाला पाहिजे. सत्य जमीनदोस्त करून टाकलें, तथापि तें पुनः मान वर करीलच, हें निश्चित आहे. सत्याला कायमचें दाबून किंवा नाहींसें करून टाकणें शक्य नाहीं. बीं रुजत घातलें, म्हणजे त्याचें मूळचें रूप व आकार हीं नाहींशीं झाल्याशिवाय अंकुर फुटणार नाहीं व त्या अंकुराची वाढ होऊन त्याचा प्रचंड वृक्षहि बनणार नाहीं. म्हणून यशस्वितेचें दुसरे आवश्यक तत्व म्हटलें म्हणजे त्याग; अहंकारनाश, स्वार्थत्याग, किंवा वैराग्य हें होय. वैराग्य शब्दाबद्दल आपला गैरसमज करून घेऊं नका. अंगाला राख फांसणें किंवा धुमी पेटवून बसणें म्हणजे कांहीं वैराग्य नव्हे !

## शुभ्रतेचें रहस्य

आपण अगदीं शुभ्र, चकचकीत, लकलकीत व दैदीप्यमान व्हावें, अशी प्रत्येकाचीच इच्छा असते. आपल्याला तेजस्वी आणि वैभवसंपन्न कसें होतां येईल ? पदार्थ पांढरे शुभ्र कसे व कां होतात, त्यांच्या ठिकाणीं शुभ्रतेचा हा गुण कोठून येतो ? याचा विचार करा. दृक्‌शास्त्र सांगतें कीं, केवळ त्यागामुळें पदार्थांच्या ठिकाणीं शुभ्रपणा येतो ; वैराग्याशिवाय त्यांच्या शुभ्रतेला दुसरें कांहींएक कारण नाहीं. सूर्यकिरणांतील सातहि रंग प्रत्येक पदार्थावर येऊन थडकतात. कांहीं पदार्थ त्या रंगांतील बहुतेक सर्व शोषण करून घेऊन फक्त एकच रंग परावृत करतात, व जो रंग ते परावृत करतात, ज्या रंगाचा ते त्याग करतात, त्याच रंगानें आपण त्यास ओळखतों, तोच रंग त्याचा असें आपण समजतों. रामाची कफनी भगव्या रंगाची दिसते; परंतु वास्तविक पाहूं गेलें तर हा रंग त्या कफनीच्या ठिकाणीं मुळींच नाहीं. सूर्यकिरणांतील जे रंग तिनें शोषून घेतले आहेत, ते रंग तिच्या ठिकाणीं असले पाहिजेत; परंतु त्या रंगांचा कफनीच्या ठिकाणीं तुम्हीं आरोप करीत नाहीं, कफनी त्या रंगाची आहे, असें तुम्हीं म्हणत नाहीं, ही केवढी आश्चर्याची गोष्ट !

काळे पदार्थ सूर्यकिरणांतील सर्व रंग शोषून घेतात, एकहि रंग ते परत फेंकीत नाहींत, आल्पांशाचाहि ते त्याग करीत नाहींत आणि या लोभिष्टपणामुळें—वैराग्यशून्यतेमुळेंच त्यांना काळेंकुट्ट स्वरूप प्राप्त होतें. परंतु तेच पांढरे शुभ्र पदार्थ पहा. ते एकहि रंग शोषून घेत नाहींत; कोणत्याच रंगावर ते आपलें स्वामित्व सांगत नाहींत. सर्वस्वाचा ते त्याग करितात. लोभाविष्ट होऊन सूर्यकिरणांतील रंगांना आपल्या ताब्यांत ठेवण्याचा ते प्रयत्न करीत नाहींत; मालकी हक्काची कल्पना त्यांच्या ठिकाणीं नाहीं, आणि या कारणामुळें, या निःस्वार्थतेमुळें ते स्वच्छ, शुभ्र, चकचकीत आणि पाणीदार दिसतात.

## वैराग्य हेंच वेदान्ताचें सार

याच न्यायानें तुम्हांला यशस्वी आणि वैभवसंपन्न होण्याची इच्छा असेल, तर मालकी हक्काची—संचयाची कल्पना अंतःकरणांतून काढून टाकून सर्वस्वी स्वार्थरहित बनलें पाहिजे ; क्षुद्र स्वार्थबुद्धीच्या अतीत झालें पाहिजे. नेहेमी त्यागाची—दातृत्वाची वृत्ति टेवा. फलाच्या आशेनें बद्ध न होतां निष्कामवृत्तीनें सर्व कर्में करीत जा. याचकवृत्तीचा ‘ भिक्षांदेही ’चा कधींहि मनावर पगडा बसूं देऊं नका. फलाच्या आकांक्षेला अंतःकरणांतून काढून टाका. जें जें दिसेल तें तें माझें म्हणण्याची कुलमुखत्यारीची संवय टाकून द्या. तुमच्या फुप्फुसांतील हवेवर तुम्हीं एकट्यांनींच मालकीचा हक्क कां सांगावा ? त्या हवेवर सगळ्यांची सारखी मालकी नाहीं काय ? फुप्फुसांतील अत्यल्प वायूवरील आपली मालकी सोडण्यास आपण तयार झालों, मालकी हक्काची संकुचित वृत्ति नाहींशी केली, म्हणजे काय चमत्कार होतो तो पहा ! विस्तीर्ण वातावरणाचे आपण कायदेशीर वारस व स्वामी आहों, असेंच आपणांस आढळून येईल. तुमचें साधनक्षेत्र अमर्याद वाढेल; मग अखिल विश्वांतील प्राणवायु खुशाल आंत खेंचून घेत रहा. तात्पर्य हें कीं, अभिमानानें फुगून जाऊं नका. या क्षुद्र जीवाची कशावरहि सत्ता आहे, असें केव्हाहि मनांत येऊं देऊं नका. सर्व कांहीं परमात्म्याचें, ईश्वराचें आहे, हा विचार सदैव अंतःकरणांत वागवीत जा. प्रख्यात गणितशास्त्रज्ञ आयझाक न्यूटनचेंच आपण उदाहरण घेऊं. लोक त्याला इतका थोर, बुद्धिमान् व तेजस्वी कां मानतात, कोणत्या गुणामुळें लोकांत त्याचें नांव झालें? त्याच्या वृत्तीमुळें—निरभिमान—वृत्तीमुळें त्याच्या जीवितक्रमाचें

रहस्य त्याच्या आयुष्याच्यां शेवटीं बाहेर पडलें. ‘ आपल्या एवढा बुद्धिमान् पुरुष साऱ्या दुनियेंत आढळणार नाहीं,’ अशी एकानें त्याची प्रशंसा केली असतां, न्यूटन अत्यंत लीनतेनें म्हणाला, “ छत् ! असें मुळींच नाहीं. माझ्या बुद्धिमत्तेची आपण प्रशंसा ती कसली करतां ? विस्तीर्ण आणि अनंत अशा ज्ञानसागराच्या तीरावरील वाळवंटांत गोट्या जमविणाऱ्या लहान मुलाइतकीच माझी वास्तविक योग्यता आहे ! ” मरेपर्यंत त्याची हीच लीन वृत्ति कायम होती व एखाद्या लहान मुलाइतकाच तो आपल्याला अज्ञानी समजत असे. या देहाचा व्यर्थ बडेजाव न माजविणारी ‘ मी अमूक केलें, अमुक माझें,’ असें न सांगणारी आणि आपल्या बुद्धिमत्तेचा व कर्तबगारीचा पूर्णपणें विकास होऊं देणारी निरहंकाराची वृत्ति न्यूटनच्या ठिकाणीं दिसून येते; आणि हीच निरहंकाराची वृत्ति अंगीं बाणून घेण्याविषयीं वेदान्त तुम्हांला सांगत असतो. निरहंकारता हेंच वेदान्ताचें आद्य तत्त्व व सार होय.

## वासनात्याग शिका

आपल्या ठिकाणीं नानातऱ्हेच्या इच्छा असतात, सर्वप्रकारच्या वासनांना आपण चिकटून बसलेले असतों, व या वासना परिपूर्ण व्हाव्या असें आपणांस वाटत असतें; याकरितां वासनांच्या परिपूर्णतेचें रहस्य समजावून घ्या. रंगभूमीवर पडदा कसा खेंचतात, हें तुम्हीं पाहिलें असेलच. पडदा वर जाण्याकरितां पडद्याची दोरी खालीं खेंचावी लागते, तेव्हांच पडदा वर जातो. वासनातृप्तीचें रहस्य पडद्याच्या या उदाहरणावरून तुमच्या चांगलें लक्षांत येईल. इच्छेचा जेव्हां तुम्हीं त्याग करतां तेव्हांच ती परिपूर्ण होते. बाण कसे मारतात ? आपण हातांत धनुष्य घेऊन प्रथम तें वांकवतों; परंतु जोंपर्यंत आपण दोरी खेंचून धरलेली असते, तोंपर्यंत बाण जागच्या जागीं असतो, तो शत्रूला जाऊन लागत नाहीं. दोरी कितीहि खेंचली तरी बाण जेथल्या तेथेंच राहतो; तो आपल्या हातांतच राहतो. पण ज्या वेळीं आपण दोरी सोडून देतों, त्या वेळीं सों सों करीत बाण वेगानें निघून जातो आणि शत्रूच्या हृदयाचा वेध करतो. त्याचप्रमाणें जोंपर्यंत तुम्हीं नवीन नवीन वासना आणि कामना करीत जाल, तोंपर्यंत त्या तृप्त होणार नाहींत, हें लक्षांत ठेवा. पण ज्यावेळीं वासनांची प्रत्यंचा ढिली सोडाल त्याचवेळीं बाण

प्रतिपक्षाच्या काळजाला जाऊन झोंबेल; अर्थात् तुमच्या इच्छा फलद्रूप होतील. 'माझ्या संबंधाच्या विचाराला आणि चिंतनाला आपल्या मनांतून अजिबात फांटा द्या, म्हणजे मी आमल्यापाशीं नेहेमींच आहें; ' मी आणि तूं या भावनेच्या अतीत असलेल्या अशा एका उच्च आणि अनिर्वचनीय स्थितीमध्यें—आत्मस्वरूपामध्यें राहूं लागा, म्हणजे सर्व विश्व आपल्यामध्यें आहे, असा तुम्हांला अनुभव येईल व हाच वेदान्ताचा उपदेश आहे.

## संचय कीं त्याग?

दोन संन्याशी एका वेळीं संगती सोबतीनें प्रवास करीत होते. त्यांतील एक संचयवादी होता आणि दुसरा वैराग्यवादी होता. वाटेनें त्या दोघांचें संचय विरुद्ध वैराग्य, (व्यवहारांत कार्यक्षम काय, संचय कीं वैराग्य) या विषयावर बोलणें चाललें होतें. वाद करीत करीत ते नदीच्या तीरावर येऊन थडकले. त्यावेळीं बरीच संध्याकाळ झाली होती. वैराग्यवाद्याजवळ एक पैहि नव्हती. संचयवाद्याजवळ अर्थातच बराच पैसा होता. नदी पहातांच तो वैराग्यवादी म्हणाला, "या क्षुद्र शरीराची पर्वा कसली! नावाड्याला देण्याला आपणांजवळ पैसा नाहीं; पण बेहेत्तर आहे! आपण येथेंच तीरावर बसून राम राम म्हणत रात्र काढूं." त्यावर संचयवादी म्हणाला, " आपण या तीरावरच राहिलों तर येथें कोणाचें घरदार दिसत नाहीं. बोलाचालायला सुद्धां येथें कोणी नाहीं. शिवाय या ठिकाणीं आपण थंडीनें कुडकुडून जाऊं. लांडग्यासारखे हिंस्र पशु व सर्पादिक विषारी जन्तु यांचें येथें मोठें भय आहे. काय होईल कांहीं नेम नाहीं! तेव्हां नावेंत बसून पलीकडे जावें, हेंच श्रेयस्कर असें मला वाटतें. उताराकरितां माझेजवळ पैसे आहेत. पलीकडे एक खेडें आहे तेथें आपली उतरण्याची सर्व व्यवस्था ठीक लागेल व बिलकूल त्रास किंवा हाल होणार नाहींत." लगेच त्यांनीं नावाड्याला हांक मारली आणि नावेंत बसून ते पलीकडे गेले. पलीकडे गेल्यावर रात्रीं ज्यानें उताराचे पैसे दिले होते तो संचयी संन्याशी आपल्या सोबत्याला म्हणाला, "संचयाचा उपयोग किती आहे, हें आतां तरी तुला पटलें कां नाहीं? माझ्याजवळ पैसे होते, म्हणून दोन जीव आज वांचले. म्हणून म्हणतों कीं, वैराग्याचा वेडगळ उपदेश कर-याचें तूं इतःपर सोडून दे. तुझ्याप्रमाणें मीहि वैराग्याच्या फंदांत शिरलों असतों

आणि द्रव्यसंचय केला नसता, तर पलीकडच्या तीरावर दोघेहि आज उपाशी मेलों असतों, थंडीनें कुडकुडून गारठून गेलों असतों, नाहीं तर हिंस्र पशूच्या भक्ष्य-स्थानीं तरी पडलों असतों." यावर त्या वैराग्यनिष्ठानें उत्तर केलें:—"पण तें द्रव्य तूं नुसतें बाळगून ठेवलें असतेंस, त्याचा त्याग केला नसतास, नावाड्याला तें दिलें नसतेंस, तर पैसे असूनहि आपण मेलोंच असतों! अर्थात् धनाच्या संचयानें आपण जगलों नाहीं, तर त्याच्या त्यागानेंच आपण जगलों. सारांश काय त्याग–वैराग्यच आपल्या सुखरूपतेस कारण झालें असेंच नव्हें का? दुसरी गोष्ट अशी कीं, मी आपल्या कडोसरीस पैसे बाळगले नसले म्हणून काय झालें? तुझा खिसा तो माझाच असें मी समजतों व त्या तुझ्या खिशाचा मला उपयोग झालाच कीं नाहीं? माझ्या ईश्वरावरील दृढनिष्ठेनेंच तुझ्या खिशांत या प्रसंगाकरितां पैसे राखून ठेविले! मला कधींहि कशाची जरूर पडत नाहीं. ज्या ज्या वेळीं मला एखाद्या वस्तूची गरज लागते, तेव्हां तत्काळ मला ती प्राप्त होते."* या गोष्टीवरून हें स्पष्ट होतें कीं, जोंपर्यंत तुम्हीं आपल्या वासना खिशांत बाळगून ठेवतां, तोंपर्यंत तुम्हांला निर्भयपणा किंवा शांति प्राप्त होणें शक्य नाहीं. वासनांचा त्याग करून वैराग्य अंगीं बाणवून घ्या म्हणजे तुम्हांला दुहेरी शांति प्राप्त होईल; तुम्हांला चित्तस्वास्थ्य÷ प्राप्त होईल आणि कालेंकरून तुमच्या मनांतील सर्व वासना परिपूर्ण होतील. वासनांच्या अतीत होऊन परमात्मस्वरूपांत स्थिर व्हाल तेव्हांच तुमच्या सर्व वासना सफळ होतील, हें ध्यानांत ठेवा. ज्ञानपूर्वक किंवा अज्ञानपूर्वक पण परमात्वतत्त्वांत मुरून जाल, तेव्हांच तुमच्या सर्व इच्छांच्या परिपूर्तीचा काल समीप येईल.

## सर्वोत्तमभाव

प्रेम अथवा अखिल विश्वाशीं तादात्म्य पावणें, परिस्थित्यनुरूप आपल्या

---

* अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥ गीता अ. ९।२२.

÷ यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि स्थिताः।
अथ मर्त्योऽमृताभवत्यत्र ब्रह्म समश्नुते॥ श्रुति.

वर्तनांत बदल करणें, सर्वात्मभाव होणें हें यशाचें तिसरें तत्त्व होय. प्रेम प्रेम म्हणजे काय ? आपले शेजारी, तसेंच ज्या ज्या लोकांशीं आपला संबंध येतो, ते ते सर्व आपणच आहों, आपलींच तीं रूपांतरें आहेत, हा अनुभव करून घेणें, हें तत्त्व प्रत्यक्ष व्यवहारांत आणणें याचेंच नांव प्रेम. तुम्ही दुकानदार असलां तर गिऱ्हाइकाचें हित तेंच आपलें हित हा सिद्धान्त तुम्हांला पटल्याशिवाय, त्याचप्रमाणें तुमच्या हातून कृति झाल्याशिवाय धंद्यांत तुम्हांला बरकत येणार नाहीं. 'पोट आणि अवयव' यांची गोष्ट तुम्हांला माहीत आहेच. हाच न्याय आपल्या सर्व व्यवहारांना लागू आहे. हें अफाट विश्व एक विराट् शरीर असून, आपलें भिन्न भिन्न देह हे या विराट् शरीराचे हस्तपादादिक निरनिराळे अवयव आहेत. आपला उत्कर्ष व्हावा अशी जर तुमची इच्छा असेल, तर जगरूपी विराट् शरीराहून आपण भिन्न आहों, असें समजतां कामा नये. आपली भरभराट आणि उन्नति व्हावी अशी हाताची इच्छा असेल, तर त्यानें सर्व शरीराचे आपण एक अवयव असून सर्व शरीराच्या हिताहितावर आपलें व्यक्तिशः हिताहित अवलंबून आहे, ही गोष्ट ओळखली पाहिजे; संपूर्ण शरीराशीं आपलें तादात्म्य करून घेतलें पाहिजे. मनगटाच्या पुढील भाग तेवढाच आपण, अशी संकुचित वृत्ति धारण न करितां, सर्व शरीरच आपण आहों, ही अभेदवृत्ति हातानें बाळगली पाहिजे; सर्व शरीराशीं तादात्म्य करून घेऊन स्वतः सर्व शरीरच बनलें पाहिजे. सर्व शरीराचें पोषण झालें कीं, त्यांत हाताचें पोषण आपोआप झालेंच. अखिल विश्व आपण आहों, प्रत्यक्ष ईश्वर आणि आपण एकच आहों, हा अद्वैत सिद्धान्त आचरणांत आल्याशिवाय–सर्वात्मभाव झाल्याशिवाय तुम्हांला यश येणें शक्य नाहीं. पृथक्पणा आणि भेदभाव यांच्या चिखलांत कुजत पडलां म्हणजे तुमच्या चित्ताची शान्ति बिघडते आणि तुम्हीं अस्वस्थ व दुःखी होतां. जें जें कांहीं आहे तें तें सर्व आपणच आहों, आपण विश्वाचे केवळ एक आवयव किंवा अंश नसून सर्व विश्वच आपण आहों, हा दृढभाव झाला कीं, खरोखर संपूर्ण आणि सकल असें सर्वव्यापी चैतन्यच आपण आहों, असा तुम्हांला प्रत्यय येईल. हे 'एकमेवाद्वितीयम्' तत्त्व अनुभवणें म्हणजेच वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत आणणें होय. सर्वत्र आपणच व्यापून राहिलों आहों, या दिव्य आणि उदात्त सत्याचें अतिक्रमण करा, हा पवित्र नियम उल्लंघन करा म्हणजे या अधर्माचरणाबद्दल पोटाशीं फटकून राहणाऱ्या मूर्ख आणि आपलपोट्या हातप्रमाणें तुम्ही दुःखाचे

वांटेकरी झाल्याशिवाय रहाणार नाहीं. कोलेरिज* कवीनें 'प्राचीन नाविक' नामक काव्यांत हें तत्त्व फार खुबीनें वर्णन केलें आहे. 'शिलानचा बंदिवान्' या काव्यांत बायरन÷कवीनेंहि हाच सिद्धान्त फार मार्मिकतेनें सांगितला आहे. परिस्थितींशीं तादात्म्य होंईनासें झालें, बाह्य सृष्टीशीं एकतानता करतां येत नाहींशीं झाली कीं मनुष्य दुःखी होतो. परिस्थितीशीं तुमचें तादात्म्य झालें, द्वैतभाव मोडून सर्वांशीं ऐक्य झालें कीं सर्व प्रकारचीं सुखें आणि ऐश्वर्य हीं तुमच्या पाठीस लागत येतील. कोलेरिज आणि बायरन या दोघां कवींनीं हें तत्व फार मार्मिकतेनें वर्णिलें आहे.

---

* कोलेरिज : प्रख्यात आंग्ल कवि ( १७७२–१८३४ ) प्राचीन नाविक ( धी एन्शन्ट म्यारिनर ) हें एक नामांकित काव्य आहे. ' जहाजावरील एका नावाड्यानें एका पक्ष्याला सहज गोळी घालून ठार मारलें, या त्याच्या दुष्टपणाबद्दल ईश्वरी कोपानें त्याचा पुढील आयुष्यक्रम अत्यंत कष्टमय झाला, तसेंच सदरहू नावाड्यानें पक्ष्याला मारलें हें ठीक केलें अशी इतर नावाड्यांनीं पसंति दर्शविली, याबद्दल त्यांच्यावरहि ईश्वरी क्षोभ होऊन ते सर्व एकदम मृत्युवश झाले,' अशाप्रकारचें विलक्षण पण गंभीर व परिणामकारक वर्णन देऊन वाचकांच्या ठिकाणीं सर्वांभूतीं भगवद्भाव उत्पन्न करण्याचा या काव्यांत कोलेरिज यानें प्रयत्न केला आहे.

÷ बायरन : प्रख्यात आंग्ल कवि ( १७८८–१८२४ ) शिलानचा बन्दिवान् ( दी प्रिझिनर ऑफ शिलान ) या लहानशा काव्यांत जिनेव्हाच्या प्रजासत्ताक राज्यांतील प्रसिद्ध देशभक्त कर्मवीर बॉनिव्हार्ड याच्या बन्दिवासाचें वर्णन आलें आहे. बन्दिवासांत असतांना तेथील परिस्थितीशीं त्याचें इतकें तादात्म्य झालें होतें कीं, आन्धारकोठडींतील उंदीर, पाली, सरडे हीं आपलीं भावंडेंच आहेत, असें त्याला वाटूं लागलें होतें. उंदीर, पाली वगैरेंना अंधारकोठडींत खुशाल आनंदानें खेळतांना पाहून त्यांच्याप्रमाणें आपणहि अन्धारकोठडींत आनंदी कां असूं नये, असें वारंवार त्याच्या मनांत येई. चिरसहवासानें तुरुंगाच्या परिस्थितीशीं त्याच्या वृत्तीची इतकी एकतानता झाली होती कीं, शिलानच्या किल्यांतून जेव्हां त्याला मुक्त करण्यांत आलें, तेव्हां तेथील अंधारकोठडी सोडतांना स्वतःचें घर सोडण्याइतकें दुःख त्याला झालें.

( वसंततिलकावृत्त )

—:०:—

प्रेमा करी अतुल जो, अतुल स्तवीतो।
कीं मानवासि विहगासि चतुष्पदा तो॥
प्रेमा करी बहुल जो बहुल स्तवीतो।
सर्वत्र ज्यासि गुरु वा लघु हें नसे तो ॥ १ ॥

## प्रेम करा आणि करून घ्या

एकदां एक राजा शिकार करीत असतां, शिकारीच्या मागें लागून फार दूर गेला, आणि त्याचे अनुयायी मागें राहिले. दुपारची वेळ होती, ऊन प्रखर पडलें होतें. तान्हेनें राजाचे प्राण कासावीस झाले. पाणी कसें व कोंठें मिळेल, याचा विचार करीत असतां त्या रानांत त्याला एक लहानसा बाग आढळला. लगेच तो बागेंत शिरला. राजा शिकारीच्या पोषाखांत होता, आणि बागवानानें त्याला पूर्वी कधीं पाहिलेलें नव्हतें, यामुळें बागवानानें आपणांस ओळखलें नसावें असें राजास वाटलें. 'तहान फार लागली आहे करितां लवकर कांहीं तरी पेय घेऊन ये,' असें राजानें त्याला सांगितलें. तें ऐकतांच बागवान् लगेच बागेंत गेला. बागेंत डाळिंबें फार लागलीं तोतीं. त्यांतलीं कांहीं डाळिंबें तोडून, रस काढून एक द्रोण भरून त्यानें राजाला आणून दिला. राजानें तो रस गटागटा पिऊन टाकला; तथापि त्याची तहान कांहीं भागली नाहीं. त्यानें आणखी एक द्रोण आणण्यास सांगितलें, व त्याप्रमाणें बागवान् निघून गेला. बागवान् दृष्टीआड झाल्यावर राजाच्या मनांत कुत्सित विचार येऊं लागले. तो आपल्याशींच म्हणूं लागला, 'हा बाग मोठा सुपीक आणि समृद्ध दिसतो. एका क्षणांत बागवानानें द्रोणभर रस आणून दिला. जमीन फारच सुपीक दिसते, आणि या बागवानाला यांतून चांगलीच प्राप्ति होत असली पाहिजे. त्याच्यावर जबर कर बसविला पाहिजे!' राजानें असें मनोराज्य चालविलें होतें. इकडे एक तास होऊन गेला तरी माळी रस घेऊन येईना. तेव्हां राजाला मोठा विस्मय वाटला. तो मनांत म्हणाला, 'अरे हें काय? मीं त्याला प्रथम पेय आणण्यास सांगितलें, तेव्हां तो एका क्षणांत द्रोणभर रस घेऊन आला! आणि आतां तर दोन घटका

झाल्या. इतका वेळ सारखा रस काढून अजून द्रोण भरत नाहीं हें काय?' अखेर एकदांचा माळी द्रोण घेऊन आला, पण द्रोण पूर्वींप्रमाणें कांठोकांठ भरलेला नव्हता, थोडा कमीच होता. 'प्रथम तर तूं एका क्षणांत द्रोण भरून आणला होतास आणि आतां दोन घटका लागून, पुन्हां द्रोण पूर्वींसारखा भरलेला नाहीं तो नाहींच! हें असें कां?' असा राजानें प्रश्न केला. तो बागवान साधुपुरूष होता. त्यानें उत्तर केलें "रस काढण्याकरितां डाळिंबें तोडावीं म्हणून प्रथम जेव्हां मी बागेंत गेलों, त्यावेळीं महाराजांचें अंत:करण शुद्ध होतें. मनांत सदिच्छा वसत होती; परंतु पुन्हां ज्यावेळीं मी बागेंत गेलों, त्यावेळीं महाराजांच्या सदय आणि उदार वृत्तींत बदल झाला असावा. एरव्हीं आर्द्र अंत:-करणाच्या माझ्या डाळिंबांच्या स्नेहवृत्तींत एकदम फरक होण्याचें दुसरें कांहीं कारण मला तरी दिसत नाहीं!" माळ्याचें उत्तर सकृद्दर्शनीं राजाला कसेंसेंच वाटलें; परंतु शांतपणानें विचार केल्यावर माळ्याचें म्हणणें तंतोतंत खरें आहे, अशी त्याची खात्री झाली. कारण, तो प्रथम बागेंत शिरला त्यावेळीं राजाची वृत्ति प्रेमपूर्ण आणि उदार होती. तेथील माणसें अगदीं गरीब आणि निराश्रित असतील, त्यांना मदत केली पाहिजे, अशा तऱ्हेचे प्रेमाचे आणि दयेचे विचार त्याच्या मनांत घोळत होते. परंतु पेय मागतांक्षणींच डाळिंबाच्या रसानें भरलेला द्रोण माळ्यानें आणून देतांच, राजाची पूर्वींची उदार वृत्ति मावळली, त्याचे विचार एकदम बदलून गेले आणि मनाची समतोलता नाहींशी झाली. निसर्गाच्या सुराशीं त्याचा सूर मिळेनासा झाला आणि बदसुराचा, एकरूपतेच्या अभावाचा त्या डाळिंबांवर परिणाम घडून त्यांतील रस वाळून जाऊन तीं नीरस झालीं! हें जग प्रेमाच्या नियमानें बद्ध झालेलें आहे. राजानें तो नियम मोडतांच झाडांनींहि रस आंत ओढून घेतला. प्रेम करा आणि करून घ्या, हा प्रेममय सृष्टीचा नियमच आहे!

ही गोष्ट खरोखर घडलेली असेल किंवा केवळ काल्पित असेल; तिच्या सत्यासत्यतेशीं आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. परंतु तिच्यापासून निघणारा निष्कर्ष कोणालाहि नाकबूल करतां येणार नाहीं; आणि तो हाच कीं, जोंपर्यंत तुमचें निसर्गाशीं पूर्ण तादात्म्य आहे, तुमच्या मनाच्या तारेचा ध्वनि सृष्टीच्या तारेच्या ध्वनीशीं पूर्णपणें मिळता आहे, जें जें आहे तें सर्व आपणच आहों, ही भावना जोंपर्यंत दृढ आहे, सर्वांशीं जोंपर्यंत एकरूपता वाटत आहे, तोंपर्यंत भोंवतालच्या सर्व वस्तु, तुमची परिस्थिति, हें सर्व पाणी वायु आणि

आप यांच्यासारखीं महाभूतेंहि तुम्हांला वश आणि अनुकूल होतील. परंतु सर्वात्मभाव नाहींसा झाला, तुमची एकतानता बिघडून मीं तूं हा भेदभाव उत्पन्न झाला कीं, तत्क्षणीं तुमचे स्नेहीसोबती व आप्तेष्टसुद्धां तुमच्या विरुद्ध खास उठतील; सारें जग तुमच्यावर उलटून पडेल. प्रेम द्यावें आणि प्रेम घ्यावें, हा दैवी नियम नीट समजावून घ्या, आणि त्याप्रमाणें वागत जा. प्रेम हें यशाचें जीवनतत्त्व आहे, हें लक्षांत ठेवा.

## समाधान

स्वस्थता किंवा समाधान हें यशाचें चौथें तत्त्व आहे. परंतु ही स्वस्थता कशी ठेवावी, हाच प्रश्न आहे. 'चित्तवृत्ति नेहेमीं प्रसन्न, प्रफुल्लित आणि उल्लसित ठेवा, कोणत्याहि कारणानें चित्ताची शांति बिघडवूं देऊं नका,' असा उपदेश करणें फार सोपें आहे. परंतु सदा सर्वकाळ चित्त शांत आणि प्रसन्न ठेवणें, कोणत्याही प्रसंगीं मनाला क्षुब्ध होऊं न देणें, समाधान राखणें, हें तितकेंच कठिण आहे. 'नेहेमीं उल्लसित वृत्ति ठेवा,' असा नुसता नियम घालून दिल्यानें शांतता आणि उल्हास तुमच्या ठिकाणीं थोडाच येणार आहे! कृत्रिम उपायांनीं कोणतीच गोष्ट साध्य होण्यासारखी नाहीं, मग अंगीं प्रसन्नता बाणावी कशी? समाधान प्राप्त होणार कसें? आपल्या वृत्तींत बदल कोण करतो, त्यांचा प्रेरक व चालक कोण आहे? स्वरूपाला विमुख होऊन जेव्हां आपण देहभानावर येतों, आपल्या ठिकाणीं देहबुद्धि जागृत होते, क्षुद्र अहंकारानें आपण ग्रासले जातों, नानातऱ्हेच्या वासना मनांत उदित होतात, तेव्हांच आपली शांति नाहींशी होऊन आपण उद्विग्न व उदास होतों, तेव्हांच आपल्या मनाची समता नाहींशी होऊन आपण दुःखी होतों, असें या बाबतींत वेदान्ताचें स्पष्टीकरण आहे. पोटांत कांहीं बिघाड झाला म्हणजेच पोटाची आपणांस जाणीव होते व तिकडे आपलें लक्ष जातें. पडसें झालें म्हणजेच नाकाचें भान होतें व हात ठणकत असला म्हणजेच त्याची आपणांस संवेदना होते. अध्यात्मदृष्ट्या ज्या वेळीं आपण बेसुर आणि बेताल होतों, अर्थात् वृत्ति बहिर्मुख झाल्यामुळें आपल्या ठिकाणचा सर्वात्मभाव नाहींसा होतो, तेव्हांच आपणांस या क्षुद्र शरीराची जाणीव होते, व शरीराशीं आपण पूर्णपणें तद्रूप होतों. देहाची प्रतिष्ठा वाटणें, शारीरिक सुखाविषयीं आवड व आसक्ति उत्पन्न होणें, हा अध्यात्मदृष्ट्या मोठा रोग आहे. देहबुद्धि प्रबल झाली कीं तत्क्षणीं

आपला तोल जाऊन आपण स्वरूपापासून च्युत होतों. भेदभाव आणि आकारदृष्टी उत्पन्न झालीं कीं, तुम्हीं स्वरूपाला विमुख झालांच म्हणून समजा. परंतु या क्षुद्र देहाला सुळावरं चढवला, अहंतेचा नाश केला कीं पुन्हां ब्रह्म-स्थिति आपली आहेच. ' मी माझें ' हें तुम्हीं टाकून दिलेंत, क्षुद्र आसक्तीचा त्याग केलात, ममत्वबुद्धि नाहींशी करून देहभावाच्या अतीत झालांत कीं लगेच तुम्हांला आपला तोल संभाळतां येईल; पुन्हां तुमचें मन समतोल होऊन तुमच्या वृत्ति प्रसन्न होतील आणि मनाला शांतता येईल.

## समाधानाचा उपाय

आपण नेहेमी आनंदित असावें, आपली वृत्ति प्रसन्न आणि प्रफुल्लित रहावी, अशी तुमची इच्छा असेल, तर आपला आत्मा, परमात्मा हीच एक सद्वस्तु असून तद्व्यतिरिक्त सर्व मिथ्या आहे, हा वेदान्ताचा मुख्य सिद्धान्त, हें शाश्वत सत्य, आचरणांत आणिलें पाहिजे. सद्वस्तूच्या ठिकाणीं तुम्हीं मुरून गेलां, आत्मस्वरूपांत लीन झालां, म्हणजे नामरूपात्मक सर्व दृश्य जगत्, व तुमची परिस्थिति तुमच्या इच्छेप्रमाणें बदलत जाईल, तिला ठोकून जसा आकार द्याल तशी ती होत जाईल. परंतु 'मी देह नाहीं,' तसेंच देहविषयक सर्व संबंध, बंधनें आणि व्यवहार, केवळ खेळ होत, निवळ भ्रम होत, हा विचार अंतःकरणांत बाणला पाहिजे. देहबुद्धि नष्ट झाली म्हणजे आई, बाप, भाऊ इत्यादि रक्ताचे संबंध, व आपले नित्याचे व्यवसाय हीं नाटकांतील पात्रांच्या संबंधाप्रमाणें व व्यवसायाप्रमाणेंच मिथ्या होत, असा तुम्हांला प्रत्यय येईल. संसाररूपी नाटकांत मी माझी भूमिका करीत असतांनां, एखादें पात्र शत्रु म्हणून येतें, तर एखादें मित्र म्हणून येतें, एखादा माझा बाप बनतो, तर एखादा मुलगा बनतो, परंतु वस्तुतः त्यांतील कोणी माझा शत्रूहि नसतो, किंवा कोणी मित्रहि नसतो. मी कोणाचा बापहि नसतों, किंवा मुलगाहि नसतों; तर तत्त्वदृष्ट्या मी केवळ परब्रह्म आहें. या दृष्टीनें व्यावहारिक संबंध किंवा उपाधी यांचा माझ्यावर कांहींच परिणाम होऊं शकत नाहीं. कारण, हें सर्व मायाजल आहे, निवळ भ्रम आहे हें मी जाणतों. या जगरूपी रंगभूमी-वर प्रत्येकानें आपापली भूमिका योग्य प्रकारें बजावावी, परंतु हें नाटक आहे हें कोणीहि विसरतां कामा नये. आपण शत्रूचें काम करीत असलों किंवा मित्राचें काम करीत असलों, तथापि आपल्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं शत्रुत्व

किंवा मित्रत्व यांचा आरोप करणें शुद्ध मूर्खपणाचें होईल. तसेंच हा संसार केवळ नाटकच असल्यामुळें त्यांतील नकली कर्तव्यांना मी अवास्तव महत्त्व कां द्यावें, या नाटकांत एकानें राजाचें सोंग घेतलें असलें म्हणून त्याच्या नाटकी ऐश्वर्याचा मी हेवा काय म्हणून करावा, किंवा एखादा भिकाऱ्याचें काम करीत असला म्हणून त्याच्या दैन्याबद्दल मला तिरस्कार तरी कां वाटावा ?

( इंद्रवज्रावृत्त. )



मानापमाना उदयासि याया ।
लागे न केव्हां स्थितितें नमाया ॥
घ्या भूमिका सार्थ करूनि दावा ।
तेणेंचि सारे मग मान पावा ॥ १ ॥

## आध्यात्मिक ऐश्वर्य प्रगट करा

वेदान्त सांगतो कीं, परिस्थिति कशीहि असो, तिच्याबद्दल विचार करून स्वतःला व्यर्थ कष्ट करून घेऊं नका; परिस्थितीचा विचारच सोडून द्या. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या,' हा सिद्धान्त पटवून घेऊन निर्भय आणि निश्चिंत रहा. न्यायाधीशाच्या दृष्टान्तावरून हा सिद्धान्त तुमच्या चांगला लक्षांत येईल. तो कचेरींत येण्याच्या पूर्वीं तेथील शिपाई, कारकून, पक्षकार, व वकील आपापल्या कामांवर हजर होऊन त्याच्या आगमनाची वाट पहात असतात. न्यायाधिशाला साक्षीदारांना बोलावणीं करावीं लागत नाहींत, वकिलांना निमंत्रणें द्यावीं लागत नाहींत, किंवा पक्षकारांना हांका मारून बोलवावेंहि लागत नाहींत; तसेंच कचेरी झाडून पुसून तेथील सामान नीटनेटकें लावूनहि ठेवावें लागत नाहीं. ज्याप्रमाणें सूर्याचा उदय झाला म्हणजे सर्व सृष्टि खडबडून जागी होते, नद्यांच्या चेहऱ्यांवर हुषारी दिसूं लागते, झाडें टवटवीत दिसूं लागतात, पक्षी किलबिल आवाज करून घरट्यांतून उडून जातात, वनांतील पशु इतस्ततः स्वैर भ्रमण करूं लागतात, आणि मनुष्यप्राणी आपापले व्यवसाय करूं लागतात, त्याच्या सत्तामात्रेंकरून जिकडे तिकडे चळवळ आणि खळबळ सुरू होते, त्याचप्रमाणें न्यायाधीशाच्या सत्तेनें सर्व कामें आपोआप सुयंत्रित आणि व्यवस्थित होत असतात. याच न्यायानें सत्याच्या सद्वस्तूच्या

ठिकाणीं तुम्हीं स्थिर झालां, सर्व चराचराचे आपण साक्षी आहों, ही भावना अंतःकरणांत दृढ झाली, द्रष्टा, दृश्य आणि दर्शन या त्रिपुटीच्या पलीकडे आपलें खरें स्वरूप असून या विश्वाचे आपण तटस्थ न्यायाधीश आहों, हा सिद्धान्त अंतःकरणांत बाणला, आत्मसूर्य आपल्या सहस्र किरणांनीं प्रकाशूं लागला, तुमचा सर्वात्मभाव झाला, म्हणजे परिस्थितीचा विचार करण्याचें तुम्हांला कारणच राहणार नाहीं. ती आपला आपणच विचार करील; ती आपोआपच सुधारेल. तुमच्या सान्निध्यानें, तुमच्या रुचिर प्रकाशानें सर्व कांहीं आनंदी आणि प्रफुल्लित होईल. भारत वर्षांतील अत्यंत श्रेष्ठ अवतारी पुरुष जो श्रीरामचंद्र त्याच्यासंबंधाचा वृत्तांत असा आहे कीं, सीतेला—आत्मशक्तीला सोडविण्याकरितां जेव्हां तो जगदेकवीर लंकापुरीवर चढाई करण्यास निघाला, त्यावेळीं अखिल विश्व त्याच्या साहाय्यार्थ धांवून आलें. वानर, पशु, पक्षी, इतकेंच नव्हे तर दगड, हवा, पाणी, इत्यादि जड भूतेंहि त्याला साहाय्य करण्याकरितां आतुर झालीं. त्याच्या पथकांत आपला सामावेश व्हावा म्हणून त्यांच्यांत अहमहमिका सुरू झाली. विषयकर्दमांत लोळविणारी प्रपंचाची आसक्ति आणि अधोगतीला पोहोंचविणारी द्वेषबुद्धि हीं नाहींशी करून राग-द्वेषातीत होऊन, आपलें अध्यात्मिक ऐश्वर्य आणि तेज प्रकट करा, म्हणजे यक्ष, गंधर्व, किन्नर, नव्हे साक्षात् देवहि बन्देगुलाम म्हणून हात जोडून तुमच्या-पुढें उभे राहिले नाहींत, तर त्यांचें दुर्दैव ओढवलेंच म्हणून समजा !

प्रत्येकजण लहान मुलाची खुषामत करतो, त्याचा बन्दा गुलाम बनतो. असें कां होतें ? रत्नजडित मुकुट धारण करणाऱ्या सुलतानी बादशहांचा केश-कलाप तें ओढूं लागतें आणि समरांगणांत अतुल पराक्रम गाजविणाऱ्या महारथी अतिरथ्यांच्या स्कन्धावर तें आरूढ होऊं शकतें. मुलाची ही सुलतानी कशामुळें चालते ? याचें कारण हेंच कीं, तें परिस्थितीच्या अतीत असतें, अजाणतां स्वरूपांत स्थिर असतें.

## परिस्थितीचा विचारच सोडा

ईश्वरार्पणबुद्धीनें तुम्हीं कर्म करीत राहिलां, कायावाचामनें करून कर्तव्याला स्वतःला वाहून घेतलेंत म्हणजे लोकांच्या मदतीबद्दल काळजी वाहण्याचें तुम्हांला कारणच उरणार नाहीं. बाहेरील मदत आपल्या पायानें तुमच्या घरीं

चालत येईल, नव्हे आलीच पाहिजे! तुमच्या भाषणांत तथ्य असूं द्या, संग्रह करून ठेवण्यासारखा एखादा नवीन मुद्दा त्यांत असूं द्या, म्हणजे लोक आपोआप तुमचें भाषण टिपून ठेवतील. आपलें व्याख्यान कोणी लिहून घेईल कीं नाहीं, किंवा कोणी तें प्रसिद्ध करील कीं नाहीं, याची चिंता करण्याचें कांहींएक प्रयोजन नाहीं. मुख्य मुद्दा हा आहे कीं, तुमच्या भाषणांत कांहीं तरी विशेष असलें पाहिजे. आपली स्वाभाविक श्रेष्ठता ओळखून नेहमीं न्यायाधीशाप्रमाणें वागत जा. आपलें अध्यात्मिक ऐश्वर्य ओळखून लोक आपणांला काय म्हणतील, ते आपणांस मदत करतील किंवा नाहीं, अशा दुबळेपणाच्या शंकांनीं आपली नैसर्गिक प्रसन्नता बिघडवूं नका.

शरीराच्या कोठल्याहि भागांत कंड सुटली कीं, हात आपोआप तेथें जातो. आतां, तुम्हांला हें माहीत असेलच कीं, हाताला अधिष्ठानभूत अशी जी चिच्छक्ति आहे, तीच खाज सुटलेल्या भागालाहि आधार आहे. दोन्ही ठिकाणीं एकच चैतन्य भरलेलें आहे. त्याचप्रमाणें तुमच्या ठिकाणीं जें परमात्मतत्त्व आहे, तेंच सभोंवतालच्या सर्व वस्तूंत ओतप्रोत भरलेलें आहे. तुम्हांला आणि तुमच्या बाह्य परिस्थितीला तो एकच परमात्मा आधार आहे. यामुळें तुमची वृत्ति स्वरूपाकार झाली, परमात्मस्वरूपाशीं तादात्म्य पावली म्हणजे हें शरीरच विश्वाकार दिसूं लागतें, सर्व विश्व आपल्या या शरीरांत येऊन एकवटलें आहे असें वाटेल, आणि अशी स्थिति झाली, आपणच सर्व विश्व बनलों, म्हणजे खाज सुटलेल्या ठिकाणीं हात जसा अगदीं सहज जातो, त्याप्रमाणें लोकांची मदत आपणांस अगदीं सहज आणि आपोआप होते—नव्हे झालीच पाहिजे.

छायेला पकडण्याकरितां आपण तिच्या मागें धांवत सुटलों तर ती आपल्या हातीं कधींहि लागणार नाहीं. आपण जसजसे पुढें पुढें धांवत जाऊं तसतशी ती पुढेंपुढें धांवत जाईल. पण सूर्याभिमुख होऊन तिच्यापुढें आपण पाठ फिरवली कीं, ती कुत्र्याप्रमाणें आपल्या मागोमाग येत राहील! याच न्यायानें लोकांच्या मदतीच्या तुम्हीं मागें लागलां कीं, ती मदत तुम्हांला केव्हांहि मिळणार नाहीं. आत्मसूर्याकडे दृष्टि ठेवून तिच्याकडे पाठ फिरवलीत, परिस्थितीचा विचार साफ सोडून दिलात, म्हणजे अनुकूल परिस्थिति तुमचा शोध काढीत तुमच्या घरीं चालून येईल, हा सिद्धान्त आहे.

## कर्तव्याचें दडपण झुगारून द्या

कर्तव्याचें नांव काढलें कीं लोक बिचकून, गोंधळून जातात; त्यांचें तोंड आंबट होतें आणि चेहरा निस्तेज होतो. त्यांना कर्तव्य हें एक बुजगावणेंच वाटतें. हा कर्तव्याचा ब्रह्मराक्षस त्यांना सारखा झोडपीत असतो; सारखा त्यांच्या राशीला लागलेला असतो. एक क्षणभरहि त्यांना चैन म्हणून कसें तें पडूं देत नाहीं. असले हे कर्तव्याचे दास किंवा खरें बोलावयाचें म्हणजे ' हीं कर्तव्याचीं चालतीं बोलतीं यंत्रें ' नेमून दिलेलीं कामें फार झपाट्यानें करतात हें खरें; परंतु या झपाट्याबरोबर त्यांच्या अंगची कर्तबगारी किंवा कर्तृत्वशक्ति नाहींशी होत असते हें निश्चित आहे. कर्तव्याची जाणीव असलीच पाहिजे, परंतु तिला मनाची समतोलता बिघडूं देऊं नका, किंवा कर्तव्यबुद्धीच्या दडपणानें आपला उत्साह कमी होऊं देऊं नका. वस्तुतः कर्तव्य हें आपलें आपणच ठरविलेलें असतें; आपखुषीनें तें स्वतःवर लादून घेतलेलें असतें, हें लक्षांत ठेवा. विचार केला असतां, आपले आपण पूर्ण मुखत्यार आहों. आपली परिस्थिति आपणच ठरवतों, आपण होऊन आपले वरिष्ठ निर्माण करतों आणि राजीखुषीनें त्यांच्या सेवेला वाहून घेतों. आपल्याला जर त्यांच्यापासून वेतन पाहिजे, तर त्यांनाहि आपल्या चाकरीची जरूरी असतेच. यांत दोन्ही बाजूंला सारख्याच अटी आहेत. जेवढी क्रिया तेवढीच उलट बाजूनें प्रतिक्रिया, हा नियमच आहे. परंतु या सर्व व्यवहारांत आपण प्रथम आपल्या स्वतःच्या इच्छेचे नोकर बनतों आणि नंतर दुसऱ्याचे नोकर बनतों. कारण, आपणांला नोकर बनवणार कोण ? तुमची सध्यांची परिस्थिति तुमची तुम्हींच निर्माण केली आहे. तुमचा प्रपंच—हा आप्तेष्टांचा संकुचित पसारा तुमचा तुम्हींच उत्पन्न केला आहे. वर्तमानकालासंबंधानें जर अशी स्थिति आहे तर तुमचा भविष्यकाल तरी तुमच्याशिवाय ठरविणार कोण ? तुम्हींच तुमच्या दैवाचे—परिस्थितीचे नियन्ते आहां, हें तत्त्व लक्षांत ठेवा आणि सुखी व्हा. चित्ताची प्रसन्नता बिघडूं न देतां सदासर्वदा आनंदांत रहा.

( चालः—फटका )

रचितों आम्हीं भावी मंदिर मूळ कल्पना हा पाया ।
हिताहितास्तव, परी त्यांतिल कांहीं न कळे जीवां या ॥

दुजें नाम दैवास कल्पना, पसंत करविधि पहा पथ।
विधिगोलाचा असे धनी मन, जरा आंवरी तुझा रथ॥
शांत होइ, दृढभाव असो तव अचल राहिं या महीवरी।
भिण्यासि कारण भिणेंच आहे, जो तो आपुला असे अरी॥
हृदयाकाशीं ज्ञानोदय हो, वदो दशा ही टळवाया।
'वचन पाळ;' मग मनोगता प्रिय मिळेल पथ मोकळा तया॥

आपणांस कोणी वेठीस धरलें आहे, कशीतरी बिगार टाळली पाहिजे, असें मानून रडतखडत कोणत्याहि कामाला हात घालूं नका; तर तो एक प्रकारचा उत्साहवर्धक व्यायाम आहे, करमणुकीचा खेळ आहे, असें समजून एखाद्या बादशहाप्रमाणें, चैनींत आपलीं कामें करीत जा. कामाचा कधींहि बाऊ वाढूं देऊं नका. आपल्या स्वाभाविक ऐश्वर्याची आणि श्रेष्ठत्वाची ओळख करून घ्या. राजे, महाराजे हे आपल्या आज्ञेचे दास आहेत, ह्या गोष्टीचा अनुभव करून घ्या आणि आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें ऐटींत, उत्साहानें आणि लीलेनें आपलें कर्तव्य बजावीत जा.

वस्तुजात जो सभोंवतालीं नसे तयांचें जयां दर।
नयन लाविती तयांकडे, काळसे गिरीही शिरावर॥
असे असति ते, असें न येई मनांत त्यांच्या पहा कधीं॥
"मनोरंजना करा दावुनी दया प्रेम लागुनीं पदीं" ॥
स्फुरण देतसे आणि तजेला गीत असे कीं प्रभाकर॥
पारितोषक प्रमोदकारी गीताचें जनमनोहर॥
स्फुट प्रसूनीं जन्म जाहला, विश्वा साऱ्या झुलवाया॥
मदनसारिका जाणति, लागति मधुर सुरांनीं खग गाया॥

## अभयता म्हणजे काय ?

आतां आपण यशाच्या पांचव्या तत्त्वाचा—अभयतेचा विचार करूं. निर्भयता—अभयता म्हणजे काय ? मायेचें मिथ्यात्व ओळखणें आणि परमात्मा हीच एक सद्वस्तु आहे असें ज्ञान करून घेऊन त्याप्रमाणें वागणें, 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' हा सिद्धान्त पटवून घेऊन तो आचरणांत आणणें म्हणजेच अभय*

* आनन्दं ब्रह्मणो विद्वान बिभेति कदाचन । तैत्तिरीयोपनिषद्

होणें होय. भयाचें वसतिस्थान जें शरीर ते आपण आहों, अशी ज्या वेळीं आपली भावना होते, त्या वेळींच भीति आपल्या मागें लागते; चिन्तारूपी कृमि या शरीराला खाऊन टाकूं शकतात. सर्व तऱ्हेचीं दुःखें या शरीरावर चढाई करूं शकतात. सर्व प्रकारच्या आधिव्याधीनीं तें ग्रस्त होऊं शकतें. परंतु आपण कांहीं शरिर नव्हे ही भावना दृढ झाली, या क्षुद्र शरीराच्या पलीकडे आपलें खरें स्वरूप आहे हें ज्ञान झालें कीं सर्व प्रकारच्या भीतीपासून आपण तत्क्षणीं मुक्त होतों. 'मी ब्रह्म आहें,' या भावनेनें वर्तत जा, वेदान्त आचरणांत आणा, म्हणजे तुमच्या केंसालाहि धक्का लावण्याची कोणाची छाती आहे? तुम्हांला पीडा देण्यास मग कोण समर्थ होणार आहे? अभयता आणि वेदान्त हीं अभेदरूप आहेत; त्यांचा समवायसंबंध आहे.

## अभयतेचा यशाशीं संबंध

यावर कोणी असा प्रश्न करतील कीं, यशस्वितेशीं निर्भयतेचा संबंध काय? निर्भयपणाची यशाला आवश्यकता ती कसली? स्वानुभवाची एक गोष्ट सांगून राम हा मुद्दा स्पष्ट करणार आहे. राम हिमालयांत एकांतवास करीत असतांना एकदां पांच अस्वलें एकदम त्याच्यावर चालून आलीं. परंतु रामाला यत्किंचितहि इजा न करतां आल्या वाटेनें तीं निघून गेलीं. हें कां झालें? केवळ निर्भयपणामुळें 'मी देह नाहीं, मनहि मी नाहीं, तर प्रत्यक्ष परमात्माच मी आहे, मी ईश्वर आहें; अग्नि मला जाळूं शकत नाहीं आणि शस्त्रें मला इजा करूं शकत नाहींत, मी स्वयं ब्रह्म आहें,' हें तत्त्वज्ञान रामाच्या रोमारोमांत मुरून गेलें होतें. म्हणून रामानें निःशंकपणें त्यांच्याकडे पाहिलें मात्र, दृष्टादृष्ट होतांच तीं पळून गेलीं. एकदां एक लांडगा असाच चालून आला होता. त्यालाहि असेंच भिववून पळविण्यांत आलें. दुसऱ्या एका प्रसंगीं एक वाघ आला होता, परंतु दृष्टीला दृष्टि मिळतांच तोहि घाबरून पळून गेला. मांजर दिसलें कीं, कबुतरें डोळे मिटून धरतात. त्यांची समजूत ही कीं, आपल्याला मांजर दिसलें नाहीं कीं, मांजरालाहि आपण दिसणार नाहीं. पण मांजराचे डोळे थोडेच मिटलेले असतात! तें त्यांना पाहातें आणि त्यांचा फडशा करतें. तुम्हीं घाबरलां कीं, मांजरानें तुम्हांला गट्ट केलेंच म्हणून समजा. शहरच्या अगदीं टोंकाच्या भागांतून फिरत असतांना कुत्रे भुंकुं लागले म्हणजे जर का आपण यत्किंचितहि घाबरलेले दिसलों, तर यःकश्चित् कुत्रीं

सुद्धां अंगावर चालून येतात आणि डांसा काढतात, हा पुष्कळांचा अनुभव असेलच. आपण भ्यालों असें दिसलें तर कुत्रेहि आपणांस फाडून खातील. पण तेच आपण निर्भय असलों कीं, वाघ आणि सिंह यांनाहि जेर करून वठणीवर आणतां येईल. एखादा पातळ पदार्थ या भांड्यांतून त्या भांड्यांत ओतीत असतांना हात कांपूं लागला कीं, पदार्थ हटकून खालीं सांडावयाचाच. परंतु तोच पदार्थ तुम्ही निःशंकपणानें आणि निर्भयपणानें ओता, म्हणजे एक थेंबहि खालीं सांडणार नाहीं.

## भीति हीच खरी आपत्ति !

'करूं कीं न करूं, साधेल कीं न साधेल,' या साशंक वृत्तीनें आणि भीतीनें आपण स्वतःस पेंचांत आणतों आणि दुःख पावतों. कोणत्याहि गोष्टीनें तुम्हीं भिऊन गोंधळून जाऊं नका. कारण, तुम्हींच सर्व कांहीं असल्यामुळें तुम्हांला भीति कोणाची ? भीति उत्पन्न करणारी देहावरील आसक्ति एकदम टाकून द्या. त्वचेनें आच्छादलेला पक्क्या शंभर शेरांचा हाडामांसांचा हा गोळा यःकश्चित् फटाक्याच्या आवाजानें, उंदराच्या चिंवचिंवण्यानें, पानाच्या सरसर आवाजानें किंवा एखाद्या झाडाच्या हालणाऱ्या सांवलीनें दचकून घाबरून जावा, ही अत्यंत केंविलवाणी आणि शरमेची गोष्ट नाहीं काय ? **आपत्तीच्या भीतीहून अधिक भयंकर दूसरी आपत्तिच नाहीं !** मृत्यूची भीति बाळगून जिवंत राहण्यापेक्षां मृत्यूच्या जबड्यांत उडी टाकणेंच मला अधिक पसंत आणि श्रेयस्कर वाटतें !

## प्रपंच आणि परमार्थ

'मनीं वसे तें जनीं दिसें,' असें एका ग्रंथकारानें म्हटलें आहे. तुमचें मन प्रेमानें भरून गेलें असेल तर जिकडे तिकडे प्रेमच प्रेम तुमच्या नजरेस येईल. मनांत द्वेषबुद्धि धरा म्हणजे सर्वत्र द्वेषच तुम्हांला आढळेल. गुप्त हेर आणि ठक यांची पोटांत भीति असेल, तर कोठेंहि गेलांत तरी ते तुमच्या राशीला लागतील. लोक लुच्चे आणि स्वार्थपरायण आहेत, अशी तुमची समजूत असेल तर तसाच तुम्हांला अनुभव येईल. त्या बाबतींत तुमची कधींहि निराशा होणार नाहीं ! अप्पलपोटेपणा आणि लुच्चेगिरी हीं चोहोंकडून तुम्हांवर मारा करतील. आपल्या मनोजोपताचेच जर हे सर्व खेळ आहेत, तर भीति बाळग-

ण्याचें काय कारण आहे? आपल्या ठिकाणीं शुद्धता आणि पावित्र्य आणा, म्हणजे कोठेंहि मलिनता आणि अपवित्रता तुम्हांला आढळणारच नाहीं. प्रपंच आणि परमार्थ यांची सदैव सांगड असते. प्रपंचांत खरें यश मिळवलेंत कीं, परमार्थाचे बाबतींतहि तुम्हांला यश आल्यावांचून राहणार नाहीं. प्रपंच आणि परमार्थ यांची ताटातूट करूं पाहणारे लोक भ्रमांत आहेत, मूर्ख आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## ज्ञानदीप पाजळून निर्भय व्हा

घरावर पहारा नसला, घरांतली मंडळी गाफिल असली म्हणजेच चोरांचें फावतें आणि ते घर फोडून खुशाल आंत शिरतात. परंतु रात्रभर दिवा तेवत असला आणि मंडळी जागत असली म्हणजे घरांत शिरण्याची चोरांची प्राज्ञा नाहीं. मनांत सत्याचा दिवा सदैव तेवत ठेवा, ज्ञानमय प्रदीप सर्वकाळ प्रज्ज्वलित ठेवा, म्हणजे मोह किंवा भयरूपी भुतें तुमच्या आसपासहि फिरकूं शकणार नाहींत; या दिव्य सिद्धान्तावर विश्वास ठेवा. व्यावहारिक ज्ञानावर फाजील भिस्त ठेवून आपल्या जीविताचें मातेरें करूं नका. भित्रा दूरदर्शीपणा तुमच्या आत्मविश्वासाचा सत्यनाश करीत आहे, तुम्हांला पक्के धर्मलंड बनवीत आहे! परिस्थितीच्या धुक्याला आपलें खरें स्वरूप आच्छादित करूं कां देतां? तुम्हीं वास्तविक सूर्याचेहि सूर्य नाहीं काय? सर्व चराचराचे तुम्हींच प्रभु नव्हे कां? परिस्थितीचा असा कोणता तऱ्हेवाईक जुल्म आहे कीं, जो तुम्हांला पायांखालीं तुडवितां येणार नाहीं? परिस्थितीचा असा कोणता अंधःकार आहे कीं, जो आपल्या प्रखर किरणांनीं तुम्हांला नाहींसा करतां येणार नाहीं? तसेंच परिस्थितीचें असें कोणतें दहिंवर आहे कीं, जें आपल्या तेजानें तुम्हांला पार वितळून टाकतां येणार नाहीं? भयंकर आणि कष्टमय वाटणाऱ्या या परिस्थितींत यत्किंचित् तरी पारमार्थिक सत्यता आहे, असें आपल्या स्वप्नांतहि येतां कामा नये. अनुकूल किंवा प्रतिकूल परिस्थिति हा सर्व आपल्या मनाचा खेळ आहे, केवळ ब्रह्म मात्र सत्य असून जगत् मिथ्या आहे, हा सिद्धान्त अंतःकरणाला पटवून घ्या आणि निर्भय व्हा.

## स्वावलंबन

स्वावलंबन किंवा आत्मश्रद्धा हें यशाचें सहावें तत्त्व आहे. हत्ती हा सिंहाहून किती तरी प्रचंड असतो, त्याच्या शरीरप्रमाणें त्याचें सामर्थ्यहि सिंहापेक्षां

किती तरी पटींनें अधिक असतें; परंतु एकटा सिंह हत्तींच्या कळपाला सर्वो कीं पळों करून सोडूं शकतो. सिंहाच्या ठिकाणीं हें अद्भुत सामर्थ्य कोठून येतें, त्याच्या पराक्रमांतील बीज काय ? बीज हेंच कीं, 'एकमेवाद्वितीयम्' हा सिद्धान्त प्रत्यक्ष कृतींत आणणारा सिंह हा अद्वैतवादी वेदान्ती असून हत्ती हे द्वैतवादी आहेत. देह म्हणजेच आपण, असें हत्ती मानतात. आणि 'नाहं देहः' म्हणजे मी देह नाहीं, मी चैतन्य आहें, या अनुभवावर सिंह हा आरूढ झालेला असतो, असा त्याचा विश्वास असतो. हत्तीच्या मानानें सिंहाचा देह जरी वस्तुतः अगदींच लहान असला, तथापि त्याची आत्मश्रद्धा दांडगी असते, आपलें सामर्थ्य अतुल आणि अनंत आहे, अशी त्याची भावना असते. हत्तींच्या ठिकाणीं हा आत्मविश्वास नसतो म्हणून ते नेहेमीं कळप करून राहतात. एकेका कळपांत चाळीस चाळीस, पन्नास पन्नास हत्ती असतात. कधीं कधीं तर शंभर दोनशें हत्तीसुद्धां एका कळपांत आढळतात. परंतु कळप कितीहि मोठा असला तथापि पहाऱ्यावर एक दांडगा हत्ती ठेवल्याशिवाय ते स्वस्थ पडावयाचे नाहींत. सिंह झडप घालून आपणांस फाडून खाईल, अशी त्यांना सदैव भीति वाटत असते; आपण हिंमत धरूं, तर एकच काय पण हजारों सिंह अगदीं सहज रीतीनें चिरडून टाकण्याचें आपणां प्रत्येकामध्यें सामर्थ्य आहे, हें त्या बिचाऱ्यांना कळत नाहीं. आत्मश्रद्धेचा अभाव असल्यामुळें बिचारे सामर्थ्य असूनहि भेकड आणि दुबळे बनतात !

आत्मविश्वास हें यशाचें—आनंदाचें मूलतत्त्व आहे, हें हत्तींच्या उदाहरणावरून स्पष्ट होईल. आपलें स्वाभाविक सामर्थ्य ओळखून स्वतःस क्षुद्र, नीच, पापी किंवा चांडाळ समजूं नका, असें वेदान्त सांगतो. तुमचें सामर्थ्य अनंत आहे, तुम्हीं सर्वशक्तिमान् परमेश्वरच आहां, अनंतशक्ति परमात्माच तुम्ही आहां, असा वेदान्ताचा उपदेश आहे. किती स्फूर्तिदायक उपदेश हा ! या उपदेशावर विश्वास ठेवा आणि सुखी व्हा. नामरूपात्मक जगावर विश्वास ठेवा म्हणजे दुःख तुमच्या पाठीस लागलेंच म्हणून समजा. हा त्रिकालाबाधित सत्यसिद्धान्त आहे.

## भावना तसें फळ

बाह्य वस्तूंवर—दुसऱ्याच्या मदतीवर आपण अवलंबून राहिलों कीं, आपल

कार्यभाग बुडालाच म्हणून समजा. * तेंच दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा न धरतां, चित्तांत आत्मविश्वास ठेवून स्वतः कष्टत गेलों कीं, सर्व तऱ्हेची मदत आपणांकडे चालून येईल आणि उद्दिष्ट कार्य यशस्वी होईल. " आपल्या हातून कार्य कसलें होणार ! आपण काय यःकश्चित् क्षुद्र कीटक, ' कीटश्च कोटायते ' अशांतली आपली स्थिति " असले दुबळेपणाचे विचार तुमच्या डोक्यांत शिरले कीं, तुम्हीं क्षुद्र कीटकच व्हाल. मग तुमच्या हातून खरोखरच कांहीं होणार नाहीं. परंतु आपलें खरें सामर्थ्य ओळखाल, आपल्या सामर्थ्याविषयीं विश्वास बाळगाल, तर खरोखरच तुम्हीं मोठे कर्तृत्ववान् आणि वैभवशाली बनाल. जशी भावना तसें फळ, हा सिद्धान्त आहे. मोठेपणाच्या भावना करा, आपण महान् पराक्रमी आहों अशी श्रद्धा ठेवा, म्हणजे खरोखरच तुम्हीं कर्तृत्ववान् व पराक्रमी व्हाल.

विद्याखात्यांतील एक अधिकारी एका शाळेची तपासणी करीत असतां तेथील अध्यापकानें एका मुलाच्या स्मरणशक्तीची व बुद्धिमत्तेची फार तारीफ केली. तो म्हणाला, ' त्यानें सबंध रघु पाठ केला आहे; हव्या त्या सर्गांतील हवा तो श्लोक तो तोंडपांठ म्हणूं शकतो. ' मुलगा होता खराच हुषार ! परंतु त्याच्या ठिकाणीं वेदान्त बाणलेला नव्हता ! त्याला आत्मविश्वास मुळींच नव्हता. ' कायरे, सबंध रघु तोंडपाठ येतो तुला ? ' असा अधिकाऱ्यानें प्रश्न करतांच, लाजून त्यानें मान खालीं घातली आणि तोंडांतल्या तोंडांत तो म्हणाला, 'छे ! तसें कांहीं नाहीं. गुरुजी उगाच कांहीं तरी सांगतात झालें. मला कसला रघु पाठ होतो ! ' असें उत्तर देणें विनयाचें दर्शक आहे, अशी त्याची समजूत होती. ' तुला मुळींच कांहीं येत नाहीं ? एक सर्गहि पाठ येत नाहीं ?' असा त्या अधिकाऱ्यानें फिरून प्रश्न केला. 'हो, एकहि सर्ग मला पाठ येत नाहीं. मी रघु शिकलोंच नाहीं ! ' मुलानें पुन्हां लाजत लाजत उत्तर केलें. हें उत्तर ऐकून बिचारा अध्यापक मात्र खजिल झाला. त्याच वर्गांत दुसरा एक धीट मुलगा होता. रघूचे पहिले सहा सात सर्गच त्यानें म्हटले होते. तो उभा राहून विद्याधिकाऱ्याला म्हणाला, ' मला रघु पाठ आहे; हवा तो श्लोक मी म्हणून दाखवीन ! अधिकाऱ्यानें लगेच

* जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ॥
जो स्वयेंचि कष्टत गेला । तोचि भला ॥ १ ॥ श्रीसमर्थ.

त्याला कांहीं श्लोक म्हणावयास सांगितले. त्यानें ते घडाघड म्हणून दाखविले. कारण, सुदैवानें त्यानें म्हटलेल्या सर्गांतीलच श्लोक विचारण्यांत आले होते. त्याची तयारी आणि उपस्थिति पाहून अधिकारी खूष झाला आणि त्यानें त्याला मोठें बक्षीस दिलें. आपण स्वतःची जी किंमत करूं त्याच्यापेक्षां जास्त किंमत लोक आपली कधींहि करणार नाहींत! मग विनाकारण आपली किंमत कमी तरी करून कां घ्या? आपणच जर आपणांला यःकश्चित् आणि क्षुद्र मानूं लागलों, तर लोकहि आपणांला तसेच क्षुद्र व तुच्छ ठरवतील. आपली किंमत आपणच राखली पाहिजे. म्हणून राम म्हणतो. बाबांनो, आपण होऊन स्वतःला क्षुद्र, त्याज्य, पापी व दुःखी बनवूं नका. जशा भावना कराल, तसेच तुम्हीं व्हाल, हें तत्त्व लक्षांत बाळगा. आपण स्वयं परमेश्वर आहों अशी श्रद्धा ठेवा, म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वरच तुम्हीं व्हाल. आपण मुक्त आहों अशी भावना करा म्हणजे तत्क्षणीं तुम्हीं मुक्तच आहां!

## देव आणि मनुष्य

एकदां एका वेदान्त्याकडे एक गृहस्थ आला. त्यावेळीं वेदान्ती घरीं नव्हता. तो वेदान्त्याच्या दिवाणखान्यांत त्याच्या स्वतःच्या बसावयाच्या उच्चासनावर जाऊन बसला. थोड्याच वेळानें वेदान्ती आपल्या दिवाणखान्यांत आला. त्याला पाहातांच गृहस्थ म्हणाला, ' देव आणि मनुष्य यांच्यांत फरक काय ? तें मला पहावयाचें आहे; आणि एवढ्याचकरितां मी आपणांकडे आलों आहें. आपण मोठे वेदान्ती आहां, तरी एवढें मला समजावून सांगा.' वेदान्त्यानें त्याच्या प्रश्नास सरळ उत्तर न देतां आपल्या नोकरास जोरानें हांक मारिली, आणि ' या चोराला एकदम येथून हांकलून लावा, ' असें दरडावून सांगितलें. हे शब्द ऐकतांच तो गृहस्थ बिचारा गर्भगळित झाला, त्याचे हातपाय लटलट कांपूं लागले आणि तो आसनावरून उठला. वेदान्ती लगेच आपल्या आसनावर जाऊन बसला आणि छातीला हात लावून अत्यंत शांतपणानें व गंभीर स्वरानें म्हणाला, ' देव म्हणतात तो हा, आणि तूं कोण ? तर आसनावरून उठणारा भित्रा मनुष्य. माझ्या दरडावणीला भीक न घालतां तूं तसाच आसनावर बसून राहिला असतास, माझ्या भाषणानें तुझ्या मनाची समतोलता बिघडली नसती, तूं घाबरला नसतास तर तुलाहि मी देवच म्हटलें असतें. परंतु तुझ्या

लटलट कांपण्यानेंच तूं देवस्थितीपासून आपणांला पदच्युत करून घेतलेंस— आपल्याला एक क्षुद्र कीटक बनविलेंस.' आपण स्वयं परमेश्वर आहों, अशी दृढ भावना ठेवा. आपल्या ईश्वरत्वाविषयीं अचल श्रद्धा बाळगा म्हणजे कोणीहि तुम्हांला उपद्रव करूं शकणार नाहीं.

जोंपर्यंत दुसऱ्यांच्या सामर्थ्यावर, लोकांवर अवलंबून असाल, तोंपर्यंत अपयशच तुमच्या वांट्याला येणार हें ध्यानांत ठेवा; परंतु तुमच्या ठिकाणीं वास करणाऱ्या परमात्म्यावर श्रद्धा ठेवून, कोणत्याहि कामाला हात घाला म्हणजे यश ठेवलेलें आहे. पर्वत महंमदाकडे येत नसेल, तर महंमदानेंच पर्वताकडे गेलें पाहिजे. तात्पर्य काय कीं, **स्वावलंबन, आपण स्वतः कष्टत राहणें, हेंच यशःप्राप्तीचें बीज आहे.**

## शुभ वासनाच करा

एकदां एक भिकारी क्षुधेनें व्याकूळ होत्साता एका झाडाखालीं बसला, आणि मनांतल्या मनांत कढीचे भुरके मारूं लागला. थोड्याच वेळांत तो जीभ काढून लाळ गाळूं लागला. 'अरे, लाळ कां गाळतोस ! इतकें तिखट कसलें झोंबलें ?' असा एका वाटसरूनें त्याला प्रश्न केला. 'कढींत एक मिरचीचा तुकडा सांपडला, त्यानें आगडोंब करून सोडली,' असें त्यानें उत्तर दिलें. त्यावर तो गृहस्थ म्हणाला, 'अरे मूर्खा ! कल्पनाच जर करावयाची होती तर तिखट कढीचीच कां ? गोड लाडू किंवा मांडे कां नाहीं खात बसलास! सगळाच जर तुझ्या कल्पनेचा बाजार आहे, तर मग तूं कढीच कां पसंत केलीस, मग मांडे तरी खात कां नाहीं बसलास ?'

वेदान्त म्हणतो कीं, हें बाह्य जग, हें चराचर आपल्या कल्पनेचा खेळ आहे. आपणच त्याला निर्माण करतों. असें जर आहे तर आपण क्षुद्र व पापी आहों, अशी कल्पना कां करावी ? आपण अकुतोभय आणि स्वावलंबी परमेश्वरच आहों, अशी कल्पना कां करूं नये ?

## स्वरूपनिष्ठ व्हा

सत्याच्या ठिकाणीं ज्वलत् आणि जाग्रत् श्रद्धा ठेवा, बाह्य सृष्टीचें यथार्थ ज्ञान करून घ्या, परिस्थितीची खरी किंमत ठरवा आणि परमात्मतत्त्वाचा इतका दृढतर अनुभव करून घ्या कीं, हें जग मिथ्या आहे, तो केवळ भ्रम

आहे, हा सिद्धान्त तुमच्या अंतःकरणांत पूर्णपणें बिंबून जाईल. तुम्हांला माहीतच असेल कीं, नक्षत्रांच्या अंतराची गणना करतांना ज्योतिर्विद् आपल्या ह्या पृथ्वीला एक बिन्दुमात्र समजतात. नक्षत्रांच्या आणि ग्रहांच्या मानानें पृथ्वी ही केवळ एका बिन्दूएवढी होय हें जर खरें, तर तिची त्या सर्वव्यापकाशीं तुलना तरी होईल काय? अर्थात् नाहीं. मग मनाची तशी भावना करा आणि अनुभव करून घ्या. सर्व तेजांचें तेज तुम्हींच आहां. सर्व ऐश्वर्य आणि सौभाग्य तुमचेंच आहे, हें वेदान्तज्ञान अंगांत इतकें बाणून घ्या कीं, ही विस्तीर्ण पृथ्वी, हें नामरूपात्मक विश्व तसेंच मानमरातब, अपमान आणि उपहास, तुमच्या शत्रूंनीं केलेली टीका किंवा तुमच्या मित्रांनीं केलेली स्तुति, हीं सर्व निरर्थक, भ्रामक व मिथ्या आहेत, असा तुमचा अनुभव होईल. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या,' हा सिद्धान्त अन्तःकरणाला पटवून घेणें हेंच यशाचें रहस्य होय.

## तारक तत्त्व

नायगारानदींतून एकदां दोन गृहस्थ वाहात जात होते. इतक्यांत वरून वाहात येणारा एक ओंडका त्यांतील एकाच्या हातीं लागला. त्याच्या आधारानें आपण आपला जीव वांचवूं, या समजुतीनें त्यानें त्याचा आश्रय केला. दुसऱ्याला तीरावरील लोकांनीं त्याच्याकरितां टाकलेली दोरी सांपडली. आतां ही दोरी अगदीं बारीक होती. लांकडाच्या ठोकळ्याप्रमाणें जाडजूड किंवा मोठी नव्हती; तथापि तिला धरून तो तीराला सुरक्षितपणें जाऊन पोहोंचला. ठोकळा अवजड असल्यामुळें तो जिकडे वाहात जाई तिकडे तो दुसरा गृहस्थ त्याच्याबरोबर खेंचला जात असे. करतां करतां, ठोकळा झोतांत सांपडला आणि लाटांच्या सपाट्याबरोबर धबधब्यांत जाऊन पडला. त्याला चिकटून राहणाऱ्या बिचाऱ्या सद्गृहस्थाला धबधब्याच्या उसळणाऱ्या लाटांत जलसमाधि मिळाली, हें निराळें सांगावयास नकोच! ठोकळ्याला चिकटून रहाणाऱ्या या दुर्दैवी इसमाप्रमाणें, जगांतील लोकांनो! तुम्हीं नांवलौकिक, संपत्ति, जमीनजुमला आणि ऐश्वर्य यांना चिकटून बसलां आहांत, व त्यांच्या आश्रयानें आपला प्रपंच सुखाचा होऊन हा भवसागर लीलेनें तरून जाऊं, अशी तुमची भ्रामक समजूत झालेली आहे. परंतु लांकडाच्या ओंडक्याप्रमाणें हीं साधनें सरोवर तारक नसून मारकच आहेत, हें विसरूं नका. तारक तत्त्व

हें ठोकळ्याप्रमाणें स्थूल नसून बारीक दोराप्रमाणें अत्यंत सूक्ष्म आहे. तें जड नसल्यामुळें हातानें त्याला स्पर्श करतां येणार नाहीं, किंवा तें हवें तसें खेळवतांहि येणार नाहीं. हें तत्त्व, हें सत्य अत्यंत विरल आणि सूक्ष्म आहे. तथापि बारीक दोरीप्रमाणें तेंच भवसागरांतून तुम्हांला पलीकडे नेऊन पोहोंचवील. संपत्त्यादि ज्या बाह्य वस्तूंवर तुम्हीं अवलंबून राहतां, त्या तुमच्या तारणास साधनीभूत न होतां उलट तुमचा नाशच करतील, नाशासच कारणीभूत होतील आणि नैराश्य, चिंता आणि दुःख यांच्या खोल खड्ड्यांत तुम्हांला ढकलून देतील! याकरितां राम म्हणतो, मित्रांनो! सावधान, अजून तरी जागे व्हां, आणि शुद्धीवर या. सद्वस्तूचा आश्रय करा. सत्यावर श्रद्धा ठेवा. बाह्यवस्तूंपेक्षां सत्याच्या ठिकाणीं अधिक विश्वास असूं द्या. बाह्यवस्तूंवर, धनदौलतीवर तुम्हीं विसंबून राहिलां, जडावर अवलंबून राहिलां कीं, तुमचा नाश झालाच पाहिजे, असा निसर्गाचा नियम आहे. आत्मदेवावर विश्वास ठेवा, आपलें दिव्यत्व अनुभूत करून घ्या, म्हणजे तुम्हीं मुक्तच आहां. इंद्रियांनीं मारले जाऊं नका.

तुमचे सर्व शेजारीपाजारी, इष्टमित्र व आप्तसंबंधी तुम्हांला भुरळ पाडून, तुम्हांवर मूर्च्छनेचे प्रयोग करून जग हें वास्तविक आहे, अशी तुमच्या अंतः-करणांत दृढ श्रद्धा उत्पन्न करीत असतात; आपल्या संस्कारांनीं जगरूपी भ्रम वाढवीत असतात. त्यांच्या घातुक सूचनांच्या अतीत व्हा. कारण, त्यांपासून दुःख आणि चिन्ता यांच्याशिवाय दुसरी कशाचीहि प्राप्ति होणार नाहीं. हा जगरूपी भ्रम नाहींसा करा. सत्यसिद्धान्तावर विश्वास ठेवून परमेश्वराशीं आपलें ऐक्य अनुभवा, म्हणजे तुम्हीं मुक्तच आहां; इतकेंच नव्हे तर मूर्तिमंत मोक्षच तुम्हीं आहां.

आत्म्यापेक्षां बाह्यसृष्टीला अधिक सत्य मानून तुम्ही तिच्या नादीं लागूं नका. हा साडेतीन हाताचा देह म्हणजेच मी, अशी आपली संकुचित व दुबळी समजूत करून घेऊं नका. कोणत्याहि वस्तूचा अभिमान धरून तिनें बद्ध होऊं नका. वैद्याप्रमाणें अलिप्तपणानें आपले सर्व व्यवसाय करीत जा. वैद्य रोग्याला बरा करतो, पण त्याचा रोग कांहीं वैद्याला जडत नाहीं! सकल घडामोडींचे आपण साक्षी आहों, त्यांपासून आपण सर्वस्वी अलिप्त आहों, या उदात्त भावनेनें आपलें कार्य करीत जा आणि सर्व संकटांपासून निर्भय रहा.

## सत्त्वसंशुद्धि.

यशःप्राप्तीचें शेवटचें तत्त्व चित्तशुद्धि हें होय. हें तत्त्व शेवटीं सांगण्यांत येत आहे म्हणून तेवढ्यावरून तें कमी महत्त्वाचें असें मात्र कोणी समजूं नये. चित्तशुद्धि ही यशाची हमीच होय. भावना हें दैवाचें दुसरें नांव आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण जशी ज्याची श्रद्धा असते तसाच तो होत असतो, हा सिद्धान्त आहे.* तुम्हीं प्रत्यक्ष परमेश्वरच आहां; तेव्हां तुमच्या सर्व वासना परिपूर्ण झाल्याच पाहिजेत. परंतु चांगल्या वासना करण्याऐवजीं दुष्ट व पापी वासना कराल, अधःपात करणारे अनीतीचे विचार मनांत आणाल, तर या दुष्ट व मलिन वासना परिपूर्ण होतीलच, परंतु त्यांबरोबर नानाप्रकारचे शारीरिक कष्ट व मानसिक क्लेश तुमच्या बोकांडीं बसतील. या दूर्वासनांच्या सवद्यांत अनेक आधिव्याधींचा तुम्हांला फायदा होईल! तुमचें मन तुम्हांला नेहेमीं खात राहील. चित्ताला स्वस्थता म्हणून कधींच प्राप्त होणार नाहीं. विषयोपभोगांत दंग झालेल्या मूर्खाला आपण मोठी चैन÷ मारतों आहों, रंग चालला आहे, असें वाटत असतें; परंतु असें करण्यांत मलिन वासनांच्या, अशुभ कर्माच्या रूपानें आपल्या जीविताचाच सत्यानाश करीत आहों, आपलें जीवनच विषयाच्या स्वाधीन करीत आहों, जीवनाच्या झऱ्यांत आपण विष कालवीत आहों, विषयांचे गुलाम बनत आहों, याची त्याला कल्पनाहि नसते. स्वार्थाकडे कर्मतत्व लावूं लागलांत कीं, त्यानें तुम्हांवर उलटून तुमचा सूड उगवलाच म्हणून समजा! तुम्हीं आपली इच्छा देवावर लादण्याचा प्रयत्न करूं नका. देहधर्माच्या, शारीरिक गरजांच्या बाबतींत ईश्वरी सूत्रावर, प्रारब्धावर सर्वस्वी अवलंबून रहा. ऐहिक धनदौलतीच्या आणि आवश्यकतांच्या बाबतींत ईश्वरी इच्छेशीं स्वतःच्या इच्छेचें तादात्म्य करून घ्या. जगाचे प्रवर्तक व चालक आपणच आहों, सर्व सत्ता आपलीच असून आपल्या प्रबळ इच्छेनुरूप सर्व परिस्थिति प्रस्तुत वेषांत नटली आहे, तिला तशी आपणच सजविली आहे; याचा अनुभव करून घ्या. तुम्हीं दरिद्री आणि विपन्न असलां तथापि दारिद्र्य आपलें

---

* श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ गीता अ. १७।३.

÷ भोगा न भुक्ता वयमेव भुक्ताः । तपो न तप्तं वयमेव तप्ताः ॥
कालो न याता वयमेव याताः । तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः । भर्तृहरि.

आपणच निर्माण केलें आहे, तें आपलेंच कर्तृत्व आहे, असें समजून दारिद्र्यांतच सुख मानण्यास शिका. देहासक्तीनें आड मार्गास लागून विषयकर्दमांत तुम्हीं अडकून पडलां असलां तरी निराश होऊं नका. भावनेचें सामर्थ्य तुम्हांला माहीत आहेच. हें सामर्थ्य प्रकट करण्याचा हा प्रसंग आहे असें समजून, आपल्या प्रबल इच्छाशक्तीच्या जोरावर परमात्मभावनेप्रत पुन्हां जाऊन पोहोंचा, त्या भावनेंत स्थिर रहा. या देशांत विषयासक्ति ही प्रेम ह्या पवित्र नांवाखालीं मोडते. प्रेमाची ही केवढी विटंबना ! व्यवहारांत एकाग्रता किंवा एकात्मकता मुळींच आढळून येत नाहीं. अस्वाभाविक प्रेम आणि अनिवार विषयासक्ति याच्या योगानें तुमचे सर्व व्यवहार अर्धवट होत असतात. तुमचें चित्त नेहेमीं अस्वस्थ व व्यग्र असतें. दिवसाच्या कार्यक्रमांत एकाग्रता केव्हांच आढळून येत नाहीं. सबंध तरुण मनुष्य क्वचितच बोलतांना दृष्टीस पडतो ! त्याचें सर्व अंतःकरण बोलण्याकडे फारच क्वचित् असतें. गणिताच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास, अमेरिकन तरुणाचा पूर्णांक कधींच नसतो; नेहेमीं अपूर्णांकच असावयाचा; अपूर्णांक तर अपूर्णांक, पण सम अपूर्णांक तरी ? छत् तेंही नाहीं. जेव्हां पहावा तेव्हां विषम अपूर्णांक, अत्यंत विकृत आणि भिन्न असा विषम अपूर्णांक ! लोकांत पूर्णत्वानें तो कधींच प्रकट होत नसून त्याची एखादी वेडीवांकडी बाजू समाजापुढें येत असतें. त्याचें अर्धे चित्त त्याच्या वल्लभेकडे गुंतलेलें असतें आणि अर्धे दुसऱ्याच एखाद्या ठिकाणीं रममाण झालेलें असतें. आपला व्यवसाय प्रेमानें करीत जा, ज्या ठिकाणीं हात असेल तेथेंच अंतःकरणहि असूं द्या. जे कांहीं कराल तें अंतःकरणपूर्वक हौसेनें करा. हात आणि पाय काम करून गरम झाले असले तरी डोकें गरम होऊं देऊं नका ! डोकें थंड ठेवा. सर्व विचारांना—वृत्तींना अन्तर्मुख करून, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं लीन करा, स्वरूपांत स्थिर रहा आणि परिस्थितीची पर्वा करूं नका. लोककल्याणाचा फाजील बडेजाव करूं नका. जगाच्या हिताचा उद्योग मनाला लावून घेऊं नका. तुमच्या मदतीची नेहेमीं अपेक्षा आणि याचना करीत जग बसलें आहे अशी वेडगळ समजूत तुम्हीं कां करून घेतां ? तुमच्या स्वतःच्या कल्याणाकरितां—तुमच्या मोक्षाकरितां तुमचें शरीर नेहमीं कष्टत राहूं द्या. मूर्ख लोक ज्ञानप्राप्त्यर्थ हपापलेले असतात आणि ज्ञान मिळण्याकरितां देवाची सतत प्रार्थना करित असतात. ज्ञानाची तरी इच्छा तुम्ही कां करावी ? ज्ञानप्रकाशाकरितां इतकें कां धडपडावें ? ज्ञानप्राप्तीची

ही धडपडच तुम्हांला अज्ञानांत ठेवते! ज्ञानाकरितां प्रयत्न हें सुद्धां अज्ञान होय. क्षणमात्र सर्व वासना झुगारून देऊन ॐ म्हणा म्हणजे तुम्हीं ज्ञानच आहां. कोणत्याहि प्रकारची आसक्ति न ठेवतां रागद्वेषांच्या अतीत व्हा, मन अगदीं समतोल ठेवा, वृत्तींचा निरास करून स्वरूपांत स्थिर रहा म्हणजे तुमचें सर्व शरीर प्रकाशमय होईल. तुम्हीं मूर्तिमंत प्रकाश व्हाल. * कोणतेंहि काम करतांना सर्व स्वार्थी हेतूंना एकदम हद्दपार करा. तृष्णाराक्षसीला निस्वार्थतेच्या मंत्रांनीं भारून गाडून टाका, आणि निष्काम होऊन प्रत्येक कर्म दिव्य आणि पवित्र करा. आसक्तीचा रोग पार नाहींसा करा. एका वस्तूच्या ठिकाणीं, अंशाच्या ठिकाणीं तुम्हीं आसक्त झालां कीं, तद्व्यतिरिक्त सर्वांपासून, सर्वव्यापी पूर्ण परमेश्वरापासून तुम्हीं वेगळे—विभक्त झालांच, हा सिद्धान्त आहे. विषयकर्दमांत लोटणाऱ्या स्वार्थी व नीच इच्छाच तुमच्या सर्व व्यवहारांना आणि जीविताला प्रापंचिक स्वरूप देत असतात. आपण कोणत्याहि कामांत गढून गेलों कीं, देहभान विसरून जातों, वृत्ति अजाणतां स्वरूपांत लीन होऊन आपण स्वरूपाकार बनतों. म्हणून राम म्हणतो कीं, देहातीत होऊन अजाणतां प्राप्त होणाऱ्या स्वरूपस्थितीच्या निरतिशयानंदांचा रसास्वाद घेण्याकरितां कर्म करीत जा. ईश्वरार्पित कर्म, निष्कामकर्म म्हणजेच अत्युच्च योग किंवा भक्ति होय. कर्म करतांना डोळ्यांसमोर हेतु असलाच पाहिजे असें आहे कीं काय? निर्हेतुक आणि निरहंकार अशा क्रिया असूं शकतच नाहींत काय? कार्य करण्याच्या आनंदापेक्षां कार्यसिद्धीचा आनंद अधिक असतो, असें मूर्ख आणि अविचारी पुरुष समजतात. परंतु, कार्य करीत असतांना जो आनंद होत असतो, तो तें कार्य तडीस गेल्यावर होत नाहीं, हें त्या मूर्खांना माहीत नसतें. आनंद हा कर्माच्या रूपानें जगांत विहरत असतो. निष्काम कर्म करीत राहिल्यानें यशाला तुम्हांला कायमचें विशांत वाळगतां येईल. निष्काम कर्माच्या योगानें हें अफाट विश्व एक पवित्र देवालयच बनून जाईल व तुमचें सर्व आयुष्य हें या मंदिरांत गाइलेलें अखंड गीत होईल. परिणामाकडे किंवा फलाकडे लक्ष देण्याची जरूरच काय? पगार काय मिळेल म्हणून कधीं डोक्याला शीण देऊं नका. तुम्हांला मोठी अधिकाराची जागा मिळाली नाहीं, म्हणून बेफामपणानें उद्दाम होऊन आपल्या वाट्यास आलेलें झाडण्याचें काम करण्यास मागें सरूं नका!

* समत्वं योग उच्यते। गीता, अध्याय २.

जें जें काम पडेल तें तें उत्सुकतेनें करण्यास कांकूं करूं नका. शिष्टाचारानें मंजूर न केलेलें काम करण्याचें टाळण्यांत खरा स्वाभिमान किंवा पुरुषार्थ आहे असें थोडेंच आहे! **स्वस्वरूपाचा, हृदयस्थ परमात्म्याचा अभिमान धरणें, हाच खरा स्वाभिमान होय!** देहाभिमान हा स्वाभिमानाच्या अगदीं उलट असून अधोगतीचा तो अगदीं जवळचा मार्ग आहे, यांत शंका नाहीं. कोणत्याहि हलक्या कामाला हात पुढें करण्यास तुम्हीं तयार व्हाल, तेव्हां उच्च दर्जाचीं कामें आणि प्रतिष्ठित व्यवसाय आपापले हात लांब करून तुमचें मनःपूर्वक स्वागत करतील, हा सिद्धान्त आहे. उद्योगाच्या वेषांत नटलेल्या परमेश्वरापासून तोंड वांकडें करून बाजूला न सरतां, त्याची षोडशोपचारें पूजा कराल, तर शिष्टाचाराचे बाबतींत देव तुम्हांला हार जाणार नाहीं, तोहि तुमची यथायोग्य संभावना करील, हें लक्ष्यांत ठेवा. तुमची इच्छा नसतांहि दिव्य तेज तुमच्या ठिकाणीं झळकूं लागेल. लोकांच्या निंदा-स्तुतीवर विश्वास ठेवूं नका. त्यानें तुम्हीं फसून आडरानांत शिराल; अज्ञानांत अधिक गुरफटले जाल. तुमचा 'स्वर्ग' तुमच्या ठिकाणींच आहे. आनंदाचा कंद आपल्या जवळ असतां सुखाकरितां सुखदायक म्हटल्या जाणाऱ्या बाह्य-वस्तूंच्या नादीं लागणें, हा अत्यंत निंद्य आणि अपवित्र असा व्यभिचार नाहीं काय? बाह्य सुखोपभोगांना अशी सक्त ताकीद द्या कीं, ' हरामखोरांनो, माझ्या समोरून काळें करा. तुमच्या हातचें पाणी सुद्धां मला नको.' सर्व सुखाचें उगमस्थान तुम्हीं स्वतःच नाहीं काय?

**(चालः—आर्यागीति.)**



**ऋतु मत्सरवश घेती वांधुनियां पुण्य कां वृथा पदरीं।**
**वैभवदानाचें; जो हृदयिं वसंता ध्रुवा स्वकीय घरीं ॥ १ ॥**

मैना पिंजऱ्यांतून काढून झाडाच्या फांदीवर बसवा, म्हणजे आपोआप मंजूळ आवाज तिच्या मुखावाटें निघूं लागतील. तुमचें चित्त स्वस्थानीं असूं द्या, स्वरूपांत लीन होऊं द्या, म्हणजे प्रयत्न न करतां, आपोआप अन्तःस्फूर्तीनें अत्यंत मधुर अशी वाणी तुमच्या तोंडावाटे बाहेर पडेल. साक्षात्कार ही बाहेर कोठून संपादन करून अणावयाची चीज नाहीं; दिव्यदृष्टि येण्याला नवीन उलथापालथ करण्याचें प्रयोजन नाहीं. फक्त तुम्हीं आपण होऊन उत्पन्न

केलेला वासनारूपी कोश नाहींसा केलात कीं, तुम्हांला दिव्यदृष्टि प्राप्त होईल व स्वरूपानुभव होईल. अनात्मवस्तूचा त्याग म्हणजेच आत्मवस्तूची प्राप्ति. तुमचें भासमान होणारें बंधन हें सुद्धां तुमच्या स्वातंत्र्याचेंच फळ होय! तुम्हीं राजीखुषीनें बद्ध झालां आहांत; आपखुषीनें संकटांना आमंत्रण दिल्याशिवाय तीं आपण होऊन तुमच्याकडे आगंतुकी करूं शकणार नाहींत. तरवार माझा घात करते, अशी तुमची भावना झाल्याशिवाय कोणतीहि तरवार तुमचा घात करूं शकणार नाहीं. आपल्या शृंखलांना आभरणें मानून त्यांना कवटाळण्याचें कारण नाहीं. अभिमानमूलक सर्व वेडगळ कल्पना डोक्यांतून काढून टाका, हृदयांतील वक्रता साफ जाळून टाका, निरहंकार व्हा, म्हणजे जगांत अशी कोणती सत्ता आहे कीं, तुमचे जोडे उचलण्याचा श्रेष्ठ मान मिळाल्याबद्दल ती तुमचे आभार मानणार नाहीं? देहाला पूर्णपणें विसरून जा, जणूं काय देह होताच कीं नाहीं अशी मनाची वृत्ति करा आणि आपलें ईश्वरत्व स्थापित करा. लाट एकदां फुटली कीं, ती सागरांत मिळून जाऊन सागरच होते.* तुम्हीं अंश नसून पूर्ण आहां. तुम्हीं अनंत आणि अविभाज्य आहां. सर्व मी हा अनुभव करून घेऊन आपल्या स्वाभाविक ऐश्वर्यात झळकत रहा. कारण हे संपूर्णा! तुला कांहीं कर्तव्य नाहीं, कांहींएक कर्तव्य नाहीं. तुझ्या आज्ञा शिरसावंद्य करण्याकरितां सर्व विश्व एका पायावर उभें आहे. तुला प्रणिपात करण्याचें सौभाग्य प्राप्त झाल्याबद्दल सारें जग आपल्या ग्रहांना धन्यता देत आहे. हेंचसें काय, पण पंचमहाभूतें तुझी चरणधूलि वंदन करण्यास आल्याशिवाय राहणार नाहींत, पण त्याबद्दल कौतुक करण्याचें कारण काय?

ॐ! ॐ!! ॐ!!!



* सोहिरा म्हणे निरामया। झालीच ना हेचि काया॥
मिठी पडली चिन्मयासी। मिनली तन्मया॥ १॥

# स्फूर्तीचें हृद्गत

( ता. २१ फेब्रुवारी सन १९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान )

## बंधमुक्त होण्याचा मार्ग



मशास्त्राची चर्चा करण्याकरितां हिंदुस्तानांत एकदां एक सभा भरविण्यांत आली होती. सभेला ठिकठिकाणचे जाडे विद्वान् व पंडित हजर होते. निरनिराळे प्रश्न सभेपुढें मांडण्यांत येत होते, आणि तज्ज्ञांकडून त्यांचीं उत्तरें देण्यांत येत होतीं. सभेचें काम फार समाधानकारक रीतीनें चाललें होतें. सभा उठण्याच्या सुमारास श्रोत्यांपैकीं एकजण उभा राहून म्हणाला, 'सद्गृहस्थहो ! आपल्या गांवांत एक सत्पुरूष आले असून ते नदीकांठीं उत्तरले आहेत. फारच योग्य व अधिकारी आहेत.' त्याचें तें भाषण ऐकून हा आप्त सत्पुरूष कोण हें जाणण्याची लोकांना सहजच उत्कट इच्छा झाली; आणि ते त्याला त्या सत्पुरुषासंबंधानें कोण कोठले म्हणून प्रश्न करूं लागलें. त्या ठिकाणीं पिंजऱ्यांत बंद केलेला एक पोपट म्हणा, किंवा प्रपंचाच्या शृंखलांनीं बद्ध झालेला एक मनुष्य म्हणा—होता. सदरहू पोपट त्या सत्पुरुषासंबंधीं लोकांचें तें बोलणें ऐकतच होता. पिंजऱ्यांत कोंडलेला एक पोपट किंवा देहरूपी पंजरांत बद्ध झालेला एक जीव सत्पुरुषाच्या आगमनाची सुवार्ता सांगणाऱ्या त्या सद्गृहस्थाला म्हणाला, 'बाबारे, माझ्याकरितां त्या सत्पुरुषाकडे जा; या पिंजऱ्यांत मीं अडकून पडलों आहें, असें त्याला सांग आणि या बंधनांतून मुक्त होण्याचा एखादा उपाय सुचविण्याविषयीं त्याला विनंति कर' त्या गृहस्थाला पोपटाची कींव आली आणि त्याचा निरोप घेऊन तो लगेच त्या महात्म्याकडे गेला. तो पुण्यात्मा त्यावेळीं स्नानार्थ नदींत उतरला होता. पोपटाची हकीकत सांगून तो सद्गृहस्थ म्हणाला, 'साधो ! तो पिंजऱ्यांत

अडकलेला पोपट, किंवा प्रेमशृंखलांनीं निगडित झालेला जीव बंधमुक्त कसा होऊं शकेल? महाराज! कृपा करून त्याच्या मोक्षाचा उपाय सांगा.' प्रश्न विचारण्याचा अवकाश, लगेच, तो महात्मा नदींतून खालीं वाहात जातांना दिसला. तीरावरील कांहीं लोक हा प्रकार पहात होते, त्यांना मोठा विस्मय वाटला. त्यांनीं त्या निरोप पाठविणाऱ्या पोपटाची फार निर्भर्त्सना केली. त्या पोपटाची ती शोचनीय स्थिति ऐकून त्या महात्म्याचें अंतःकरण कळवळलें असावें आणि सहानुभूतीमुळें त्याला मूर्च्छा आली असावी, अशी तेथील लोकांची समजूत झाली. साधु झोतांत सांपडून बराच दूरपर्यंत वाहात गेला होता. दुसरे दिवसपर्यंत तो सावध झाला नाहीं, असें म्हणतात. दुसरे दिवशीं नेमल्या वेळीं सभा भरल्यानंतर 'माझा निरोप त्या सत्पुरुषाला निवेदन केलास काय?' असा पोपटानें त्या गृहस्थाला प्रश्न केला. 'होय, निरोप सांगितला परंतु तुझ्यासारख्या दुःखी, नीच व बद्ध झालेल्या जीवाचा निरोप घेऊन त्या माहात्म्याकडे गेल्याबद्दल मला फार पश्चाताप होतो,' असें गृहस्थ म्हणाला. 'आपणांस इतका खेद होण्याचें कारण काय?' म्हणून पोपटानें विचारलें त्यावर तो गृहस्थ बोलला, 'पोपटा, काय सांगूं! तुझा निरोप सांगितला मात्र! लगेच त्या महापुरुषाला मुर्च्छा आली!' तेथें बरेच लोक हजर होते. सर्वांना हा प्रकार ऐकून मोठा अचंबा वाटला. तें कोडें कोणालाच उकलेना. परंतु पुढें पोपटानें, त्या बद्ध जीवानेंच हें कोडें उकललें. तो पोपट मोठा पंडित होता अशांतला भाग नाहीं, परंतु सत्पुरुषाच्या मूर्च्छनेची हकीकत ऐकतांच त्यालाही मूर्च्छा आली. त्यानें अंग टाकलें आणि त्याला मेल्याची भावना झाली! पोपटाच्या कृतीचेंहि तेथें जमलेल्या मंडळीस फार आश्चर्य वाटलें. तो निरोप कांहीं तरी विलक्षण असला पाहिजे; कारण त्यानें त्या वेळेपर्यंत दोन बळी घेतले. तो निरोप त्या साधूला कळविण्यांत आला तेव्हां तो मूर्च्छित झाला आणि परत पोपटाला त्या साधूची हकीकत कळल्याबरोबर त्यानेंहि राम म्हटला; तेव्हां त्या निरोपांत कांहीं तरी गूढ असलें पाहिजे, असें त्याच्या मनानें घेतलें. पुढें काय गंमत झाली तुम्हांला माहीत आहे? पोपट मेला असें जेव्हां लोकांना वाटलें, तेव्हां आतां त्याला पिंजऱ्यांत कोंडून ठेवण्यांत अर्थ नाहीं असें समजून त्याला बाहेर फेंकून देण्यांकरितां पिंजऱ्याचें दार उघडण्यांत आलें. लगेच पोपट उडून गेला, आणि शेजारच्या फांदीवर बसून लोकांना वेदान्त सांगूं लागला. तो म्हणाला, "शास्त्री पंडितांनो! धर्ममार्तंडांनो! तुम्हीं दररोज

येथें जमून वेदान्ताचा काथ्याकूट करीत असतां; उपनिषदांचा कीस काढीत असतां; परंतु साक्षात्कार कसा करून घ्यावा, मोक्ष कसा संपादन करावा, दिव्य स्फूर्ति किंवा ईश्वरी प्रसाद कसा होतो, याचें रहस्य तुम्हांला अद्यापि कळलें नाहीं. तें रहस्य मला कळलें आहे. माझ्या प्रश्नाला त्या सिद्ध पुरुषानें जें मूक उत्तर दिलें त्यावरून हें मी शिकलों. माझा निरोप ऐकून त्या महात्म्याला जी मूर्च्छा आली ती वास्तविक मूर्च्छा नसून तें माझ्या प्रश्नाचें उत्तरच होतें. मूर्च्छेच्या रूपानें माझ्या मोक्षाचाच उपाय त्यानें मला सुचवला. लौकिक दृष्ट्या मरणें, देहभाव नाहींसा करणें, हा साक्षात्काराचा खरा राजमार्ग आहे. अहंभावाला फांसावर चढविणें, निरभिमानी आणि निरिच्छ होणें हाच ईश्वरी प्रसादाचा, ईश्वरी प्रेरणेचा किंवा अन्तःस्फूर्तीचा एकमेव उपाय आहे. देहाभिमान सोडून ज्या स्थितींत देहभानच रहातनाहीं, 'मीं'ची जेथें जाणीवच रहात नाहीं, अहं आणि मम, मी आणि माझें, या संकुचित वृत्ति ज्या ठिकाणीं सर्वस्वी मावळून जातात, त्या उच्च स्थितीप्रत जाऊन पोहोंचणें, हा ब्रह्मानुभवाचा, शाश्वत जीविताचा एकच एक उपाय आहे.

## भोग आणि योग

संस्कृत भाषेंत भोग आणि योग असे दोन अर्थपूर्ण शब्द आहेत. योग शब्द तुमच्या परिचयांतला आहे. योगाच्या उलट भोग आहे. भोग याचा अर्थ विषयसुख भोगणें हा असून योग याचा अर्थ विषयत्याग—वैराग्य असा आहे. या जगांतील लोक विषयसुखाविषयीं—भोगाविषयीं चर्चा करीत असतात. परंतु भोग म्हणजे तरी काय ? भोगाचें शास्त्रीय दृष्ट्या परिक्षण केलें, त्याचें पृथक्करण केलें, तर भोग म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून केवळ योग किंवा त्याग होय, असें आपणांस आढळून येईल. योगाशिवाय खरा भोग नाहीं, योगाशिवाय खरी स्फूर्ति नाहीं, किंवा योगाशिवाय खरी भक्ति—उपासना नाहीं. देहभाव आणि सौख्य हीं एकत्र राहूं शकत नाहींत. आनंदाचा प्रादुर्भाव झाला कीं, आनंदभोक्त्याचा अहंभाव नाहींसा झालाच पाहिजे. अन्तःकरणांत ईश्वरी प्रेरणा उदित झाली कीं, 'मी जाणतों, मी करतों' या मीपणाचा, अहंभावनेचा तेथें अस्त होतो, नव्हे झालाच पाहिजे. मोठमोठ्या अधिकारी पुरुषांचें या बाबतींत असेंच सांगणें आहे. जो स्वयंसिद्ध आहे, ज्याच्यावर आत्मकृपा झाली, त्याला कवित्वस्फूर्ती करितां सरस्वतीच्या मंदिराचे उंबरठे झिजविण्याची

जरूरी नाहीं. परंतु अन्तःकरणांत कवित्वस्फूर्ति झाली असतां स्वतःच्या काव्य-कुसुमाचा आमोद तुम्हांला मात्र घेतां येणार नाहीं. काव्यानंद अनुभविण्याकरितां मीपणा जागृत झाला पाहिजे; पण अहंपणा जागृत झाला कीं, काव्यस्फूर्ति मावळून जाईल. प्रासादिक कविता लिहीत असतां मी कविता लिहीत आहें, ही जाणीव राहणें शक्य नाहीं. लेखकाची लेख्य विषयाशीं तन्मयता होते, स्वयं लेख्यविषयच तो होतो, तेव्हांच खरी अन्तःस्फूर्ति त्याला होऊं शकते. कारागिरानें उत्तम कारागिरी करावयाची म्हटली तर प्रथम त्यानें आपल्या कलेला स्वतःला अर्पण केलें पाहिजे; काम करीत असतां तन्मय होऊन देहभान विसरलें पाहिजे. ज्या वेळीं अत्यंत विख्यात अशा कलाभिज्ञाची भूमिका तुम्हीं घेत असतां, एखादें नामांकित काम करण्यांत तुम्हीं गढून गेलेले असतां, त्यावेळीं तुम्हीं मोठे कलाभिज्ञ आहां, असें लोकांना वाटत असतें; परंतु तुम्हांला मात्र तसें वाटत नसतें. तुमच्या दृष्टीनें तुम्हीं कलाभिज्ञ नसतांच. कारण तुमचा मीपणा त्यावेळीं मावळलेला असतो. 'हें काम मी करीत आहें' हा विचार—अहंभाव नाहींसा होऊन अंगीकृत कार्याच्या ठिकाणीं तुमच्या चित्ताचा लय झालेला असतो. तुमच्या दृष्टीनें तुम्हीं कलाभिज्ञ किंवा चित्रकार असत नाहीं. वृत्ति परब्रह्माच्या ठिकाणीं लीन झाल्यामुळें तुमची भेदभावाची दृष्टिच रहात नाहीं. लेखक, लेख्य आणि लेखन हीं एकच होऊन जातात; स्वरूपाकार होतात व सर्व भेद नाहींसे होऊन जातात. त्रिपुटीचा नाश, अर्थात् वृत्ति स्वरूपाकार होणें हेंच स्फूर्तीचें रहस्य होय. एखादा मनुष्य आत्मज्ञानसंपन्न आहे, त्याला ईश्वरी प्रसाद झाला आहे, असें त्याच्यासंबंधानें लोक म्हणोत; परंतु त्याला मात्र असें वाटतां कामा नये आणि वाटत नसतेंही. त्याला तसें वाटत असेल तर त्याला ईश्वरी प्रेरणा झालीच नाहीं, असें म्हटलें पाहिजे. कारण, सर्व भावनाविरहित होणें म्हणजेच खरें ज्ञान. इंद्रधनुष्याच्या ठिकाणीं जनदृष्टीला अनेक सुंदर आणि नयनमनोहर रंग दिसतात, आणि त्या रंगांचें लोक मोठें कौतुक करतात. इंद्रधनुष्य पाहातांच सर्वांना फार आनंद होतो, परंतु दूर अंतरावरून ज्या ठिकाणीं तें मोहक आणि रमणीय इंद्रधनुष्य दिसतें त्याठिकाणीं जाऊन पाहिलें, त्या सृष्टचमत्काराचा शास्त्रीय दृष्टया विचार केला तर इंद्रधनुष्य म्हणून कांहीं पदार्थ आहे किंवा त्यांतील सात प्रकारच्या सात रंगांना अस्तित्व आहे असें नाहीं.

डोळ्यांच्या ठिकाणींच केवळ त्याला अस्तित्व आहे. परंतु ज्या भूमिकेवरून तें इंद्रधनुष्य आतां आपणांस दिसत आहे किंवा दिसल्याचा डोळ्यांना भास होत आहे, ती भूमिका बदलली, किंवा ज्या ठिकाणीं तें प्रतीत होत आहे त्या ठिकाणीं जाऊन पाहिलें तर तेथें तें मुळींच दिसत नाहीं. याच न्यायानें लोकदृष्ट्या एखादा मनुष्य मोठा ब्रह्मज्ञानी, मोठा तत्वज्ञ, नामांकित लेखक किंवा प्रतिभासंपन्न कवि असला, लोक त्याला ब्रह्मज्ञानी, पंडित किंवा कवि म्हणत असले, तथापि 'मी हें करतों, किंवा माझ्यावर ईश्वराचा वरदहस्त आहे' अशा प्रकारचा भ्रम किंवा अभिमान त्याच्या ठिकाणीं यत्किंचित्‌हि नसतो. कारण, ज्याच्या ठिकाणीं भ्रम आहे तो ज्ञानी कसला? कलाभिज्ञानें आपल्या कलेला आपणांस सर्वस्वी वाहून घेतलें पाहिजे, तन्मय आणि तदाकार झालें पाहिजे. डांस मारतांना गांधीलमाशी जसें आपलें सर्व सामर्थ्य नांगीच्या ठिकाणीं एकवटते, दंशरूपानें आपलें जीवितसर्वस्व खर्च करते, त्याप्रमाणें प्रत्येक कलाकुशलानें आपलें जीवित सर्वस्वीं आपल्या कलेला अर्पण केलें पाहिजे; तरच वाखाणण्यासारखी सर्वोत्कृष्ट कारागिरी त्याच्या हातून वठेल. डांस मारतांक्षणींच गांधीलमाशी मरण पावते, हें तुम्हांला माहीत असेलच. जो आपलें सर्व सामर्थ्य, आपले पंचप्राण स्वीकृत कार्यार्थ खर्च करतो, तोच खरा प्रासादिक. आत्मयज्ञ हें उत्कर्षाचें आणि सिद्धीचें संपूर्ण रहस्य होय. भोग आणि योग हे एकाच वेळीं साधणें शक्य नाहीं. प्रसाद पाहिजे असेल तर विषयसुखाला आंचवलें पाहिजे. एखाद्या वस्तूचा उपभोग घेण्याचा प्रयत्न करा, भोगाच्या मागें लागा, म्हणजे योग साधणार नाहीं, तुमच्यावर आत्मकृपा होणार नाहीं. तुम्हीं देवाच्या कृपेला पात्र झालां म्हणजे तुमच्या ज्ञानामृताचा इतर लोक आस्वाद घेतील, तुमच्या सहवासानें ते आनंदित होतील; परंतु मी दुसऱ्यांना आनंदी करीत आहें, ही भावना मात्र तुमच्या ठिकाणीं साफ नाहींशी झाली असलीच पाहिजे. प्रेरणेच्या स्थितींत प्रेरणेचें भान राहणें शक्य नाहीं. अर्थात् तुम्हीं आत्मप्रेरित झालां म्हणजे आनंदाचे भोक्ते न राहतां मूर्तिमंत आनंद, परमानंदच व्हाल.

पतंग दिव्यावर झडप घालतो; अर्थात् आत्मयज्ञ करून प्रकाशावरील अलौकिक प्रेम तो व्यक्त करतो. आपण क्षुद्र पिंगाणें नसून पतंग आहों हें सिद्ध करण्याकरितां, आपलें पतंगत्व स्थापित करण्याकरितां, पतंगानें भयंकर दिव्य केलें पाहिजे. याच न्यायानें ब्रह्मज्ञानानें, साक्षात्कारी पुरुषानें रागद्वे-

षातीत आणि समचित्त राहून आपलें ब्रह्मज्ञान जगताला पटवून दिलें पाहिजे. योगाच्या निकषावर त्याचें ईश्वरी प्रेम कसोटीस लागलेंच पाहिजे. ब्रह्मज्ञानी मनुष्य निर्भय आणि निरहंकार होत्साता निर्भयपणानें स्वैर संचार करीत असतो; लोकदृष्ट्या तो मेल्यासारखाच असतो.

## संपृक्तता आणि स्फूर्ति

निसर्गाच्या नियमांप्रमाणें वागल्याशिवाय, ते नियम आचरणांत आणल्याशिवाय कोणाच्याहि बुद्धीला, प्रत्यक्ष बृहस्पतीलाहि अन्तःस्फूर्ति होणें शक्य नाहीं. सृष्टींतीलच एक दृष्टान्त घेऊन हें विधान राम स्पष्ट करून दाखवणार आहे. पाण्यामुळेंच पृथ्वीवरील सर्व पदार्थ जिवंत राहूं शकतात, पाणी हेंच चराचराचें जीवन आहे. आप् आणि तेज, पाणी आणि प्रकाश, यांच्यांमुळेंच भूतलावरील सर्व पदार्थांची वाढ होते. शेतांतील धान्य पाण्यामुळेंच पिकून तयार होतें. जीवन हें भूतलावरील अमृतच होय. तुम्हां अमेरिकन लोकांना पाऊस आवडत नाहीं. परंतु हिंदुस्तानांत आणि पूर्वेकडील सर्व देशांत, पर्जन्य ही परमेश्वराची अपूर्व व अत्युच्च देणगी मानली जाते. आम्हां पौरस्त्यांना पाऊस फार आवडतो; पाऊस पडत असला कीं, आम्हांला मोठी मौज वातते. आकाश ढगांनीं आच्छादित झालेलें असलें, मेघ गर्जना करीत असले, विजा कडकडत असल्या, किंवा धोधो पाऊस पडत असला कीं, मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांना, कविवरांना, परमार्थजिज्ञासूंना अत्यंत आनंद होतो. अशा मंगल प्रसंगाची चातकाप्रमाणें ते वाट पहात असतात; असले प्रसंग ते कधींहि वांया जाऊं देत नाहींत. कारण, अशा प्रशान्त आणि रमणीय प्रसंगीं निसर्गाशीं लौकर तादात्म्य होतें; मनाची चटकन् एकाग्रता होते. राम स्वानुभवानें सांगतो कीं, बाहेर मुसळधार पाऊस पडत असला म्हणजे ज्याप्रमाणें रामाच्या लेखणींतून काव्यौघ सहज आणि अस्खलित वाहत असतो, तसा तो इतर प्रसंगीं वाहात नाहीं. पाऊस पडण्याचा रंग असतो, किंवा झिम् झिम् पाऊस पडत असतो, अशा वेळीं अगदीं स्वाभाविकपणें उच्च वृत्ति मनांत उदित होतात, डोकें काव्यमय होतें, आणि प्रत्येक गोष्ट स्फूर्तिदायक वाटते. पर्जन्याच्या द्वारें भू आणि स्वर्ग यांच्या होणाऱ्या संयोगाशिवाय या लोकोत्तर परमानंदाला दुसरें कांहीं बाह्य कारण दिसत नाहीं. अशाच मंगलप्रसंगीं प्रायः भरतवर्षांतील विवाहादि मंगल समारंभ होत असतात. द्यावापृथिवी

यांचा या वेळीं संबंध जडत असल्यामुळें आपल्या मुलामुलींचीं लग्नें याच ऋतूंत लागून द्यावाभूमीप्रमाणें प्रेमबंधनांनीं वधूवरें एकजीव व्हावीं, असें त्यांना वाटतें. आतां वातावरण आपल्या ठिकाणीं दिव्य प्रेरणा कशीं उत्पन्न करतें, तसेंच पाऊस, दहिंवर व मंदगतीनें झुळ झुळ वाहणारे वारे वातावरणांत कसे उत्पन्न होतात, याचा आपण विचार करूं या. भूप्रकृतिशास्त्र असें सांगतें कीं, वातावरणाच्या ठिकाणीं ही दिव्य स्फूर्ति आणि अद्भुत शक्ति संपृक्ततेनें उत्पन्न होते. आतां संपृक्तता म्हणजे काय हें समजावून सांगणें जरूर आहे. एका वाटींत थोडें दूध घ्या आणि त्यांत थोडी साखर घाला, साखर लगेच विरघळून जाईल; पुन्हां आणखी थोडी साखर दुधांत टाका. तीहि दुधांत विरघळून जाईल. परंतु अशा रीतीनें दुधांत एकसारखी अधिकाधिक साखर टाकीत गेलां कीं, अखेर अशी स्थिति होईल कीं, त्यानंतर साखर दुधांत मुळींच विरघळेनाशी होईल. एकदां ही स्थिति आली कीं, मग साखर थोडी टाका कीं जास्त टाका, ती विरघळावयाची म्हणून नाहीं. कारण, त्यावेळीं वाटींतील दुधांत किती साखर विरघळूं शकते, याची अन्तिम सीमा झालेली असते, विद्रावणाच्या अन्तिम बिन्दूला दूध पोहोंचलें असतें. या अन्तिम बिन्दूलाच संपृक्तता असें म्हणतात. पाण्यांत मीठ टाकलें कीं तें विरघळतें. परंतु या विरघळण्याला प्रमाण किंवा मर्यादा म्हणून असतेच. पाण्याच्या ( प्रमाणाच्या ) मानानें अमुक इतकें मीठ त्यांत विरघळूं शकेल, त्याहून अधिक विरघळूं शकणार नाहीं; त्यांत अधिक मीठ घातलें तर तें न विरघळतां तळाशीं जाऊन बसेल, हें आपणांस माहीत असतें. पाण्यांत तें मीठ विरघळेनासें झालें कीं, तें मिठानें संपृक्त झालें आहे असें आपण म्हणतों. पाण्यांत आपण माती टाकीत गेलों तरी तीच स्थिति होते. विशिष्ट प्रमाणापर्यंतच माती विरघळून जाते, परंतु त्या प्रमाणाच्या पुढें तुम्हीं कितीहि माती ओतलीत तरी ती कालवली न जातां जशीच्या तशी तळाशीं राहते. पाण्याच्या ह्या स्थितीलाच शास्त्रीय भाषेंत संपृक्तता असें म्हणतात. आपलें हें वातावरण प्राणवायु, नैत्रवायु, कर्बद्विप्राणिल, सेंद्रिय पदार्थ, जड परमाणु आणि सजलबाष्प यांचें बनलेलें आहे. पाण्याचे सूक्ष्म परमाणु हवेंत तरंगत असतात. परंतु अशी एक वेळ येते कीं, वातावरण सजलबाष्पानें भरून जातें; तें सजल बाष्पानें संपृक्त होतें. अशा स्थितींत हवेंत आणखी थोड्या सजलबाष्पाची समृद्धि झाली तर तें हवेंत ठरेनासें होतें, हें अधिक

झालेलें पाणी, हवेंत जिरेनासें झालेलें प्रमाणाबाहेरील जास्त पाणी पावसाच्या रूपानें खालीं येतें. सारांश काय कीं, वातावरण ज्या वेळीं बाष्पानें ओथंबून जातें किंवा शास्त्रीय परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे सजलबाष्पानें संपृक्त होतें, त्या वेळींच पृथ्वीवर पर्जन्यवृष्टि होते. वातावरणांत जलाची संपृक्तता झाली कीं, मग मेघ गर्जना करूं लागतात, विजा चमकूं लागतात, समुद्रांत वादळें होतात आणि भूतलावर जलधारा वर्षाव करूं लागतात. हे सृष्टचमत्कार संपृक्ततेनंतर होतात, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. संपृक्तता कशी घडून येते याचा पुन्हां केव्हां तरी विचार करूं. तूर्त एवढेंच लक्षांत ठेवा कीं, वातावरणाच्या ठिकाणीं स्फूर्ति होऊन अमृतवृष्टि होण्याकरितां तें आंतून पाण्यानें भरून गेलें पाहिजे; सजलबाष्पानें तें संपृक्त झालें पाहिजे. वातावरणाचें अंतःकरण जीवनरसानें तुडुंब भरून जाईल, नव्हे तें फुट्टन वाहूं लागेल, तेव्हांच त्यांतून पर्जन्यवृष्टि होऊं शकेल; नद्या आणि विहिरी पाण्यानें भरून जाऊन जिकडे तिकडे धनधान्यसमृद्धि होऊं शकेल. आपलें मन हें वातावरणासारखें आहे. तें ज्या वेळीं एखाद्या कल्पनेनें संपृक्त होतें, त्या वेळीं त्या विशिष्ट कल्पनेशिवाय दुसरा विचारच आपल्या डोक्यांत नसतो; मन सर्वस्वीं त्या कल्पनेच्या आधीन झालेलें असतें; नसानसांत आणि रोमारोमांत तीच कल्पना खिळून गेलेली असते; वृत्ति तन्मय झाल्यामुळें त्या कल्पनेशिवाय आपणांस दुसरें कांहीं सुचत किंवा दिसतच नाहीं. तुमच्या मनाची अशी विलक्षण स्थिति झाली असली, एखाद्या कल्पनेनें तुम्हीं वेडावून गेलां असलां, म्हणजे त्या स्थितीला एक प्रकारची विचित्र अस्वस्थता किंवा तळमळ असें म्हणतां. भूप्रकृतिशास्त्राच्या भाषेंत ज्याला आपण हवेंतील कुंदपणा किंवा निर्वातत्त्व असें म्हणतों, त्या स्थितीशीं आपल्या या मानसिक अस्वस्थतेच्या स्थितीचें विलक्षण साम्य असतें. आणि तुम्हांला माहीत असेलच कीं, हवा कुंद झाली, वारा पडला कीं आतां पाऊस पडणार, असें आपण समजतों. ज्या वेळीं हवा उबट झाली आहे असें आपण म्हणतों, त्या वेळीं वातावरण सजल-बाष्पानें भरून गेलेलें असतें; संपृक्ततेच्या अंशाप्रत पोहोंचलेलें असतें; त्यांत बाष्पाचें जरा आधिक्य झालें कीं लगेच पाऊस पडतो. मन एखाद्या विषयाच्या ठिकाणीं संलग्न होणें हें हुबेहुब वातावरण सजलबाष्पानें संपृक्त होण्यासारखें आहे. एखाद्या वस्तूचें तुम्हांला वेड लागतें तेव्हां कुंद झालेल्या हवेसारखी तुमची स्थिति होते; तुमचें मन अगदीं अस्वस्थ होऊन जातें, मनाच्या या अव-

स्थेला विलक्षण तळमळ असें म्हणतां येईल. या अवस्थेचा कळस झाला, तिच्या पलीकडे तुम्हीं गेलां कीं, शब्दसृष्टीचे ईश्वर बनतां; तुमच्या मुखांतून काव्यामृताचा वर्षाव होऊ लागतो; प्रासादिक आणि प्रतिभासंपन्न काव्यसुधा तुमच्या मुखकमलांतून स्रवूं लागते. कोणत्याहि विषयाशीं तुमचें पूर्ण तादात्म्य झालें कीं तुम्हांला आत्मदेवाकडून प्रेरणा होते, आणि अन्तःस्फूर्ति झाली कीं, मनोविचार भराभर मूर्तरूपानें लेखणींतून उतरूं लागतात. निरहंकार होणें देहभाव पूर्णपणें विसरून जाऊन विषयाशीं तन्मय व तद्रूप होणें ह्याचेंच नांव स्फूर्ति किंवा प्रसाद.

## स्फूर्ति कशी होते ?

कल्पना करा कीं, एका गृहस्थाच्या डोक्यांत एक विचार आला आहे; गणितशास्त्रांतील एक गहन सिद्धान्त सोडविण्याचें त्याच्या मनानें घेतलें आहे. लगेच कागद लेखणी घेऊन तो सिद्धान्त सोडविण्यास बसतो, बराच वेळ तो डोकें खाजवतो, पानेंच्या पानें नासतो, परंतु सिद्धान्त म्हणून सुटत नाहीं. सिद्धान्त कसा सुटतो, याचा रामाला अनुभव आहे; व आतां तो जें सांगत आहे, तें स्वानुभवावरून सांगत आहे. तत्त्वज्ञानाचे गहन प्रश्न किंवा गणितांतील कूट प्रश्न सोडविण्याचा ज्यांना अभ्यास असेल, तें रामाच्या बोलण्याला दुजोरा देतील, यांत शंका नाहीं. एखादा बिकट प्रश्न पुढें घेऊन बसलें म्हणजे प्रथम प्रथम कांहीं अक्कल चालत नाहीं. कारण, त्या वेळीं मनाची तन्मयता झालेली नसते. त्या प्रश्नानेंच, त्याच एका विचारानें डोकें भरून गेलेलें नसतें. दुसरे अनेक विचार आपल्या डोक्यांत असतात; आपलें अर्धे चित्त त्या प्रश्नाकडे असतें, तर अर्धे दुसरीकडेच भटकत असतें. दुसऱ्या विषयांनीं तें आपणांकडे खेंचलेलें असतें. चित्ताची एकाग्रता नसल्यामुळें प्रथम प्रश्न सुटत नाहीं. बराच वेळ माथाकूट करूनहि प्रश्न सुटला नाहीं म्हणजे मनुष्य त्रासतो, आणि त्याच्या चित्ताला खेंचणारे दुसरे विषय तो डोक्यांतून काढून टाकतो. डोक्यावरील इतर विषयांचें दडपण नाहींसें झाल्यामुळें त्याला थोडें बरें वाटतें; कूट प्रश्नच काय तो मग त्याच्या डोळ्यापुढें राहतो, त्याचाच जोर होऊन तो इतर विचारांना रजा देतो. इतकें झालें तरी सिद्धान्त एकदम सुटत नाहीं. सिद्धान्ताशिवाय इतर विचार डोक्यांतून काढून टाकले, त्यांना अर्धचंद्र दिला तथापि 'हा सिद्धान्त मी सोडविन आहें, व त्याबद्दल माझी जिकडे तिकडे वाहवा

होईल, ' हा अहंकार कायमच असतो; आणि त्यामुळें सिद्धान्त सुटत नाहीं. परंतु ही स्थिति प्राप्त झाल्यावरहि तुम्हीं डोकें खाजवीत राहिलां, त्या सिद्धान्ताचा पिच्छा पुरवलात कीं, मग कांहीं वेळानें मीतूंपणा पार मावळून जातो, अहंकार नाहींसा होतो, आणि त्या सिद्धान्ताशिवाय दुसरा विचारच डोक्यांत उरत नाहीं; मन तन्मय–सिद्धान्तमय होऊन जातें, आणि ही तन्मयता झाल्यावर मीतूंपणा, माझें तुझें हा विकल्पच उरत नाहीं, दिक्कालाचा विचारहि कोठल्या कोठें विरून जातो; तो सिद्धान्त तुमचें सर्व डोकें व्यापून टाकतो, तुमचें अन्तःकरण त्या सिद्धान्तानें भरून जातें, तुमचा आत्मा त्या सिद्धान्तानें ओथंबून जातो, तुमचे पंचप्राण त्या सिद्धान्तानें संपृक्त होतात, तुम्हीं त्या सिद्धान्ताशीं एकजीव होतां; ज्योतीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें किंवा आपल्या नांगींत आपलें जीवित एकवटून डांस मारणाऱ्या गांधीलमाशीप्रमाणें तुमचें देहभान पूर्णपणें नाहींसें होतें, भोगाची कल्पना पार मावळून जाते, देहाभिमान—अहंकार अस्तंगत होतो, आणि ही अवस्था कांहीं वेळ टिकली कीं, एकदम तुम्हांला आंतून स्फूर्ति होते, आणि लख्खन् डोक्यांत प्रकाश पडून कोडें उलगडतें. ' मला सुचलें, माझ्या डोक्यांत आलें ' अशा तऱ्हेचे उद्गार पुष्कळांच्या तोंडून तुम्हीं ऐकले असतील. सुचणें किंवा डोक्यांत येणें म्हणजेच स्फूर्ति होय; आणि तन्मयतेशिवाय स्फूर्ति नाहीं, हें आपण पाहिलेंच आहे. सारांश काय कीं, देहभान नाहींसें झाल्याशिवाय, अहंता गळाल्याशिवाय, हें जिवंतपणांतील मरण आल्याशिवाय भोग किंवा स्फूर्ति उत्पन्न होणें शक्य नाहीं

## अहंता गळाल्याशिवाय स्फूर्ति नाहीं

मोठमोठे कलाभिज्ञ शास्त्राध्यापक, तत्त्ववेत्ते आणि विचारवन्त यांना आपापल्या व्यवसायांत अन्तःस्फूर्ति होत असते हें खरें, परंतु अहंकाराला सुट्टी दिल्यानेंच त्यांना स्फूर्ति होत असते, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आपण भोक्ते म्हणून रहावें, कर्तृत्वाचा टेंभा मिरवावा अशी लोकांची इच्छा असते; परंतु कर्तृत्वाभिमान बाळगणें, उपभोक्ता होऊन राहणें हें निसर्गाच्या नियमांना धरून नाहीं, असें वेदान्त सिद्ध करून देतो. वास्तविक भोग कोणालाच घेतां येत नाहींत, आत्म्याला भोग असणेंच शक्य नाहीं. ज्याला भोग आहे असें आमणांला वाटतें, तें आपलें—आत्म्याचें प्रतिबिंब

असून तें खोटें आहे. तें तुमचें वास्तविक स्वरूप नव्हे; सर्व तत्त्ववेत्ते आणि मुनी यांना आपल्या शरीराचा, मनाचा, एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष जीविताचा अखिल विश्वासाठीं यज्ञ करावा लागतो. उन्नतीचा, ईश्वरी प्रेरणेचा हाच मार्ग आहे. उपभोक्ता होण्याची—भोग भोगण्याची तुमची इच्छा असेल तर मोक्षाचा मार्ग, सौख्याचा मार्ग, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष उपभोगाचा मार्ग हे सर्व बंद होतील, हें लक्षांत ठेवा. जगाचा उपभोग घेण्याची इच्छा व्यर्थ आहे, ती कधींहि शक्य होणार नाहीं हें विसरूं नका. आपलें शरीर व मन, तसेंच आपलें सर्वस्व ईश्वराला अर्पण करणें, कायावाचामनें-करून ब्रह्मस्वरूपीं लीन होणें, हा तुमच्या उन्नतीचा, तुमच्या मोक्षाचा आणि शाश्वत सुखाचा एकच एक उपाय आहे. 'प्रभुभोजना'च्या वेळचे खिस्ताचे उद्गार तुमच्या लक्षांत असतीलच. 'माझें मांस खाऊन टाका' व माझें रक्त प्राशन करा. जो एकसारखा आत्मयज्ञ करण्यांतच आपलें आयुष्य घालवितो तोच खरोखर सुखी व धन्य होय!

आतां सांगितलेल्या संपृक्ततेच्या अवस्थेप्रत आपण जेव्हां जाऊन पोहोंचतों, जेव्हां एखाद्या विशिष्ट कल्पनेनें आपलें डोकें भरून जातें, जेव्हां त्या कल्पनेंत आपण सर्वस्वी मुरून जातों, आपण तद्रूप होतों त्या वेळीं ही देहरूपी वीणा भगवान् आपल्या हातांत घेतो आणि मग याच वीणेंतून उदात्त, गंभीर आणि उन्नत असे सूर एकसारखे निघूं लागतात. व अशा त्या देहातीत स्थितीप्रत तुम्हीं जाऊन पोहोंचलां कीं, अप्रतीम आलाप, दिव्य स्वर तुमच्या मुखावाटे निघतील. परंतु, वीणा देवाधिदेवाला वाजवूं न देतां ती स्वतःच वाजवण्याची पोरबुद्धि जोंपर्यंत आपल्या ठिकाणीं प्रबळ असते, तोंपर्यंत वीणेच्या तारा सुरांत लागणार नाहींत व त्यांतून बेसूर, कर्णकटु ध्वनीच निघत जातील. जोंपर्यंत हा क्षुद्र अहंकार, हें खोटें मीपण, भोगबुद्धि जिवंत राहील, जोंपर्यंत देहासक्ति कायम राहील तोंपर्यंत आपल्या या देहरूपी बाजाच्या पेटींतून बेसूर आलाप निघत जातील; त्यांत सुरेलपणा कधींहि येणार नाहीं. ही देहरूपी पेटी ईश्वराच्या स्वाधीन करा, देहातीत व्हा, क्षुद्र अहंकार नाहींसा करा, आपल्या व्यक्तित्वाचा यज्ञ करा. अशा रीतीनें ममत्वाचा पूर्ण नाश झाला म्हणजे स्वयं परमात्मा ती वीणा वाजवूं लागेल आणि तारांवरून परमात्म्याचीं बोटें फिरतांच दिव्य आणि उदात्त ध्वनी त्यांतून निघूं लागतील. याच स्थितीला ईश्वरी प्रेरणा किंवा प्रसाद असें म्हणतात.

स्फूर्ति ही ईश्वरी देणगी होय. जेव्हां क्षुद्र जीव आपला देहपणा विसरतो, आपण स्वतः देहातीत होतो, स्वरूपांत स्थिर होतो, तेव्हांच त्याला दिव्य स्फूर्ति प्राप्त होते.

## ख्रिस्ताची शिकवण

ख्रिस्तानें लोकोद्धाराच्या कार्यास सुरवात करण्यापूर्वी त्याला ऐहिक सुखांची भुरळ पाडून 'अहंकर्ता, अहंभोक्ता' ही देहात्मबुद्धि, हा अहंकार त्याच्या ठिकाणीं उत्पन्न करण्याचा, त्याला मोह पाडण्याचा सैतानानें पुष्कळ प्रयत्न केला, असें ख्रिस्ताच्या चरित्रांत लिहिलें आहे. निरनिराळे सात लोक, नानातऱ्हेचीं स्वादिष्ट मिष्टान्नें, भूतलाचें साम्राज्य, एखादा चमत्कार करून दाखवून मोठा नांवलौकिक मिळविण्याची संधि, सारांश नानाविध विषयसुखें आणि भोगविलास यांचें आमिष त्याच्या पुढें ठेवण्यांत आलें; परंतु तो या मोहजालांत सांपडला नाहीं. ख्रिस्तानें सैतानाला काय उत्तर दिलें ? 'सैताना, तूं येथून एकदम काळें कर, तुझ्या हातच्या पाण्यालाहि मी स्पर्श करणार नाहीं,' असें ख्रिस्तानें सांगितलें. केवढें कडकडीत वैराग्य ! यूरोप आणि अमेरिका या देशांतील लोकानो ! ख्रिस्ताचा हा उपदेश ह्र्तटलावर खोदून ठेवा. शारीरिक सुखें वृद्धिंगत करण्याच्या तीव्र लालसेनें—जडवादानें बाहेर कितीहि धुमाकूळ माजवला असला, विषयसुखांना तुमचें शरीर कितीहि चटावलें असलें, तथापि अंतःकरणांत ख्रिस्ताची अपूर्व शिकवण दृढ धरून ठेवा. ख्रिस्तानें सर्व विषयोपभोगांवर आणि ऐहिक ऐश्वर्यावर लाथ मारून क्रूसच उचलून घेतला, वैराग्याचाच स्वीकार केला, हें विसरूं नका. क्रूस हेंच वैराग्याचें बाह्य लक्षण आहे आणि वैराग्य हीच दैवी प्रसादाची गुरुकिल्ली आहे. जोंपर्यंत मी कर्ता आणि मी भोक्ता हा अहंकार तुमच्या ठिकाणीं जागृत आहे, तोंपर्यंत तुम्हांला दिव्य स्फुर्ति होणें कधींहि शक्य नाहीं. 'मी कर्म करीत आहें आणि त्याचें फळ मला मिळालें पाहिजे,' हा मीपणा जेव्हां सर्वस्वी टाकून द्याल, अकर्तात्मबोध तुमच्या ठिकाणीं बाणून जाईल, तेव्हांच तुम्हांला आंतून स्फूर्ति होऊं शकेल.

## तीन असुरांची गोष्ट

आतां एक गोष्ट सांगून आजचें व्याख्यान समाप्त करणार आहे. हिंदूंच्या पुराणांत तीन असुरांची एक मनोरंजक व बोधप्रद गोष्ट सांगितली आहे. या

दैत्यांच्या अंगीं अद्भुत सामर्थ्य होतें. ते मोठे पराक्रमी असल्यामुळें त्यांच्यापुढें कोणाचाही टिकाव लागेना. त्यांच्यावर कितीहि लोकांनीं चढाई केली, तथापि ते त्यांचा तत्काल पराभव करीत. त्यांचें सामर्थ्यच तसें विलक्षण होतें. हजारों लोक चालून आले तरी ते तिथे त्या प्रचंड सैन्याचा मोड करीत. अशा रीतीनें वारंवार पराभव होऊं लागला, तेव्हां लोक चिंतातुर होऊन एका ऋषीकडे गेले, आणि त्या असुरांचा पाडाव कसा होईल, असा त्यांनीं प्रश्न केला. ऋषीनें हकीकत ऐकून घेऊन असुरांच्या अजिंक्यतेचें बीज कशांत आहे, ह्याचा तपास करण्यास आलेल्या लोकांना सांगितलें. बारकाईनें तपास केल्यावर मोठ्या कष्टानें आणि परिश्रमानें अकर्तात्मबोध हें त्या असुरांच्या अजिंक्यतेचें रहस्य आहे, असें त्यांना आढळून आलें. लढाईस उभें राहिल्यावर आपण लढाई मारीत आहों, हा अहंकार त्यांच्या ठिकाणीं मुळींच उद्भवत नसे; तसेंच लढाईत यश आलें तथापि त्याचें त्यांना कांहींच वाटत नसे, जयानें ते फुगून जात नसत. ‘ या शरीराच्या रूपानें प्रतीत होणारा मी लढत आहें, मी युद्ध करीत आहें, ’ हा मीपणाचा विचार, ही देहबुद्धि युद्धाच्या वेळीं त्यांच्या डोक्याला स्पर्शहि करीत नसे. जगांतील सर्व वीरपुरुष असेच असतात. एखाद्या उत्कृष्ट वक्त्याचें भाषण ऐकतांना, ज्याप्रमाणें श्रोत्यांचें सर्वांग कानच होतें, सर्व इंद्रियें कानाच्या ठिकाणीं एकवटतात, श्रोतेपणा सर्व अंगभर फांकून जातो, त्याप्रमाणें युद्धाच्या वेळीं वीर पुरुष युद्धमय होऊन जातात; अहं-कर्तृत्वाला त्यांच्या ठिकाणीं अवकाशच मिळत नाहीं; समरांगणावर असतांना त्यांचे सर्व व्यापार देहाकडून केवळ यंत्रवत् होत असतात. ते युद्धरूप बनत असल्यामुळें हस्तपादादि त्यांचें सर्वांग दिव्य तेजानें संपृक्त होई. या गोष्टींतील असुर युद्ध करतांना स्वयं युद्ध बनत. त्यामुळें ‘ अहं कर्ता ’ हा विचारच त्यांच्या डोक्यांत येत नसे; एखाद्या यंत्राप्रमाणें ईश्वरी प्रेरणेनुरूप त्यांच्या देहाकडून क्रिया होत असत. निरहंकार हेंच त्यांच्या उत्कर्षाचें बीज होतें, आणि म्हणूनच ते अजिंक्य झाले होते. असुरांच्या प्रचंड सामर्थ्याचें हृद्गत कळल्यावर त्या ऋषीनें असुरांना जिंकण्याचा एक उपाय लोकांना सांगितला. ऋषि म्हणाला, ‘प्रथम तुम्हीं असुरांवर चाल करून जा आणि ते तुमच्या अंगावर धांवून येऊन त्यांचे तुमचे दोन हात झाले कीं, लगेच पळ काढून माघार घ्या. अशा रीतीनें वरचेवर केलेंत कीं आपण जेते आहों, हा अहंकार त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होईल व त्यानेंच

ते नाश पावतील.' ऋषीच्या उपदेशाप्रमाणें ते लोक युद्ध करूं लागले. प्रत्येक वेळीं लढाईला तोंड लागतांच ऋषीच्या सांगण्याप्रमाणें पाठ दाखवून ते समरांगणावरून पळून जात. असुरांशीं टक्कर मारण्याचें त्यांनीं सोडून दिलें. याचा परिणाम असा झाला कीं, ते अजिंक्य योद्धे आपल्या खऱ्या स्थानापासून–तद्रूप स्थितीपासून च्युत झाले. 'देह म्हणजेच मी' अशी त्यांची भावना झाली, व 'आपण मोठे वीर आहों,' हा अभिमान त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाला. अर्थात् त्यांचें अजिंक्यपण नाहींसें झालें. एकसारखें यश येत गेल्यानें आपण मोठे पराक्रमी व जेते आहों, हा मीपणा त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाला. देहाभिमानाचा पगडा बसतांच ते राक्षस देहरूपी पिंजऱ्यांत, देहाच्या कारागृहांत येऊन पडले. 'मी कर्ता, मी बलवान्' या अहंभावाच्या अधीन झाल्यामुळें देहरूपी तुरुंगांत ते बन्दिवान् होऊन पडले.* कर्ता करविता हरि–म्हणजे परमात्मा करतो, त्या श्रीहरीच्या सत्तेनें सर्व कांहीं होतें, ही भावना नाहींशी होऊन 'मी करतों,' हा क्षुद्र देहाभिमान त्या असुरांच्या ठिकाणीं उत्पन्न झाला. एकदां देहाभिमान उत्पन्न झाल्यावर त्यांचा पराभव होण्याला उशीर कसला? लगेच लोकांनीं चढाई करून त्यांचा पुरा मोड केला, आणि त्यांच्या मुसक्या बांधल्या.

## गोष्टीचें तात्पर्य

आतां या गोष्टीचें तात्पर्य काय, व प्रस्तुत विषयाला ती कशी लागू पडते, याचा आपण विचार करूं या. देह हें ईश्वराच्या हातांतील एक खेळणें असून त्याच्याच इच्छेनुरूप देहाच्या सर्व क्रिया घडत असतात. या अकर्तेपणाच्या दृष्टीनें जेव्हां तुम्हीं कर्म करीत असतां, तुमचें व्यक्तित्व पार कोठल्या कोठें नाहींसें होऊन देहभावाच्या ठिकाणीं देहातीतता उत्पन्न होते, अकर्तात्मबोधावर आरूढ होऊन ईश्वरार्पणबुद्धीनें तुम्हीं कर्म करीत असतां, तेव्हां त्या तीन असुरांप्रमाणें अहंकर्ता, अहंभोक्ता या अहंकाराच्या अतीत असल्यामुळें तुम्हींहि अजिंक्यच होतां. परंतु कर्म करून अकर्ता या भावनेमुळें तुमच्या

---

* बन्धनं प्राणिनां राजन्नहंकारस्तु बन्धकः । अहं कर्ता मया चेदं कृतं कार्यं बलीयसा । करिष्यामि करोम्येवं स्वयं बध्नाति प्राणभृत् ॥ देवी भागवत, पंचम स्कन्ध, अ. १.

ठिकाणीं अजिंक्यत्व आलें कीं, लोक तुमची प्रशंसा करूं लागतात, तुमच्या प्रत्येक गोष्टीचें कौतुक होऊन चोहोंकडून तुमच्या स्तुतीचा वर्षाव होऊं लागतो आणि याचा कालेंकरून असा परिणाम होतो कीं, त्या असुरांप्रमाणें आपण जेते आहों, आपण मोठे पराक्रमी आहों, शत्रूंना आपण तेव्हांच पादाक्रान्त करून टाकलें, अशा प्रकारचा अहंकार तुमच्या ठिकाणीं उत्पन्न होतो. आणि अहंकार उत्पन्न झाला कीं, त्या असुरांप्रमाणें देहाच्या बंधनांत पडून तुमचा नाश होतो, तुमचें अजिंक्यत्व नाहींसें होतें. ख्रिस्त जेव्हां प्रथम पर्वतावरून खालीं मैदानावर आला, त्या वेळीं त्याच्या ठिकाणीं अद्भुत सामर्थ्य होतें. परंतु जेव्हां तो कांहीं दिवस मित्रमंडळींत राहिला, मित्रांशीं प्रेमसंवाद होऊं लागले, तेव्हां पूर्वींचें सामर्थ्य कमी होत असल्याचें त्याला वाटूं लागलें. 'मला कोणी स्पर्श केला? माझें सामर्थ्य नाहींसें होत आहे असें मला वाटतें,' अशा तऱ्हेचे उद्गार ख्रिस्ताला काढावे लागले, असें बायबलांत लिहिलें आहे. ख्रिस्ताच्या उद्गारांचें मर्म हेंच आहे कीं, जोंपर्यंत 'मी कर्ता,' 'मी भोक्ता' या कल्पनेच्या तुम्हीं अतीत असतां, तोंपर्यंत तुमच्या शरीराच्या द्वारें स्वयं परमात्माच व्यवहरत असतो; ईश्वरी स्फूर्तीनेंच तुमचीं सर्व कर्में होत असतात. परंतु, कर्म करीत असतांना लोकांच्या बऱ्या किंवा वाईट अभिप्रायाकडे तुम्हीं लक्ष देऊं लागलां, लोकांच्या टाळ्यांचा आणि माळांचा तुमच्या अंतःकरणावर परिणाम होऊं लागला कीं, तत्क्षणीं तुमच्या ठिकाणचें दिव्यत्व गेलेंच म्हणून समजा! कारण, अहंकार जागृत झाल्यामुळें स्वरूपच्युति होते. देहभानावर या, म्हणजे तुमचें सर्व सामर्थ्य एकदम नाहींसें होईल आणि तुम्हांला कोणीहि विचारणार नाहीं. देहातीत व्हा, अकर्तात्मबोध अंगीं बाणून घ्या, म्हणजे तुम्हीं अजिंक्यच आहां, स्वयं परमेश्वरच आहां.

## घड्याळाचा दृष्टांत

समजा कीं, येथें एक सुंदर घड्याळ असून तें अगदीं नीट चाललें आहे. चोवीस तास वेळ बरोबर दाखवतें. परंतु शेजारीं ठेवलेल्या एका लोहचुंबकाच्या सान्निध्यानें त्याच्या लोखंडी फिरकीवर चुंबनाचें कार्य घडून तें बंद पडलें, तें वेळ देत नाहींसें होऊन निरुपयोगी बनलें. अशा प्रसंगीं घड्याळ चालू होण्याला काय केलें पाहिजे? लोहचुंबकाच्या आकर्षणापासून तें दूर करा, कांहीं काळपर्यंत जमिनींत पुरून ठेवा, म्हणजे चुंबनानें त्याच्यावर घडलेले

संस्कार नाहींसे होऊन तें पूर्वींप्रमाणें बरोबर वेळ देऊं लागेल. मनावरील अशुद्ध संस्कार नाहींसे करा, म्हणजे आंत तुमचें स्वरूप दिव्यच आहे. प्रत्येक मूल हें स्वभावतः प्रासादिकच असतें. प्रत्येक मूल जन्मतः कविच असतें. तुम्हीं ईश्वरी नियमाप्रमाणें वागाल; ईश्वराशीं तादात्म्य करून निरहंकारवृत्तीनें रहाल, तर लहान मुलाप्रमाणें पुढेहि सदैव दिव्य कल्पनांनीं प्रेरितच रहाल. परमात्म्याशीं तादात्म्य करून घ्या, आत्मस्वरूपाशीं सदैव संलग्न रहा, म्हणजे निरंतर स्फुर्तिच आहे. कारण, स्वरूपाकार होणें हीच स्फुर्ति. तुम्हांला स्फूर्ति होत नाहीं याचें कारण हेंच कीं, चोहोंकडून भोगरूपी लोहचुंबक तुमच्या मनाला आपणांकडे खेंचीत असतात. अर्थात्, विषयासक्ति वाढून तुम्हीं स्वरूपाला विमुख होतां. तुम्हांला क्षणमात्रहि स्वरूपानुभव होत नाहीं, ईश्वरी प्रेरणा होत नाहीं, याचें मुख्य कारण हेंच कीं, स्वतःला एकान्तिक अगदीं अव्यग्र ठेवण्याचा तुम्हीं प्रयत्नच करीत नाहीं. विषयसुखांकडून तुम्हीं आकर्षिले जातां. त्यांना खुशाल आपल्यावर कुरघोडी करूं देतां. विषय नाचवतील तसे तुम्हीं नाचतां. आपलें स्वाभाविक सामर्थ्य तुम्हांला परत मिळविणें असेल, स्वरूपानुभव पाहिजे असेल, तर क्षणमात्र वृत्ती अन्तर्मुख करून स्वरूपांत त्यांचा लय करा, आत्मस्वरूपांत मुरून जा. वड्यालाप्रमाणें स्वतःला सत्यांत पुरून ठेवा. एकांताकरितां दिवसांतील थोडा वेळ राखून ठेवा आणि त्यावेळीं वृत्ती स्वरूपाकार करण्याचा, स्वरूपांत मुरून जाण्याचा अभ्यास करा; म्हणजे बाह्यवस्तूंनीं तुमच्या मनावर केलेले सर्व अनिष्ट संस्कार नाहींसे होतील, तुमचें चित्त निर्विकार आणि शुद्ध होऊन तुम्हांला फिरून स्वरूपानुभव होईल; तुमचें दिव्य सामर्थ्य प्रगट होईल.

कांहीं वर्षें सफरी केल्यावर जहाजें नादुरुस्त होतात व दुरुस्तीकरितां कांहीं काल तीं गोदींत आणावीं लागतात. जहाजांची जी स्थिति आहे, तीच हुबेहुब आपल्या मनाची आहे. उगमापासून तें फार दिवस दूर राहिलें, जगरूपी भ्रम वाढविणाऱ्या परिस्थितीच्या सहवासांत त्याचा फार काल गेला, प्रापंचिक विषयांतच तें फार दिवस गुरफटून राहिलें, म्हणजे तें नादुरुस्त होऊन जातेंच. त्यांतील पूर्वींचें दिव्य सामर्थ्य नाहींसें होतें. त्याला दुरुस्त करण्याकरितां त्याच्या उगमाप्रत नेलें पाहिजे. जहाजाप्रमाणें त्याला कांहीं दिवस आत्मचिंतनाच्या गोदींत ठेवलें पाहिजे. मनाला कांहींकाल तरी

प्रपंचाच्या उपाधींपासून दूर ठेवा, कांहीं कालपर्यंत त्याला स्वरूपाशीं संलग्न ठेवा, स्फूर्तिदायक ग्रंथ वाचा, मनावर दिव्य संस्कार होतील अशा सत्पुरुषांचा सहवास करा, एकांतांत बसून मनन आणि निदिध्यास करा, म्हणजे तुमचें गुप्त झालेलें सामर्थ्य पुन्हां प्रगट होईल; तुम्हांला स्वरूपानुभव घडेल. शरीर स्वच्छ राहण्याकरितां तें रोज धुवावें लागत नाहीं काय? शरीरशुद्ध्यर्थ रोज स्नानादिक क्रिया कराव्या लागत नाहींत काय? घर रोज झाडून पुसून साफसूफ करावें लागतें ना? त्याचप्रमाणें मनालाहि न्हाऊं धुऊं घालून, झाडून पुसून तें रोजच्यारोज स्वच्छ ठेवावयास नको का? चित्तशुद्धीचा प्रयत्न करावयास नको का? परंतु, जोंपर्यंत सुखोपभोगाकडे प्रवृत्ति आहे, विषयांच्या ठिकाणीं चित्त आसक्त आहे, अहंकार जागृत आहे, विषयपराङ्मुखता होऊन अकर्तात्मबोध उदित झाला नाहीं, तोंपर्यंत ईश्वरी प्रेरणेची तुम्हांला आशाच नको. निरहंकारत्व, देहातीतता हाच ईश्वरी प्रसादाचा मार्ग आहे.

ॐ ! ॐ !! ॐ !!!



# आध्यात्मिक ऐश्वर्याचा मार्ग



( सान्फ्रान्सिस्को येथील हर्मेटिक ब्रदरहुड नामक संस्थेपुढें तारीख १३ दिजंबर, सन १९०२ रोजीं दिलेलें व्याख्यान. )

**विविध स्त्रीपुरुषवेषानें नटणाऱ्या हे आत्मरूपा!**



## भरतवर्षाची सांपत्तिक अवनति

मुख्य विषयाला सुरुवात करण्यापूर्वीं भरतवर्षाच्या सांपत्तिक अवनतीसंबंधानें राम थोडें विवेचन करणार आहे. असा एक काल होता कीं, ज्या वेळीं सर्व युरोपखंडांत मिळून आज जितकी संपत्ति आहे, तीहून क्वचित् थोडी अधिकच संपत्ति एकट्या भरतखंडांत होती. तसेंच, जितके मौल्यवान् हिरे, जितकीं रत्नें व माणकें, जितकें मौल्यवान् जडजवाहीर, आज सर्व अमेरिकाखंडांत मिळून आहे, त्याहून अधिक जडजवाहीर एके काळीं एकट्या भरतभूमींत होतें. भरतवर्षाचाहि सांपत्तिक उत्कर्षाचा एकदां काल होता. परंतु, तेथील संपत्तीला भुलून एकामागून एक परकी राष्ट्रांनीं भरतवर्षावर स्वाऱ्या केल्या. भरतखंडांतील संपत्ति लुटूनच ग्रीस देश श्रीमंत झाला. अफगाणिस्तान व इराण हे देशहि भरतवर्षांतून लूट नेऊनच संपन्न झाले. आजहि भरतवर्षाच्या जिवावरच इंग्लंडदेश वैभवसंपन्न झाला आहे. एके काळीं भरतभूमि ही खरोखरच सुवर्णभूमि होती!

परंतु, गतवैभवाबद्दल आम्हांला यत्किंचितहि वाईट वाटत नाहीं. सांपत्तिक दृष्ट्या सध्यां आमचा ऱ्हास झाल्याबद्दल आम्हां भरतवर्षीयांना बिलकुल दुःख होत नाहीं. कारण, हें संचारचक्र ईश्वरी नियमानुसार, आमच्या नैसर्गिक प्रकृतीच्या अनुरोधानें चालत असतें; जगांतील सर्व घडामोडी या दिव्य नियमानुसारच होत असतात, हें आम्हीं जाणून आहों. तसेंच, आमचे सर्व व्यव-

हार ईश्वरी सत्तेनें होत असतात, तोच सर्व व्यवहारांचा प्रवर्तक व निवर्तक आहे, हें आम्हांस माहीत आहे; आणि म्हणूनच भौतिक अवनतीबद्दल आमच्या जिवाला हुरहूर व तळमळ लागत नाहीं. जड संपत्ति नाहींशी झाली म्हणून आम्हीं कधींहि खेद करीत नाहीं. भौतिक ऐश्वर्य—जड संपत्ती आर्यांनीं मागेंच कसोटीला लावून पाहिली, परंतु ती कसाला उतरली नाहीं, परमार्थदृष्ट्या ती हिणकस ठरली! व ठरेल! भरतवर्षाच्या दृष्टीनें अमेरिका अगदींच अल्पवयस्क आहे, कालचें पोर आहे. तराजूच्या एका पारड्यांत ऐहिक संपत्ति व दुसऱ्या पारड्यांत आध्यात्मिक ऐश्वर्य वाळून त्यांची तुलना हजारों वर्षांपूर्वींच आर्यांनीं करून ठेविली आहे. या तुलनेंत ऐहिक संपत्तिचें पारडेंच हलकें ठरलें. प्राचीन आर्यऋषींनीं हजारों हजार वर्षांपूर्वीं करून पाहिलेले प्रयोगच पाश्चात्य पंडित आज करीत आहेत. जड संपत्तीचें महत्त्व किती आहे हें प्रयोगानें पूर्वींच ठरलें असल्यामुळें तिला भरतवर्षांतील लोक दंवबिंदूहून अधिक किंमत देत नाहींत. संपत्ति कांहीं आमच्या सुखाचा घटक नव्हे. तिच्यामुळें कोणीहि खरोखर सुखी होईल, हें कालत्रयींहि संभवत नाहीं. लोखंड आणि सोनें यांचा, लोखंड आणि सोनें विकत घेण्यापुरताच उपयोग आहे, हें ध्यानांत ठेवा! चैनीच्या वस्तूंप्रमाणें पैसे देऊन बाजारांत विकत मिळणारी सुख ही वस्तु खास नाहीं. सुख, खरें सुख हें जड संपत्तीच्या मोबदल्यानें प्राप्त होणें शक्य नाहीं.

## वेदान्ताच्या ऱ्हासामुळें!

सुखाची गुरुकिल्ली निराळीच आहे. तुम्हीं सुखाच्या जितके मागें लागाल, तितकें तें तुमच्यापासून दूर पळून जाईल. सुखाविषयीं जितकी आसक्ति जास्त, तितकें तें मिळण्याचा संभव कमी. पदार्थांच्या ठिकाणची आसक्ति ज्या मानानें कमी होईल, ज्या मानानें तुम्हीं वासनांच्या अतीत व्हाल, अर्थात् निरिच्छ बनाल, त्या मानानें तुमच्या इच्छा परिपूर्ण होत जातील; तुमचें इच्छित पदार्थ तुमच्या मागें लागत येतील. आजकालच्या शहाण्यासुरत्या, व्यवहारज्ञ व चतुरस्त्र अशा आर्यांनांहि उत्कर्षाचें हें रहस्य समजत नाहीं. सूक्ष्म आणि व्यापक निरीक्षण करण्याची संवय व अक्कल नसल्यामुळें, व्यापक दृष्टि न आल्यामुळें एखाद्या गोष्टीचीं ते भलतींच कारणें सांगत असतात. हिंदूस्तानची राजकीय दृष्ट्या किंवा सांपत्तिक दृष्ट्या अधोगति कां? राजकीय व

सांपत्तिक बाबतींत हिंदुस्तान इतका मागासलेला कां ? असा रामाला नेहेमीं सवाल करण्यांत येतो. वेदान्ताचा–प्रवृत्तिपर वेदान्ताचा ऱ्हास हेंच या प्रश्नाला रामाचें ठराविक उत्तर आहे. विद्यमान हिंदुलोक हे हिंदुस्तानच्या अवनत कालांतील होत. वेदान्त व्यवहारांत कसा आणावयाचा हें ते विसरून गेले ; आणि हेंच त्यांच्या अधोगतीचें कारण आहे. वेदान्ताचें आगर, ब्रह्मविद्येचें माहेरघर, अद्वैताचें उगमस्थान, ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' या सिद्धान्ताची जनयित्री अशी जी आर्यभूमी, ज्या पुण्यभूमींत दिव्य ज्ञानगंगा उगम पावली, ज्या भूमींत ब्रह्मज्ञानाचा उदय झाला, ज्या भूमींत आत्मज्ञान, आत्मकृपा, स्वात्माभिमान इत्यादि कल्पना जन्म पावल्या, ती आर्यभूमि आज वेदान्ताला पारखी झाली आहे. सध्यांचे भारतवासी वेदान्त व्यवहारांत आणीत नाहींत, आणि हेंच हिंदुस्तानच्या ऱ्हासाचें खरें कारण आहे. हिंदुस्तानच्या अवनतीची ही उपपत्ति ऐकून तुम्हांला आश्चर्य वाटेल, परंतु वस्तुस्थिति अशीच आहे. या विषयाचें अधिक विवेचन करण्यास आज अवकाश नाहीं, पुढील एखाद्या व्याख्यानांत वेळ मिळाल्यास हा विषय राम विस्तृत रीतीनें सांगणार आहे. राष्ट्रांचे उदयास्त कसे होतात ? अशी कोणती अदृश्य शक्ति आहे कीं, जी एका राष्ट्राला उदयाचलाच्या शिखरावर चढवीत असते आणि दुसऱ्याला अस्ताचलावरून खालीं ढकलून देत असते ? कोणत्या चंद्राच्या योगानें राष्ट्ररूपी महासागरांत भरती आणि ओहोटी लागत असते ? अत्यंत विचारणीय आणि गहन असा हा प्रश्न आहे. कोणत्याहि राष्ट्राची प्रथम आध्यात्मिक अवनति झाल्याशिवाय तें कोणत्याहि बाजूनें अवनत होणें शक्य नाहीं. आध्यात्मिक अवनति झाली कीं, मग सर्व प्रकारच्या अवनतीस सुरुवात होते, हा सिद्धान्तच फक्त राम आज तुम्हांला सांगून ठेवीत आहे. हिंदुस्तानांतून आलेल्या, हिंदुस्तानच्या व इतर राष्ट्रांच्या इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन केलेल्या आर्यांच्या तोंडचें हें विधान तुम्हांला विशेषच पटेल असें वाटतें. हें विधान इतर हिंदूंना कदाचित् मान्य होणार नाहीं. राम स्वतःच्या जबाबदारीवर, राष्ट्रांच्या इतिहासाच्या अभ्यासाच्या जोरावर हें विधान करीत आहे. आतां, यावर तुम्हीं असा प्रश्न कराल कीं, तर मग अमेरिकेची सारखी जोरानें प्रगति चालली आहे, अमेरिका देश आश्चर्यकारक रीतीनें आपली उन्नति करून घेत आहे, हें कसें ? भौतिक सुधारणांच्या बाबतींत अमेरिकेंतील लोक अबुद्धिपूर्वक वेदान्त व्यवहारां

आणीत आहेत. म्हणून अमेरिकन लोक अजाणतां वेदान्त आचरणांत कसा आणतात आणि त्यामुळेंच त्यांची भौतिक सुधारणांच्या बाबतींत प्रगति कशी होत आहे, यासंबंधानें आज चर्चा करण्याचें कारण नाहीं. परंतु, स्थिति मात्र निःसंशय अशीच आहे. 'सत्यमेव जयते,' सत्याचीच शेवटीं सरशी होणार, खरें नाणेंच अखेर टिकणार, सत्याचाच जयजयकार होणार आणि त्यालाच यश मिळणार हा सिद्धान्त आहे. सत्याशिवाय कोणासहि यश मिळणें शक्य नाहीं.

वस्तुतः खरीं, पण दिसण्यांत आश्चर्यकारक विरोधी अशीं जीं विधानें आतां करण्यांत आलीं आहेत, त्याच्या संबंधानें आज विशेष विस्तार किंवा चर्चा न करितां, आजच्या व्याख्यानाच्या विषयाकडे आपण वळूं या. या विरोधाभासा-संबंधानें पुढें केव्हां तरी विस्तारपूर्वक विचार करण्यांत येईल.

## शाश्वत जीविताचा उपाय

'मागा म्हणजे मिळेल,' आणि 'ठोक म्हणजे उघडेल' असें बायबलांत* लिहिलें आहे. हिंदूंचें कर्मतत्त्व तरी हेंच सांगतें. आपल्या प्रत्येक इच्छेंत तिच्या परिपूर्तीचें बीज असतें, प्रत्येक वासना तिच्या पूर्णतेचें अभिवचन देत असते. मनुष्य हा स्वयं परमेश्वरच असल्यामुळें त्याची प्रत्येक इच्छा केव्हांना केव्हां परिपूर्ण झालीच पाहिजे, हा कर्मतत्त्वाचा सिद्धांत आहे. कर्मतत्वाचा नुसता उल्लेख करून राम प्रतिपाद्य विषयाकडे वळत आहे.

उपवनांतील विकासोन्मुख कलिका आपली विकासाची कामना परिपूर्ण झालेली पाहाते, अर्थात् योग्य काळीं कळी उमलून तिचें फूल होतें. तसेंच पशूंच्या वासनाहि योग्य काळीं परिपूर्ण झाल्याशिवाय रहात नाहींत. जगांतील कोणत्याहि शक्तीचा, कोणत्याहि प्रेरणेचा किंवा कोणत्याहि वस्तूचा विनाश होणें कधींहि शक्य नाहीं, जगांत कशाचाच विनाश होत नाहीं. भौतिक शास्त्रें प्रेरणासातत्य, शक्तीचें प्रकृतिनित्यत्व व पदार्थाचें अविनाशित्व सिद्ध करून देतात. भौतिक शक्तींचा, प्रेरणांचा किंवा वस्तूंचा जर विनाश होत नाहीं, तर मानसिक शक्तींचा, मानसिक प्रेरणांचा, आपल्या वासनांचा सर्वस्वी नाश होणें कसें संभवेल? आपली मनःशक्ति, आपल्या वासना लौकर किंवा उशीरा, केव्हांना केव्हां पण फलद्रूप झाल्याच पाहिजेत. थोडक्यांत

* नवा करार, ल्यूक, अध्याय ११ ओंवी ९.

कर्मतत्त्वाचें सार हें असें आहे. कर्मतत्त्वाप्रमाणें 'मागा म्हणजे मिळेल,' आणि 'ठोका म्हणजे उघडेल,' हाच उपदेश हिंदुलोक करीत असतात. परंतु, हें विधान खरें आहे काय? याचा प्रत्यक्ष व्यवहारांत आपणांस अनुभव येतो काय? अशी यावर शंका येते. पण राम सांगतो कीं, हें विधान अक्षरशः खरें आहे. आतां, इतकें मात्र खरें कीं, सामान्यतः कर्मतत्त्वाचा लोक जो अर्थ समजतात, त्या अर्थानें कर्मतत्त्व व्यवहाराला लावूं पहाल, किंवा 'मागा म्हणजे मिळेल,' आणि 'ठोका म्हणजे उघडेल,' या बायबलांतील विधानाचा सामान्य लोक जो अर्थ करतात, त्या दृष्टीनें तें व्यवहारांत अजमावून पाहूं म्हणाल, तर मात्र खात्रीनें फसाल. तुमची फसगत होईल, आणि हें तत्त्व व्यवहारांत लागूं पडत नाहीं, असेंच तुम्हांला आढळून येईल. कारण, 'ठोका म्हणजे उघडेल' या वाक्यांत सर्व सिद्धांत आला नसून त्याच्या फक्त एका अंगाचाच विचार आलेला आहे. तें संपूर्ण सत्य नसून त्याचा एक अंशमात्र आहे. 'मागा म्हणजे मिळेल,' आणि 'ठोका म्हणजे उघडेल,' असें बायबलांत लिहिलें गेलें आहे, हें खरें; पण त्या वाक्यांत गर्भित अर्थ काय आहे, हें सामान्य लोकांना समजत नाहीं, किंवा समजावून घेण्याच्या ते भानगडींत पडत नाहींत. 'मागा म्हणजे मिळेल,' एवढेंच वाक्य ते घेऊन बसतात, पण किंमतीचा प्रश्नच त्यांच्या डोक्यांत येत नाहीं. कोणत्याहि वस्तूच्या प्राप्तीकरितां किंमत देणें निःसंशय जरूरीचें आहे. योग्य मोबदला दिल्याशिवाय कोणतीहि वस्तु कधींहि प्राप्त होणें शक्य नाहीं, ही गोष्ट विसरूं नका. या किंमतीसंबंधानेंहि बायबलांत विचार केलेला आहे. 'जगावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें आधीं मेलें पाहिजे'* अशा अर्थाचें एक वाक्य बायबलांत आहे. या वाक्याचा अर्थ काय? अर्थ हाच कीं, जो केवळ इच्छाच करीत राहील, अमुक हवें, तमुक हवें, असें नुस्तें तोंडानें म्हणत राहील, परंतु, जें हवें त्याबद्दल योग्य किंमत देण्यास तयार होणार नाहीं, त्याला इच्छित वस्तू कधींहि प्राप्त होणार नाहींत. जगण्याची केवळ इच्छा करूनच कोणीहि जगणार नाहीं! ज्याला शाश्वत जीवित हवें असेल, त्यानें प्रथम देहदृष्ट्या मरण्यास तयार झालें पाहिजे. निरनिराळ्या इच्छा करणें म्हणजे देहदृष्ट्या जगण्याचाच प्रयत्न करणें होय. पण शाश्वत जीविताचा हा मार्ग नव्हे. शाश्वत जीवित हवें असेल तर देहदृष्ट्या मेलेंच पाहिजे, निरहंकार बनलें

* नवा करार, मार्क्यू १६।२५

पाहिजे. शाश्वत जीवीताकरितां निरभिमानतेची किंमत दिली पाहिजे, हें लक्षांत ठेवा. 'केवळ भाकरीनेंच मनुष्यें जगणार नाहींत'* म्हणजे नुस्तें पोटाला मिळवणें हेंच कांहीं मनुष्याचें ध्येय नाहीं, अशा आशयाचें बायबलांत एक वाक्य आहे. मित्रांनो ! विचार करण्यासारखी गोष्ट आहे. या वाक्याच्या अगदीं उलट असें एक वाक्य 'प्रभुप्रार्थने'त आहे. ती म्हणतांना 'हे प्रभो आजची भाकर आम्हांला दे, × असें तुम्हीं म्हणतां. या दोन विरोधी वचनांची एकवाक्यता करा. त्यांतील मर्म पूर्णपणें समजावून घ्या. 'हे प्रभो ! आजची भाकर आम्हांला दे' याचा अर्थ आपण देवाजवळ याचना करावी, याचकवृत्ति ठेवावी, असा मुळींच नाहीं. प्रभुप्रार्थनेंतील या वचनाचा असा अर्थच नाहीं. आजची भाकर कशी मिळेल, याची स्वप्नींहि काळजी नसणाऱ्या 'धनधान्य-समृद्धीनें संपन्न असणाऱ्या राजामहाराजांनीं सुद्धां करण्याची अशी ही प्रार्थना आहे, हें तुम्हांला नाकबूल करतां येणार नाहीं. अर्थात् सकल ऐश्वर्यानें युक्त अशा राजामहाराजांनीं गुडघे टेंकून आणि हात जोडून संपत्तीची किंवा ऐश्वर्याची देवाजवळ याचना करावी, हा या वचनाचा अर्थ नाहीं, हें अगदीं उघड आहे. वैराग्यप्रतिपादक असें हें वचन आहे. प्रत्येकानें, मग तो राजा असो कीं रंक असो, महात्मा असो कीं क्षुद्र जीव असो, भोंवतालच्या सर्व वस्तु सर्व संपत्ति आणि ऐश्वर्य, जगांतील सर्व सुंदर आणि मोहक पदार्थ, अखिल वस्तुजात आपलें नसून देवाचें आहे, अशी भावना ठेवावी, हा या प्रार्थनावाक्याचा अर्थ आहे. सारांश, हें वचन याचनेचा उपदेश करीत नसून, उलट त्यागाचाच उपदेश करतें. 'आजची भाकर आम्हांला दे' याचा अर्थ देवाजवळ याचना करणें हा नसून देवाला सर्वस्व अर्पण करणें, सर्व देवाचें आहे असें समजून ममत्वबुद्धीचा नाश करणें, हा या प्रार्थनेचा खरा अर्थ आहे. 'आजची भाकर आम्हांला दे' या वचनाचा जो लौकिक अर्थ आहे, त्या अर्थानें एखाद्या राजामहाराजानें हें वचन उच्चारणें किती असमंजसपणाचें व हास्यास्पद आहे बरें ! खजिन्यांतील सर्व संपत्ति व जडजवाहीर, तसेंच राजभवनांतील सर्व ऐश्वर्य, स्वयं राजभवन हीं आपलीं नसून देवाचीं आहेत, या भावनेनें, निर्ममत्वाच्या बुद्धीनें ब्रह्मार्पणबुद्धीनें एखादा राजामहाराजाहि हें वाक्य उच्चारील, तर मात्र तें

* नवा करार, माथ्यू अध्याय ४, ओवी ४.

× नवा करार, माथ्यू अध्याय ६, ओवी ११.

सयुक्तिक व योग्य असेंच होईल. कारण, त्या स्थितींत तो जगाशीं असलेला संबंध तोडून जणूं काय अगदीं अलग—अलिप्त होतो. तो मुनींचाहि मुनि बनतो; ममत्वाचा नाश झाल्यामुळें हें मेज, मेजावरील जिन्नस, सारांस प्रत्येक वस्तु आपली नसून देवाची आहे, माझें असें कांहींच नाहीं, तर जें जें कांहीं प्राप्त होतें तें सर्व भगवानच देतो, अशी त्याची भावना असते. रामानें आतां सांगितलेल्या अर्थानें ‘ आजची भाकर आम्हांला दे,’ हें वाक्य वाचा म्हणजे त्याची व ‘ केवळ भाकरीनेंच मनुष्यें जगणार नाहींत ’ या वाक्याची बरोबर संगति लागेल. नाहींपेक्षां त्यांची एकवाक्यता होणार नाहीं; तर तीं परस्पर विरोधीच दिसतील.

‘स्वर्गाचें राज्य मिळवा, म्हणजे सर्व इच्छित वस्तू आपोआप तुम्हांला प्राप्त होतील;’ अर्थात् आत्मज्ञान संपादन करा म्हणजे तुमच्या सर्व कामना परिपूर्ण होतील, असें बायबलांत म्हटलें आहे. या वाक्यांत प्रार्थनेचें रहस्य—खरी गुरुकिल्ली सांगितली आहे. प्रभुप्रार्थनेच्या वेळीं ‘प्रथम स्वर्गाचें राज्य मिळवा म्हणजे सर्व कांहीं मिळेल,’ हें वाक्य आशीर्वादादाखल येशूनें सांगितलें आहे.

## प्रसूतिवेदनांशिवाय अपत्यदर्शन नाहीं !

‘प्रसूतिवेदनांशिवाय अपत्यदर्शन नाहीं’* अशा आशयाचें दुसरें एक वाक्य तुमच्या बायबलांत आहे. हें वाक्य म्हणजे मधला दुवा होय. अपत्य होईल, परंतु, त्याकरितां प्रसूतिवेदनांच्या रूपानें अपत्याची किंमत दिली पाहिजे! याचा अर्थ असा कीं, तुमच्या सर्व इच्छा फलद्रूप होतील, तुम्हीं जें म्हणाल तें होईल, तुमच्या मनाप्रमाणें सर्व कांहीं घडून येईल; पण त्या-करितां दुःखाच्या रूपानें प्रथम किंमत दिली पाहिजे. ‘प्रसूतिवेदना सोसल्या-शिवाय अपत्यदर्शन होणार नाहीं,’ हें विधान स्त्रियांनाच उद्देशून लिहिलें नसून पुरुषांनाहि उद्देशून तें लिहिलें आहे. सर्वांनाच तें सारखें लागू आहे, तुमचे मनोरथ परिपूर्ण होतील; परंतु योग्य किंमत दिल्यानेंच. किंमत कोणती म्हणाल? तर दुःख. दुःख या शब्दाचें येथें स्पष्टीकरण करणें रामाला जरूरीचें वाटतें. वासनात्याग म्हणजेच दुःख. कोणाच्या वासना परिपूर्ण होतील? जो सर्वस्वीं वासनांना चिकटून बसतो, जो वासनामय बनतो,

* जुना करार, उत्पत्ति, अध्याय ३, ओवी १६.

त्याच्या ? छे! छे! तें तर कधींच शक्य नाहीं. जो राजाप्रमाणें निरिच्छतेच्या डौलानें वासना करतो, जो त्यांच्या पूर्णतेविषयीं अगदीं बेफिकीर व उदासीन असतो, त्याच्याच वासना फलद्रूप होतील. सारांश काय कीं, निरिच्छता ही इच्छांच्या फलद्रूपतेची पहिली अट आहे.

## प्रार्थनेचें स्वरूप व कार्य

देव आमच्या प्रार्थना ऐकतो, अर्थात् त्या फलद्रूप होतात, असें लोकांच्या तोंडून नेहेमी ऐकण्यांत येतें. आतां, प्रार्थना म्हणजे काय, याचा विचार होणें जरूर आहे. याचना करणें, विनवणें, मागणें, इच्छा करणें, हाच प्रार्थनेचा अर्थ असेल, ( आणि याच अर्थानें सामान्यतः लोक प्रार्थना हा शब्द वापरतात ) तर प्रार्थना फलद्रूप होतात, हें म्हणणें साफ चुकीचें आहे. प्रार्थना करा, म्हणजे प्रार्थित वस्तु तुम्हांला मुळींच मिळणार नाहीं; हात जोडून मागा, तरीहि मिळणार नाहीं, याचना करा म्हणजे तर ती मुळींच मिळणार नाहीं. प्रार्थनेचा अर्थ लोक समजतात त्याहून अत्यंत उदात्त आहे. **वासनातीत होणें, देवा! तुझ्याच इच्छेप्रमाणें सर्व कांहीं होवो, या वचनाशीं वृत्तीचें तादात्म्य करून घेणें, सर्व कांहीं देवाचें आहे, हें तत्त्व मनांत बाणून घेणें, हा प्रार्थनेचा खरा अर्थ आहे.** याचना करणें, हात जोडणें, पदर पसरणें, माझ्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं होऊं दे, अशी बुद्धि ठेवणें, हा कांहीं प्रार्थनेचा अर्थ नव्हे. स्वतःच्या, या क्षुद्र जीवाच्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं घडूं दे, असा प्रार्थनेचा लोक अर्थ करतात. परंतु, 'देवा! तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व काहीं होऊं दे,' या भावनेप्रत जाऊन पोहोंचणें, ही भावना उत्कट होणें, हेंच प्रार्थनेचें मर्म व सार आहे. नानाप्रकारच्या व्याधींनीं ज्या वेळीं शरीर ग्रस्त व जर्जर झालेलें असतें, नानाप्रकारच्या वेदना व क्लेश होत असतात, त्या वेळींहि तुमच्या अंतःकरणांतून, अगदीं जिव्हाळ्यापासून, 'देवाची मर्जी!' असेच उद्गार अगदीं सहजस्फूर्तीनें निघत असतात. ज्या वेळीं शरीर अस्वस्थ व रोगग्रस्त असतें, भोंवतालची परिस्थिति सर्वथा प्रातिकूल असते त्यावेळींहि, 'देवा, तुझ्याच इच्छेप्रमाणें होऊं दे, माझ्या नव्हे,' हीच भावना तुमच्या अंतःकरणांत उदित होत असते, व 'देवाची इच्छा!' असेच


नवा करार, माथ्यू, अध्याय ६, ओवी १०.

शब्द तुमच्या तोंडावाटे निघत असतात. यालाच ईश्वरावर हवाला टाकणें, आत्मार्पण, ईश्वरार्पण, क्षुद्र अहंकाराचा त्याग किंवा जीवबुद्धीचा नाश असें म्हणतात आणि हेंच जिव्हाळ्याच्या प्रार्थनेचें—भक्तीचें सार, तत्त्व किंवा मर्म होय. ज्या प्रार्थनांचा हेतु स्वार्थी असतो, ज्यांत 'देवा मला हें दे, तें दे,' अशी स्वार्थी याचकबुद्धि असते, त्या प्रार्थना देव कधींहि ऐकत नाहीं. असल्या सकाम भक्तीच्या वासना फलद्रूप होण्याच्या कामीं या जन्मीं यत्किंचित्‌हि उपयोग होऊं शकत नाहीं.

निसर्गाशीं पूर्ण तादात्म्य झाल्यामुळें ज्या वेळीं जगाचा जगपणाच आपल्याला राहात नाहीं; वृत्ती स्वरूपाकार झाल्यामुळें सर्वच वासुदेव असें वाटूं लागतें, अंतःकरण ईश्वरमय झाल्यामुळें ज्या वेळीं देहाचा देहपणा जातो आणि मनाचा मनपणा जातो, अर्थात् मन उन्मन होऊन विदेहावस्था प्राप्त होते, आप्तेष्टसंबंध व गणगोत यांचा कोठें मागमूसहि राहात नाहीं, क्षणभर का होईना, पण ज्या वेळीं देहातीत अवस्था प्राप्त होते, त्या वेळीं त्या स्थितींतून जागें झाल्यावर, देहभानावर आल्यावर लगेच एखादी इच्छा तुम्हांला झाली तर ती परिपूर्ण झालीच पाहिजे. ज्या वेळीं आपण पूर्णपणें देहातीत स्थितीप्रत जाऊन पोहोंचतों, क्षुद्र अहंकाराचा पूर्णपणें नाश होतो, जगाचें, वस्तुमात्राचें भान नाहींसें होतें, पूर्णपणें ईश्वरार्पणबुद्धि आणि वैराग्य अंगीं बाणतात, त्या वेळीं केलेल्या प्रार्थनाच फलद्रूप होत असतात. परंतु, अशा प्रार्थनांना भिक्षांदेहीच्या किंवा याचकवृत्तीच्या प्रार्थना म्हणतां येणार नाहीं—नव्हे म्हणतां कामा नये.

## निरिच्छतेनेंच इच्छातृप्ति !

तसेंच आपण असें पाहतों कीं, कांहीं लोक ठरीव पद्धतीनें प्रार्थना करीत नाहींत; म्हणजे ईश्वराजवळ ते याचना करीत नाहींत; ठरीव अक्षरें ते तोंडानें म्हणत नाहींत, तथापि त्यांच्या प्रार्थना देव ऐकतो. त्यांच्या इच्छेनुरूप गोष्टी घडून येतात. त्यांच्या प्रार्थना देव कां ऐकतो ? हे लोक तरी कोणत्या कोटींतले ? त्यांच्याच तेवढ्या प्रार्थनां देव कां ऐकतो ? आणि ऐकतो त्या कोणत्या अटींवर ? असा प्रश्न उत्पन्न होतो. आतां, कल्पना करा कीं, तुमची एक विशिष्ट इच्छा असून ती पूर्ण कशी होईल, यासंबंधानें तुम्हीं सारखा विचार करीत आहां. इच्छित वस्तूचें जणूं काय तुम्हांला वेडच लागलें आहे.

आपली इच्छा तृप्त झाली पाहिजे, अशा प्रकारची क्षुद्र वृत्ति जोंपर्यंत प्रबळ असेल, तोंपर्यंत तुमची कोणतीच इच्छा पूर्ण होणार नाहीं. थोरामोठ्यांच्या भेटीस जावयाचें असलें म्हणजे नीटनेटके कपडे घालूनच आपण जातों, हें तुम्हांस माहीत असेलच. परमेश्वर हा श्रेष्ठांतला श्रेष्ठ, थोरांतला थोर, सर्वस्वी निरिच्छ आणि निरपेक्ष असा आहे. षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंताच्या भेटीस जावयाचें असेल, तर त्या ठिकाणीं साजेल असा निरिच्छतेचा पोषाख चढवूनच गेलें पाहिजे. निस्पृहाच्या भेटीस निस्पृह होऊनच गेलें पाहिजे. दुकानदाराचा किंवा भिकाऱ्याचा वेष घेऊन जातां कामा नये. याचकवृत्ति टाकून देऊन, स्वतः निरिच्छ व निष्काम बनलें पाहिजे; तरच देवाची भेट होईल. भिकारी कोणालाच आवडत नसतो; त्याला जिकडे तिकडे मज्जावच होतो. जो तो त्याला टाळण्याचाच प्रयत्न करतो. भिकारी आणि उडाणटप्पू यांचें काम नाहीं ! त्यांच्याकरितां एकहि जागा खालीं नाहीं; म्हणून राम म्हणतो कीं, तुम्हांला देवदर्शनास जावयाचें असेल, तर दिव्य पोषाख चढवून जा. आतां दिव्य पोषाख म्हणजे काय असा तुम्हीं प्रश्न कराल. ज्याला भिकारडेपणाची, याचकवृत्तीची घाण येत नाहीं तोच दिव्य पोषाख होय. निष्कामतेची वृत्ति अंगीं बाणवून घ्याल, तरच देव तुमचें स्वागत करून मोठ्या आनंदानें तुमची भेट घेईल. वैराग्य अंगीं बाणल्याशिवाय देवाची भेट होणें अशक्य आहे.

## समान धर्मीयांचेंच सख्य होऊं शकतें

जो मनुष्य नेहेमीं कसली ना कसली इच्छा करीत असतो, आपल्याला हें हवें, तें हवें असा ज्याला हव्यास सुटलेला असतो, ज्याला नेहेमीं कोणत्या ना कोणत्या वस्तूची अपेक्षा असते, जो नेहेमीं असमाधानी व अतृप्त असतो, त्याला सुख होणें कधींहि शक्य नाहीं. जोंपर्यंत तुम्हीं इच्छा करीत असतां, वासनांच्या अधीन असतां, तोंपर्यंत तुमच्या जिवाला स्वस्थपणा व शांति कधींहि प्राप्त होणार नाहींत. वासना नाहींशी होईपर्यंत, ती पूर्ण होणार नाहीं; अर्थात् वासना सफळ झाल्यानें होणारें सुख किंवा तुमच्या दृष्टीनें सुखाचें केवळ आगर असलेला तुमच्या आवडीचा पदार्थ तुम्हांला मिळणार नाहीं. याचें कारण उघड आहे. तुम्हीं आणि तुमच्या आवडीचा पदार्थ यांत मोठें अंतर आहे, मोठा विरोध आहे. तुम्हीं भिकारी आणि गरजू आहां, आणि

तुमच्या प्रेमाचा विषय अत्यंत श्रेष्ठ, वैभवशाली व आनंदमय असा आहे. समान धर्मीयांचेंच सख्य होऊं शकतें. परंतु, तुम्हां दोघांत समान धर्म नसल्यामुळें इच्छित पदार्थाचा तुम्हांकडे ओढा असत नाहीं. याचा परिणाम असा होतो कीं, त्या पदार्थाच्या तुम्हीं अधिकाधिक मागें लागतां, त्या संबंधाची तुमची आसक्ति अधिक होते आणि जितकी आसक्ति अधिक होते, तितका तो तुमच्यापासून दूर दूर जातो; तुम्हांला टाळण्याचा प्रयत्न करतो. तो तुमच्या हातीं म्हणून लागत नाहीं. असें होतां होतां तुम्हीं कंटाळतां, आणि निराश होऊन त्याचा नाद सोडून देतां, आपल्याला तो नकोच असें तुमच्या मनांत येतें; अशी स्थिति झाली, त्याचें नांवहि घेण्याचें तुम्हीं सोडून दिलेंत, अर्थात् त्या पदार्थाहून श्रेष्ठस्थितीप्रत तुम्हीं जाऊन पोहोंचलां कीं, मग तो पदार्थ उलट तुमचा पाठलाग करूं लागतो; तोच तुमच्या घरीं चालून येतो. अगदीं तंतोतंत असेच होत नाहीं काय? प्रत्येकाला याचा अनुभव असेलच. स्वानुभवाच्या प्रकाशांत या मुद्याचा विचार करा. म्हणजे प्रत्येक इच्छेच्या बाबतींत असाच अनुभव येत असल्याचें तुम्हांला आढळून येईल. एखाद्या व्यक्तीवर जेव्हां तुमचें अत्यंत प्रेम जडतें, त्याचें सान्निध्य आणि सहवास घडावा असें मनापासून वाटत असतें, त्याच्या भेटीविषयीं तुम्हीं अत्यंत आतुर व उत्कंठित झालेले असतां, तेव्हां त्याची भेट कधींहि होणार नाहीं, हा सिद्धान्त आहे. जिवलगाच्या भेटीचा विचार सोडून देणें हाच भेटीचा खरा उपाय आहे. इच्छित वस्तूचा विचारच नाहींसा होईल, मीतूंपणा मावळून चित्त एकाकार होईल, तेव्हांच तुमच्या मनांतील वस्तु तुम्हांला प्राप्त होईल. हें सत्य आहे, निर्घृण सत्य आहे.

## गुरुत्वाकर्षणाचा नियम

असें कां होतें? समधर्मीय पदार्थांचें एकमेकांवर आकर्षण घडतें, हें याचें कारण आहे. सूर्य आणि पृथ्वी हे दोन्ही घन पदार्थ असून त्यांचें एकमेकांवर आकर्षण घडतें. परंतु, पृथ्वीच्या मानानें सूर्य हा अधिक मोठा असल्यामुळें त्याचें पृथ्वीवर आणि इतर ग्रहांवर आकर्षण चालतें. पृथ्वी सूर्याला आकर्षित करूं शकत नाहीं, परंतु सूर्य मात्र तिला स्वतःकडे आकर्षित करतो. विद्युद्यंत्रांतील धन आणि ऋण ध्रुव यांचा संबंध सूर्य आणि पृथ्वी ह्यांच्यासारखाच आहे. दोहोंतील फरक जातीचा नसून फक्त प्रमाणाचा अंशाचा आहे. ही गोष्ट

विद्युच्छास्त्र सिद्ध करून देतें. कल्पना करा कीं, ह्या ठिकाणीं एक लोहचुंबक असून त्याच्या शेजारींच एक लोखंडाचा तुकडा आहे. लोखंड आणि लोहचुंबक या दोहोंतून जें भारी असेल तें स्वतःहून हलक्याला आपल्याकडे ओढून घेईल, हा भौतिक शास्त्राचा महशूर नियम आहे. हा परस्पराकर्षणाचा नियम मनोरथांच्या परिपूर्तीलाहि लागू आहे. ज्या वेळीं इच्छित पदार्थाची इच्छा सोडून देऊन त्याच्या आपण अतीत होतों, अर्थात् अगदीं अवर्णनीय अशी मनाची वृत्ति होऊन जाते, आपण पूर्णपणें निरिच्छ बनतों, ज्या वेळीं इच्छित वस्तूहून उच्च दर्जाप्रत आपण जाऊन पोहोंचतों; त्या वेळीं आपण जणूं काय सूर्याच्या ठिकाणीं असून इच्छित पदार्थ पृथ्वीच्या ठिकाणीं असतो, अर्थात् आपल्या गुरुत्वानें त्या पदार्थांवर आपलें आकर्षण चालून तो पदार्थ आपोआप आपणाकडे खेंचला जातो.

दुसरी गोष्ट अशी कीं, इच्छित वस्तु प्राप्त झाली म्हणजे क्षणमात्र तुम्हीं खुलून फुगून जातां, थोडा वेळ तुम्हांला आनंद होतो; परंतु लगेच दुसऱ्या एखाद्या वस्तूची तुम्हांला इच्छा होते, आणि ती प्राप्त करून घेण्याविषयीं तुमची धडपड सुरूं होते; मिळून मनाला शांति नाहीं ती नाहींच. कारण, मनोरथांची मालिका संपावयाची नाहीं व ती संपादल्याशिवाय मनाची तळमळ सर्वस्वी जावयाची नाहीं. म्हणून राम म्हणतो, तुम्हीं आपल्या आशांना जिंका आणि वैराग्याच्या सिंहासनावर बसा. निरिच्छता अंगीं बाणवून घेतलीत, म्हणजे राजदर्शनाकरितां सर्व प्रजा जशी धडपडत असते, राजमंत्री आणि इतर दरबारी ज्याप्रमाणें राजाची भेट होण्याविषयीं अत्यंत उत्सुक झालेले असतात, न बोलावतां राजदर्शनार्थ ते राजमंदिरांत जातात, त्याप्रमाणें तुम्हीं इच्छेच्या अतीत झालां, म्हणजे सर्व प्रकारचे पदार्थ आपोआप तुमच्याकडे आकर्षिले जातील, न बोलावतां आपल्या पायांनीं ते तुम्हांकडे चालून येतील. आपल्या इच्छा किंवा इच्छित पदार्थ हे दरबारांतील खुषमस्करे किंवा भालदार चोपदार होत! तुम्हीं सिंहासनारूढ व्हा. निराशेच्या राजपदाची प्राप्ति करून घ्या, म्हणजे सर्व इच्छा तुमच्या दर्शनाकारितां आपोआप धडपडूं लागतील. परंतु अवर्णनीय आणि त्रिगुणातीत अशा स्थितीप्रत तुम्हीं जाऊन पोहोंचलां, विषयविरक्ति उत्पन्न होऊन इच्छित मोहक पदार्थ तुमच्याकडे चालून येऊं लागले, म्हणजे तुम्हीं आपलें राजेपण विसरून जातां, त्या पदार्थांचा स्वीकार करण्याकरितां सिंहा-

सनावरून खालीं उतरतां, वासनांचा पुन्हां उदय होऊन तुम्हीं आपला दर्जा कमी करून घेतां, व त्यामुळें ते पदार्थ तुम्हांला सोडून जातात आणि पुन्हां तुम्हीं दुःखी आणि कष्टी होतां. हीच गोष्ट निराळ्या पद्धतीनें राम आतां स्पष्ट करून सांगत आहे.

## वैराग्याशिवाय इष्टसिद्धि नाहीं

कल्पना करा कीं, आगगाडीच्या डब्याच्या दरवाज्यांत एक गृहस्थ उभा असून धक्क्यावरील मित्राला तो हांका मारीत आहे. परंतु आपला मित्र एकदांचा गाडींत कसा येऊन बसतो याच काळजींत तो असल्यामुळें, मित्राची वाट पहात तो तसाच दरवाजांत उभा राहतो. मित्राला आंत येण्याकरितां दरवाजा मोकळा ठेवला पाहिजे, आपण दरवाजा अडवून धरतां कामा नये; हें त्याच्या लक्षांत येत नाहीं. पण याचा परिणाम काय होतो ? मित्र गाडीजवळ येतो तों दरवाजा अडलेला त्याला आढळतो. आंत चढण्याचा तो प्रयत्न करणार इतक्यांत गाडी चालू होते; आणि तो सद्गृहस्थ मित्राच्या सहवासाला आंचवतो. मनोरथांच्या परिपूर्णतेचें असेंच आहे. समजा कीं, एखाद्या पदार्था-वर आपलें मन गेलें आहे. त्यासंबंधानें आपली इच्छा अत्यंत प्रबळ झाली आहे. प्रबळ इच्छेच्या रूपानें त्या वस्तूला जणूं काय आपण आपल्याकडे बोलावीत असतों. तुमच्या निमंत्रणाप्रमाणें ती वस्तु तुमच्याकडे चालून येते, परंतु, ती आपल्याला प्राप्त होईल किंवा नाहीं यासंबंधाच्या चिंतेंत, आतांच्या गोष्टींतील सद्गृहस्थाप्रमाणें, तुम्हीं दरवाजा अडवून उभे राहातां. तिला आंत येण्याला दरवाजा खुलाच ठेवीत नाहीं. मग ती आंत कशी येईल बरें! अर्थात् तिची प्राप्ति तुम्हांला होत नाहीं व तुम्हीं दुःखी होतां. केवळ इच्छा करून कोण-तीहि वस्तु प्राप्त होणार नाहीं. मित्राला ये ये म्हणून हांका मारल्यानें मित्राच्या सान्निध्याचें सुख तुम्हांला मिळणार नाहीं. तर मित्राच्या प्रेमसंलापाच्या इच्छे-बरोबर त्याला हांक मारण्याबरोबर, गाडीचा दरवाजा सोडून आपण आंत गेलें पाहिजे आणि त्याला आंत येण्यास जागा केली पाहिजे. तसें केलें, आपण बाजूला झालों, तरच मित्र आंत येऊं शकेल, व त्याच्याशीं आप-णांस गोष्टी सांगतां येतील.

मित्रप्राप्तीकरितां जसें बाजूला झालें पाहिजे तसें मनोरथपूर्तीकरितां विषयांच्या अतीत झालें पाहिजे, विषयपराङ्मुख झालें पाहिजे. कोणत्याहि

वस्तूविषयीं मनांत प्रबळ इच्छा झाली, तिच्या प्राप्तीसंबंधानें सारखी तळमळ लागली, भावना तीव्र झाली म्हणजे इच्छित वस्तु तुम्हांकडे आकर्षित होते; परंतु तिच्या अतीत झाल्याशिवाय, तिचा विचार डोक्यांतून काढून टाकल्याशिवाय ती तुम्हांला हस्तगत म्हणून होणार नाहीं. मित्र आंत यावा अशी इच्छा असल्यास ज्याप्रमाणें दरवाज्यावर उभें न राहतां पलीकडे सरलें पाहिजे, त्याप्रमाणें इच्छित वस्तू प्राप्त होण्याकरितां तिच्याकडे पाठ फिरवून, तिचा विचारच सोडून दिला पाहिजे. सारांश, मनोरथांची सिद्धि किंवा असिद्धि ही त्या मनोरथांच्या अतीत होण्यावर, हें डोक्यांतून काढून टाकण्यावर अवलंबून आहे.

सूर्यप्रकाश पडला कीं, त्यानें तापून जाऊन या खोलींतील हवा विरल होते, आणि ती वर जाते, मग रिकाम्या झालेल्या जागीं बाहेरची हवा घुसून येते. परंतु, खोलींतील हवा सूर्यकिरणांनीं तापून विरल होऊन वर न चढतां जागच्या जागींच राहील, तर बाहेरची हवा खोलींत कशी येऊं शकेल! याच न्यायानें आपल्या वासनांना जोंपर्यंत तुम्हीं चिकटून बसतां, अमुक मला हवें आहे, ही आसक्ति जोंपर्यंत प्रबळ असते, तोंपर्यंत वांच्छित पदार्थ तुमच्याकडे धांवून येत नाहींत. **वासनांचा त्याग करणें, हाच वासना परिपूर्ण होण्याचा मार्ग आहे.** प्रथम वासना खुशाल करा, त्या परिपूर्ण होण्याबद्दल पाहिजे तर याचनाहि करा, परंतु तेवढ्यानें भागणार नाहीं, तुमच्या वासना परिपूर्ण होणार नाहींत, हें लक्षांत ठेवा. मनोरथांचे मनोरथ परिपूर्ण होण्याला त्या मनोरथांच्या अतीत झालें पाहिजे, त्यांचा विचारच सोडून दिला पाहिजे; दुसरा उपायच नाहीं. वासनात्याग हाच वासनातृप्तीचा एकमेव उपाय आहे.

## त्याग हेंच ऐश्वर्याचें बीज

या भूतलावर असे कांहीं सामर्थ्यवान् माहात्मे असतात कीं, प्रत्यक्ष पंचमहाभूते व सूर्यचंद्रादि आकाशस्थ ज्योती त्याच्या आज्ञा शिरसावंद्य मानतात. त्यांच्या या लोकोत्तर ऐश्वर्याचें व सामर्थ्याचें बीज कशांत आहे बरें? त्यांतील रहस्य काय? त्यांच्या सामर्थ्याचें बीज हेंच आहे कीं, त्यांच्या इच्छा व्यक्तिविषयक किंवा स्वार्थपर नसतात. निर्मम आणि निरहंकार वृत्तींतील त्यांच्या त्या इच्छा किंवा आशा असतात. सकल ऐश्वर्यानें

युक्त असल्यामुळें ज्याला कशाचीहि गरज नाहीं, जवळच्या नोकरांना खूष करण्याकरितां जो केवळ कौतुकानें एखादा शब्द तोंडावाटें काढतो, किंवा एखादें काम कर म्हणून म्हणतो, अशा एखाद्या वैभवसंपन्न राजाधिराजाच्या इच्छेप्रमाणें, त्या महात्म्यांच्या इच्छा पूर्णपणें निःस्वार्थपर आणि सर्वस्वी परार्थपर असतात. त्यांच्या इच्छेप्रमाणें घडून आलें तरी वाहवा! बरें, घडून न आलें तरी वाहवा! कारण, त्यांना स्वतःला कांहींच नको असतें. ते सर्व वासनांच्या अतीत असतात. राजाला कशाचीच जरूर नसते; परंतु दरबारी लोक महाराज आपणांला कांहीं आज्ञा करतील का म्हणून आशेनें त्याच्या भोंवतीं भोंवतीं करीत असतात. अशा स्थितींत, त्याला स्वतःला कांहींहि नको असलें, तथापि, इष्टमित्रांच्या संतोषाकरितां, त्यांना खूष करण्याकरितां तो एखादें काम त्यांना सांगत असतो. ऐहिक ऐश्वर्याचे बाबतींत राजा हा आपल्या ठिकाणीं नित्य तृप्त व संतुष्ट असाच असतो. राजामहाराजांप्रमाणें जे माहात्मे आध्यात्मिक ऐश्वर्यामुळें नित्य तृप्त असतात, ज्यांना कशाचीहि जरूरी नसते, जे वास्तविक वासनांच्या अतीत असतात, अशांच्याच आज्ञा सूर्यचंद्रादि ग्रह आणि पृथिव्यापतेजादि पंचमहाभूतें आदरानें पाळीत असतात, वासनांविषयीं त्यांना अभिमान नसल्यामुळें त्यांच्या त्या वासना परिपूर्ण होतात. आपल्या वासना फलद्रूप व्हाव्या अशी तुमची इच्छा असेल, तर त्यांचा त्याग करण्यास शिका. वासनात्याग, निर्वासनता हीच वासनापूर्तीची गुरुकिल्ली आहे.

## सूर्याप्रमाणें साक्षीरूप रहा

जगांतील सर्व व्यवहार सूर्याच्याच सत्तेनें होत असतात. सूर्याच्या ठिकाणीं एवढें अद्‌भुत सामर्थ्य कोठून येतें? या सामर्थ्यातील बीज हेंच आहे कीं, सूर्य हा जगांतील सर्व घडामोडींपासून अगदीं अलिप्त असतो. एखाद्या राजा-प्रमाणें सहजसिंहासनीं विराजमान होऊन केवळ साक्षीरूपानें तो सर्व घडा-मोडी अवलोकन करतो. कल्पना करा कीं, एखादा राजा किंवा राजपुत्र येथें आला तर मला अमुक पाहिजे म्हणून स्वतःच्या तोंडानें सांगण्याची त्याला जरूरी नाहीं. कारण, प्रत्येकजण आपोआप उठून त्याला बसावयास आसन देईल, गूळ पाणी आणून त्याचें स्वागत करील, त्याच्या भोजनाची व्यवस्था करील, सारांश, अन्नवस्त्र, पैसाअडका, जें जें कांहीं

त्याला हवें असेल, तें तें जो तो आपखुषीनें आणून त्याला अर्पण करील. याचप्रमाणें बसल्याजागीं केवळ इच्छामात्रें करून सूर्य हा जगांतील सर्व व्यवहार चालवितो. जें जें म्हणून आपण पाहतों तें तें सूर्यामुळेंच पाहतों. सर्वाला कारण सूर्यच आहे. या जगांत सूर्य नसेल, तर प्रकाश पडणार नाहीं. आणि सर्व ठिकाणची हवा अगदीं गारठून जाऊन, तिच्यांत कांहींएक हालचाल होणार नाहीं; अर्थात् ध्वनिवाहकतेचें काम तिच्याकडून होणार नाहीं, व ध्वनि आपल्या कानांपर्यंत न पोहोंचल्याकारणानें ते आपणांस ऐकूं येणार नाहींत. शब्दज्ञान जसें प्रकाशामुळें होतें, तसें रसज्ञानहि सूर्यप्रकाशामुळेंच होतें. सूर्यकिरणांच्या उष्णतेमुळेंच वनस्पती वाढतात. सर्वप्रकारचे गंध सूर्यामुळेंच उत्पन्न होतात व सूर्यामुळेंच नाकाला त्यांचा आमोद घेतां येतो. पृथ्वीचें हल्लींचें लंबवर्तुलाकार स्वरूप सूर्यामुळेंच तिला प्राप्त झालें असें मानतात. सर्व कांहीं सूर्यामुळें होत असतें. परंतु, त्याबद्दल सूर्याच्याविरुद्ध कोणत्याहि न्यायसभेंत कोणी दावा लावल्याचें प्रसिद्ध नाहीं. चोर चोरी करतो तीहि सूर्यामुळेंच, परंतु, त्याबद्दल सूर्याला न्यायमंदिरांत खेंचून आणल्याचें किंवा सूर्यावर खटला झाल्याचें कोठें ऐकिवांत नाहीं.

सूर्य हा सर्व व्यवहारांपासून अलिप्त, निजपदावर आरूढ होऊन आत्मतेजांत विलसणारा, सर्व चराचराचा केवळ साक्षी आहे आणि म्हणूनच पृथ्वी ही सदैव त्याच्याभोंवतीं फिरत राहून एकेका अंगानें प्रणिपातपूर्वक त्याचें दर्शन घेत असते. पृथ्वीप्रमाणें इतर ग्रहहि सूर्याभोंवतीं भ्रमण करून एकेका अंगानें त्याला दंडप्रणाम करीत असतात. तसेंच, सूर्याचा उदय होतांच हिमनद्यांतून पाण्याचे प्रवाह वाहूं लागतात, झुळझुळ वारे वाहतात आणि वनस्पती वाढूं लागतात; सारांश काय कीं, सूर्याच्या केवळ साक्षित्वानें जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं घडून येत असतात. सूर्याच्या अद्भुत व दिव्य सामर्थ्याचें बीज हेंच कीं, तो या सर्व गोष्टींपासून अगदीं अलिप्त असतो. त्याच्या सत्तेनें ज्या गोष्टी होतात त्यांबरोबर तो स्वतः धांवत सुटत नाहीं. आपल्या ऐश्वर्यांत स्थिर राहून तो सर्व व्यवहार तटस्थप्रमाणें चालवीत असतो. तो सर्व करून पुन्हां अकर्ता असतो.

सर्व व्यवहारांत सूर्याप्रमाणें तटस्थपणाची वृत्ति ठेवा, जगांतील सर्व व्यवहार करून त्यापासून अलिप्त राहण्यास शिका, सूर्याप्रमाणें सर्व घडामोडींचे

साक्षी होऊन राहण्याचा प्रयत्न करा, कोणतेंहि कर्म करतांना, कोणतीहि
इच्छा करतांना तींत स्वार्थबुद्धि-मायेचा अंश ठेवूं नका, आत्मतेजांत विलसत
राहून ज्या ज्या ठिकाणीं जाल त्या त्या ठिकाणच्या सर्व वस्तू आत्मतेजानें
प्रकाशित व उज्जीवित करा, कोणत्याच वस्तूच्या ठिकाणीं ममत्वबुद्धि न ठेवतां
भगवद्भावाची दिव्यदृष्टि अंगीं बाणून घेऊन, 'अहं ब्रह्मास्मि, सर्वं खल्विदं
ब्रह्म' या परमात्मभावनेच्या स्वाभाविक ऐश्वर्यांत स्थिर रहा, आत्मकेंद्रांत स्थिर
रहाण्याचा प्रयत्न करा, क्षुद्र अहंकाराच्या स्वार्थीदृष्टीनें जगाकडे न पाहतां
ब्रह्मभावाच्या दिव्यदृष्टीनें जगाकडे पाहण्यास शिका, म्हणजे जिच्या आज्ञा
जगांतील सर्व सत्तांनीं शिरसावंद्य केल्याच पाहिजेत अशी सर्वश्रेष्ठ व लोको-
त्तर सत्ता आपणच आहों, सर्वशक्तिमान् आणि सर्वसत्ताधीश आपणच आहों,
असा तुम्हांला प्रत्यय येईल, असें वेदान्त प्रतिपादन करतो. गाडींतून
प्रवास करीत असतांना सूर्यप्रकाशानें अत्यंत रमणीय दिसणारे उंच
सखल भूप्रदेशाचे अनेक देखावे आपल्या दृष्टीस पडतात. त्या देखाव्यां-
तील प्रत्येक गोष्ट अगदीं स्पष्टपणें पण अगदीं सहज रीतीनें, डोळ्यांना
यत्किंचित्हि ताण किंवा शीण पडल्याशिवाय, आपणांस दिसत असते.
आपलें हें जग हाहि एक असाच मधुरविधुरमिश्रित देखावा आहे. सर्व
प्रकारचीं दुःखें व आपत्ती, सर्व प्रकारचीं सुखें व ऐश्वर्य, सर्व प्रकारची
संपत्ति व वैभव तसेंच सर्व प्रकारची विपत्ति व अवनति यांनीं, उच्चनीच
भावांनीं युक्त असा हा जगरूपी देखावा निम्नोन्नत भूप्रदेशाच्या देखाव्या-
प्रमाणें स्पष्टपणें पण सहज रीतीनें आपल्या नेत्रपटलांसमोरून जाऊं द्या.
सुखदुःखादि सर्व द्वंद्वांच्या अतीत आपलें वास्तविक स्वरूप आहे, हें ध्यानांत
बाळगून विषमस्थितीच्या देखाव्यानें मनाची समता बिघडूं देऊं नका.
सृष्टींतील एखाद्या देखाव्याप्रमाणें या जगरूपी दृश्याकडे प्रेक्षकाच्या नात्यानें
पाहण्यास शिका. जगांतील प्रवासांत रस्त्यांतून साक्षीरूपानें फिरत जा.
प्रत्येक गोष्ट बारकाईनें अवलोकन करा. परंतु, त्या गोष्टीनें डोळ्यांना
किंवा डोक्याला शीण पडूं देऊं नका. प्रेक्षकाच्या नात्यानें सर्व व्यवहार
करीत जा. हें अलिप्ततेचें धोरण तुम्हांला साधेल तर ज्या महात्म्याच्या
आज्ञा प्रत्यक्ष निसर्गाच्या शक्तींनीं-पंचमहाभूतांनीं पाळल्या पाहिजेत
असे महात्मेच तुम्हीं व्हाल. अलिप्ततेचें तत्त्व आंगीं बाणून घ्या म्हणजे
तुम्हीं महात्मेच आहां.

## प्रारब्ध आणि प्रयत्न यांची एकवाक्यता

वासनांच्या अतीत व्हा म्हणजे त्या परिपूर्ण झाल्याच पाहिजेत. यावर कोणी असा प्रश्न करतील कीं, मग कर्मतत्वाची वाट काय? हवी ती इच्छा करण्याला मनुष्य पूर्ण मुखत्यार आहे, मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे, असें एकदां म्हणतां, आणि फिरून पूर्वकर्मानुरूप–प्रारब्धानुरूप मनुष्य जगांत वर्तत असतो, असें सांगतां, एकदां प्रारब्धावर जोर देतां, तर एकदां प्रयत्नाचा पुरस्कार करतां, अशा स्थितींत प्रारब्ध आणि प्रयत्न यांची तुम्हीं सांगड कशी घालतां, त्यांची एकवाक्यता कशी करतां? राम आतां एक साधा दृष्टान्त देत आहे, त्यावरून हा मुद्दा स्पष्ट होईल. या बाबतींत सिद्धान्त हा आहे कीं, आपल्या इच्छा या स्वयंसिद्ध किंवा अकारणोद्भव नसून, त्या अगदीं स्वाभाविक–पूर्वजन्मार्जित असतात. प्रत्येक वासनेचे संस्कार बीजरूपानें–अव्यक्तरूपानें आपल्या अंतःकरणांत वसत असतात. बाह्य कारणानें ते उद्बोधित झाले कीं, त्यांना आपण इच्छा असें म्हणतों; आणि इच्छा प्रबळ झाल्या कीं, त्यांचें क्रियेंत रूपांतर होतें. अर्थात्, आपल्या इच्छा या सृष्टिक्रमांत सृष्टिक्रमानुसार होणाऱ्या गोष्टींच्या छायाच होत. सृष्टींत पुढें घडून येणाऱ्या गोष्टी इच्छांच्या रूपानें आपली छाया लोकांच्या मनांत आधींच पाडीत असतात, इच्छांच्या रूपानें त्यांची पूर्वसूचना देत असतात.

एका बाईची अशी गोष्ट सांगतात कीं, आपला प्रकाशलेख उतरण्याकरितां ती एका पहिल्या प्रतीच्या प्रकाशलेखकाकडे गेली. छबी बरोबर पडावी म्हणून त्यानें प्रकाशलेखनपेटिका नीट प्रमाणांत लावली, आणि पहिल्या प्रतीच्या प्रतिमाग्राहक काचपटाचा उपयोग केला. परंतु पटावरील ऋणप्रतिमा पाहतांच त्या बाईच्या चेहऱ्यावर देवींच्या अंघुक खुणा त्याच्या नजरेस आल्या. याचें त्याला मोठें आश्चर्य वाटलें. तो आपल्याशींच म्हणाला, 'बाईचा चेहरा तर लख्ख साफ दिसतो, आणि ऋणप्रतिमेंत तर देवी आल्याच्या खुणा स्पष्ट दिसतात, याचा अर्थ काय?' कदाचित् कांचपटांत दोष असेल असें समजून त्यानें दुसऱ्या पटांवर प्रकाशलेख घेऊन पाहिलें; परंतु देवींच्या खुणा नाहींत अशी ऋणप्रतिमा कांहीं केल्या निघेना. अखेर तो प्रकाशलेखक कंटाळला, आणि बाईला म्हणाला, 'आज हवा बरोबर नाहीं असें वाटतें. यासाठीं आपण पुन्हां केव्हां तरी या, म्हणजे आपला प्रकाशलेख बरोबर घेतां येईल.'

हें ऐकून बाई घरीं गेली. पण त्यानंतर थोड्याच तासांनीं तिला देवी आल्या. तिला एकदम देवी कशा आल्या? 'मला देवी आल्या असून हवा पालटण्याकरितां एकदोन दिवसांनीं तिकडे येण्याचा माझा बेत आहे,' अशा मजकुराचें बहिणीकडून पत्र आलें असल्याचें मागाहून तिच्या लक्षांत आलें. सदरहू पत्र तिच्या बहिणीनें आपल्या थुंकीनें ओलें करून आपल्या हातानें बंद केलें होतें. बाईनें जेव्हां तें पत्र उघडलें, तेव्हां त्या पत्राला लागलेल्या देवींच्या लसीच्या संसर्गानें देवींचें विष तिच्या अंगांत शिरलें आणि त्या विषाचें कार्य होतांच ती आजारी पडली. सध्यां डोळ्याला जरी तिच्या चेहऱ्यावर देवीचा मागमूसही दिसत नव्हता, तथापि, त्या प्रतिमाग्राहक काचपटामुळें देवींच्या खुणा प्रकाशलेखनयंत्रानें तेव्हांच उघडकीस आणल्या.

याच न्यायानें ज्यांचा त्वचेच्या बाहेर उगम झाला नाहीं, परंतु, संस्कारित काचपटावर ज्या दिसूं शकतात, अशा देवींच्या खुणांप्रमाणें आपल्या इच्छा होत. इच्छा ह्या त्यांच्या परिपूर्णतेची एक प्रकारें हमीच आहेत. ज्या गोष्टी पुढेंमागें खात्रीनें घडून येणार त्यांचीं इच्छा हीं पूर्व चिन्हेंच होत.

एका दृष्टीनें विचार करतां ज्या गोष्टी आपल्या नाशिवीं येतात, त्या आपल्या परिस्थितीनें आणि बाह्य कारणांनीं नियमित झालेल्या असतात. दुसऱ्या दृष्टीनें विचार करतां आपल्या सर्व इच्छा आपण पूर्ण मुखत्यारीनें करीत असतों. हवी ती इच्छा करण्यास आपण सर्वस्वीं स्वतंत्र असून ती इच्छा परिपूर्ण झालीच पाहिजे. दोन्ही दृष्टी आपापल्यापरी खऱ्या आहेत. वासनानुरूप कर्म आणि कर्मानुरूप वासना असें हें सुताडें-गोताडें आहे. या दृष्टीनें प्रारब्ध आणि प्रयत्न हीं एकच आहेत- कर्मरूपच आहेत. इच्छेंतच तिच्या फलद्रूपतेचें बीज असतें. प्रत्येक इच्छा परिपूर्ण झालीच पाहिजे. मग जगांत दुःख आणि विपत्ति कां? वासनापूर्तिकरितां दुःखाच्या रूपानें आपणांस किंमत द्यावी लागते, याचें कारण काय? किंमत देणें अवश्यच आहे, हा मुद्दा एक गोष्ट सांगून राम विशद करीत आहे.

एक मनुष्य आपल्या एका मित्राला पत्र लिहीत बसला होता. मित्राचा वियोग होऊन बरींच वर्षें लोटलीं होतीं, आणि त्याची केव्हां एकदां भेट होईल म्हणून कित्येक वर्षें त्याला उत्कंठा लागून राहिली होती. मित्राला तो सविस्तर हकीकतीचें पत्र लिहीत होता. [illegible] हें पत्र

लिहिण्यांत तो इतका गढून गेला होता कीं, एकदांसुद्धां त्यानें मान वर म्हणून केली नाहीं. पत्र पुरें होण्यास सुमारें पाऊण तास लागला. मान खालीं घालून तो सारखें लिहीतच होता. जेव्हां पत्र पुरें झालें आणि सही करून त्यानें लेखणी खालीं ठेवली, आणि आळस देत सहज मागें पाहिलें, तों त्याचा जिवलग मित्र त्याच्या दृष्टीस पडला. लगेच ताडकन् उठून तो उभा राहिला आणि मित्राला मिठी मारून म्हणाला, 'अरे, तूं केव्हां आलास?' मित्र म्हणाला, 'मला येऊन अर्धाअधिक तास झाला.' तो गृहस्थ म्हणाला, 'अरे, इतका वेळ झाला तर मला सांगावें कां नाहीं?' त्यावर तो मित्र बोलला, 'तें खरें! मला वाटलें तूं कामांत गर्क आहेस, तुला उगाच त्रास देऊं नये.'

आमच्या इच्छा या पत्राप्रमाणें होत. आपण नानातऱ्हेच्या इच्छा करतों, नानाप्रकारच्या वासनांना अगदीं चिकटून बसतों, हें पाहिजे, तें पाहिजे अशा प्रकारचा हव्यास करतों, सर्व प्रकारच्या कामनांच्या आणि आकांक्षांच्या आधीन होतों, म्हणजे आपल्या चिरवियुक्त जिवलग मित्रांना एकसारखीं सविस्तर मजकुराचीं पत्रें लिहीत असतों. परंतु, ज्याला उद्देशून, ज्या प्रिय-मित्राच्या भेटीकरतां, तुम्हीं पत्र लिहित असतां, तो तुमचा जिवलग मित्र-तुमच्या इच्छित वस्तू कर्मतत्वाच्या गूढ नियमाप्रमाणें तुमचें लक्ष जाण्यापूर्वींच तुमच्यासन्निध हजर असतात. मग त्या आपणांला दिसत कां नाहींत? कारण, त्यावेळीं आपण इच्छाच करीत असतों. पत्र लिहिण्याचें काम बंद झालें, अर्थात् इच्छा करण्याचें तुम्हीं सोडून दिलेंत, इच्छेच्या अतीत झालांत. म्हणजे तुमचे इच्छित पदार्थ बसल्याजागीं तुम्हांला प्राप्त होतील. कोणतीही वस्तू पाहिजे असल्यास तिची किंमत आधीं दिली पाहिजे.

मनोरथांच्या परिपूर्णतेचा हा विषय विशद करणाऱ्या हिंदूंच्या धर्मग्रंथांत अनेक गोष्टी आहेत. विजयानगरचे सुप्रसिद्ध दिवाण सायणमाधव जे पुढें विद्यारण्य स्वामी म्हणून प्रसिद्धीस आले, त्यांची गोष्ट हिंदुस्तानांत सर्वत्र महशूर आहे. घरीं अठरा विश्वे दारिद्र्य असल्यामुळें लक्ष्मीचा आपणांवर प्रसाद होऊन तिनें प्रत्यक्ष दर्शन द्यावें, एतदर्थ सर्वप्रकारचे मंत्रतंत्र त्यांनीं करून पाहिले; अनेक गायत्रीपुरश्चरणें केलीं; तथापी लक्ष्मी प्रसन्न झाली नाहीं ती नाहींच. अखेर गायत्रीमंत्रावरील त्यांचा विश्वास उडाला. मंत्रतंत्र सब झूट आहे अशी दृढ समजूत होऊन त्यांनीं जगाचा त्याग केला आणि संन्यासदीक्षा घेतली. संन्यास घेऊन अरण्यवास पत्करतांच श्रीलक्ष्मी

त्यांच्या समोर प्रगट झाली. तिला पहातांच स्वामी संतापानें व तिरस्कारानें म्हणाले, " बाई ! आलीस तशी एकदम निघून जा. तुझ्या प्रसादाशीं मला आतां कांहीं कर्तव्य नाहीं. संसाराचा त्याग करून संन्यस्त होऊन मी बसलों आहें. आतां संपत्ति, भोगविलास व ऐषआराम यांचें प्रयोजन काय ! ज्या वेळीं तुझ्या प्रसादाची मला अपेक्षा होती, त्या वेळीं तूं प्रसन्न झाली नाहींस, आतां संपत्तीची विरक्ति उत्पन्न झाल्यावर तूं प्रकट होत्येस याचा अर्थ काय ! " त्यावर देवीनें उत्तर केलें, " याला कारण तुम्हींच आहां. माझी आठवण केल्याबरोबर मी यावयास निघालेंच होत्यें, परंतु, माझ्या मार्गांत तुम्हीच आडवे आलां. इच्छेची स्थिति ही द्वैताची-द्विधा भावाची याचकाची स्थिति होय; आणि याचकाला कधींच कांहीं मिळावयाचें नाहीं हा सिद्धान्त आहे. इच्छांचा त्याग करून त्यांच्या अतीत झालां कीं, तुम्ही परमेश्वरच अहां, मग सर्व वैभव आणि ऐश्वर्य तुमचेंच आहे." आध्यात्मिक ऐश्वर्याचें रहस्य हेंच आहे.

ॐ ! ॐ !! ॐ !!!



# विजयशाली आध्यात्मिक शक्ति

( सान्फ्रान्सिस्को येथील गोल्डन गेट हॉल नामक संस्थेपुढें तारीख ९ माहे फेब्रुवारी सन १९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान. )

## आपलें वास्तविक स्वरूप



श्नः—दुसऱ्यांच्या दृष्टीनें स्वतःकडे पाहण्यास आपणांस कसें शिकतां येईल ?

उत्तरः—दुसऱ्यांच्या दृष्टीनें स्वतःकडे पाहण्याचा अभ्यास केलांत, तर त्यापासून तुम्हांला कांहींहि फायदा होणार नाहीं. कारण, दुसरे लोक नसतेच गुणदोष तुमच्या ठिकाणीं पाहात असतात. आपण वास्तविक जसे आहों, तसे दुसऱ्यांच्या डोळ्यांना दिसत नाहीं, आपलें यथार्थ स्वरूप त्यांना कळत नाहीं. तुम्हीं परमेश्वर आहां, या दृष्टीनें जर लोक तुमच्याकडे पाहतील, तुमच्यांतील दिव्यत्व ते ओळखूं शकतील, तुमचें परमात्म-स्वरूप त्यांच्या दृष्टीला प्रतीत होईल, तरच तुमचें वास्तविक स्वरूप त्यांनीं ओळखलें, त्यांस तुमचें यथार्थ ज्ञान झालें, असें म्हणतां येईल. आपण वास्तविक जसे नाहीं, तसे आहों, अर्थात् आपण देह किंवा बुद्धि आहों, हेंच तत्त्व आपले आईबाप, बहिणभाऊ व इष्टमित्र अगदीं कानटाळ्या बसेपर्यंत आपणांस ओरडून सांगत असतात. हेंच कानांत ठांसून भरीत असतात. आमची देहात्म-बुद्धि दृढ होऊन जगरूपी भ्रम बद्धमूल होईल, अशाच प्रकारचे विपरीत संस्कार आप्तेष्ट व कुटुंबीय आपणांवर एकसारखे करीत असतात. आपण वास्तविक कोणीच नसून किंवा एका दृष्टीनें आपण सर्वच असून, कोणी आपणांला मुलगा म्हणून तर कोणी भाऊ म्हणून, कोणी मित्र म्हणून तर कोणी शत्रु म्हणून, सर्व लोक आमचें सर्वव्यापकत्व मर्यादित करीत असतात. एकजण तुम्हांला

चांगलें म्हणतो, तर दुसरा वाईट म्हणतो. एक तुमच्या भलेपणाची तारीफ करून तुमचें स्तोम माजवतो, तर दुसरा तुमच्या पाजीपणाबद्दल तुम्हांला नांवें ठेवून, तुमची अवहेलना करतो; सारांश, अशा रीतीनें प्रत्येकजण तुमचें वास्तविक स्वरूप संकुचित व मर्यादित करीत असतो. कारण, पुत्र, बंधु, मित्र, शत्रु, स्तुति, निंदा हे शब्द सापेक्ष असल्यामुळें त्या शब्दांनीं लक्षित होणाऱ्या स्वरूपापलीकडे तुमचें स्वरूप नाहीं, असें ओघानेंच येतें. तुम्हांला मित्र म्हणून संबोधिलें कीं, तुम्हीं शत्रु नाहीं हें आपोआपच सिद्ध झालें; तुम्हांला भाऊ म्हटलें कीं, तुम्हीं बहिण नव्हे हें सांगावयास नकोच! सारांश काय कीं, तुम्हीं वास्तविक सर्वच असल्यामुळें लोकांचे तुमच्या संबंधींचे अभिप्राय एकांगी व तुमचें वास्तविक स्वरूप संकुचित करणारे असेच असतात. अशा अर्धवट अभिप्रायांची किंमत ती कसली! सर्व जगाला खिजगणतींत न धरतां सर्व काय तो मीच, सर्वत्र मीच व्यापून राहिलों आहें, या भावनेप्रत जो पोहोंचतो, जो आपलें दिव्यत्व—ईश्वरत्व प्रकट करितो, तोच खरोखर धन्य होय! ज्याला स्वरूपानुभव झाला, परमात्मतत्त्वाशीं जो तादात्म्य पावला, मी प्रत्यक्ष परमेश्वरच आहें म्हणून जो छाती ठोकून सर्व जगाला—त्रैलोक्याला सांगू शकतो, त्याला लोकांची—त्रैलोक्याची किंमत कसली! भूर्भुवस्वरादि सप्त लोकांना तो तुच्छ—कवडी किंमतीचे समजतो. तुम्हीं आपलें दिव्यत्व प्रकट करा, प्रत्यक्ष परमात्माच मी आहें, अशी अंतःकरणांत दृढ भावना ठेवा, म्हणजे सर्व जग-अखिल विश्व तुम्हांला परमेश्वर समजूं लागेल, नव्हे लागलेंच पाहिजे. तुमचा अधिकारच तसा आहे. फक्त तो ओळखा म्हणजे झालें.

## राजयोग

प्रश्नः—महाराज, राजयोग म्हणजे काय?

उत्तरः—राजयोग याचा शब्दार्थ चित्ताची एकाग्रता करण्याचा-चित्तवृत्ति-निरोधाचा धोपट मार्ग—राजमार्ग हा आहे.

## वेदान्तप्रसाराचा उपाय



प्रश्नः—वेदान्ततत्त्वज्ञानाचा प्रसार करण्याचा अत्यंत सुलभ व सर्वोत्तम उपाय कृपा करून आम्हांला सांगाल काय?

उत्तरः—वेदान्त आचरणांत आणणें, वेदान्ततत्त्वांप्रमाणें स्वतःचे सर्व व्यवहार करणें, हाच वेदान्तप्रसाराचा सर्वोत्कृष्ट मार्ग आहे. वेदान्त प्रसाराला याहून दुसरा राजमार्ग नाहीं.

लोक नेहमीं कोणत्याना कोणत्या जड वस्तूच्यामागें लागलेले असतात. इंद्रियगोचर आणि इंद्रियग्राह्य स्थूल वस्तूच्या प्राप्तीसाठीं ते सारखे धडपडत असतात, नामरूपात्मक भौतिक वस्तूंच्या संग्रहाचा त्यांना सारखा हव्यास सुटलेला असतो; परंतु, इतकी धडपड करून त्या प्राप्त होतात म्हणावें, तर तेंहि नाहीं. इच्छित वस्तूंच्या बाबतींत लोकांची सारखी फसवणूक व निराशाच होते. पण असा कटु अनुभव येत असूनहि त्यांची स्थूलावरील—जडावरील आसक्ति यत्किंचित् तरी कमी होते काय? भलतेंच! अनात्मवस्तूंच्या संग्रहाचा त्यांचा हव्यास सारखा वाढतच असतो. नगद छण्छण् हवेच असतात. त्यांचें नामरूपावरील प्रेम उडत नाहीं, तर उलट वृद्धिंगतच होत जातें. नामरूपाच्या अतीत होऊन स्वरूपांत स्थिर व्हावें, हा विचारच त्यांच्या डोक्याला कधीं शिवत नाहीं.

मित्रांनों, स्थूलावर—नामरूपावर छण्छण्वर विश्वास ठेवून फसूं नका. हें नामरूपात्मक जगत्, ही स्थूलसृष्टि केवळ मायिक आहे, आपल्या इंद्रियांनीं उत्पन्न केलेला तो भ्रामक पसारा आहे, निवळ भ्रम आहे, हें लक्षांत ठेवा. जो या नामरूपात्मक पसाऱ्यावर विश्वासला तो साफ फसला, ठार बुडाला म्हणून समजा. त्याला (आत्यन्तिक) श्रेय प्राप्त होणें कधींहि शक्य नाहीं, हें निश्चित आहे. बाह्य आकारांवर विश्वास ठेवल्यानें तुमची उन्नति कधींहि होणार नाहीं, हें विसरूं नका. नामरूपावर मोहित होणें, त्यांना पारमार्थिक सत्यता आहे असें मानणें, हीं कांहीं यशाची—उन्नतीची गुरुकिल्ली नाहीं. सर्व चराचराला आधारभूत असें जें अत्यंत सूक्ष्म अणोरणीयान् सत्तत्त्व—सत्य त्यावरच विश्वास ठेवणें, त्याचाच आश्रय करणें, हेंच उत्कर्षाचें मर्म आहे. हें सत्तत्त्व आपलेंसें करून परमात्मभावनेंत मुरून जा, या दिव्य सत्याचा अनुभव करून तें आचरणांत आणा, म्हणजे नामरूपात्मक अखिल वस्तुजात, सर्व प्रकारचें भौतिक ऐश्वर्य आणि संपत्ति हीं तुमचा शोध काढीत तुमच्या घरीं चालून येतील.



राम आतां एक गोष्ट सांगत आहे, तीवरून हा मुद्दा स्पष्टपणें तुमच्या

लक्षांत येईल. एकदां एका मोठ्या नदीच्या प्रवाहांत सांपडून दोन इसम वाहात जात होते. त्यांपैकीं एकानें मोठ्या थोरल्या ओंडक्याचा आश्रय केला आणि दुसरा तीरावरून फेंकलेल्या वारीकशा दोरीला धरून राहिला. ओंडक्याला धरून राहिलेला इसम वाहतां वाहतां भोंवऱ्यांत सांपडून अखेर मरण पावला, आणि बारीकशा दोरीचा आश्रय करणारा सुखरूपपणें पैलतीरास जाऊन पोहोंचला. याच न्यायानें सूक्ष्म सत्तत्वाचा आश्रय न करतां जे स्थूलाचा-अनात्म वस्तूंचाच आश्रय करतात, थोरामोठ्यांच्या आश्रयावर अवलंबून राहतात, मोठमोठ्या नांवांच्या आणि दौलतीच्या मागें लागतात, ते अखेर फसल्याशिवाय–पस्तावल्याशिवाय राहात नाहींत. सत्याचा–सत्तत्वरूप सूक्ष्म तंतूचा आश्रय करा, त्यावर निष्ठा ठेवा, म्हणजे हा भवसागर तुम्हीं लीलेनें तरून जाल. मित्रांनों, आपलें दिव्यत्व ओळखा, स्वरूपानुभव करून घ्या; मग तुम्हीं निबिड अरण्यांत जाऊन राहिलां, किंवा एखाद्या गजबजलेल्या शहराच्या मध्यवस्तींत जाऊन राहिलां तरी तीं दोन्हीं सारखींच आहेत. सत्याचें यथार्थ ज्ञान झालें कीं, सर्व जग पालटून जाईल. ब्रह्मज्ञान झाल्यावर सर्व विश्वच दिव्य बनून जाईल; तुमच्या दृष्टीला तें हरिरूपच दिसेल.

हें येथें मेज आहे. हें वर उचलावयाचें झालें तर त्याचा एकच खूर उचलला, त्याच्या एकाच बाजूला सर्व जोर लावला, तरी सबंध मेज आपणांस उचलतां येईल. आपलें हें जग या मेजाप्रमाणेंच एक घन वस्तू आहे, आणि आपलें शरीर हें मेजाच्या एका कांपऱ्याप्रमाणें किंवा मेजांतील एका बिन्दू-प्रमाणें किंवा परमाणुप्रमाणें आहे. हा एकच बिन्दु आपण घट्ट पकडूं, त्याला वर उचलूं, त्याला उन्नत करूं, त्यालाच देव समजूं, त्याच्या ठिकाणीं परमात्मत्व कल्पूं, या एकाच परमाणूला परमात्मतत्वांत विरघळून टाकूं, 'सर्वं खल्विदं ब्रह्म,' या भगवद्भावाच्या प्रेरणेनें हा एकच बिन्दु, एकच परमाणु आपण वर उचलूं, तर त्या एका परमाणूबरोबर सारें जग आपोआप वर खेंचलें जाईल, सर्व मानवजातीची उन्नति होईल, अखिल विश्व, सारें ब्रह्मांड उन्नत होईल. कारण, जग हें मेजाप्रमाणें एक घन वस्तु आहे. त्यांतील प्रत्येक परमाणु एकमेकांशीं इतका संसक्त आहे कीं, एकाला गति मिळाली कीं, इतरांना आपोआपच गति मिळते. तुम्हीं स्वतःला, तुमच्या व्यक्तित्वाला उन्नत करा, स्वतःला उच्चस्थितीप्रत पोहोंचवा, म्हणजे साऱ्या जगाला अगदीं सहज रीतीनें केवळ संसक्त्याकर्षणानें तुम्हांला उन्नत आणि अधिक उन्नत करतां येईल. मोठ-

मोठ्या संस्था, समूह, समाज, मंडळें किंवा महामंडळें यांच्यावर भिस्त ठेवणें, त्यांच्या मार्फत लोकोद्धार करण्याची आशा बाळगणें, हा निखालस वेडेपणा, शुद्ध मूर्खपणा आहे. हा एक प्रकारचा लोकभ्रमच आहे. हा भ्रम, ही चूक, ही घोडचूक पुढेंमागें लोकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं, हें सिद्धच आहे. जे आपणां स्वतःवरच अवलंबून असतात, 'आमचे आम्ही' हेंच ज्यांचें ब्रीद असतें, समाज आणि संस्था यांवर ज्यांची भिस्त नसते, असे आत्मनिष्ठ माहात्मेच जगांत क्रान्ति घडवून आणतात. तेच अखिल विश्वाला उन्नत आणि श्रेष्ठ बनवूं शकतात. समाज आणि संस्था निर्माण करून त्यांच्या जिवावर लोककल्याण साधूं पहाणारे समाजोद्धारक मोठमोठ्या वर्गण्या उभारतील, 'समाजा'करितां भव्य मंदिरें उठवतील, दुष्काळ-निवारणार्थ पट्टया गोळा करून त्यांतून दुष्काळपीडितांना अन्नवस्त्र देतील, किंवा अशींच इतर लोकोपयोगी कामें करूं शकतील. परंतु, वर्गण्या, मंदिरें किंवा अन्नवस्त्र म्हणजे कांहीं आध्यात्मिक उन्नति नव्हे, हें लक्षांत ठेवा. पारमार्थिक विजयाचा मार्ग निराळाच आहे.

## समाज आणि संघ यांचें काम काय !

कोल्हे रानांत संघ करून राहतात. त्यांचे मोठाले समूह व प्रचंड समित्या असतात. ते प्रायः एकटेदुकटे दिसावयाचेच नाहींत. नेहमी समुदायचा समुदाय असावयाचा. त्यांचें बसणें उठणें चार चौघांत असतें. जणूं काय त्यांच्या नेहमी ज्ञातिसभा, बैठकी आणि अधिवेशनेंच चालू असतात ! बसण्याउठण्या-प्रमाणें त्यांचें ओरडणेंहि सहविचारानें एका सुरांतच असतें. सारांश त्यांच्या मोठमोठ्या सभा आणि जमाती भरतात, जंगी मेळे आणि मजलसी होतात, आणि ते मोठीच आरडाओरड करीत सुटतात. मेंढरांचेहि मोठमोठाले कळप असतात. कोल्ह्यांप्रमाणें संघ आणि मंडळें यांवर त्यांची विशेष भिस्त असल्यामुळें, त्यांचेहि जंगी समूह व प्रचंड समाज असतात. तींहि परिषदा भरवतात, आणि अधिवेशनें करतात. परंतु, त्यांनीं केवढेहि समूह केले, किंवा केवढींहि मंडळें स्थापन केलीं, तथापि, कोल्हीं तीं कोल्हींच आणि मेंढरें तीं मेंढरेंच ! त्यांना आपल्या हिंमतीवर पुढें होऊन शत्रूंशीं दोन हात कधीं तरी करतां येतील काय ? शत्रूंशीं तीं सामना करूं शकतील काय ? छे ! तें स्वप्नींहि आणावयास नको. सिंह कळप करून राहिल्याचें तुम्हीं कधीं

ऐकलें आहे काय? ते संघ करून फिरत असल्याचें कधीं कोणी पाहिलें किंवा वाचलें आहे काय? त्यांनीं मोठमोठे समूह किंवा समाज स्थापन केल्याचें, तसेंच मेळे आणि जमाती भरविल्याचें कधीं कोणी ऐकलें आहे काय? गरुडपक्षी हे पक्षिगणांचे राजे होत. समाज आणि संघ स्थापन करण्याच्या भानगडींत ते कधीं पडतात काय? कधींच नाहीं. त्यांना संस्थांचें आणि मंडळाचें कामच काय? गरीब बिचारे दीनदुबळे पक्षीच संघ करून असतात. संभूयसमुत्थानाची गरज दुबळ्यांनाच असते! स्वयंसिद्ध आत्मनिष्ठ गरुड किंवा सिंह हे नेहमीं एकटेच राहतात. परंतु गरुड एकटा असला तथापि आपल्या केवळ आगमनानें सर्व पक्षिगण, पक्ष्यांचीं कुलेंच्या कुलें तो भयाकुल करून सोडतो. हत्तीहि कळप करूनच राहतात. त्यांची समाज आणि जमात यांवर अचल श्रद्धा दिसते. ते अत्यंत समाजप्रिय आणि संघचारी आहेत. चार मंडळींनीं संघ करून एकत्र राहणेंच त्यांच्या स्वभावाला आवडतें. त्यांचीं शरीरें तरी केवढीं प्रचंड असतात! आणि त्यांचें शारीरिक बलहि किती असामान्य असतें! परंतु उपयोग काय? एक सिंह आला कीं सबंध कळपाची मारे दाणादाण उडून जाते. हत्तींचे संघच्या संघ सैरावैरा धांवू लागतात. म्हणून राम म्हणतो कीं, समाज आणि संघ ह्यांवर विश्वासून राहूं नका. स्वतः सामर्थ्यवान् बनणें, स्वतांतील स्वत्व-सत्त्व वाढविणें, आत्मनिष्ठ होणें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें एकान्तीं किंवा जनान्तीं, आपल्या घरांत किंवा बाहेर, सर्वत्र वेदान्त व्यवहारांत आणणें, वेदान्तानुकूल वर्तन ठेवणें, हाच वेदान्तप्रसाराचा सर्वोत्तम मार्ग आहे. वेदान्ताचे सिद्धांत तुम्हीं स्वतः कृतींत आणा, वेदान्ततत्त्वज्ञान तुमच्या आचरणांत येऊं द्या, म्हणजे त्याच्या प्रसाराची तुम्हांला निराळी काळजी वाहाण्याचें कारण नाहीं. तुमचें तें दिव्य-ज्ञान वातावरण तत्काल उचलील, नव्हे तें उचलण्याला तें बांधलें आहे. वातावरणच काय, पण चंद्र, सूर्य, तारे, आकाश वगैरे सर्व तुमचा उपदेश तात्काळ ग्रहण करतील, वेदान्तज्ञानानें दशदिशा दुमदुमून जातील, त्रिभुवनांत वेदान्तच व्यापून राहील. तसें झालेंच पाहिजे. पण प्रथम स्वतःला सुधारा, स्वतःची उन्नति करून घ्या. आत्मोन्नति करा, म्हणजे जगाची उन्नति आपोआप होईल.

ख्रिस्तानें समाज स्थापन केले काय? छे! छे! तो बिचारा एकटाच राहिला. धर्मप्रसारक मंडळ किंवा धर्मप्रचारिणी सभा स्थापन करण्याच्या भानगडींतच

तो पडला नाहीं. श्रीशंकराचार्यांनीं तरी समाज आणि संघ स्थापन केले काय? नाहीं. ते आपल्या स्वतःच्या सामर्थ्यावरच अवलंबून राहिले; मंडळांमहामंडळांची त्यांना आवश्यकताच भासली नाहीं. आचार्यांप्रमाणें प्रत्येकानें आपलें दिव्यत्व ओळखून त्याचा अनुभव करून घेतला पाहिजे; आत्मनिष्ठ बनलें पाहिजे. तुम्हीं आपलें दिव्यत्व ओळखलेंत, त्याचा अनुभव केलात, आत्मज्ञान अंगीं बाणलें कीं, तत्क्षणीं सूर्यांतून जसे तेजोरश्मी बाहेर पडतात, त्याचप्रमाणें तुमच्या ठिकाणीं आत्मज्ञानाचें दिव्य तेज चमकूं लागेल, सहस्र किरणांनीं तें उफळून बाहेर पडेल आणि सर्वत्र दिव्य ज्ञानप्रकाश फांकून जाईल.

## सामर्थ्य बाहेरून येत नाहीं

लोकांच्या पैशावर किंवा दुसऱ्यांच्या मदतीवर उभारलेले आणि बाह्य उपकरणांवर अवलंबून असणारे मनुष्यजातीच्या उन्नतीचे सर्व प्रयत्न, भिक्षांदेहींत जन्म पावणाऱ्या सर्व चळवळी शेवटीं निष्फळ होणार, हें लक्षांत ठेवा. असा देवाचा कायदाच आहे. तुमच्या ठिकाणीं जें सर्वशक्तिमत् आणि अनंत असें सत्तत्व ओतप्रोत भरून राहिलें आहे, त्याचाच फक्त आश्रय करा, त्याच्यांवरच अवलंबून राहून आत्मकेंद्रांतून ढळूं नका. निजपदावर आरूढ होऊन निरक्षेप बुद्धीनें सर्व व्यवहार करीत असतांना बाहेरून तुमच्याकडे मदत चालून आली, लोकांनीं आपण होऊन तुम्हांला साह्याय्य केलें, तर ठीकच आहे. त्यांचें तें साहाय्य स्वीकारण्याची त्यांच्यावर मेहेरबानी करा. परंतु, लोकांच्या मदतीच्या स्वीकाराला मेहेरबानीचें-अनुग्रहाचें स्वरूप असूं द्या. तुमच्या छत्राखालीं काम करण्यास लोक अपखुषीनें पुढें आले, तर अशा स्वयंसेवकांचा—शिष्यांचा त्यांच्यावर प्रसाद करण्याच्या दृष्टीनें संग्रह करा. परंतु, त्यांच्या मदतीवर अवलंबून राहूं नका. त्यांच्यावर जराहि अवलंबून राहिलां कीं, ऐन प्रसंगीं सर्व स्वयंसेवक आणि स्वयंसैनिक तुम्हांला एकदम सोडून जातील; मग तुमचे तुम्हीं एकीएकच रहाल, हें विसरूं नका. हा सृष्टिक्रमच आहे. बाह्य उपकरणांवर, लोकांच्या मदतीवर विश्वासून राहूं नका. आत्मश्रद्धा ठेवा, स्वावलंबन शिका, आपलें सत्व प्रगट करा. क्रियासिद्धीला सत्त्वाचीच जरूरी असते, बाह्य उपकरणांची नसते, हें लक्षांत बाळगा. लोकांनीं धारण केलेलीं मोठमोठीं नांवें आणि रूपें, पुच्छाप्रमाणें लांबचलांब पसरणाऱ्या पदव्या, कौतुकोत्पादक नांवें धारण करणारीं उन्नतिमंडळें, आणि वस्तुप्रचा-

रिणी सभा—सर्व बाह्य उपकरणें फुकट आहेत. त्यांचा सदैव नेम चुकतो. तीं कोणचीच उन्नति करूं शकत नाहींत किंवा कोणालाहि मुक्त करूं शकत नाहींत. स्वावलंबनाचें किंवा आत्मोद्धाराचें सामर्थ्य तीं लोकांत उत्पन्न करूं शकत नाहींत; उलट समाजांत दुही आणि दुःख माजविण्यास मात्र तीं कारणीभूत होतात.

विद्युत्प्रेरणेनें मृताच्या ठिकाणीं चलनवलन उत्पन्न करतां येतें; प्रेतांत हाल-चाल उत्पन्न करून आपल्या इच्छेप्रमाणें ओंठ, हात, पाय वगैरे हवा तो अवयव त्याजकडून आपण हालवूं शकतों; परंतु हें चलनवलन म्हणजे कांहीं जीवित नव्हे, हें उघड आहे. त्याचप्रमाणें संपत्ति, पैसाअडका, कपडालत्ता, वर्तमानपत्रांनीं वाजविलेली टिमकी, मित्रांनीं केलेली प्रशंसा आणि भक्तमंड-ळानें गायलेलीं स्तुतिस्तोत्रें ह्या बाह्य प्रेरणांनीं अंगीं येणारें सामर्थ्य विद्यु-त्संस्कारांनीं उत्पन्न केलेल्या चलनवलनाप्रमाणें आहे. बाह्य उपकरणांच्या जोरावर थोडीशी हालचाल तुमच्या ठिकाणीं दिसेल, परंतु तें कांहीं खरें जीवित नव्हे. खरा जोम, खरा उत्साह बाह्य साधनांनीं उत्पन्न होऊं शकत नाहीं. तसेंच, त्यायोगानें आमचें दुःखहि कमी होणार नाहीं, किंवा स्वतःच्या पायां-वर उभें राहण्याचें सामर्थ्यहि आमच्या अंगीं येणार नाहीं. तुताऱ्यांच्या आवा-जांत सोडलेल्या हुकमांनीं जीवित किंवा चैतन्य उत्पन्न होऊं शकत नाहीं. वृक्ष तयार होण्याला प्रथम बीज पेरावें लागतें. बीजापासून वृक्ष होतो, बाह्य उपकरणांपासून नव्हे. कल्पना करा कीं, या ठिकाणीं बीज आहे, सूक्ष्म अस्पष्टावयव गर्भ आहे. आतां हें बीज किंवा हा गर्भ वाढून वृक्षरूपानें किंवा बालकरूपानें परिणत होण्याला त्याला थोडा अवकाश लागेल हें खरें, परंतु, अवकाश लागला तरी खरें जीवित त्यांत राहील. तें विद्युत्सूचनांनीं उत्पन्न होणारें नकली जीवित—नकली चलनवलन नव्हे. प्रेताच्या ठिकाणीं चलनवलन उत्पन्न करण्यासारखे, किंवा इच्छेनुरूप त्याला हातपाय हालविण्यास लावण्यासारखे तात्कालिक व कौतुकोत्पादक चमत्कार विद्युत्सू-चनांच्या साहाय्यानें आपणांस करतां येतात, हें खरें; परंतु प्रेतांत प्राण कांहीं घालतां येत नाहीं, हें अगदीं निश्चित आहे. आणि प्राण—जीवित हेंच तर आपल्याला हवें आहे. म्हणून राम म्हणतो कीं, सत्याचें तुमच्या ठिकाणीं बीजारोपण होणें, अत्यंत आवश्यक आहे. बीज पेरल्यानंतर त्याच्या वाढीसंबं-धानें विशेष काळजी करण्याचें कारण नाहीं. याच न्यायानें वेदान्ततत्वांचा

तुम्हांला प्रसार करणें असेल, तर तीं तत्त्वें स्वतःच्या अंगीं बाणवून घ्या, स्वतः त्यांचा अनुभव करा. सत्याचें—वेदान्ताचें एकदां बीजारोपण झालें, म्हणजे त्याच्या वाढीची किंवा विस्ताराची काळजी वाहण्याचें कारण नाहीं. तुम्हीं काळजी वाहिल्याशिवाय आपोआप तें वाढीस लागून त्याचा सर्वत्र प्रसार होईल.

## बीज पेरा मग वृक्षाची काळजी नको

एका साधूचा एक अत्यंत श्रद्धाळु, भक्तिमान् व आज्ञाधारक असा शिष्य होता. सदरहू शिष्य रोजच्या रोज महाराजांच्या दर्शनाला जात असे. पुढें असें झालें कीं, तो साधु कांहीं दिवसपर्यंत तेथून दुसरीकडे निघून गेला. तो बाहेरगांवाहून परत आल्यावर तो शिष्य एकदांहि त्या साधूच्या दर्शनास गेला नाहीं. बरेच दिवस लोटले तरि तो मुळींच तिकडे फिरकलाहि नाहीं; तेव्हां त्याच्या कृतघ्नपणाबद्दल दुसऱ्या शिष्यांनीं महाराजांजवळ तक्रार केली. साधूला त्यांच्या तक्रारीचें हंसूं आलें. शिष्यांची समजूत करण्याकरितां तो म्हणाला, " बाबांनो ! तुम्हीं त्याला दोष कां देतां ? त्याला नांवें कां ठेवतां ? त्यानें माझ्या दर्शनास येण्याचें कारणच काय ? त्यानें या देहावर इतकी आसक्ति कां ठेवावी ? ही व्यक्ति किंवा हें शरीर म्हणजे कांहीं मी नव्हे. हें शरीर किंवा ही व्यक्ति म्हणजेच मी अशी जर त्याची समजूत असेल तर याचें प्रायश्चित त्याला भोगावेंच लागेल; त्यांत त्याचें अकल्याणच आहे. सर्व सत्ता माझी आहे, मी स्वयं परमेश्वर आहें, हें त्यानें ओळखलें, माझें-आपलें दिव्यत्व त्याला पटलें, म्हणजे तो कृतार्थ झाला. माझा उपदेश हृद-यांत बाणून घेऊन त्याप्रमाणें तो वागला म्हणजे तो मुक्तच आहे. परमानन्द त्याला प्राप्त होईल. व्यवहारहि असाच आहे. घोडी एकदां गाभण राहिली, म्हणजे मग तिला घोडा लागत नाहीं. बीजारोपण—गर्भादान एकदां झालें असल्यामुळें दिवस भरतांच तिला शिंगरूं होणारच ! त्याचप्रमाणें उपदे-शाच्या रूपानें मीं बीज पेरून ठेवलें आहे. बीज आपलें कार्य करीलच. त्या संबंधानें काळजी करण्याचें मला प्रयोजन नाहीं.

याच न्यायानें वेदान्तचर्चा करण्याकरितां तुम्हीं सभा भरवा किंवा न भरवा, रामाला त्याची बिलकूल पर्वा नाहीं. तसेंच, या देहाचें आदरपूर्वक स्मरण ठेवलेत किंवा त्याचें नांव निघतांच पाय आपटून तिरस्कार व्यक्त

केलात, देहाची स्तुति केलीत किंवा निंदा केलीत, त्याचा गौरव केलात, किंवा अव्हेर केलात, दोन्हीं रामाला सारखींच आहेत. रामाचें वेदान्ताचें बीजारोपण करण्याचें काम अव्याहतपणें चालू आहे. त्यांतून आपोआप प्रचंड वृक्ष निर्माण होतील. तसेंच, हें जग किंवा त्यांतील अखिल वस्तुजात यांच्याशीं आपणांला काय कर्तव्य आहे! जगदुद्धाराचें कंकण बांधणें म्हणजे जगाच्या अवनतीची तयारी करण्यासारखेंच आहे! म्हणून राम म्हणतो कीं, दुसऱ्यांना सुधारण्याच्या आधीं स्वतःला सुधारा. आत्मोन्नति हाच जगाच्या उन्नतीचा खरा उपाय आहे.

## जगाची सुधारणा

वेदान्तदृष्ट्या हें अखिल विश्व केवळ परमात्मरूप आहे. स्वयं परमात्माच सर्वत्र व्यापून राहिला आहे. सर्व जग सर्वथा पूर्ण—परिपूर्ण आहे. सर्व ईश्वरच आहे, मीच आहें. सर्व जग एक—अगदीं एकरूप—अभिन्न आहे. वास्तविक अशी स्थिति असतां, सर्वत्र मीच अखंडपणें व्यापून राहिलों असतां, तुम्हीं अवनत आहां असें मानणें, जगदुद्धाराचें कंकण हातीं बांधणें, क्षुद्र महत्वाकांक्षांच्या अधीन झाल्यामुळें तुम्हीं दुःखी व कष्टी आहांत, अशी समजूत करून घेणें म्हणज तुमची अवनतिच करणें होय. कारण, तुम्हांला दुःखीकष्टी किंवा अवनत मानणें म्हणजे तुम्हांला स्वतःहून भिन्न मानण्यासारखें आहे. परंतु, हें मीतूंपणाचें—भिन्नतेचें तत्त्व वेदान्ताला मुळींच मान्य नाहीं. वेदान्ताच्या दृष्टीनें विविधवेषांत मीच सर्वत्र नटलों आहें. म्हणून सुधारणावीरांना वेदान्त म्हणतो, मानवजातीची उन्नति करण्याचें कवच धारण करणाऱ्या सुधारकविरांनों! हें कवच धारण करण्याच्या कल्पनेवरूनच जगांतील झाडून सारे लोक अधोगतीला पोहोंचलेले, अत्यंत पापी व नीच आहेत, अशी तुमची समजूत असल्याचें स्पष्ट होत आहे. परंतु, जगाच्या अवनतीविषयीं स्वतःची अशी संमजूत करून घेणें हा जगाचा धडधडीत अपमान आहे. तुमच्या मदतीची याचना करण्याइतकें जग अगदीं दीन व दुबळें झालें आहे, असें तुम्हीं कां मानतां? जगदुद्धाराचे आतांपर्यंत थोडेथोडके का प्रयत्न झाले? ख्रिस्तानें अवतार घेऊन लोकांना सुधारण्याचा, जगाला उन्नत आणि सुसंस्कृत करण्याचा शक्य तितका प्रयत्न केला. परंतु, या भयंकर खटाटोपानें जग जराहि सुधारलें नाहीं तें नाहींच. भगवान श्रीकृष्णादींहि अवतार घेऊन जगदुद्धारार्थ आपल्यापरी

शक्य ते परिश्रम केले, पण काय? जग अधिक उन्नत आणि सुसंस्कृत झालें काय? बुद्धदेवानेंहि लोककल्याणार्थ आमरणान्त परिश्रम केले; पण त्यांचा तरी कितीसा उपयोग झाला? या अवतारी विभूतींप्रमाणें आजपर्यंत अनेक महात्म्यांनीं व तत्त्ववेत्त्यांनीं आपापल्या परीनें जगन्मंगलार्थ यथामति व यथाशक्ति भगीरथ प्रयत्न केले आहेत; परंतु, जगांतील दुःख, आपत्ति व क्लेश यांचें प्रमाण आजामितीस यत्किंचित तरी कमी झालेलें दिसतें काय? लोकांची स्थिति अल्पांशानें तरी सुधारली आहे काय? त्यांच्या सौख्यांत तिळमात्र तरी भर पडल्याचें अनुभवास येतें काय? तसेंच, विद्युद्रथ, बाष्पनौका, विद्युत्संदेश, शब्दवाहक इत्यादी अतर्क्य आणि महनीय भौतिक शोधांनीं लोकांच्या सुखांत भर टाकली आहे काय? त्यांच्यामुळें लोक पूर्वीहून आज अधिक सुखी आहेत काय? विचार करा. जगांतील सुखदुःखांच्या प्रमाणांचा हा प्रश्न अंकगणिताच्या भाषेंत सांगावयाचा झाला, तर असें म्हणतां येईल कीं, सुखदुःख हा एक व्यवहारी अपूर्णांक आहे. भौतिक शास्त्रांच्या उत्कर्षाच्या कालांत ह्या विसाव्या शतकांत, आजामितीस हा अपूर्णांक खूप वाढवलेला दिसतो, अगदीं निराळा दिसतो. त्याचे अंश आणि छेद वाढले आहेत, ही गोष्ट निःसंशय खरी आहे; परंतु, ते सारख्या प्रमाणांत वाढत असल्यामुळें, त्यांच्या स्वरूपांत जरी फरक झाला असला, तथापि त्यांच्या किंमतींत यत्किंचितही फरक झालेला नाहीं. सध्यां आमचीं उत्पन्नें वाढलेलीं दिसतात, प्राप्ति मोठी वाटते, परंतु, त्याबरोबर आमच्या गरजाही वाढत्या प्रमाणांत आहेत. सारांश काय, सुखदुःखांचें प्रमाण तेंच कायम आहे. सुखदुःखांचें हें तंत्र कुत्र्याच्या शेंपटीसारखें आहे. कुत्र्याचें शेंपूट नळकांड्यांत असेपर्यंतच सरळ असावयाचें, पण नळकांड्यांतून काढलें कीं पुनः जशाचें तसें, वांकडें तें वांकडें! जगदुद्धाराचे–जगाच्या सुधारणेचे प्रयत्न कुत्र्याचें शेंपूट नळकांड्यांत घालून तें सरळ करण्याच्या प्रयत्नासारखे हास्यास्पद व निरर्थक होत! जे लोक लोकांना सुधारण्याचा चंग बांधतात, किंवा समाज आणि सदनें स्थापून लोकोद्धाराचा डांगोरा पिटतात, ते भ्रमांत आहेत. मित्रांनों! दुसऱ्यापासून उन्नतीच्या मार्गाची सुरवात करण्यांत तुमची मोठी चूक होत आहे, हें लक्षांत ठेवा. उन्नतीची सुरवात आपणां स्वतःपासूनच झाली पाहिजे, हें तत्त्व विसरू नका. गुरुत्वाकर्षणाचा मध्यबिंदु आपणांबाहेर असूं देऊं नका, आपलें दिव्यत्व

ओळखून, त्याचा अनुभव करा, 'अहं ब्रह्मास्मि' हा दृढ अनुभव करून, परमात्मभावनेंत तुम्हीं स्थिर झालां कीं, तत्क्षणीं तुमच्यांतून स्वाभाविकच सदासर्वकाळ चैतन्याचे स्फुलिंग, उडत राहतील; सामर्थ्य आणि तेज यांचा सारखा वर्षाव होत राहील. स्वयं वेदान्त होणें हाच वेदान्ताच्या प्रसाराचा राजमार्ग आहे.

प्रसिद्ध ग्रीक गणितशास्त्रज्ञ आर्किमीडीज असें म्हणत असे कीं, 'मला उभें रहाण्याला एखादा स्थिर बिंदु मिळेल, एखादा आलंब मिळेल, तर साऱ्या विश्वाला मी हालवून सोडीन.' हतभागी अर्किमीडीज! त्याला हा ध्रुव-बिंदु किंवा केंद्र सांपडला नाहीं. गड्यांनो! हा ध्रुवबिंदु बाहेर कोठें नसून तुमच्याच ठिकाणीं आहे, तुमच्या हृदयांतच आहे. तुमचा आत्मा हाच तो आलंब होय. त्याला आपलासा करा, घट्ट पकडून धरा, '. मी आत्मा आहें, हृदयस्थ परमात्माच मी आहें;' अशी मनाची दृढ भावना करा, आपलें दिव्यत्व अनुभूत करून घ्या. तसेंच, 'देवांचाहि देव तो मीच, सर्व न्यायाचा अधिष्ठाता तो मीच, या विश्वांतील सर्व सौंदर्याचा, शक्तीचा व सामर्थ्याचा उगम मीच, सर्व मीच असून माझ्या—परमात्म्याच्याच सत्तेनें सर्व कांहीं होत आहे,' ही श्रद्धा अंगीं बाणून घ्या, आणि तसा अनुभव करा, म्हणजे तुम्ही देवाधिदेवच निःसंशय आहां. शुद्ध स्वरूपाचा अनुभव झाला, ब्रह्म पाहिलेंत, म्हणजे ब्रह्मभावाच्या दिव्यतेजानें सर्व जगावर आपोआप तुमची सत्ता प्रस्थापित होईल; तुमचें ब्रह्मानुभवाचें दिव्य तेज दशदिशा फांकून जाईल, आणि तेणेंकरून जगांत नवीन चैतन्य उत्पन्न होऊन त्याची उन्नति होईल.

## वेदान्तनिष्ठ सूर्य

भगवान् मरीचिमाली वेदान्ताच्या तत्वानुसार वर्तत असतो. तोच खरा वेदान्ती. आतां रामानें तुम्हांला जो बोध केला, त्या बोधानुसार तो सर्वदा रहाटत असतो. जगांतील सर्व जीविताचा, सर्व सामर्थ्याचा उगम तो सहस्र-रश्मिच आहे. जगांतील सर्व हालचाली व घडामोडी त्याच्यामुळें—त्याच्याच सत्तेनें होतात, परंतु, त्यासंबंधींचा अहंकार त्याला कधीं चिकटत नाहीं. 'मीं हें जगत्सूत्र हालवीत आहें,' हा अभिमान त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होत नाहीं. स्वार्थपरायणता किंवा अहंमन्यता हीं त्याच्या गांवींहि नसतात, आणि म्हणूनच तो शुद्ध चैतन्याचा पुतळा बनतो. सर्व प्रकारचें सामर्थ्य, सर्व प्रकारचें तेज

यांचा तो आकारच होतो. सर्व तेजाचा आणि सामर्थ्याचा तो उगम असल्या-मुळें, त्याचा उदय होतांच, आपल्या सहस्र किरणांनीं तो विलसूं लागतांच सर्व चराचर जागृत आणि स्वकर्मनिरत होतें. पण, 'येणार! येणार!! येणार!!!' म्हणून त्याला आपल्या आगमनाच्या खास जाहिराती द्याव्या लागतात काय ? आपल्या आगमनासंबंधानें व्याख्यानांच्या किंवा पुस्तकांच्या रूपानें त्याला पूर्व-तयारी करावी लागते काय ? किंवा अन्य तऱ्हेनें धामधूम उडवून देण्याची त्याला कधीं तरी आवश्यकता भासत काय ? कांहीं एक नाहीं. आगमनासंबंधानें त्याला यत्किंचितहि आगाऊ तयारी करावी लागत नाहीं, किंवा आगमनोत्तरहि लोक-जागृत्यर्थ त्याला किंवा त्याच्या वतीनें इतरांना धडपडावें लागत नाहीं. तो महात्मा उदयाचलावर आरूढ झाला कीं, आपली ही पृथ्वी, हें अखिल विश्व खडबडून जागें होतें, त्यांत नवीन जीव व जोम उत्पन्न होतो. विश्वाच्या पुन-रुज्जीवनाचें हें कार्य त्याच्याकडून कसें धिमेपणानें, पण निश्चयानें होत असतें ! निसर्ग गाढ निद्रेंतून एकदम जागृतीवर येतो. नद्यांचे प्रवाह खळखळ वाहूं लागतात. बिचाऱ्या नद्या रात्रीच्या अंधकारांत गोठून थिजून गेलेल्या असतात. परंतु श्रीसाविता मोठ्या प्रेमानें सहस्रकरांनीं त्यांना आलिंगन देतो, त्यांच्या मुखांवरून हात फिरवून त्यांना उत्साहित करतो, त्यांच्यात चैतन्य आणि प्रेमरूपी जीवन उत्पन्न करतो; मग त्या प्रसन्न आणि उत्साहित होत्सात्या स्वैरगतीनें वाहूं लागतात. सरोवरांतील कमलें आणि वनोपवनांतील पुष्पें, सूर्याच्या करस्पर्शानें तत्काल आश्वासित होतात, प्रेमानें त्यांचें अंतःकरण उचंबळून येतें, आणि त्यांची मुखश्री प्रफुल्लित होते. सुर्योदय होतांच मनुष्यांचीं नेत्रकमलेंही प्रसन्न व विकसित होतात. स्थावराप्रमाणें जंगमांतही हालचाल व घडामोड सुरूं होते, त्यांच्यातही नवीन चैतन्य आणि नवीन जागृती उत्पन्न होते. आपलें हें वातावरण खडबडून जागें होतें, त्याच्या ठिकाणींही चलनवलन दिसूं लागतें. हें कां होतें ? तर सूर्याच्या ठिकाणीं हे सर्व गुण आहेत म्हणून. सूर्य हा मूर्तिमंत चैतन्य आहे, केवळ तेजोरूप आहे. म्हणून त्याचा उदय होतांच सर्व सृष्टि उज्जीवित व प्रकाशित होते; सर्वत्र खळबळ आणि चळवळ सुरू होते. इतकें असूनहि तुम्हांला जागृत केल्याचें, पक्षिगणांना उत्साहित केल्याचें, पुष्पांना विकसित केल्याचें, सर्व जगाला उद्बोधित व प्रकाशित केल्याचें, जगदुद्धाराचें श्रेय तो आपणांकडे मुळींच घेत नाहीं. तो विचारच त्याच्या डोक्याला स्पर्श करीत नाहीं. आणि स्पर्श करणार कसा ! कारण, कर्म करून अकर्ता, अर्थात्

अकर्तात्मबोध, हेंच त्याच्या लोकोत्तर सामर्थ्याचें व ऐश्वर्याचें बीज आहे. हें तत्व ओळखून तुम्हींही त्याप्रमाणें वागूं लागा, आत्मनिष्ठ व्हा; म्हणजे आपण सर्व प्रकाशाचा प्रकाश आहों, देवांचेहि देव आहों, सर्व तेज, चैतन्य, सत्ता यांचें केंद्र आहों, अखिल विश्व आपल्या हुकमतींत राहटत आहे, असा तुम्हांलाहि अनुभव येईल.

## लहान मुलांचें सामर्थ्य

लहान मुलाला सुप्रसन्न आणि संतुष्ट ठेवण्याकरितां प्रेमळ आईबापें काय काय करतात, हें तुम्हांला माहीत असेलच. बिचाऱ्या आईबापांना त्याचें शिष्यत्व पतकरून तो देईल ते पाठ फार दक्षतेनें शिकावे लागतात! आईबापच काय, घरांतील सर्वांना मुलाच्या प्रत्येक कृत्याकडे लक्ष ठेवावें लागतें. प्रत्येकाला त्या मुलाचें ताबेदार व्हावें लागतें. आतां, मुलाचें शिष्यत्व किंवा ताबेदारी म्हणजे काय असा प्रश्न सहजच येतो. याचें उत्तर हें कीं, आईबाप व घरांतील इतर मंडळी त्याच्याप्रमाणें बोबडें बोलतात, त्याच्याप्रमाणें नाचतात आणि तोंडें वेडींवांकडीं करतात. हें छन्दानुवर्तित्व म्हणजेच शिष्यत्व किंवा ताबेदारी. लहान मुलाची सुलतानी मोठी कठिण असते. तें वाटेल त्याच्या खांद्यावर स्वार होऊन बसतें! त्याचें वर्तन अगदीं स्वाभाविक, सरळ आणि अकृत्रिम असल्यामुळें, त्याला कोठेंच प्रतिबंध नसतो, कोणाचीच भीति नसते. हंसतांना बाहेर निघालेले त्याचे ओंठ हें डेमास्थिनिस किंवा बर्क यांच्या वक्तृत्वापेक्षां अधिक अधिकारयुक्त, अधिक परिणामकारक व अधिक मोहक असतात, असें कोण म्हणणार नाहीं? लहान मूल हें निष्पाप व निष्कलंक असल्यामुळें, ईश्वरस्वरूप असल्यामुळें, प्रत्येक गोष्ट त्याच्याप्रमाणें झालीच पाहिजे. हा सुलतान दिसण्यांत एवढासाच असतो, अवघा दीडदोन वितींचा असतो, त्याचे हातपाय बोटाएवढाले असतात, परंतु त्याची आत्मश्रद्धा फार दांडगी असते; अर्थात् त्याच्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं झालेंच पाहिजे. त्याच्या रोमारोमांत आत्मविश्वास भिनून गेलेला असल्यामुळें, तडजोडीची भाषा तो ऐकतच नाहीं. त्याच्या म्हणण्याप्रमाणेंच झालें पाहिजे. मुलाचें कोड पुरविण्याकरितां आईबाप कधींकधीं चीजवस्त विकतात; इतकेंच नव्हे, तर त्याच्या कल्याणाकरितां ते सर्वस्वावर पाणी सोडतात. या बाल अधिराजाच्या आज्ञा जो शिरसावंद्य करणार नाहीं त्याचें दुर्दैवच ओढ-

वलें म्हणावयाचें !! मुलांच्या ठिकाणीं ही अद्भुत शक्ति वेदान्तामुळें—वेदान्त आचरणांत आणल्यामुळें येत असते. त्याला जग दिसतच नाहीं, अर्थात् जगाची त्याला पर्वा नसते; दूरदर्शीपणा किंवा भय त्याच्या गांवींहि नसतें; त्याला सर्वत्र आनंदीआनंदच दिसतो; सर्व सत्ता त्या गोजिरवाण्या, निष्पाप मुलाच्या ठिकाणीं असते. निष्पापता—स्वाभाविकता हेंच मुलांच्या सुलतानीचें रहस्य आहे.

## सर्व सामर्थ्यांचा उगम वेदान्तांत

लहान मुलांप्रमाणें वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत आणा, 'या विश्वाचा नियन्ता, सर्व प्रभूंचा प्रभु, देवाधिदेव, सर्वेश्वर तो मीच, जगांतील सर्व शरीरांचा—प्राणिमात्रांचा सूत्रधार तो मी,' अशी अंतःकरणाची दृढ भावना करून त्याचा अनुभव करा, 'सद्वस्तु ती मीच,' हा सिद्धान्त अन्तःकरणाला पटवून घ्या, या वेदान्ततत्त्वाचा अनुभव करा, आणि त्याप्रमाणें आचरण करा, मूर्तिमंत वेदान्त बना, म्हणजे तुम्हांला शिष्यांची वाण पडणार नाहीं. मुलें कधीं 'शिष्य पाहिजेत' म्हणून जाहिराती देत नाहींत, त्याकरितां थोरामोठ्यांची खुषामतहि करीत नाहींत, अथवा वर्तमानपत्रकारांच्या अनुकूल अभिप्रायांची याचनाहि करीत नाहींत; तथापि त्यांना हवे तितके शिष्य मिळतात. मुलाकडे पहाणारा प्रत्येक इसम त्याचा शिष्यच होय. हें खरें नाहीं काय? वेदान्त आचरणांत आणा, म्हणजे तुमचा उपदेश घेण्यास हवे तितके शिष्य एका पायावर उभे राहतील. चंद्रोदय झाला कीं, चांदण्याची मौज पाहण्यास घराबाहेर पडणाऱ्या लोकांची कधींच टंचाई नसते. भारतवर्षांत शुद्ध द्वितीयेला सर्व लोक घराबाहेर येऊन मोठ्या उत्सुकतेनें चंद्रदर्शन घेतात. चंद्रदर्शनाच्या मिषानें ते आत्मदर्शनच करतात, असें रामाला वाटतें. हा दिवस मोठ्या आनंदाचा मानला जातो. या दिवशीं लोक उत्तमोत्तम पक्कानें करतात, इष्टमित्रांच्या भेटी घेतात, आणि सारा दिवस चैनींत व आनंदांत घालवितात.

तुमच्या अंतःकरणांत चंद्रोदय—प्रबोधचंद्रोदय होऊं द्या, म्हणजे मग काम करण्याच्या पद्धतीसंबंधानें किंवा कसें करूं, काय करूं, या संबंधानें डोकें खांजवीत बसण्याची तुम्हांला जरूरी नाहीं. काम करण्याच्या पद्धती व साधनें आपसूकें येतील नव्हे आलींच पाहिजेत. मुलाचें फूल फुललें

कीं मधुमक्षिकांची कधींच उणीव पडत नाहीं. मध असला कीं तेथें मधमाशा आपोआप जमावयाच्याच. याच न्यायानें आपल्या अंतःकरणांत अनुभवामृत उत्पन्न करण्याचा प्रयत्न करा; हृदयोद्यानांत ज्ञानकुसुमांचा विकास होऊं द्या, म्हणजे मग तुम्हांला कशाचीहि वाण पडणार नाहीं. तुम्हांला कशाची जरूर असेल, तर ती आपलें दिव्यत्व ओळखण्याची, आत्मानुभवाचीच होय. आत्मकेंद्रांत स्थिर झालां, आपलें ईश्वरत्व ओळखलेंत, त्याप्रमाणें प्रत्यक्ष वागूं लागलांत, म्हणजे सारें जग क्षुद्र कुत्र्याप्रमाणें तुमचे पाय चाटूं लागेल. हें अखिल विश्व तुमचा शोध काढीत येईल. परंतु, तेच तुम्हीं आत्मकेंद्रांतून च्युत झालां, स्वरूपाला विन्मुख झालां कीं, सर्व जग तुम्हांला सोडून जाईल. सर्व सत्तेचा उगम बाहेर कोठें नसून तुमच्याच ठिकाणीं आहे, भलत्याच ठिकाणीं त्याचा शोध करून स्वतःला शिणवूं नका.

या क्यालिफोर्निया प्रांतांत शास्ता स्प्रिंग्ज या नांवाचे सुप्रसिद्ध पाण्याचे झरे आहेत. या झऱ्यांचें पाणी फार गुणावह आहे, असें म्हणतात. त्यामुळें प्रत्येकाला तेथें जाऊन त्या झऱ्यांचें पाणी प्यावें असें वाटतें. लोक कसे येतील म्हणून काळजी करण्याचें त्या झऱ्यांना बिलकूल कारण नाहीं. आपल्या गुणकारितेबद्दल जाहीरपत्रकें काढण्याची किंवा भपकेदार जाहिराती देण्याचीही त्यांना जरूरी नाहीं. लोक आपोआप त्यांचा शोध काढीत येतील, नव्हे आलेच पाहिजेत.

याच न्यायानें, ज्ञान, चैतन्य, शुद्धता, आणि प्रेम यांचे शुद्ध आणि जिवंत झरे तुमच्या अंतःकरणांत उचंबळून जोरानें बाहेर वाहूं लागले कीं, तत्क्षणीं जणूं शास्ता स्प्रिंग्जच तुमच्या ठिकाणीं उत्पन्न झाले आहेत असें होईल; आणि आध्यात्मिक आरोग्याची इच्छा करणारे सर्व लोक तुमचा शोध करूं लागतील. हा कधींही न बदलणारा, वज्रलेप असा नियम आहे. अंतःकरणांत आत्मानुभवाचे निर्झर उत्पन्न होणें, सर्वात्मभाव अन्तःकरणांतून वाहूं लागणें, हीच कायती आवश्यक व महत्वाची गोष्ट आहे; ती एकदां का प्राप्त झाली, म्हणजे मग तुम्ही एकाच ठिकाणीं बसून राहिलां, किंवा जिकडेतिकडे स्वैर संचार करीत राहिलां, तरी त्यांत फारसा फरक किंवा महत्व नाहीं. तुम्ही एकाच जागीं राहिलां, तरीही लोकांच्या झुंडीच्या झुंडी तुमच्याकडे येतील; बरें तुम्ही नेहमी पर्यटन करीत

राहिलां, तथापि तुम्हीं जेथें जाल तेथें तुमचा शोध काढीत लोक येतील. सत्य आणि आध्यात्मिकता हीं अंगीं बाणल्यावर शिष्यमंडळीला तोटा नाहीं. शिष्यसमुदायादि ऐश्वर्य लौकिक व्यवहारावर अवलंबून नसून, खऱ्या आध्यात्मिकतेवरच अवलंबून असतें. आपलें दिव्यत्व आपणांस पटून दिव्यज्ञानाचे प्रवाह अंतःकरणांतून खळखळ कसे वाहूं लागतील, याबद्दलच काय तो आपणांस प्रयत्न करावयाचा आहे. सर्व कांहीं स्वरूपानुभवावर अवलंबून आहे.

जर्मन तत्त्ववेत्ता क्यान्ट याच्यासंबंधानें असें सांगतात कीं, स्वतःची जन्मवेळा त्याला माहित नव्हती; परंतु, असें जरी असलें, तथापि तत्त्ववेत्ता म्हणून जगांत त्याचें नांव सुप्रसिद्ध आहे. एकाच ठिकाणाला चिकटून राहण्यावर यश अवलंबून नसतें. आध्यात्मिक शक्ति अंगीं आणा, मग तुम्हीं कोचावर चैनींत पडून राहिलां, तथापि सत्याचें ज्ञान करून घेण्याकरितां शिष्यत्ववृत्तीनें सारें जग तुमच्या बसल्या ठिकाणीं लोटेल; जे येणार नाहींत त्यांचें दुर्दैव ! न्यायाधीश न्यायासनावर येऊन बसला कीं, तेथील अंमलदार, पक्षकार, वकील, साक्षीदार आपोआप आपापल्या कामगिऱ्यांवर हजर होतात. न्यायमंदिर झाडूनपुसून तेथील खुर्च्या, मेजें वगैरे सामानसुमान व्यवस्थेनें लावून ठेवण्याची किंवा वादीप्रतिवादी, साक्षीदार, वकील वगैरेनां बोलावणीं पाठविण्याची त्याला जरूरी नाहीं. त्याची व्यवस्था दुसरे आपोआप करतात. न्यायाधीशाचें न्यायमंदिरांत पाऊल पडण्याच्या आधींच जो तो आपापल्या जागेवर हजर असतो.

मित्रांनो, हें 'स्वर्गाचें राज्य' संपादन करा, आपलें दिव्यत्व—सर्वेश्वरत्व अनुभूत करून घ्या, असें रामाचें तुम्हांला सांगणें आहे. देवाधिदेवा! सर्वेश्वरा! हे मानवा ! तूं वास्तविक राजाच आहेस, प्रत्यक्ष ईश्वर आहेस, याचा अनुभव करून घे. आपलें ऐश्वर्य ओळखून राजाप्रमाणें स्वच्छंदानें आणि निर्भयपणानें आपले सर्व व्यवहार करीत जा. आपलें दिव्यत्व व सर्वेश्वरत्व पटवून घेऊन त्याप्रमाणें मनःपूत वागत जा. आपला पोषाख, आपली प्रवासदर्शिका, आपला धंदा, आपलें घरदार, चीजवस्त व इतर बाबी यांसंबंधानें काळजी वहात बसूं नका. तें काम, मित्रांनो ! तुमचें नसून इतरांचें—व्यवहारांतील सामान्य दर्जाच्या लोकांचें आहे. तुमचा अधिकार त्याहून श्रेष्ठ आहे. तुम्हीं राजे आहां. आपलें दिव्यत्व—ईश्वरत्व

अनुभूत करून घ्या, सर्व सूर्यांचा सूर्य तो मीच, सर्व तेजांचें तेज तें मीच, याचा अनुभव करा, म्हणजे प्रत्यक्ष चंद्र, तारे, यक्ष, किन्नर, झाडून सर्व तुमची सेवा करण्यास सिद्ध राहतील; नव्हे राहिलींच पाहिजेत. असा नियमच आहे. सत्य हेंच आहे आणि हें सत्यच यशाचें रहस्य आहे, असें वेदान्त प्रतिपादन करतो. तुम्हीं आपलें वास्तविक स्वरूप ओळखलें, स्वरूपानुभव करून घेऊन आत्मकेंद्रांत स्थिर झालां कीं, तत्क्षणीं विलक्षण सामर्थ्य तुमच्या अंगीं येईल. मग, सारें जग तुमचा शोध काढीत तुमच्या घरीं चालून येईल, आणि तुमच्या कृपाप्रसादाची याचना करील.

कृत्रिम नियम आणि कायदेकानू यांनीं स्वतःची उन्नति होईल, तसेंच, सर्वशक्तिमान् छत्रपति, आप्तेष्ट, नोकरचाकर, पैसाअडका यांवर, बाहेरून होणाऱ्या मदतीवर आपला उत्कर्ष अवलंबून आहे, असें लोक प्रायः समजतात; आणि त्यांची चूक—घोडचूक होते ती येथेंच. या समजुतीनेंच ते आपला नाश करून घेतात! बाह्य उपकरणांच्या जोरावर आत्मोन्नति करूं पाहाणें हें, कृत्रिम उपायांनीं बुलबुल पक्ष्याला गावयास लावण्यासारखें हास्यास्पद आहे. कबुतराला खुराड्याच्या बाहेर खुलें सोडा, हिमालयाच्या शिखरावरील एखाद्या उंच सुरूच्या शेंड्यावर त्याला बसूं द्या, म्हणजे स्वाभाविकच तें घुमूं लागेल. हिमालयाच्या रमणीय शिखरावरील गुलाबांवर बुलबुल पक्षी बसला कीं, लकेऱ्या मारण्याची त्याला लहरच येते. श्रुतिमनोहर गीतें खड्या आवाजांत तो आपोआप गाऊं लागतो. त्याचप्रमाणें, राम म्हणतो कीं, आत्मानुभवाच्या प्रशान्त आणि रमणीय शिखरावर तुम्हीं एकदां आरूढ झालां, आपलें दिव्यत्व ओळखून आत्मकेंद्रांत स्थिर झालां, म्हणजे शुद्ध आचरण, थोर आणि उदात्त कृत्यें, दिव्य आयुष्यक्रम, हीं आपोआप सुरू होतील; दिव्यत्वाचा तुमच्या ठिकाणीं उदय होऊन त्याचा अखंड प्रवाह तुमच्या अन्तःकरणांतून वाहूं लागेल. विजयशाली आध्यात्मशक्ति संपादन करण्याचा, सर्वत्र विजयी होण्याचा हाच मार्ग आहे.

नियम आणि कायदेकानू यांच्या जोरावर देशांत थोर व लोकोत्तर माणसें निर्माण करण्याचा समाजसुधारकांचा प्रयत्न असतो. त्यांचें बोलणें व लिहिणें नेहमीं तृतीयपुरुषी असतें. लोकांनीं असें करावें तसें करावें, असा त्यांचा उपदेश किंवा आग्रह असतो. परंतु स्वतःच्या उपदेशानें ते स्वतः कधीं बद्ध होत नाहींत.

अमुक करा, तमुक करा असा दुसऱ्यांना हुकूम करून ते स्वतः परीक्षक किंवा प्रेक्षक बनतात. अशानें समाजसुधारणा होईल काय? समाजसुधारणेचा हा उपाय अगदीं अस्वाभाविक व अशक्य आहे.

## सक्तीची तालीम काय कामाची!

आतां, लोक असें म्हणतील कीं, आम्हांस नुसतीं उदात्त तत्त्वें नकोत; आम्हांला कांहीं क्रिया करावयास सांगा. यावर रामाचा उलट असा सवाल आहे कीं, बाबांनों, या क्रिया तरी तुमच्या हातून होणार कशा? उदात्त क्रिया काय वाटेवर पडल्या आहेत? उदात्त तत्त्वांशिवाय उदात्त क्रिया होणार कशा? सक्तीनें केलेल्या क्रिया, बाह्य तालीम ही बुलबुल पक्ष्याच्या सक्तीच्या गाण्याप्रमाणें कृत्रिम व निरुपयोगी आहे. बुलबुल पक्ष्याची मानगुटी दाबून 'चल, गा' असा हुकूम केल्यानें बुलबुल पक्ष्याच्या मुखांतून मंजुळ ध्वनि निघूं शकतील काय? ही गोष्ट सर्वथा अशक्य आहे. बुलबुल पक्ष्याची मानगुटी सोडून देऊन त्याला मोकळा करा, अन्तःस्फूर्तीनें त्याला गाऊं द्या, म्हणजे मग त्याच्या लकेऱ्यांची मजा तुम्हांस अनुभवावयास मिळेल. याच न्यायानें, तुम्हीं आपलें ईश्वरत्व ओळखून आत्मकेंद्रांत स्थिर झालां, 'अहं ब्रह्मास्मि' हा सिद्धान्त तुमच्या अंतःकरणांत ठसला, स्वरूपानुभवाच्या अत्युच्च स्थितीप्रत तुम्हीं जाऊन पोहोंचलां, कीं तत्क्षणीं अति उदात्त आणि प्रतापशाली कृत्यांचा तुमच्या अंतःकरणांतून नुसता पूर वाहूं लागेल. कबुतरें खुराड्यांत चैनीनें बसलेलीं असलीं, म्हणजे तीं जशीं ऐटींत आनंदानें घुमत असतात, किंवा बुलबुल पक्षी घरट्यांत बसला असतां, तो जसा प्रेमानें आणि स्फूर्तीनें लकेऱ्या मारीत असतो, त्याप्रमाणें तुम्हीं आपल्या ठिकाणावर बसलां, स्वरूपांत स्थिर झालां कीं, थोर आणि उदात्त कृत्यें अगदीं स्वाभाविक रीतीनें तुमच्या हातून घडत जातील. आत्मानुभव करून घेणें हाच उदात्त क्रिया हातून घडण्याचा खरा मार्ग आहे.

## आकर्षकतेचें रहस्य

कल्पना करा कीं, या मेजावर एक लोखंडाचा तुकडा असून तो लोहचुंबक व्हावा, दुसरे लोखंडाचे तुकडे आकर्षण करण्याचें त्याच्यांत सामर्थ्य यावें, अशी आपली इच्छा आहे. आतां, या तुकड्यांत चुंबकीय धर्म आपणांस कसे उत्पन्न करतां येतील? अर्थात् त्याला लोहचुंबक

केल्यानें. दुसरे लोखंडाचे तुकडे आकर्षण करून, ते धरून ठेवण्याचें त्याच्या ठिकाणीं सामर्थ्य आणण्याचा हाच खरा मार्ग आहे. आतां असें समजा कीं, येथें हा एक लोहचुंबक आहे. लोखंडाचा तुकडा या लोहचुंबकाला जोडा, म्हणजे तो स्वतः चुंबक होईल, व दुसरा तुकडा आकर्षित करण्याचें त्याच्या ठिकाणीं सामर्थ्य येईल. सदरहू लोखंडाच्या तुकड्यांत दुसरे तुकडे आकर्षित करण्याचें आतां सामर्थ्य आलें आहे, हें खरें; परंतु, लोहचुंबकापासून तो वेगळा केला, कीं, लगेच त्याच्या ठिकाणचें सामर्थ्य नाहींसें होईल. त्याला दुसरा तुकडा आकर्षण करतां येणार नाहीं. सदरहू तुकडा जोंपर्यंत खऱ्या लोहचुंबकाशीं संलग्न होता, तोंपर्यंत त्याच्यांतहि चुंबकाचे सर्व धर्म होते, इतर लोखंडाच्या तुकड्यांवर त्याचें आकर्षण चालत होतें. परंतु, मूळ चुंबकापासून तो दूर केला कीं, त्याच्यांतील सामर्थ्य नष्ट होऊन दुसऱ्या तुकड्यांना त्याला स्वतःकडे खेंचतां येणार नाहीं.

## ख्रिस्ताची स्थिति

आतां, आपण दुसरा दृष्टांत घेऊं. कल्पना करा कीं, या ठिकाणीं एक देह होता. त्याला आपण ख्रिस्त असें म्हणूं या. तो फार चांगला होता, अत्यंत पवित्र होता, पण तेवढ्यानें काय होणार! त्याच्या आयुष्यांतील पहिलीं तीस वर्षें तो आतांच्या दृष्टांतांतील लोखंडाच्या तुकड्याप्रमाणें अगदीं अनाकर्षक, अप्रसिद्ध व दुर्बळ होता. त्या वेळीं त्याची कोणाला माहितीहि नव्हती. यःकश्चित् सुताराचा मुलगा, घरचीं अतिशय गरिबी, अप्रसिद्ध आईच्या पोटीं जन्मास आलेला, समाजांत तो तुच्छच मानला जाई. परंतु, या लोखंडाच्या तुकड्यानें खऱ्या लोहचुंबकाशीं आपला संबंध जुळवून आणला, सर्व आकर्षकतेचा, चैतन्याचा व सामर्थ्याचा उगम असा जो सच्चिदानंद-स्वरूप परमात्मा त्याच्याशीं हा तुकडा संलग्न झाला, आपलें दिव्यत्व ओळखून तो स्वरूपांत स्थिर झाला, आणि या स्वरूपस्थितीचा परिणाम असा झाला कीं, मूळ चुंबकाचे सर्व धर्म त्या लोखंडांत आले; तें लोखंड स्वयं लोहचुंबक बनलें. अर्थात् तें लोकांना आपणांकडे खेंचूं लागलें. लोक आपण होऊन दंडप्रणाम करून त्याला शरण जाऊं लागले व शिष्यत्वाची याचना करूं लागले. त्याच्या आयुष्याच्या शेवटीं एकदां अशी वेळ आली कीं, तो लोखंडाचा तुकडा म्हणजे ख्रिस्तानें शरीर मूळ चुंबकापासून वेगळें झालें.

लगेच त्याला चिकटून राहिलेले, त्यानें आकर्षण केलेले लोखंडाचे हजारों तुकडे वेगळे झाले—त्याचे सर्व शिष्य त्याला सोडून गेले. ज्या जेरुसलेमच्या लोकांची त्याच्यावर पूर्वीं फार श्रद्धा व प्रेम होतें, जे त्याला अत्यंत पूज्य मानीत, ज्यांनीं त्याच्या सन्मानार्थ नगर शृंगारून बादशाही थाटानें त्याचें एकदां स्वागत केलें होतें, तेच लोक आतां त्याला सोडून गेले. कारण, लोहचुंबकापासून वेगळा झालेल्या लोखंडाच्या तुकड्याप्रमाणें त्याच्यांतील पुर्वीची आकर्षकता त्या वेळीं निघून गेली होती. त्याच्या ठिकाणचे चुंबकीय धर्म पार नाहींसे झाले होते. इतरेजनांनींच त्याला सोडलें असें नाहीं, तर त्याच्या अकरा पट्ट शिष्यांनींही त्याला सोडलें, तेव्हां तर लोकांची वृति एकदम इतकी पालटली कीं, ते त्याच्यावर सूड घेण्यास, त्याला सुळावर चढविण्यास तयार झाले. याच प्रसंगीं 'हे आकाशांतील बापा, तूं मला सोडून कां गेलास !' अशा तऱ्हेचे करुणोद्गार ख्रिस्ताच्या तोंडून निघाले असल्याचें आपण बायबलांत वाचतों. यावरून मूळ लोहचुंबकाशीं जडलेला त्याचा संबंध त्या वेळीं तुटला होता, हें उघड होतें. ख्रिस्ताच्या चरित्रांतील या गोष्टीवरून काय बोध घ्यावयाचा, याचा विचार करा. ख्रिस्ताचें चरित्र हेंच सांगतें कीं, त्याच्या अंगचे सर्व गुण, त्याच्या ठिकाणचें सर्व सामर्थ्य परमात्मस्वरूपी लोहचुंबकाशीं जडलेल्या संबंधावर अवलंबून होतें. जोंपर्यंत ख्रिस्ताचें जडशरीर त्या खऱ्या लोहचुंबकाशीं—परमात्मस्वरूपाशीं संलग्न होतें, तोंपर्यंत तें शरीरहि स्वयं लोहचुंबकच बनलें होतें, चुंबकाचे सर्व धर्म त्यांत उतरले होते. परंतु, मूळ चुंबकापासून—स्वरूपापासून अलग झाल्याबरोबर त्याचें पूर्वीचें सामर्थ्य पार नाहींसें झालें; त्याचे अनुयायी व शिष्य त्याला सोडून गेले. देहावसान होण्यापूर्वीं तो फिरून स्वरूपांत स्थित झाला होता, हें उघड आहे. सुळीं दिल्यानें ख्रिस्त मरण पावला नाहीं, हें तुम्हांला माहीतच आहे; आणि ही गोष्ट पुराव्यानेंहि सिद्ध करून देतां येईल. सुळावर चढविल्यानंतर तीन दिवसपर्यंत तो समाधिस्थितींत होता. समाधींत असतांना मनुष्याच्या शरीरांतील सर्व जीवनक्रिया बंद पडतात, नाडी बंद पडत्ये, रक्तवाहिन्यांतून रक्त वाहात नाहींसें होतें, आणि जीविताचीं सर्व बाह्य लक्षणें दिसेनाशीं होतात. या स्थितींत शरीर जणूं काय सुळीं दिल्याप्रमाणें काष्टवत् निश्चेष्ट असतें. सुळावर चढविण्याच्या वेळीं ख्रिस्तानें समाधि लावली, आणि त्या स्थितींत तो तीन दिवस होता. चौथ्या दिवशीं [illegible] तो पुन्हां देहभानावर

आला; नंतर तेथून तो भारतवर्षांतील काश्मीर प्रांतांत येऊन राहिला. काश्मीर प्रांतांत राम फिरलेला असून, ख्रिस्ताचें तेथें वास्तव्य असल्याबद्दलच्या अनेक खुणा त्याच्या नजरेस पडल्या आहेत. तोंपर्यंत काश्मीर प्रांतांत ख्रिस्ती-पंथाचा मागमूसही नव्हता. परंतु आज पहावें तों ज्या ठिकाणीं ख्रिस्ती धर्मोपदेशकांचा अद्याप प्रवेश झालेला नाहीं, अशा काश्मीरांतील कांहीं शहरांचीं नांवें जेरुसलेम प्रांतातील ज्या ज्या शहरांतून ख्रिस्त गेला, त्या त्या शहरांच्या नांवांप्रमाणें दिसतात. काश्मीर प्रांतांत दोन हजार वर्षांपूर्वींची एक कबर आहे. ईसाची कबर या नांवानें ती तिकडे प्रसिद्ध असून, ती फार पवित्र मानण्यांत येते. हिंदुस्तानी भाषेंत ख्रिस्ताला ईसा असें म्हणतात. ईसा शब्दाचा अर्थ राजपुत्र असा आहे. सारांश काय कीं, बालपणीं जेथें तो वेदान्त शिकला, तेथेंच शूलारोपणानंतर परत आला, असें मानण्यास बळकट पुरावा आहे. ईसाचें मलम या नांवाचें एक मलम, भरतवर्षांत प्रसिद्ध आहे. हें मलम लावल्यानें सर्व प्रकारच्या जखमा खरोखरच अगदीं अद्भुत रीतीनें तावडतोब भरून येतात. हें मलम तयार करून विकणोर अशी अख्यायिका सांगतात कीं, पुनरुत्थानानंतर जखमा बऱ्या करण्याकारतां ख्रिस्त याच मलमाचा उपयोग करीत असे. शूलारोपणानंतर ख्रिस्त भरतवर्षांत आला, हें सिद्ध करून देण्यास भरपूर पुरावा आहे. परंतु त्यासंबंधानें आज विस्तृत विवेचन करण्याचा रामाचा विचार नाहीं. राम आज तुम्हांला इतकेंच सांगत आहे कीं, ख्रिस्ताचें शरीर जोंपर्यंत परमात्वतत्त्वरूपी लोहचुंबकाशीं संलग्न होतें, ख्रिस्त आत्मकेंद्रांत स्थिर होता, तोंपर्यंत सर्व जग त्याच्याकडे खेंचलें जात होतें; विश्ववशीकरणाचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं होतें. आतां यावर असा प्रश्न उद्भवतो कीं, मूळ लोहचुंबकाशीं जडलेला संबंध एकदम कसा तुटला ? याला अनेक कारणें झालीं. प्रापंचिक लोकांत फार मिसळणें, बराच कालपर्यंत स्वरूपानुसंधान सुटणें, स्वरूपापासून विमुख होणें, इत्यादि कारणांमुळें मनुष्याच्या ठिकाणचें दैवी सामर्थ्य नाहींसें होऊं शकतें. प्राकृत जनांच्या संसर्गापासून अलिप्त राहण्याकरितां ख्रिस्ताला डोंगराच्या एकांतांत जाऊन रहावें लागलें होतें, आणि तेथें असतांना, तो एका शिष्यास एकदां असें म्हणाला होता कीं, 'माझ्या ठिकाणचें सामर्थ्य कोणी काढून घेतलें असावेंसें वाटतें, कोणी मला स्पर्श केला हें समजत नाहीं !' ही हकीकत

बायबलांतच आहे. प्राकृत जनांच्या चिरसंसर्गानें, तसेंच बराच वेळपर्यंत स्वरूपानुसंधान सुटल्यानें मूळ लोहचुंबकापासून आपण वेगळे होतों, व आपणांतील चुंबकीय धर्म एकदम लुप्त होतात. असें होणें अगदीं स्वाभाविक—मानवी दुर्बलतेला अगदीं धरून आहे. खिस्ताचे हे दोष सुद्धां तुम्हांला उपकारकच आहेत. प्रत्येक मनुष्याचें चरित्र आपणांस बोधप्रदच आहे, मात्र तें बरोबर समजावून घेतलें पाहिजे; त्यांतील मर्म कळलें पाहिजे. एखाद्या यःकश्चित मनुष्याचें चरित्र नीट समजावून घ्याल, त्याच्या गुणदोषांचा बारकाईनें विचार कराल, तर तें सामान्य चरित्रहि खिस्ताच्या चरित्राइतकेंच बोधप्रद होईल. रामाच्या सांगण्याचा मुद्दा एवढाच आहे कीं, स्वरूपापासून-परमात्वतत्वापासून तुम्हीं विमुख झाला कीं, तत्क्षणीं तुम्हीं कवडी किंमतीचे व्हाल, हें निश्चित आहे. आत्मकेंद्रांत थिर रहा, परमात्मस्वरूपाशीं तादात्म्य करून घ्या, आत्मानुभवाच्या शिखरावरून खालीं येऊं नका, सत्याचा अनुभव करून अखंड स्वरूपानुसंधान ठेवा, म्हणजे पूर्वीं दिलेल्या दृष्टांतांतील लोखंडाच्या तुकड्याप्रमाणें तुम्हीं स्वयं लोहचुंबक बनाल. चुंबकाशीं संलग्न असल्यामुळें लहान मुलांचें शरीर जड असूनही तेजस्वी असतें, व त्यांच्या अश्रूंत अद्भुत सामर्थ्य असतें. याचप्रमाणें त्या दिव्य चुंबकाच्या सान्निध्यानें तुमचें सर्व शरीर चैतन्यमय होऊन तुमच्या ठिकाणीं अद्भुत सामर्थ्य प्रगट होईल.

## सामर्थ्याचें मूळ

परमात्म्याशीं तादात्म्य करून घेतलेंत कीं, लहान मुलांप्रमाणें तुम्हींहि पवित्रच आहां. वृत्ति स्वरूपाकार झाल्यानें चुंबकीय धर्म प्राप्त झालेल्या लोखंडाच्या तुकड्याप्रमाणें इतरांना स्वतःकडे खेंचण्याचें तुमच्या अंगीं सामर्थ्य येईल. तुम्हीं स्वतःकडे अखिल विश्वाला आकर्षित करणारे चुंबक बनाल. परंतु, मूळ चुंबकाशीं—परमात्मस्वरूपाशीं संलग्न राहिल्यानेंच तुमच्या ठिकाणीं चुंबकता येईल, हें ध्यानांत ठेवा. यावरून याच प्रश्नाची दुसरी एक बाजू मनांत येते. ती ही कीं, सामर्थ्याचा खरा उगम कोठें आहे? या संबधानें लोक नेहमीं चूक व घोंटाळा करतात. सामर्थ्याचें मूळ, सामर्थ्याचें आदिकारण, सामर्थ्याचें खरें रहस्य कशांत आहे, हें आतांपर्यंत रामानें स्पष्ट करून सांगितलेंच आहे; परंतु, या बाबतींत प्रायः लोकांची चांगलीशी समजूत पडत नाहीं. सर्व सामर्थ्याचा उगम आपणांपाशीं नसून बाहेर कोठें आहे, आत्म्याव्यति-

रिक्त इतर कोठें आहे, अशी ते आपली समजूत करून घेतात. उदाहरणार्थ, लहान मुलांच्या ठिकाणीं जें कल्पनातीत सामर्थ्य दिसून येतें, तें वास्तविक अभेदभावामुळें—सर्वात्मभावामुळें आलेलें असतें; परंतु, लोक चुकीनें त्यांच्या बाह्यांगाला, बाह्यसौंदर्याला फाजील महत्त्व देतात. मुलांच्या ठिकाणची आकर्षणशक्ति त्यांच्या शारीरिक सौंदर्यामुळें प्राप्त झालेली असते, असें ते मानतात; आणि म्हणून मुलांच्या जीवितक्रमांतील सामर्थ्याच्या वास्तविक कारणाचा परिपोष न करतां, त्यांच्या ठिकाणच्या विश्वात्मभावनेचें दृढीकरण न करतां, त्यांच्या शरीरसौष्ठवाचेंच स्तोम माजवून त्यांची जीवितयात्रा निकृष्ट, अपमानास्पद व अधोगतीची करतात.

ख्रिस्ताच्या चरित्राचें परिशीलन करा, आणि ख्रिस्ताचा कित्ता स्वतः गिरवा. ख्रिस्ताच्या शरीरावर—त्याच्या व्यक्तित्वावर अवलंबून न राहतां त्याच्या ठिकाणीं वास करणाऱ्या परमात्मतत्त्वावर, स्वतांतील दिव्य शक्तीवर अवलंबून रहा. ख्रिस्त होण्याचा हाच खरा मार्ग आहे.

## वेदान्तप्रतिपादित श्रद्धा

वेदान्त हा केवळ भरतवर्षाकरितां नाहीं. तो जितका वेदान्तानुयायी भरतवर्षीयांकरितां आहे, तितकाच तो ख्रिस्ती लोकांकरितांहि आहे. ख्रिस्ताचें नामस्मरण केल्यानें मनुष्य मुक्त होतो, या ख्रिस्ती लोकांच्या समजुतीची तुम्ही वेदान्तदृष्ट्या उपपत्ति कशी लावतां, या मुद्यावर वेदान्त काय प्रकाश पाडतो, असा रामाला प्रश्न करण्यांत आला आहे. एक दृष्टान्त देऊन हा मुद्दा राम विशद करीत आहे. एक बाई होती. तिला अक्कल बेताचीच होती. दिवाणखान्याच्या शेजारच्या खोलींत एक भूत आहे, त्यांत तूं जात जाऊं नकोस, असें तिनें आपल्या लहान मुलाच्या डोक्यांत भरवून दिलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्या खोलीचें नांव काढलें कीं, मुलाच्या छातींत धडकी भरे, व खोलींत पाऊल टाकण्याचें त्याला धैर्य होईना. एके दिवशीं संध्याकाळीं कचेरींतून घरीं आल्यावर त्या मुलाच्या बापानें दिवाणखान्याच्या शेजारच्या खोलींतून त्याला कांहीं जिन्नस आणण्यास सांगितलें. खोलीचें नांव निघतांच मुलगा गर्भगाळित झाला. खोलींत जाण्याची त्याची छातीच होईना. बापाच्या अंगाला घट्ट धरून तो म्हणाला, "बाबा, मी नाहीं जायचा त्या खोलींत, तेथें एक मोठें थोरलें भूत आहे, मला भय वाटतें. हा भित्रेपणा

बापाला अर्थात् आवडला नाहीं. मुलाला पोटाशीं धरून तो म्हणाला, "बाळा, भूत कसलें घेऊन बसलास! तेथें भूतबीत कांहीं एक नाहीं बरें! तुला कोणी खाणार नाहीं. तूं बेधडक खोलींत जा आणि तो जिन्नस घेऊन ये." बापानें असा धीर दिला, तथापि तो मुलगा जाग्यावरून हालेना. बाप मोठा धोरणी होता. भुताचें वेड कोणी तरी त्याच्या डोक्यांत भरविलें असलें पाहिजे, हें त्यानें ओळखलें; आणि हें वेड काढून टाकण्याकरितां त्यानें एक युक्ति काढली. लगेच त्यानें नोकराला हांक मारली, आणि त्याच्या कानांत एक गोष्ट सांगितली. नोकर तत्क्षणीं तेथून निघून गेला आणि पाठीमागच्या दारानें तो शेजारच्या भुताच्या खोलींत गेला. खोलींत गेल्यावर त्यानें एक उशी घेतली आणि तिच्या एका कोंपऱ्यावर बोंगडीचा तुकडा गुंडाळून, काळा भाग पुढें येईल आणि विलक्षण दिसेल अशा रीतीनें ती उशी त्यानें भुताच्या खोलीच्या एका खिडकींत उभी केली. इतकें झाल्यावर त्या मुलाचें तिकडे लक्ष वेधण्यांत आलें. ती विचित्र आकृति पहातांच मुलगा घाबरला. त्यावर बाप म्हणाला, "हें कानासारखें दिसतें नव्हे का?" ती आकृति पाहिल्याबरोबरच मुलाची कल्पनाशक्ति जागृत झाली होती; तशांत बापाच्या तोंडचे वरील शब्द ऐकतांच ती अधिकच उद्दीपित झाली. मग काय विचारतां! खिडकींतून पुढें आलेलें उशीचें टोंक हा त्या खोलींतील भुताचा खरोखर कान असावा, अशी त्याची कल्पना झाली, व तो बापाला म्हणाला, "मी सांगत नव्हतों त्या खोलींत भूत आहे म्हणून? झालें, आतां झाली खात्री! त्या भुताचाच हा कान." बापानें उत्तर केलें, "बाळ, तूं म्हणतोस तें खरें, पण भुताला भिऊन काय उपयोग! हिंमत धर. ही काठी घे. आपण त्या भुताला झोडपून मारून टाकूं. आहे काय त्यांत!" मुलें स्वभावतः फार शूर, उत्साही, धाडसी व हिंमतवान् असतात, हा तुमचा अनुभव असेलच. हवें तें धाडसाचें कृत्य करण्यास त्यांची तयारी असते. लगेच बापाच्या हातांतील काठी घेऊन त्यानें त्या आकृतीच्या डोक्यावर एक सपाटून रट्टा लगावला. त्याबरोबर पलीकडच्या खोलींतून रडल्यासारखा आवाज आला; आणि तो भुताचा कान दिसेनासा झाला. अर्थात् नोकरानें उशी आंत ओढून घेतली. हा प्रकार पाहून मुलगा फार खुष झाला, व तो बापाला ऐटीनें म्हणाला, "पहा, भूत पळालें; त्याची चांगलीच खोड मोडली." बापानें मुलाच्या पाठीवरून हात फिरवून त्याला शाबासकी दिली,

आणि म्हटलें, "बाळा, तूं खरोखरच फार शूर व धाडशी दिसतोस. तूं तसा वीरच आहेस." मुलाच्या शौर्याचें अशा रीतीनें कौतुक चाललें असतां, दाराच्या फटींतून एका कानाऐवजीं आतां दोन कान दिसूं लागले. तें पहातांच बाप म्हणाला, "अरे हें भूत ऐकत नाहीं. बाळ बघतोस काय? काठी घे." मुलानें लागलीच काठी घेऊन त्या भुताच्या डोक्यावर एका मागून एक सारखे पांचपन्नास प्रहार केले. दर फटकाऱ्यावरोबर खोलीच्या आंतून रडण्याचा आवाज ऐकूं येत होता. तें पाहून बाप म्हणाला, "बघितलेंस, तें भूत आतां रडूं लागलें. आतां मात्र तूं त्याची पुरी खोड मोडलीस. आतां त्याला वठणीस आणलेंस खरें." बापाकडून असें उत्तेजन मिळतांच मुलाला चेवच आला, आणि तो सारखा बडवीत सुटला. थोडा वेळ गेल्यावर आतां धोपटणें पुरे कर असें बापानें सांगितलें. नंतर त्यानें त्या दाराच्या फटींतून ती उशी ओढून काढली, आणि ती मुलापुढें ठेवून तो म्हणाला, "अरे, तुझें शौर्य विलक्षण खरें! मारून मारून त्या भुताची तूं उशीच करून टाकलीस!" बापाचें बोलणें मुलाला खरें वाटलें. त्या खोलींतील भुतासंबंधाची कल्पना व तज्जन्य भीति हीं नाहींशीं झालीं; त्या मुलाच्या अंगीं धैर्य आलें. तो आनंदानें नाचूं लागला. मग तो बेधडक आणि बेदिक्कत खोलींत गेला, आणि बापाला हवी असलेली वस्तु तेथून घेऊन आला. लहान मुलांकरितां हा उपाय ठीक म्हणतां येईल. परंतु जाणत्या मुलांकरितांहि याच उपायाचा अवलंब करावा, असें कोणता शहाणा बाप म्हणेल? कोणताहि म्हणणार नाहीं. ही मात्रा लहान मुलांकरितांच आहे. प्रौढ झालेल्या मुलांना ती लागू पडणार नाहीं. त्या लहान मुलाचे बाबतींत या युक्तीचा बराच उपयोग झाला, हें खरें; पण सज्ञान झालेल्या मुलांना असल्या बाह्य व कृत्रिम उपायांची जरूरी नाहीं. लहान मुलांच्या डोक्यांतील वेडें अशा तऱ्हेच्या उपायांनीं आपणांस काढून टाकतां येतील. मात्र तसें करण्यास आपणांस सवड पाहिजे; आणि या गोष्टींतील बापाप्रमाणें मात्रेचा एकेक वळसा प्रत्येक वेळीं हळू हळूच देत गेलें पाहिजे. आतां, याच गोष्टींत त्या खोलींतील भूत कशानें गेलें, याचा तुम्हीं आपल्याशीं विचार करा. या बाबतींत वेदान्ताचें असें म्हणणें आहे कीं, उशी झोडपल्यानें कांहीं भूत ठार झालें नाहीं; भुताची भीति नाहींशी होण्याचें खरें कारण उशीला बडवणें हें नसून त्या खोलींत भूत नव्हतेंच, ही श्रद्धा

हळू हळू त्या मुलाच्या अंन्तःकरणांत बाणणें, हेंच त्याच्या भीतिनाशाचें खरें कारण आहे. त्या खोलींत भूत नाहीं, अशी त्याची भावना करण्यांत आली; आणि त्या भावनेप्रमाणें खोलींत त्याला भूत दिसेनासें झालें. तेथें भूत आहे, अशी समजूत केल्यानेंच त्याला तें तेथें दिसूं लागलें होतें. तो केवळ त्याच्या भावनेचा—कल्पनेचा परिणाम होता. वास्तविक पाहिलें तर त्या खोलींत भूत केव्हांहि नव्हतें. त्यानें तें आपल्या खोट्या समजुतीनेंच निर्माण केलें होतें. ही खोटी समजूत, ही चुकीची कल्पना, ही अप्रामाणिक भावनाच वस्तुतः भुताची जनयित्री असल्यामुळें, तीच नाहींशी करणें फार जरूरीचें आहे. तिच्यावरच आपण उपचार केले पाहिजेत. परंतु, लहान मुलांच्याच बाबतींत लागू पडणारे इलाज मोठ्या माणसांच्या बाबतींत चालणार नाहींत. त्यांचें अज्ञान किंवा विपरीत ज्ञान दूर करण्याला निराळ्याच उपायांची योजना केली पाहिजे. आपण जन्मतः पापीच आहों; मरणोत्तर भयंकर नरकांत आपण पडणार असून त्या नरकाच्या कांठावर जाऊन आपण थडकलों आहों, पातकांचें मोठें थोरलें ओझें आपल्या डोक्यांवर असून त्याच्या भारानें आपण चेपले जात आहों, आदमच्या चुकीमुळें आपला स्वभाव पापप्रवण बनला, आपण स्वभावतःच पापी, विषयासक्त, नीच, दरिद्री व क्षुद्र आहों, अशी तुम्ही खिस्ती लोक मुळांतच चुकीची समजूत करून घेतां. या स्पष्टोक्तीबद्दल आपण रामाला क्षमा कराल, अशी आशा आहे. अशी तुमची समजूत होण्याला तुमचें बायबलच कारण आहे. बायबलांतील 'जुन्या करारा'नें आपण स्वभावतः पापी आहों, अशी भलतीच समजूत तुम्हां खिस्ती लोकांच्या डोक्यांत भरवून दिली आहे. जगांतील गरीब बिचाऱ्या खिस्ती लोकांच्या निर्मल अन्तःकरणांत, अन्तःकरणरूपी प्रकाशमय प्रासादांत, अविकार्य असा जो परमात्मा त्याच्या निवासमंदिरांत, तुमच्या मनोरूपी खोलींत, तुमच्या पापप्रवणतेचें, तुमच्या अधःपाताचें, आणि क्षुद्रतेचें काल्पनिक भूत 'जुन्या करारा'च्या शिकवणीनेंच उत्पन्न केलें. या जगांत आपण अत्यंत क्षुद्र असे कीटक आहों, वारा वाहून नेईल तिकडे वाऱ्याच्या इच्छेप्रमाणें वाहात जाणारे अत्यंत दुर्बल प्राणी आहों, आपल्या अंगीं यत्किंचितहि सामर्थ्य नसून आपण सर्वस्वी दीन आहों, काडीचीहि आपणांला किंमत नाहीं, अशा तऱ्हेच्या दुबळेपणाच्या आणि मूर्खपणाच्या कल्पना 'जुन्या करारा' नेंच तुमच्या अंतःकरणांत ठसवल्या, पापप्रवणतेचें

भूत तुमच्या अंतःकरणांत 'जुन्या करारा' च्या उपदेशानें उत्पन्न केलें. भुताच्या कल्पनेचा तुमच्या अन्तःकरणांत उदय झाल्यावरून 'नव्या करारा'चा अवतार झाला. 'जुन्या आणि नव्या करारां' संबंधानें राम निःपक्षपातबुद्धीनें बोलत आहे. 'जुना करार' ही आतां सांगितलेल्या गोष्टींतील मुलाची आई असून 'नवा करार' हा त्या मुलाचा बाप होय. या बापानें त्या वेडगळ आईनें मुलाच्या मनांत भरविलेलें भुताचें नसतें वेड काढून टाकलें. लोकांच्या डोक्यांत भरलेलें क्षुद्रतेचें आणि अधःपाताचें वेड काढून टाकून त्यांना मुक्त करण्याचा सेंट पॉलनें 'नव्या करारां'त शक्य तितका प्रयत्न केला आहे. लोकांच्या मानगुटीस बसलेलें हें भूत नाहींसें करण्याकरितां सेंट पॉलनें कोणत्या उपायाचा अवलंब केला, हें तुम्हांस माहीत आहेच. सेंट पॉलनें असें म्हणण्यापेक्षां प्रत्यक्ष परमेश्वरानेंच सेंट पॉलच्या द्वारें अज्ञानपिशाचिकेला भारून गाडून टाकण्याचा खिस्ती लोकांना मार्ग दाखविला, असें म्हणणें रामाला अधिक सयुक्तिक वाटतें. सेंट पॉलच्या द्वारें प्रत्यक्ष परमेश्वरानें असें जाहीर केलें कीं, मनुष्याचीं सर्व पापें, त्याची नैसर्गिक पापप्रवणता, 'मी क्षुद्र आहें,' ही मानसिक दुर्बलता, 'मी मुक्त होईन काय?' या बद्दलचा संशय, सारांश, पापाचें, अधःपाताचें तुमच्या मानेवर बसलेलें भूत, तुमचें सर्व अज्ञान बाप्तिस्म्याच्या संस्कारानें नाहींसें होईल. देवानें असें जगजाहीर केलें कीं, खिस्ताच्या कळपांत येऊन जे कोणी जलसिंचनसंस्कारपूर्वक खिस्ती-धर्माची दीक्षा घेतील, प्रात्याहिक आणि साप्ताहिक प्रार्थनांना हजर राहतील, सूकरमांस सेवन करून देवाची करुणा भाकतील, खिस्ती धर्माच्या महोपदेश-कांचा योगक्षेम चालवितील, आपल्या श्रद्धेचें निदर्शक म्हणून छातीवर खिस्ताचा कूस लटकवतील, त्यांचीं सर्व पापें नाहींशीं होऊन ते मुक्त होतील. खिस्ताचें नित्य नामस्मरण करा, त्याच्या नांवानें मंदिरांतून प्रार्थना करा आणि गीतें गा, खिस्ती उपाध्यायांचा योग्य परामर्ष घेऊन त्यांना पुष्ट करा, म्हणजे तुमच्या मोक्षाबद्दल मी जबाबदार आहें, असें सेंट पॉलच्या शरीराचा आश्रय करून देवानेंच खिस्ती जगाला जाहीर केलें. आतां, याप्रमाणें वागून आपण खरोखर मुक्त झालों, असें खिस्ती लोकांना वाटत असेल, सेंट पॉलनें सांगितल्याप्रमाणें प्रार्थना आणि उपासना केली कीं, मी खचित उद्धरेन, अशी जिवंत श्रद्धा खिस्ती लोकांच्या अंतःकरणांत वागत असेल, तर या उप-चारांनीं ते मुक्त झालेच पाहिजेत, असें रामाचें म्हणणें आहे. खिस्ताच्या

नांवानें प्रार्थना केल्यावर आपण खरोखर पापांपासून मुक्त झालों, आपण तरलों, अशी भाविक ख्रिस्त्यांच्या अंतःकरणाची दृढ भावना होत असेल, तर ते तरलेच पाहिजेत. कारण, सेंट पॉलनें सांगितलेला उपचार हा उशी धोपटण्यासारखाच आहे. धोपटण्यानें जशी भुताची उशी झाली, आणि त्या खोलींतील भूत नाहींसें झालें, त्याप्रमाणें प्रार्थनादि उपचारांनीं पापप्रवणतेचें भूत अंतःकरणांतून नाहींसें होऊन मनुष्य मुक्त होऊं शकेल.

## द्राविडी प्राणायाम कशाला ?

राम म्हणतो, तुमचा बायबलावर विश्वास असेल, आणि त्यांत सांगितलेले प्रार्थनादि प्रकार केल्यावर आपण खरोखर मुक्त होऊं, अशी तुमच्या अन्तःकरणाची दृढ श्रद्धा होईल, तर तुम्हीं मुक्तच आहां. अज्ञेयवादी व अप्रमाणवादी तुम्हां ख्रिस्ती लोकांच्या श्रद्धेची टवाळकी करतात. वेडगळ श्रद्धेनें का कोणी तरणार आहे, असा तुमचा उपहास करतात; परंतु, त्यांचा हा अभिप्राय रामाला बिलकुल संमत नाहीं. 'मी क्षुद्र आहें,' 'मी पापी आहें,' हें मानासिक दौर्बल्य नाहींसें करून 'मी निष्पाप आहें,' 'मी मुक्त झालों,' अशा तऱ्हेची दृढ भावना तुमची धर्मश्रद्धा तुमच्या अंतःकरणांत उत्पन्न करीत असेल, आपण मुक्त झालों असें खरोखर तुम्हांला वाटत असेल तर तुम्हीं मुक्तच आहां; यांत यत्किंचित्‌हि संशय नाहीं. परंतु, त्याचबरोबर रामाचें असें म्हणणें आहे कीं, जग आतां कांहीं बाल्यावस्थेंत नाहीं; तें आतां प्रौढ दशेस पोहोंचून सज्ञान झालें आहे. प्रार्थना करा, उपदेशकांचा योगक्षेम चालवा, म्हणजे तुम्हीं मुक्त व्हाल, अशा प्रकारच्या प्रमाणवचनांनीं आजपर्यंत लाखों जीव तरले हें खरें; परंतु, लहान मुलाप्रमाणें उशीला धोपटून खोलींत भूत नाहीं हें न ठरवितां, सज्ञान मुलाप्रमाणें, त्या गोष्टींतील मुलाच्या बापाप्रमाणें, खोलींत भूत खरोखर नव्हतें, हें जाणून भयनिर्मुक्त होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. लहानपणींच शोभणाऱ्या बातिस्म्याच्या संस्कारानें पापप्रवणतेचें भूत गाडण्याचा प्रयत्न न करतां, आपण वस्तुतः पापप्रवण नसून निष्पाप व निष्कलंक आहों, या गोष्टीचा अनुभव करून, आपल्या हृदयमंदिरांत अधःपाताचें भूत केव्हांहि नव्हतेंच, तसेंच, आपण क्षुद्र कीटक नसून सर्वशक्तिमान् परमेश्वर आहों, आपला अधःपात केव्हांहि झालेला नसून आपण नित्य मुक्तच आहों, या प्रौढपणाला उचित अशा स्वरूपानुभवाच्या तेजानें ही

अज्ञानजन्य पातकपिशाचिका भस्म करून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. वेदान्ताच्या दृष्टीनें आपण नेहमीं शुद्ध व निष्पाप आहों. आपलें स्वरूप अविकार्य असून, सर्व कांहीं आपणच आहों याचा अनुभव करा. पवित्रांतले पवित्र, प्रभूचेहि प्रभु, सर्वशक्तिमान् परमेश्वर, सर्वेश्वरच आपण आहों, या वेदान्ताच्या सिद्धान्ताचा अनुभव करून घ्या. 'सर्वेश्वर तो मीच,' असा मनानें विचार करा, अन्तःकरणाची तशी भावना करा, त्याचा अनुभव घ्या आणि तो अनुभव आचरणांत आणा. सरळ प्राणायाम करतां येत असून द्राविडी प्राणायाम करण्यांत अर्थ काय? प्रार्थना करून आपण मोक्षाला जाऊं, असें मानण्यांत अर्थ नाहीं. आपण नेहमीं मुक्त आहों, अशी तुमची दृढ श्रद्धा असली कीं, तुम्हीं साऱ्या जगाला मुक्त करूं शकाल, जगदुद्धारक व्हाल, असें वेदान्ताचें सांगणें आहे. हें शरीर आपण केव्हांहि नव्हतों, आपण कधींच बद्ध नव्हतों, अशी तुमची दृढ भावना असेल, अज्ञान पोरांप्रमाणें न वागतां, सज्ञान मुलांप्रमाणें वागाल, आपण कधींच बद्ध नव्हतों तर आपण नित्य मुक्तच आहों, या वेदान्ततत्त्वाचा अनुभव कराल, जगांतील तारक तत्त्व—स्वयं परमात्माच आपण आहों, अशी दृढ श्रद्धा ठेवाल, तर सर्व जगाचे तुम्हीं तारकच आहां. म्हणून राम म्हणतो कीं, निरर्थक, अनवश्यक, आणि डामडौली धर्मविधींत आपल्या शक्तीचा दुरुपयोग करूं नका. स्वतःला मुक्त करण्याकरितां उगी धोपटण्याच्या बालिश प्रकारांत आपलें सामर्थ्य व्यर्थ खर्च करूं नका. पोरकटपणा आतां सोडून द्या. आपण मुक्त आहों, अशी अन्तःकरणांत दृढ श्रद्धा ठेवा, म्हणजे तुम्ही मुक्तच आहां, खिस्ती धर्मांतील तारक तत्व श्रद्धा किंवा वस्तुतः वेदान्तच आहे. परंतु, वेदान्ताची प्रक्रिया अधिक सुसंस्कृत आहे. मोक्षाप्राप्त्यर्थ बायबलांत सांगितलेले सर्व धार्मिक विधि केल्यावर, मी तरलों, मी मुक्त झालों, अशी तुमची समजूत होईल, तर खिस्तीधर्मांत अन्तर्भूत असलेलें वेदान्ततत्वच तुम्हांला तारीत आहे, हें ध्यानांत ठेवा; आणि बाह्य उपचारांना धार्मिक विधींना आणि संस्कारांना नसतेंच महत्त्व देऊं नका.

## भोळा भाव आणि खरी श्रद्धा

तुर्कीकडून जेरुसलेम काबीज करण्याकरितां जुडिया प्रांतांत खिस्ती राष्ट्रांनीं धर्माच्या नांवाखालीं जीं घनघोर युद्धें केलीं, त्यांत कित्येक वेळां

त्यांनीं रक्ताचे पूर वाहविले. या युद्धांतील एका चकमकींत ख्रिस्ती लोकांचा पराभव होऊन त्यांस माघार खावी लागली; व सैन्यांतील शिपाई सैरा-वैरा पळूं लागले. या सैनिकांत एक धूर्त मनुष्य होता. नांव करण्याची ही वेळ आहे, असें पाहून त्यानें अशी बातमी पसरून दिली कीं, 'रात्रीं मला एक दृष्टांत झाला. एक देवदूत माझ्या स्वप्नांत येऊन मला म्हणाला, कीं 'ख्रिस्तांच्या शरीराचा एकवार स्पर्श झालेला एक भाला जवळच एके ठिकाणीं पुरलेला असून तो भाला तुम्हीं शोधून काढाल, आणि त्या-निशीं युद्धाला सज्ज व्हाल, तर तुम्हांला जयश्री माळ घालील.' एकाच्या तोंडून दुसऱ्याला, दुसऱ्याच्या तोंडून तिसऱ्याला असें होतां होतां, ही दृष्टान्ताची बातमी सर्व सैन्यभर पसरली. झालें; बातमी खरी कीं खोटी, याचा विचार न करतां सर्व लोक त्या भाल्याकरितां जिकडेतिकडे खणूं लागले. त्यांनीं पुष्कळ ठिकाणीं खणलें, सकाळपासून चांगली रात्र होईपर्यंत ते सारखे खणीतच होते; तथापि भाला म्हणून त्यांना सांपडेना. तेव्हां मात्र त्यांची निराशा झाली. हताश होत्साते खणण्याचें काम बंद करून लोक तेथून परत फिरणार, इतक्यांत तो दृष्टांत झालेला मनुष्य मोठ्यानें ओरडून म्हणाला, 'मित्रांनों! जागा सांपडली!' भाला ज्या ठिकाणीं सांपडेल असें तो म्हणत होता, त्या ठिकाणीं सर्व मंडळी त्याच्याबरोबर गेली; आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, तेथें तो भाला सांपडला. भाला अगदीं जुना व गंजलेला असून त्याला ठिकठिकाणीं भोंकें पडलेलीं होतीं. भाला हातांत उचलून घेऊन सदरहू धूर्त मनुष्य म्हणाला, 'फार दिवस जमिनींत राहिल्यानें हा गंजून गेला आहे. ख्रिस्ताच्या शरिराचा स्पर्श झालेला भाला तो हाच.' सर्वांना दिसण्याकरितां त्यानें तो हातांत वर उचलून धरला. सर्व ख्रिस्ती सैनिक त्या भाल्याभोंवतीं आनंदानें नाचूं लागले. त्यांच्या आनं-दाला पारावार राहिला नाहीं. ख्रिस्ताच्या शरिराचा स्पर्श झालेला भाला आपणांस सांपडला, या कल्पनेनें त्यांना युद्धाचें स्फुरण चढलें, मोठ्या उत्सा-हानें, हिंमतीनें व शौर्यानें त्यांनीं तुर्कांवर पुन्हां चाल केली; आणि त्यांत ते विजयी झाले. विजय मिळवून सर्व ख्रिस्ति सैनिक (युरोपांत) स्वदेशीं परत आले. त्या दिव्य भाल्यामुळेंच युद्धांत आपणांस यश आलें, अशी प्रत्येकाची प्रामाणिक समजूत होती. परंतु, हा प्रकार घडल्यावर थोड्याच दिवसांनीं दृष्टांत झालेला धूर्त मनुष्य आजारी पडला. तो अत्यावस्थ असतां त्यास

पापाची क्षमा करून आशीर्वाद देण्यास आलेल्या धर्मोपदेशकाजवळ भाल्याचा दृष्टांत ही केवळ गप्प होती, असें त्यानें कबूल केलें. तो म्हणाला, ' हा भाला वस्तुतः माझ्या पणजोबांचा होता. माझे पणजोबाहि सैन्यांत नोकर होते. त्यांच्या मरणानंतर सदरहू भाला एका फडक्यांत गुंडाळून ठेवला होता. हा भाला फक्त माझ्या पणजोबांनींच वापरला होता असें नव्हे, तर पणजोबांनाहि तो त्यांच्या पणजोबांकडून वंशपरंपरेनें मिळाला होता. ज्यावेळीं जुडिया प्रांतांत युद्धार्थ मंडळी निघाली, त्यावेळीं फडक्यांत गुंडाळलेला तो भाला तसाच मी आपल्याबरोबर घेतला. परंतु, युद्धांत त्याचा कांहीं उपयोग होईना. आमचा पराभव होऊन आम्हीं बारा वाटा पळूं लागलों, तेव्हां पळतां पळतां माझ्या मनांत असें आलें कीं, आपलें नांव करण्याला ही वेळ बरी आहे. लगेच दृष्टान्ताची हूल उठवून दिली, आणि लोक दुसरीकडे खणीत असतांना हळूच तो भाला शेजारच्या खंदकांत फेंकून दिला. या खंदकांत पहा म्हणजे सांपडेल, असें मींच त्यांना सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं तेथें शोधून पाहिलें, आणि तो त्यांना आढळला. उपाध्यायाजवळ एकांतांत दिलेली ही कबूली इतिहासकारांनीं आडून ऐकली, आणि खरा प्रकार असाच असेल असें स्वतःचें मत बनवून त्यांनीं असा अभिप्राय दिला कीं, सदरहू युद्धांतील जयाला तो भाला कारण झाला नसून लोकांची धर्मश्रद्धा व उत्साह हींच कारण झालीं, यशाची किल्ली त्या भाल्यांत नसून ख्रिस्ती वीरांच्या आत्मश्रद्धेंत, आत्मविश्वासांतच होती. लोकांनीं आपल्या अंगीं आध्यात्मिक शक्ति उत्पन्न केली, आणि या शक्तीमुळें, या भावनेच्या जोरावर त्यांनीं शत्रूंस पादाक्रांत केलें. ख्रिस्ती लोकांच्या ज्वलत् श्रद्धेमुळेंच त्या युद्धांत त्यांना यश आलें, भाल्यामुळें नव्हे, असें आपलें स्पष्ट मत इतिहासानें नमूद केलें. वेदान्त तरी हेंच सांगतो कीं, ख्रिस्ती लोकांनो, मुसलमानांनो, वैष्णवांनो, जगांतील निरनिराळ्या धर्मांच्या व धर्मपंथांच्या अनुयायांनो, ख्रिस्ती, महंमद, कृष्ण किंवा इतर अवतारी विभूती, यांच्या केवळ नांवाचा आश्रय केल्यानें आपण मुक्त होऊं, अशी जर तुमची समजूत असेल, तर ती साफ चुकीची आहे. आपले मोक्षदाते आपले आपणच आहों. आपणांस मुक्त करण्याचें सामर्थ्य, मुक्तिदायकत्वाचा गुण या अवतारी विभूतींच्या ठिकाणीं नसून तो आपल्या ठिकाणीं, आपल्या हृदयांत, आपल्या भावनांत आहे.

भोळा भाव आणि खरी धर्मश्रद्धा यांतील फरक ओळखण्यास शिका. आतांच्या गोष्टींतील भाला भोळा भाविकपणा असून, लोकांना चढलेलें स्फुरण, त्यांनीं प्रगट केलेलें सामर्थ्य ही त्यांची श्रद्धा होय. मनुष्य नुसत्या भाविकपणानें तरला जात नसून श्रद्धेच्या जोरावर तरत असतो, हें लक्षांत ठेवा.

## श्रद्धा अंतर्मुख करा

आतां सांगितलेल्या गोष्टींत ख्रिस्ती सैनिकांची उत्कट धर्मश्रद्धाच त्यांच्या विजयास कारणीभूत झाली, हें जर खरें आहे, तर वेदान्त तुम्हांला असा सवाल करतो कीं, ही श्रद्धा तुम्हीं आपल्या स्वतःच्या ठिकाणीं, आपल्या आत्म्याच्या—आत्मदेवाच्या ठिकाणीं कां ठेवीत नाहीं ? आपल्या श्रद्धेचा ओघ तुम्हीं ख्रिस्त, बुद्ध, कृष्ण किंवा इतर अवतारी पुरुष यांच्याकडे काय म्हणून वळवतां ? श्रद्धेची शक्ति तुम्हीं हृदयस्थ परमात्म्याच्या ठिकाणीं कां लावीत नाहीं ? श्रद्धेचें सुकाणूं आत्मदेवाकडे कां वळवीत नाहीं ? श्रद्धेचा ओघ बहिर्मुख न करतां तो अन्तर्मुख करणें, स्वतःकडे—आत्म्याकडे वळवणें, आत्मश्रद्धा ठेवणें, हा मार्ग किती सरळ व स्वाभाविक आहे बरें ! आपणांतील जिवंत श्रद्धेचा हा किती स्वाभाविक विनियोग होईल बरें !!

हींच जर वेदान्ताचीं तत्त्वें आहेत; वेदान्ताचा हाच जर मथितार्थ आहे, आणि भरतवर्ष हीच जर वेदान्ताची जननी आहे, तर त्या वेदान्तजनक भरतवर्षाची आज अशी अवनति व दुर्दशा कां ? असा प्रश्न रामाला वारंवार विचारण्यांत येतो. भरतवर्षांतील विद्यमान लोक वेदान्त आचरणांत आणीत नाहींत, हेंच त्यांच्या अधोगतीचें एकमेव कारण आहे. भरतवर्षीयांपेक्षां अमेरिकन लोक वेदान्त अधिक व्यवहारांत आणतात, आणि त्यामुळें ते अधिक उन्नत व संपन्न आहेत. वेदान्तामुळें भरतवर्षाचा ऱ्हास झाला, असें म्हणण्याचा जगाला बिलकुल अधिकार नाहीं. भरतवर्षाच्या अवनतीला वेदान्तज्ञानाचा ऱ्हासच कारण आहे, हें एक गोष्ट सांगून राम स्पष्ट करणार आहे.

## आजीबाईचें तर्कशास्त्र !

हिंदुस्तानांत एका खेडेगांवांत एक मुलगा होता. तो जात्या बुद्धिमान् असल्यामुळें विश्वविद्यालयाच्या मोठमोठ्या पदवीच्या परीक्षा देऊन पंडित म्हणून प्रसिद्ध झाला. परंतु विश्वविद्यालयांत शिकत असतांना, अनुकरणप्रियतेमुळें त्यानें

कांहीं इंग्रजी चालीरीति उचलल्या होत्या. भरतखंडांतील लोक फार पुराणप्रिय व प्राचीनाभिमानी आहेत, हें कदाचित् तुम्हांला माहीत असेलच. अगदीं अलीकडेच कांहीं इंग्रजी चालीरीति क्वचित् रूढ होऊं पाहात आहेत. इंग्लंडच्या विश्वविद्यालयांतील उच्च अभ्यासक्रम पुरा केलेले पुष्कळ हिंदी विद्यार्थी रामानें पाहिले आहेत; पण, ते इंग्रजी पद्धतीचे कपडे वापरीत नाहींत. किंवा उगाच वरींदारीं इंग्रजी भाषा बोलत नाहींत. आईबापांना असला उद्धटपणा बिलकुल खपणार नाहीं. विश्वविद्यालयांत शिकत असतांना सदरहू विद्यार्थ्यानें एक घड्याळ विकत घेतलें होतें. उन्हाळ्याच्या सुटींत तो तीन महिने एका खेड्यांत आपल्या आजींच्या घरीं जाऊन राहिला होता. घड्याळाची विशेष आवश्यकता भासल्यामुळें त्यानें तें आपल्याबरोबर आजोळीं नेलें होतें. आजी अगदीं जुन्या पद्धतीची होती. तिला अर्थात् हा अतिक्रम खपेना. त्या तरुण मनुष्यानें इंग्रजी तऱ्हेचे कपडेलत्ते वगैरे कांहींएक बरोबर घेतलें नव्हतें, परंतु अभ्यासाला घड्याळाची जरूरी असल्यामुळें तेवढेंच त्यानें बरोबर आणलें होतें. खुर्च्या, मेज, वगैरे इंग्रजी पद्धतीचें सामान आणण्याची त्याची छातीच नव्हती. कारण, इंग्रजी पद्धतीचें सामान वापरणें हें त्या वेळीं भयंकर अशुभ मानण्यांत येत असे. तथापि, धीर करून त्यानें घडयाळ बरोबर आणलेंच. घरांतील सर्वच मंडळी घड्याळ आणण्याच्या विरुद्ध होती. आजीचा तर त्यावर विशेष कटाक्ष होता. हा मर्यादातिक्रम तिला बिलकुल सहन होईना. ती म्हणाली, 'हें सारा दिवस टिक् टिक् करीत रहातें. किती किळसवाणा आवाज! ही ब्याद आपल्या येथें नको. तें मोडून तोडून बाहेर फेंकून द्या. तें सर्वस्वी अशुभ आहे. त्यानें कांहीं तरी संकट ओढवेल!" घड्याळानें अरिष्टविरिष्ट कांहीं ओढवणार नाहीं, आंतील यांत्रिक क्रियेमुळें टिक् टिक् असा आवाज निघतो, असें समजावून सांगून आजीची समजूत घालण्याचा त्या तरुणानें पुष्कळ प्रयत्न केला; पण कांहीं केल्या तिची समजूत म्हणून पडेना. आजीच्या मर्जीविरुद्ध त्यानें तें घड्याळ आपल्या अभ्यासाच्या खोलींत ठेवलेंच. पुढें असें झालें कीं, एक दिवस चोर घरांत शिरले, आणि घरांतील पैसाअडका, व जडजवाहीर ते चोरून घेऊन गेले. आजीच्या म्हणण्याला आतां अधिकच बळकटी आली. ती आतां जरा जोरानेंच म्हणूं लागली कीं, " मी म्हटलें नव्हतें कीं, या घड्या-

ळाचें लक्षण चांगलें दिसत नाहीं म्हणून ! कांहीं तरी अरिष्ट येणार हें मला आधींच दिसत होतें; आणि अखेर त्याप्रमाणें झालेंच ! चोर जडजवाहीर घेऊन गेले. पण त्यांनीं घड्याळ कांहीं नेलें नाहीं. बरोबरच आहे. घड्याळाला हात लावला कीं, कांहीं तरी संकट ओढवेल, आणि आपण पेंचांत येऊं, हें त्या चोरांनीं सुद्धां ओळखलें. असली ही पीडा, ही नस्ती ब्याद घरांत ठेवाच कशाला ! " मुलगा फार आग्रही होता. आजीनें इतकें आकांडतांडव केलें तरी त्याकडे त्यानें लक्षच दिलें नाहीं. त्यानें तें घड्याळ तसेंच आपल्या खोलींत ठेवून दिलें. पण मजा ही कीं, यानंतर थोड्याच दिवसांनीं त्या मुलाचा बाप हें अशाश्वत जग सोडून गेला. आतां मात्र आजी फारच घाबरली. ती संतापून बोलली, "कारट्या ! आतां तरी तें घड्याळ टाकून दे. ही ब्याद घरांतून जाऊं दे कशी ! मी इतकें सांगतें तरी हें लचांड घरांत बाळगण्याला तुला लाज कशी वाटत नाहीं ! " इतकें झालें तरी मुलानें आपला हट्ट सोडला नाहीं. त्यानें तें घड्याळ तसेंच खोलींत राहूं दिलें. पण, कर्मधर्मसंयोगानें हा प्रकार घडून आल्यावर थोड्याच दिवसांनीं त्याची आई हें नश्वर जग सोडून गेली. एक क्षणभरहि ही घोरपड आपल्या घरांत ठेवतां कामा नये, अशी आतां आजीची पुरी पुरी समजूत झाली. यांत्रिक योजनेनें चालणाऱ्या वस्तू तिनें पूर्वीं कधीं पाहिल्या नव्हत्या. त्यामुळें, त्या वेळच्या इतर माणसांप्रमाणें तिची अशी समजूत झाली कीं, त्या घड्याळांत एखादा किडा असावा, एरव्हीं तें आपोआप चालेल कसें ? किंवा त्यांतून टिक् टिक् असा आवाज तरी निघेल कसा ? त्यांत किडा असावा हें तिच्या डोक्यानें पक्कें घेतलें. या घड्याळानेंच सर्व आपत्ती ओढवल्या अशी तिची ठाम समजूत झाली. लगेच नातवाच्या खोलींत जाऊन तिनें तें घड्याळ घेतलें, आणि घरांत नेऊन तें एका दगडावर ठेऊन, वरून दगड मारून तिनें त्याचे तुकडे तुकडे केले. अशा रीतीनें तिनें त्या दुष्ट घड्याळाचा सूड घेतला. हिंदुस्तानांतील आजीबाईचें अज्ञान पाहून तुम्हांला हंसू येईल. परंतु, दुसऱ्या कांहीं बाबतींत तुमचीहि स्थिति तिकडील आजीबाईसारखीच केंविलवाणी आहे. दोन गोष्टींचा बादरायण संबंध जोडून देऊन एकामुळें दुसरी झाली असें अनुमान करण्याची लोकांची प्रायः प्रवृत्ति असते. विशेषतः पाश्चात्यांची विचारसरणी विपरीत पूर्वग्रहांनीं दूषित झालेली असल्यामुळें भलतेंच तर्कशास्त्र लढवून वेदान्तामुळेंच भरतवर्षाचा ऱ्हास झाला, असा भलताच सिद्धान्त ते एकदम ठोकून देतात.

मुक्त करण्याचा तिनें निश्चय केला. मुलांना संसारचक्रांतून सोडवून मोक्षपदाचे अधिकारी करणें, हेंच भरतवर्षांतील मातांचें एकमेव ध्येय व उद्दिष्ट असतें. आत्मज्ञानसंपन्न पुरुष सदैव मुक्त असतो. जन्ममृत्युपरंपरेंतून तो कायमचा सुटतो. म्हणून आपली सर्व प्रजा आत्मानुभवसंपन्न—अर्थात् जविन्मुक्त करण्याची तिनें प्रतिज्ञा केली. स्वराज्यांत जिकडे तिकडे अनुभवी महात्मे निर्माण करण्याचा तिनें निश्चय केला. फक्त एका मातेनें केलेला हा एक सत्य संकल्प होता, आणि तो तिनें तडीस नेला. तिचे मुलगे कृष्ण, ख्रिस्त किंवा बुद्ध यांप्रमाणें पूर्णपणें विरक्त व आत्मज्ञानसंपन्न झाले. त्यांच्या वैराग्याचा व आत्मनिष्ठेचा प्रजेवर परिणाम होऊन सर्व प्रजा ज्ञानी व मुक्त झाली. एका आर्य स्त्रीला एवढी महत्वाची कामगिरी बजावतां आली. हें महत्कार्य घडवून आणण्यास तिनें कोणत्या मार्गाचा अवलंब केला होता म्हणाल, तर मुलांना स्तन पाजतांना, त्यांना पाळण्यांत घालून हालवितांना, निजवतांना किंवा खेळवतांना आध्यात्मज्ञानरूपी अमृत पाजण्याचा तिचा नेहमींचा क्रम असे. ओंव्या आणि पाळणे यांच्या रूपानें दिव्यज्ञान त्यांच्या डोक्यांत भरवून वेदान्ताचे संस्कार ती त्यांच्या मनावर करीत असे. ÷

---

स्वारी करण्याविषयीं सुबाहूनें त्याचें मन वळविलें. त्याप्रमाणें काशीराजानें अलर्काच्या राजधानीला वेढा दिला. परचक्रानें पीडित झालेला अलर्क राजा शत्रूचा प्रतिकार करण्यास असमर्थ असल्यामुळें अत्यंत खिन्न झाला, विचार करतां करतां मातेनें दिलेल्या अंगठीची त्याला आठवण झाली; व तींतील आज्ञापत्र काढून तें त्यानें वाचलें, त्यांत पुढील मजकूर होता, 'संगःसर्वात्मना त्याज्यः स चेत्यक्तुं न शक्यते। स सद्भिःसह कर्तव्यः सताम् संगो हि भेषजम् ॥ कामःसर्वात्मना हेयो दातुं चेच्छक्यते न सः। मुमुक्षां प्रति तत्कार्यं सैव तस्यापि भेषजम् ॥' नंतर दत्तात्रेयाच्या प्रसादानें तो आत्मज्ञानसंपन्न झाला, व काशीराजा किंवा सुबाहु यांना राज्य देण्याला कबूल झाला. अलर्काला आत्मबोध व्हावा हीच सुबाहूची इच्छा होती; व ती याप्रमाणें सफल झाली. इकडे ज्येष्ठ पुत्राला राज्याभिषेक करून निःसंग होऊन तपश्चर्येकरितां अलर्क वनांत गेला. मार्कंडेय पुराण अध्याय १८—४१.

÷ स्तन पाजितां निजवितां हालवितां बाळकासि खेळवितां ॥
दे बोध, जो सुदुर्लभ थोरांसि सहस्रकल्प मेळवितां ॥ मोरोपंत.

ळाचें लक्षण चांगलें दिसत नाहीं म्हणून ! कांहीं तरी अरिष्ट येणार हें मला आधींच दिसत होतें; आणि अखेर त्याप्रमाणें झालेंच ! चोर जडजवाहीर घेऊन गेले. पण त्यांनीं घड्याळ कांहीं नेलें नाहीं. बरोबरच आहे. घड्याळाला हात लावला कीं, कांहीं तरी संकट ओढवेल, आणि आपण पेंचांत येऊं, हें त्या चोरांनीं सुद्धां ओळखलें. असली ही पीडा, ही नस्ती ब्याद घरांत ठेवाच कशाला ! " मुलगा फार आग्रही होता. आजीनें इतकें आकांडतांडव केलें तरी त्याकडे त्यानें लक्षच दिलें नाहीं. त्यानें तें घड्याळ तसेंच आपल्या खोलींत ठेवून दिलें. पण मजा ही कीं, यानंतर थोड्याच दिवसांनीं त्या मुलाचा बाप हें अशाश्वत जग सोडून गेला. आतां मात्र आजी फारच घाबरली. ती संतापून बोलली, "कारट्या ! आतां तरी तें घड्याळ टाकून दे. ही ब्याद घरांतून जाऊं दे कशी ! मी इतकें सांगतें तरी हें लचांड घरांत बाळगण्याला तुला लाज कशी वाटत नाहीं ! " इतकें झालें तरी मुलानें आपला हट्ट सोडला नाहीं. त्यानें तें घड्याळ तसेंच खोलींत राहूं दिलें. पण, कर्मधर्मसंयोगानें हा प्रकार घडून आल्यावर थोड्याच दिवसांनीं त्याची आई हें नश्वर जग सोडून गेली. एक क्षणभरहि ही घोरपड आपल्या घरांत ठेवतां कामा नये, अशी आतां आजीची पुरी पुरी समजूत झाली. यांत्रिक योजनेनें चालणाऱ्या वस्तू तिनें पूर्वीं कधीं पाहिल्या नव्हत्या. त्यामुळें, त्या वेळच्या इतर माणसांप्रमाणें तिची अशी समजूत झाली कीं, त्या घड्याळांत एखादा किडा असावा, एरव्हीं तें आपोआप चालेल कसें ? किंवा त्यांतून टिक् टिक् असा आवाज तरी निघेल कसा ? त्यांत किडा असावा हें तिच्या डोक्यानें पक्कें घेतलें. या घड्याळानेंच सर्व आपत्ती ओढवल्या अशी तिची ठाम समजूत झाली. लगेच नातवाच्या खोलींत जाऊन तिनें तें घड्याळ घेतलें, आणि घरांत नेऊन तें एका दगडावर ठेऊन, वरून दगड मारून तिनें त्याचे तुकडे तुकडे केले. अशा रीतीनें तिनें त्या दुष्ट घड्याळाचा सूड घेतला. हिंदुस्तानांतील आजीबाईचें अज्ञान पाहून तुम्हांला हंसू येईल. परंतु, दुसऱ्या कांहीं बाबतींत तुमचीहि स्थिति तिकडील आजीबाईसारखीच केविलवाणी आहे. दोन गोष्टींचा बादरायण संबंध जोडून देऊन एकामुळें दुसरी झाली असें अनुमान करण्याची लोकांची प्रायः प्रवृत्ति असते. विशेषतः पाश्चात्यांची विचारसरणी विपरीत पूर्वग्रहांनीं दूषित झालेली असल्यामुळें भलतेंच तर्कशास्त्र लढवून वेदान्तामुळेंच भरतवर्षाचा ऱ्हास झाला, असा भलताच सिद्धान्त ते एकदम ठोकून देतात.

याचप्रमाणें इतर बाबतींतहि भलतेच कार्यकारणभाव जोडून, हवीं तीं अनुमानें ते काढीत असतात.

युरोप आणि अमेरिका हे देश आज उन्नतावस्थेप्रत पोहोंचलेले दिसत आहेत. परंतु, ही उन्नति ख्रिस्तामुळें किंवा त्याच्या उपदेशामुळें झालेली नाहीं, हें लक्षांत ठेवा. अजाणतां वेदान्त व्यवहारांत आणल्याचा तो परिणाम आहे. वेदान्तानुकूल आचरण हेंच तुमच्या उत्कर्षाचें वास्तविक कारण किंवा रहस्य आहे. वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत येत नसल्यामुळें, वेदान्त आणि व्यवहार यांची फारकत झाल्यामुळेंच ऐहिक उन्नतीच्या दृष्टीनें भरतवर्ष आज रसातळाला गेलेलें दिसत आहे.

## मातेची थोरवी

जगदुद्धाराचे बाबतींत माता केवढी महत्त्वाची कामगिरी बजावीत असतात, या संबंधानें राम आतां दोन शब्द बोलणार आहे, ते आपण सावधानतेनें ऐकावे. जगांत जे जे वीर पुरुष होऊन गेले त्या सर्वांच्या आया आणि आज्या फार थोर आणि सच्छील होत्या.

सर्व जगाची उन्नति करणें हें आयांच्या हातीं आहे. तसेंच, देशाची उन्नति किंवा अवनति करणें हें त्यांच्याच हातांत असतें. सृष्टींतील भरती ओहोटी त्याच घडवून आणीत असतात. थोर मातेच्या पोटींच थोर महात्मे किंवा वीर पुरुष जन्माला येतात. अगदीं लहानपणींच मुलांना वेदान्ताचें बाळकडू पाजण्यांत येईल, वैराग्याचें सामर्थ्य लहानपणींच त्यांच्या मनांत ठसविलें जाईल, वेदान्ताच्या वातावरणांत त्यांचें संगोपन होईल, तर तीं मोठेपणीं ख्रिस्त किंवा कृष्ण होऊं शकतील, यांत तिळमात्र शंका नाहीं.

आया मुलांचा स्वभाव बिघडवूं शकतात, किंवा त्याला उन्नत आणि उदात्त बनवूं शकतात. एवढी महत्त्वाची कामगिरी आयांच्या हातीं असते. युद्धास निघालेल्या तरुण मुलाला निरोप देतांना स्पार्टा देशांतील एका मातेनें काढलेले बाणेदार उद्गार तुम्हीं ऐकले असतील. ती म्हणाली, " तरवारींचे वार घेऊन किंवा तरवारीवर शिरकमल ठेवून ये; परंतु, भेकडासारखा दोन हात केल्याशिवाय परत येऊं नको. समरांगणावर झुंजत असतांना तूं मला सोडून गेलास तरी बेहेत्तर! पण हार खाऊन काळें तोंड मला दाखवूं नकोस!"

फत्तेआबादच्या लढाईत हार खाऊन राजधानीस परत आलेल्या महाराजा जसवंत सिंहाची त्याच्या तेजस्वी व मानी राणीनें कोणत्या प्रकारें संभावना

केली, हें इतिहासवाचकांस माहीत आहेच. पराभव होऊन महाराजा परत येत आहेत, ही खबर कळतांच तिनें किल्ल्याचे दरवाजे बंद केले, आणि असा निरोप पाठविला कीं, "आपण माझे स्वामीच नव्हेत; मेवाडच्या महाराण्यांचा जामात इतका नीच कधींहि असूं शकणार नाहीं. आपण हें लक्षांत वागवलें पाहिजे होतें कीं, उत्तम वंशाशीं संबंध केल्यावर त्या वंशाच्या उज्वल कीर्तीला शोभेल असेंच वर्तन आपल्या हातून घडलें पाहिजे. विजयश्रीच्या प्राप्तीचा संभव दिसत नसल्यास शत्रूंशीं झुंजत झुंजत समरभूमीवरच देह ठेवणें आपणांस उचित व आवश्यक होतें."

## मदालसेची शिक्षणपद्धति

आर्यांच्या मार्कंडेय पुराणांत मदालसा राणीची गोष्ट* प्रसिद्ध आहे. आपल्या सर्व मुलांना, 'पुनरपि जननं, पुनरपि मरणं' या जन्ममृत्युपरंपरेपासून

---

* शत्रुजित् नांवाच्या एका महापराक्रमी राजाचा ऋतुध्वज उर्फ कुवलयाश्व नांवाचा पुत्र असून त्याचा विश्वावसु नामक गंधर्वाच्या मदालसा नामक कन्येशीं विवाह झाला होता. राणी मदालसा हिला ऋतुध्वजापासून विक्रांत, सुबाहु, शत्रुमर्दन आणि अलर्क असे चार पुत्र झाले. मदालसा राणी ज्ञानी असून तिनें पहिल्या तीन पुत्रांना बोध करून आत्मनिष्ठ केलें; व त्यामुळें ते संन्यस्त वृत्तीनें राहूं लागले. अलर्कालाहि तिनें आत्मज्ञानाचा बोध करण्याला प्रारंभ केला; परंतु, 'आपले सर्व पुत्र वैराग्यसंपन्न झाले असतां, पुढें संतानाचा अभाव होईल,' असें राजाला वाटून अलर्काला तरी प्रवृत्तिधर्माचा उपदेश करण्याविषयीं त्यानें राणीला आग्रहानें सांगितलें; व त्याप्रमाणें राणीनें त्याला प्रवृत्ति-धर्माचा उपदेश केला. पुढें ऋतुध्वजानें अलर्काला राज्याभिषेक केला, व तपश्चर्या करण्याकरितां तो भार्येसह निघून गेला. जातांना राणीनें अलर्काला शेवटचा उपदेश केला, व 'राज्य करीत असतां इष्टबंधुवियोग, शत्रुबाधा, द्रव्यनाश व देहपीडा ह्यांपासून तुला असह्य दुःख झालें असतां ह्या अंगठींत सूक्ष्म अक्षरांनीं लिहिलेलें आज्ञापत्र ठेवलें आहे, तें वाच;' असें सांगून एक सोन्याची अंगठी त्याला दिली. पुढें राजा अलर्क हा विषयोपभोगांत दंग झाला आहे, असें वनांत संचार करणाऱ्या त्याच्या सुबाहु नामक भ्रात्याला समजलें. तेव्हां त्याला बोध व्हावा ह्या हेतूनें काशीराजाकडे जाऊन अलर्कावर

मुक्त करण्याचा तिनें निश्चय केला. मुलांना संसारचक्रांतून सोडवून मोक्षपदाचे अधिकारी करणें, हेंच भरतवर्षातील मातांचें एकमेव ध्येय व उद्दिष्ट असतें. आत्मज्ञानसंपन्न पुरुष सदैव मुक्त असतो. जन्ममृत्युपरंपरेंतून तो कायमचा सुटतो. म्हणून आपली सर्व प्रजा आत्मानुभवसंपन्न—अर्थात् जविन्मुक्त करण्याची तिनें प्रतिज्ञा केली. स्वराज्यांत जिकडे तिकडे अनुभवी महात्मे निर्माण करण्याचा तिनें निश्चय केला. फक्त एका मातेनें केलेला हा एक सत्य संकल्प होता, आणि तो तिनें तडीस नेला. तिचे मुलगे कृष्ण, खिस्त किंवा बुद्ध यांप्रमाणें पूर्णपणें विरक्त व आत्मज्ञानसंपन्न झाले. त्यांच्या वैराग्याचा व आत्मनिष्ठेचा प्रजेवर परिणाम होऊन सर्व प्रजा ज्ञानी व मुक्त झाली. एका आर्य स्त्रीला एवढी महत्वाची कामगिरी बजावतां आली. हें महत्कार्य घडवून आणण्यास तिनें कोणत्या मार्गाचा अवलंब केला होता म्हणाल, तर मुलांना स्तन पाजतांना, त्यांना पाळण्यांत वाल्लून हालवितांना, निजवतांना किंवा खेळवतांना आध्यात्मज्ञानरूपी अमृत पाजण्याचा तिचा नेहमींचा क्रम असे. ओंव्या आणि पाळणे यांच्या रूपानें दिव्यज्ञान त्यांच्या डोक्यांत भरवून वेदान्ताचे संस्कार ती त्यांच्या मनावर करीत असे. ÷

---

स्वारी करण्याविषयीं सुवाहूनें त्याचें मन वळविलें. त्याप्रमाणें काशीराजानें अलर्काच्या राजधानीला वेढा दिला. परचक्रानें पीडित झालेला अलर्क राजा शत्रूचा प्रतिकार करण्यास असमर्थ असल्यामुळें अत्यंत खिन्न झाला, विचार करतां करतां मातेनें दिलेल्या अंगठीची त्याला आठवण झाली; व तींतील आज्ञापत्र काढून तें त्यानें वाचलें, त्यांत पुढील मजकूर होता, ' संगःसर्वात्मना त्याज्यः स चेत्त्यक्तुं न शक्यते। स सद्भिःसह कर्तव्यः सताम् संगो हि भेषजम् ॥ कामःसर्वात्मना हेयो दातुं चेच्छक्यते न सः। मुमुक्षां प्रति तत्कार्यं सैव तस्यापि भेषजम् ॥ ' नंतर दत्तात्रेयाच्या प्रसादानें तो आत्मज्ञानसंपन्न झाला, व काशीराजा किंवा सुबाहु यांना राज्य देण्याला कबूल झाला. अलर्काला आत्मबोध व्हावा हीच सुबाहूची इच्छा होती; व ती याप्रमाणें सफल झाली. इकडे ज्येष्ठ पुत्राला राज्याभिषेक करून निःसंग होऊन तपश्चर्येकरितां अलर्क वनांत गेला. मार्कंडेय पुराण अध्याय १८–४१.

÷ स्तन पाजितां निजवितां हालवितां बाळकासि खेळवितां ॥
दे बोध, जो दुर्लभ थोरांसि महत्कष्टें मेळवितां ॥ मोरोपंत.

## मदालसेचा पाळणा.

(चाल:—जयकृष्णा तटवासा.)

निज बाळा निज बाळा ।
स्मितहासा वेल्हाळा ।
धरिं मी करतलताला ॥ धृ० ॥

नलगे स्फुंदन तव तें ।
नलगे तव रोदन तें ।
नलगे आक्रंदन तें ।
विश्रम; भय सोडुनि तें ।
गाई तव नुतिगीतें ।
सुरवर परिजन मेळा ॥ १ ॥

हे श्रीसौंदर्यकरा ! ।
विश्वपते ! तूं चतुरा ।
आत्मा तव विमल हिरा ।
दे गति शासोनि धरा ।
वानुनियां ज्यासि गिरा ।
थकली ही कविबाला ॥ २ ॥

दंवबिंदू, मृदुलकमल ।
मंदवात मधु परिमल ।
तनु-सौख्यद रविकरबल ।
प्रियगीतें ध्वनि मंजुल ।
श्रवणनयनसुखद सकल ।
त्वद्रूपज तें बाळा ॥ ३ ॥

पूर्ण असासि ॐकारा ।
निःसंगा निर्वैरा ।
स्वानंदसुधाधारा ।
अचला अभया सारा ।
मधुरा प्रेमागारा ।
मृदुला शान्ता बाळा ॥ ४ ॥
तारागण भुवनाचा ।
कळस उभविला साचा ।
रविशशि कंदुक यांचा ।
खेळ तुझा कुतुकाचा
हरिधनु तव सदनाचा ।
विलसतसे ध्वज बाळा ॥ ५ ॥
स्वर्गंगा चालाया ।
तुजला हे प्रभुराया! ।
तुजविषयीं बोलाया ।
लागति नभि वन गाया ।
ब्रह्मांडें प्रतिमा या ।
गाती नाचति बाळा ॥ ६ ॥
चंपकांत, अंबुजांत, ।
कासारीं, निर्झरांत, ।
निद्रा, रुचि, तव नितान्त ।
कालहि अवकाश त्यांत ।
ऊर्णपटें भासतात ।
लोटी करें दुरि बाळा ॥ ७ ॥
अर्धोन्मीलित नयनीं ।
निद्रा घे शिशु शयनीं ।
प्रिय चपल स्मित, सुमनीं ।
गणिं नच दिन वा रजनी ।
आशा न धनीं न जनीं ।
ॐतत् सत् तूं बाळा ॥ ८ ॥

वंशनाद कोकिलरव।
खुळखुळेचि किरकिर तव।
चटक, पवन तारा नव।
क्रीडनकें स्यंदन तव।
जग सारें स्वप्नचि तव।
दिसत पृथक् जरि बाळा॥९॥

निद्राविश्रांतिगृहा।
ज्ञानार्का! तूंचि अहा।
जीवन, कृति उभय पहा।
जरि निर्झर सुखद महा।
कारण असती कलहा।
नष्ट तमा करि बाळा॥ १० ॥

आशा बहु कमनीया।
वस्तु परम रमणीया।
पंखस्वन तव राया।
स्तुतिरव गरुडा! गाया।
चंचल पत्रच्छाया।
निज बाळा निज बाळा॥११॥

अर्धस्फुट रूप असें।
विश्वातें मोहितसें।
मायापटिं लपुनि बसे।
पांघरुनी पट विलसे।
परमात्मा रुचिर दिसे।
ॐतत् सत् हे बाळा॥ १२॥

---

आतां वाचून दाखविलेल्या पाळण्यावरून ती वेदान्तनिष्ठ मदालसा राणी आपल्या सात पुत्रांना कोणत्या प्रकारचीं गाणीं म्हणत असे, याची तुम्हांला थोडीशी कल्पना येईल. जन्मदिवसापासून वेदान्ताचें बाळकडू पोटांत गेल्या-मुळें त्या सातहि पुत्रांच्या ठिकाणीं अल्प वयांतच वैराग्य बाणून, राज्यवैभ-

वाचा त्याग करून तपश्चर्येकरितां ते वनांत निघून गेले. त्यांच्या रोमारोमांत ब्रह्मज्ञ.न बाणलें गेल्य.मुळें ते ज्या ज्या ठिकाणीं जात, त्या त्या ठिकाणच्या लेकांवर त्यांच्या तीव्र वैराग्याचा परिणाम घडून वेदान्ताचीं तत्वें त्यांच्या अन्तःकरणांत ठसत असत; व अशा रीतीनें वेदान्ततत्त्वांचा सर्वत्र प्रसार होत असे. पहिल्या सात मुलांप्रमाणें आठव्या मुलानेंहि राजपदाचा त्याग करून तपोवनाचा मार्ग सुधारावा, ही राजा ऋतुध्वजाची इच्छा नसल्यामुळें आठव्या पुत्राला निराळेंच वळण लावण्याचा निश्चय करून, त्याच्या शिक्षणाची दिशाच तिनें बदलली. आतां वाचून दाखविलेला पाळणा ती या मुलाला म्हणून दाखवीत नसे. परंतु, सर्व मुलांनाच काय, पण सर्व प्रजेला ज्ञानी करून मुक्त करण्याची तिची प्रतिज्ञा होती. मुलगा गादीवर बसला, अर्थात् प्रपंचांत राहिला, तरी प्रपंचाच्या पाशांनीं बद्ध होऊन त्यानें दुःखी होऊं नये, मोक्षसंपत्तीचा तोहि अधिकारी व्हावा, ही राणीची उत्कट इच्छा होती. त्या इच्छेनुसार या आठव्या मुलाच्या शिक्षणासंबंधानें तिनें पुढील योजना केली. मुलाचें संगोपन स्वतः न करितां तें तिनें एका दाईकडे सोंपविलें. पुढें कांहीं दिवसांनीं ती आसन्नमरण झाली असतां, तिनें मुलाला आपल्याजवळ बोलावून त्याला एक रत्नजडित सोन्याची अंगठी दिली आणि म्हटलें, "बाळा अलर्का, ही अंगठी फार जपून ठेव. ज्या वेळीं तुझ्यावर एखादें अरिष्ट कोसळून तूं अत्यंत दुःखी होशील, त्या वेळीं या अंगठींतील सूक्ष्म अक्षरांनीं पटावर लिहिलेलें आज्ञापत्र काढून वाच, त्यांतील बोधाचें मनन कर आणि त्याप्रमाणें वाग म्हणजे तूं दुःखनिर्मुक्त होशील." याप्रमाणें उपदेश केल्यावर राणीनें आपला देह ठेवला. पुढें कांहीं दिवसांनीं ऋतुध्वज राजाहि कालवश झाला, आणि त्याच्या मागून हा आठवा मुलगा गादीवर बसला व त्यानें पुष्कळ वर्षे राज्य केलें.

## अलर्काला वैराग्य

एके दिवशीं अलर्क राजाच्या वडील भावांनीं त्याला असा निरोप पाठविला कीं, 'आम्हीं तुझ्याहून वडील आहों, व वडील भाऊच गादीचा कायदेशीर वारस आहे, करितां राज्य तूं त्याच्या स्वाधीन कर, नाहींपेक्षां युद्धास तयार हो.' हा निरोप कानीं पडतांच महाराजा अलर्क घाबरून गेला. थोरला भाऊच वस्तविक गादीचा अधिकारी आहे; त्यालाच आतां राज्यपद जाणार, अर्थात्

आपलें सर्व वैभव व ऐश्वर्य नाहींसें होईल; हा विचार मनांत येऊन त्याला अत्यंत दुःख झालें. त्याच्या डोळ्यांत अश्रु आले. उद्विग्न व चिंतातुर होत्साता रात्रीं तो अंथरुणावर पडला असतां, मातेनें दिलेल्या अंगठीकडे त्याचें लक्ष गेलें; लगेच अंगठींतील आज्ञापत्राची त्याला आठवण झाली. तसाच तो उठला आणि अंगठींतील आज्ञापत्र काढून अश्रुपूर्ण नयनांनीं तें वाचूं लागला. आज्ञापत्रांत पुढील मजकूर होता. ' तूं तत्वतः शुद्ध व अविकार्य आहेस, सर्व ज्ञान तूंच आहेस, तूं ज्ञानमयच आहेस; सर्व शक्तीचा उगम तूंच असून, सर्व सत्ताधीशहि तूंच आहेस, सर्व सौंदर्याचा केंद्र, दाता—प्रतिदाता तूंच आहेस, सर्व आनंदाचा कंद तूंच आहेस. हें क्षुद्र शरीर म्हणजे मी, अशी अंतःकरणाची भावना करूं नको. बाह्य वस्तूंवर अवलंबून न राहतां त्यांच्या अतीत होण्याचा अभ्यास कर. या उपदेशाचें मनन कर, त्याचा अनुभव कर, म्हणजे शत्रु व मित्र आपणच आहों, याचा तुला प्रत्यय होईल.'* थोडा वेळ विचार केल्या-वर मातेचा उपदेश त्याला पूर्णपणें पटला. लगेच त्याची सर्व चिंता व भीति नाहींशी होऊन आनंदानें आणि उत्साहानें त्याचा चेहरा प्रफुल्लित झाला. मातेचें आज्ञापत्र त्यानें कितीदां तरी वाचलें. मातेच्या आज्ञापत्राचा प्रभाव म्हणा किंवा तिच्या सदिच्छेचा परिणाम म्हणा, त्याच्यांत नवीन सामर्थ्य आलें, मनांतील कालवाकालव नाहींशी होऊन चित्त स्थिर झालें; सर्व प्रकारची भीति आणि चिंता, सर्व प्रकारचीं दुःखें यांच्या तो अतीत झाला; सर्व प्रका-रच्या क्षुद्र वासनांचा, राज्यवैभवादि ऐहिक सुखांचा त्यानें मनःपूर्वक त्याग केला. आज्ञापत्रांतील मातेच्या उपदेशानें त्याच्या ठिकाणीं इतकें कडकडीत वैराग्य बाणलें, त्याच्या ठिकाणीं इतकें सामर्थ्य व तेज आलें, कीं तें त्याच्या रोमारोमांतून स्रवूं लागलें. झोंपणेंबिपणें तो पार विसरून गेला. लगेच पोषाख करून तो आपल्या बन्धूंकडे गेला, आणि उच्च स्वरानें म्हणाला, 'बन्धूंनो, हा राज्यभार तुम्हीं खुशाल आपणांकडे घ्या. राज्यशकटाचें हें जड जोखड

---

* मुळांत पुढीलप्रमाणें उपदेश आहे. ' संग सर्वस्वी त्याज्य होय; तथापि तो सुटणें अशक्य असेल तर साधूं'चा सहवास करावा. कारण, सत्संग हें औषध आहे. काम सर्वस्वी त्याज्य आहे; तथापि तो सुटणें अशक्य असल्यास निदान तो मुमुक्षेसंबंधानें असूं द्यावा. कारण, मुमुक्षा ( मुक्तीची इच्छा ) हें कामाचेंहि औषध आहे,

माझ्या मानेवरून केव्हां जाईल असेंच मला झालें आहे. कपाळशूळ उत्पन्न करणारा हा राजमुगुट मोठ्या आनंदानें मी तुमच्या स्वाधीन करीत आहें. राज्यकारभाराचें जूं आपल्या मानेवर घेऊन माझी मान एकदांची मोकळी करा. राज्यपदाची महत्त्वाकांक्षा बाळगणारीं हीं सर्व शरीरें माझींच आहेत. तुमच्या ठिकाणींहि मीच आहें, तुम्हीं आणि मी एकच आहों, याचें मला आतां ज्ञान झालें आहे. मी तूं हा भेदभावच आतां माझ्या ठिकाणीं उरलेला नाहीं." त्याच्या चेहऱ्यावर झळकत असलेलें दिव्य ज्ञानाचें तेज पाहून त्याच्या वडील बन्धूंना अत्यंत संतोष झाला. ते म्हणाले, "वत्सा अलर्का, तुझ्याकडून राज्य हिरावून घेण्याकरितां आम्हीं तुझ्यावर चालून आलों नाहीं; हें लक्षांत ठेव. मातृप्रसादानें दिव्य ज्ञान लाधल्यामुळें अखिल विश्वाचेच आम्हीं राजे आहों. आपलें दिव्यत्व ओळखणें हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे. त्याची तुला आठवण करून देण्याकरितांच आम्हीं हा व्यूह रचला होता. बाळा अलर्का, इंद्रियांकडून फसवला जाणारा तो कांहीं तूं नव्हेस; तसेंच, केवळ महीतलाचाच तूं अधिपति नसून, स्वर्गमृत्युपातालादि सर्व लोकांचा, चंद्र, सूर्य, तारे इत्यादिकांचा, अखिल ब्रह्मांडाचा तूं स्वामी आहेस. सर्व सूर्यांचा सूर्य, सर्व तेजांचें तेज तें मीच, याचा अनुभव कर, मी अनंत आणि अविकार्य आहें, हें तत्त्व अनुभूत करून घे." ज्येष्ठ भ्रात्यांच्या इच्छेप्रमाणें 'अहं ब्रह्मास्मि' या सिद्धान्ताचा त्यानें अनुभव करून घेतला. नंतर पुष्कळ वर्षें त्या महात्मा अलर्कानें राज्य केलें; परंतु, या संसाररूपी नाटकांत आपण राजाची भूमिका घेतली आहे; तें आपलें वास्तविक स्वरूप नसून तें एक सोंग आहे, हें तो पूर्णपणें ओळखून होता. आत्मज्ञान झाल्यामुळें पुढें त्याला केव्हांहि दुःख झालें नाहीं. समुद्रवलयांकित साम्राज्याचा कारभार त्यानें मोठ्या सामर्थ्यानें व यशस्वितेनें चालविला. यशस्विता त्याच्या पाठीस लागली.

आत्मज्ञान संपादन करा, म्हणजे अखंड शांति आणि नित्य आनंद हीं तुम्हांला ठेवलेलींच आहेत. नव्हे, अखंड शांति व नित्य आनंद—सच्चिदानंदच तुम्हीं आहां. आत्मकेंद्र शोधून काढा आणि तेथून केव्हांहि ढळूं नका.

ॐ! ॐ!! ॐ!!!

# आरण्यक संवाद

## सर्वोत्तम वादनाचार्य



का ख्रिस्ती मंदिरांत एक सुंदर बाजा ठेवलेला होता. हा बाजा इतका नामी साधला होता कीं, तेथील बाजा वाजविणारा एखाद्या नवशिक्याला त्या बाजाला नुसता हातहि लावूं देत नसे. एके दिवशीं मंदिरांत उपासना चालू असतां भिकारडा पोषाक केलेल्या एका गृहस्थानें बाजा वाजविण्यासंबंधानें आपली इच्छा प्रदर्शित केली. परंतु बाजा वाजविणारानें त्याला नुसतें बाजाजवळ येऊंहि दिलें नाहीं. या गृहस्थाची धर्मोपदेशकांशीं किंवा इतर कोणाशीं ओळख नव्हती. आणि बाजा ही एक अपूर्व चीज मानली जात असल्यामुळें बाजाला त्याला कोणी हात लावूं देईना. उपासना आटोपल्यावर जेव्हां बाजेवाला आपल्या जागेवरून उठला, तेव्हां हा परका मनुष्य हळूच बाजाजवळ गेला. बाजाच्या पट्ट्यांवर त्यानें बोटें ठेवतांक्षणींच आपला गुरु आला असें त्या बाजानें ओळखलें, आणि अशा तऱ्हेचे मंजुळ सूर त्यांतून निघूं लागले कीं, जरी मंडळी निघून जाण्यास तयार झाली होती, तथापि पेटीचे सूर ऐकून ती जेथल्यातेथें तटस्थ राहिली. पेटीनें ते इतके लुब्ध होऊन गेले कीं, ती जागा सोडून त्यांच्यानें बाहेर जाववेना. ज्या वाद्यानें लोक इतके मोहून गेले होते तें वाद्य—मंदिरांतील बाजा—या परक्या गृहस्थानेंच बनविला होता.

हा देहरूपी बाजा वाजविण्याची आपण परमेश्वराला, त्या सर्वोत्तम वादनाचार्याला संधीच देत नाहीं. आपण नेहमीं हें क्षुद्र शरीर किंवा मन यांचीच काळजी वाहात असतों. त्यांवरील ममत्व नाहींसें करून तीं ईश्वरार्पण करीत नाहीं; त्यामुळें आपल्या बाजांतून कर्कश सूर निघावे, हें वाजवीच होय. हें वाद्य तयार करणारालाच तें वाजवूं द्या, प्रत्यक्ष परमात्म्याचीं बोटें या वाद्याच्या पट्ट्यांवरून फिरूं द्या; प्रेममय परमात्म्याच्या बोटांचा पट्ट्यांना स्पर्श झाला कीं, तुम्हा कधीं स्वप्नींहि ऐकले नसतील, अशा तऱ्हेचे दिव्य ध्वनि त्या वाद्यांतून निघूं लागतील; तालबद्ध आणि सुस्वर असें संगीत तुमच्या कानीं पडेल.

## दिव्यदृष्टि कशी येईल ?

प्रश्नः—महाराज, आम्हीं ज्ञानस्वरूप आहों, मूर्तिमंत ज्ञानच आहों, असें आपण नेहमीं सांगत असतां. तरी वेदान्ताची दिव्यदृष्टि प्राप्त करून घेण्याचा एखादा सुलभ उपाय कृपा करून मला सांगा कीं तेणेंकरून येत्या वकिलीच्या परीक्षेंत पुस्तकें वाचल्याशिवायच पहिलें बक्षीस मला मिळवितां येईल !

उत्तरः—एकदां एक राजपुत्र सरदारांच्या मुलांबरोबर अंधळी कोशिंबीर खेळत होता. त्याच्यावर राज्य आलें तेव्हां त्याला बराच वेळ कोणी सांपडेना. तें पाहून तेथील एक गृहस्थ म्हणाला, ' राजपुत्रा, भिडू शोधून काढण्यासाठीं इतकी दगदग कशाला करतोस. तूं राजाचा मुलगा आहेस; त्यांना आपणांपुढें हजर होण्याचा एकदम सक्त हुकूम कर, म्हणजे ताबडतोब सर्व भिडू तुझ्यासमोर येऊन उभे राहतील.' त्यावर राजपुत्रानें उत्तर केलें कीं, ' तुम्हीं म्हणतां तें बरोबर आहे. माझ्या हुकुमाबरोबर सर्व मुलें माझ्यापुढें येऊन उभीं राहतील, ही गोष्ट खरी. परंतु, मग त्या खेळांत मौज रहाणार नाहीं. तो खेळ न होतां हुकमतीचा प्रकार होईल. बरोबरीच्या नात्याशिवाय—परस्पर-प्रेमाशिवाय खेळ नाहीं, किंवा त्या खेळांत स्वारस्यहि नाहीं. हाच न्याय आपल्या आत्मस्वरूपाला लागू आहे. वस्तुतः आपण सर्वज्ञ आणि सर्व-सत्ताधीश विश्वेश्वरच आहों; परंतु, ज्या अर्थीं केवळ कौतुकानें आपण होऊन हा जगरूपी अंधळ्याकोशिंबिरीचा डाव आपण सुरू केला आहे, आणि आपणांवर राज्य येऊन आपले भिडू शोधून काढण्याचें—निरनिराळे अभ्यास, व्यासंग व व्यवसाय करण्याचें—आपण आपखुषीनें पत्करलें आहे, त्या अर्थीं आपली सत्ता गाजवून खेळाचा विरस करणें वाजवी होणार नाहीं. जी दिव्य दृष्टि प्राप्त झाली असतां, वर्तमान, भूत आणि भविष्यत् हे तिन्ही काळ, तसेंच हजारों सूर्य आणि असंख्य तारे आपणांतच दिसूं लागतात, जी प्राप्त झाली असतां जगांतील प्रत्येक वस्तु आपल्या ज्ञानोदधीवरील लहरींप्रमाणें भासते, ती प्राप्त झाली म्हणजे, अर्थात् आपण स्वतःच ज्ञानोदधि झाल्यावर वकिलीची परीक्षा, नांवलौकिक किंवा पैसाअडका यांची तुम्हांला यत्किंचित् तरी किंमत वाटेल काय ? वेदान्ताची दिव्यदृष्टि प्राप्त करून घेणें असेल, तर ज्या विषयसुखां-करितां ती दिव्यदृष्टि तुम्हांला हवीशी वाटते तीं सुखें, आणि त्या विषय-सुखांची आवड वाटणारी मनाची वृत्ति यांचा प्रथम त्याग केला पाहिजे, विषयांच्या आणि विषयवासनांच्या अतीत झालें पाहिजे.

मासे धरण्याकरितां एकदां एके ठिकाणीं जाळें लावण्यांत आलें होतें. जाळ्यांत एक भला मोठा मासा सांपडला, परंतु तो एवढा प्रचंड होता कीं, तो जाळेंच ओढून घेऊन गेला. वेदान्ताची दिव्यदृष्टि किंवा अन्तर्ज्ञान हें या गोष्टींतील प्रचंड माशाप्रमाणें मोठें विलक्षण असून तें वासनाजाल साफ नाहींसें करून टाकतें. सारांश काय कीं, विषयविरक्तीशिवाय आत्मज्ञान होणें शक्य नाहीं. ज्ञानसंपादनाची आपली नेहमीची पद्धत ही एका दृष्टीनें वेदान्ताच्या अतींद्रिय ज्ञानाचीच पद्धत होय; कारण, अध्ययन करीत असतांना सहजींच मीतूंपणाचा—द्वैतभावाचा लय होऊन चित्ताची एकाग्रता होत असते.

## तेजस्वी इमाम गिजाली

इमाम गिजाली× याच्या संबंधानें अशी गोष्ट सांगतात कीं, विद्यार्थि-दशेंत असतांना, दिवसभर परिश्रम करून एके दिवशीं रात्रीं तो झोंपी गेला असतां, त्याला एक स्वप्न पडलें. ख्वाजा खिज्र * स्वप्नांत येऊन त्याला म्हणाला, ' तूं एवढे अभ्यासाचे परिश्रम कशाला करतोस ? तुझी इच्छा असल्यास एका फुंकारासरशी जगांतील सर्व ज्ञान मी तुला प्राप्त करून देतों.'

---

× इमाम गिजालीः—फारसी संत कवि. याचें संपूर्ण नांव इमाम इब्न्–ए–हमीद जैन–उद्–दीन अल्तूसी असें आहे. खुरासान प्रांतांतील तूस नामक गांवांत इ. स. १०५८ त याचा जन्म झाला. हा प्रतिभासंपन्न आणि प्रासादिक कवि असून फारसी आणि आरबी भाषेंत मिळून त्यानें एकंदर नव्याण्णव ग्रंथ लिहिले आहेत. इह्या–इ–उलूम–उद्–दीन हा त्याचा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. सुफी पंथाचा प्रसार करण्यांत त्यानें आपलें सर्व आयुष्य घालविलें. इ. स. ११११ सालीं तो मरण पावला.

* ख्वाजा खिज्रः—खिज्र या शब्दाचा अर्थ हिरवा असा आहे. ख्वाजा खिज्र हा एक साधु असून त्याच्या पादस्पर्शानें प्रत्येक जागा एकदम हिरवी गार होत असे, असें मानतात. अरण्य आणि नद्या यांचा हा अधिष्ठाता देव असून रानावनांतून वाट चुकलेल्या लोकांना मार्ग दाखविण्याकरितां, किंवा समुद्रांत बुडून मरणारांना हात देण्याकरितां याची प्रार्थना करतात.

इमाम गिजाली मोठा स्वाभिमानी होता. त्यानें तें साफ नाकारलें. तो म्हणाला, ' मजवर कृपाच करावयाची असेल, तर अभ्यासाकरितां दिव्याला तेल मिळण्याची व्यवस्था कर, म्हणजे झालें ! ' जवळच्या आड वाटेपेक्षां लांबीचा राजमार्गच त्यानें पसंत केला. मागल्या वाटेनें चोरून स्वर्गभुवनांत प्रवेश करणें त्याच्या तेजस्वी व बाणेदार वृत्तीला रुचलें नाहीं.

## निरिच्छता हीच यशाची गुरुकिल्ली

' असें कर, तसें कर, ' म्हणून देवाला उपदेश करण्याच्या भरीस पडूं नका; किंवा आपल्या स्वतःच्या इच्छाहि देवावर लादण्याचा प्रयत्न करूं नका; तर क्षुद्र अहंकार टाकून देऊन ईश्वराला अनन्य भावानें शरण जा. आपल्या सर्व अस्वाभाविक इच्छा टाकून द्या; म्हणजे तुमचें शरीर व मन दिव्य व तेजस्वी होईल. सर्व प्रकारचें खरें ज्ञान आणि खरें शिक्षण पुस्तकांपासून किंवा दुसऱ्यांपासून प्राप्त होत नसून आपल्या अंतःकरणांतूनच तें प्रगट होतें. सर्व ज्ञानाचा उगम बाहेर कोठें नसून आपणांपाशींच, आपल्या या हृदयांत आहे. अलौकिक बुद्धिमत्तेचे पुरुष जेव्हां एखादी नवीन कल्पना काढतात, किंवा एखादा नवीन शोध लावतात, त्या वेळीं त्यांची वृत्ति परमात्मस्वरूपाशीं पूर्णपणें तादात्म्य पावलेली असते. मी हा शोध लावीत आहें, यानें माझा मोठा लौकिक होईल, अशा प्रकारच्या स्वार्थी इच्छांच्या किंवा क्षुद्र अहंकाराच्या ते त्या वेळीं पूर्णपणें अतीत असतात. व्यक्तित्वाचा—क्षुद्र अहंकाराचा मळ धुऊन काढून ते स्वतःस पारदर्शक बनवितात; तेव्हांच, दिव्य ज्ञानाचा प्रकाश त्यांच्या ठिकाणीं चमकूं लागतो, त्याच्यायोगानें ते पुस्तकांवर प्रकाश पाडतात, आणि पुस्तकालयांना प्रकाशित करतात. निरहंकारवृत्तींत असतांनाच अलौकिक ग्रंथरचना, व अपूर्व शोध नेहमीं होत असतात. यालाच कर्म म्हणतात. काबाडकष्ट म्हणजे कर्म असें रामाचें बिलकुल म्हणणें नाहीं. विश्वाशीं तादात्म्य करणें, परमात्मस्वरूपाशीं एकतानता पावणें, हेंच वेदान्तदृष्ट्या कर्म होय. वृत्ति स्वरूपाकार करून निरहंकार होणें हेंच खरें कर्म आहे. यालाच कधीं कधीं लोक अज्ञानानें अकर्म किंवा आलस्य म्हणून नांवें ठेवतात. फार परिश्रमाचीं कामेंसुद्धां वेदान्तदृष्टीनें केलीं असतां कष्टाचीं नसून सुखाचीं गंमतीचींच होत, निव्वळ खेळ होत, असें तुम्हांला दिसून

येईल. कर्तव्याची जबाबदारी या नात्यानें कांहीं करावयाचें नसून नेहमीं काम करीत राहणें, हें वेदान्ताचें सार आहे. वेदान्तदृष्टीनें कर्म करीत गेल्यास यशाच्यामागें लागण्याचें तुम्हांला कारण नाहीं. उलट यशच तुमच्या मागें लागत येईल. कारण, निरिच्छता हीच यशाची गुरुकिल्ली आहे.

ॐ! ॐ!! ॐ!!!



# सनातन धर्म *

( चाल—नृपममता रामावरती )

त्यागियलें प्रियवृंदाला, अरिवियोग तैसा घडला
या क्षणीं ।
सोयरीं धायरीं मेलीं, बंधनें तटतटां तुटलीं
या क्षणीं ।
आमुचे हेतु गमतीचे, येवोत सुदिनही त्यांचे
या क्षणीं ।
जावोत निघोनि सुखानें, रथचक्राच्या न्यायानें
या क्षणीं ।
चाल—रुजतात, वृक्ष फुलतात, विहग रमतात,
भक्ष कालाला, भक्ष कालाला,
कोमेजे ती सुममाला
कधि तरी ॥ १ ॥

दीपाची विझते ज्योती, प्रेमाची भंगे मूर्ती
जगतिं या ।
सद्रूप कुरूपहि होतें, यश, नाम लयाला जातें
जगतिं या ।
वैभव हें मंदिर वांया, कीं वाळूवरचा पाया
जगतिं या ।
हो राजा अथवा राणी, कीं अळवावरचें पाणी
जगतिं या ।

---

* आपले शिष्य नारायणस्वामी यांना स्वामींनीं जीं पत्रें पाठविलीं होतीं, त्यांपैकीं कांहीं पत्रांतील मजकूर लेखरूपानें स्वामींनीं स्वतः तयार केला होता. तो मजकूर सदर लेखांत आला आहे.

चाल—रमविती, विषय भ्रमविती, अंतीं ठकविती
मूढ जीवाला, मूढ जीवाला।
लोटिती शोकिं सकलांला
जगतिं या ॥ २॥

---

( चाल—झंपा )

दिसे चारुतम तेंचि शांत्यर्थ वरितों।
सांति सायांत विश्वास धरितों ॥ ध्रु० ॥

स्पर्शतां निजपदां होत विनिपात तों।
भंगती वस्तु जों प्रेम करितों।
क्षणिक विश्वावरी ठेवि विश्वास तो
घात अपुल्या करीं खास करितो ॥ १ ॥

( शार्दूल विक्रीडित )

अंतीं स्वप्न समस्त, सत्य न मुळीं
'तो' 'मी' व 'तूं' यापरी।
कोठें जाउं कुणाकडे परतु मी ?
आक्षेप्ट कादंबरी।
ज्वाला या ह्रदयीं पहा भडकती
शोकासि येई भर।
हा ! हा ! हे करुणेश्वरा ! सुरवरा !
देई दयाळा वर ॥ १ ॥

( राग—वसंत )

थाटमाट पालटती ऐसा देखावा हा पाहीं।
त्यांतहि ज्यास न पालट यापरि
झळकत एकचि राही ॥ ध्रु० ॥

दिसति जना मृति, जीर्णपणा वा
आधि व्याधि तशाही ।
पालटि ते पोषाख निरंतर
पुनरपि येतचि राही ।
प्रेम करा तत् सत् वरि केवळ
पोषाखावरि नाहीं ।
प्रेम करा त्यावरतीं केवळ
वस्तूवरतीं नाहीं ।
पालटुनी निज वसनें, देई
दूर झुगारुनि सारीं ।

त्यागुनि जीर्ण करी नवधारण
यापरि लीला सारी ।
नटिनेटका विमल असा तो
पाहियलें केव्हांही ।
सतत नवाकृति करि धारण तो
चिंतियलें न कदाही ॥ १ ॥

नित्य नवक्रम चक्रभ्रमसा
यथानुक्रमें चाले ।
द्वंद्वांतरिं तो एकचि, ज्याविण
एक न तरुदल हाले ।
अन्न वसन नसतां हानी जरि
लाभ मधुरतर होई ।
तोचि दिगंबर गति, पथ सुखकर
मुक्तजनांप्रति राही ।
पांघरि तो मायामय गारुड
नूतन रूपीं गोडी ।

सरिता, सागर, गगन, पवन, तो
स्वानंदास्तव जोडी ।

लपविं तुला तूं हवा तसा बा !
त्वदानुभूति जहाली ।
प्रकट करिति तुज लपावेति नच पट
कथिति मजसि या कालीं ।
गजकेसरि वा अहि—नकुलापरि
लीलारूपें पाहीं ।
अवलोकावें त्या एकाला
टाकिति झांकुनि ज्या हीं ॥ २ ॥

( चाल—सबसे रामभजन कर लेना )

दिसतें चारु मजसि जग सारें
खचितचि केवळ मणिमाला ॥ ध्रु० ॥
एकामागुनि एक असे मणि
माळेचे फिरतात ।
फिरणें यातें मरणें सारे
लोकीं या म्हणतात
पुरतें सूत्रचि सकळांला ॥ १ ॥
दिव्य सूत्र तें माझें माझें
वाढविता मी त्यास ।
रूपें राहुत जाउत अथवा
पावुत नाशहि खास ।
पुरतें सूत्रचि सकळांला ॥ २ ॥

( चाल—तो भाग्यशाली खरा )

प्रभात—चमत्कृती । जगीं या ।
या चंचला आकृती ॥ १ ॥
येतात उदयासि, जातात विलयासि
मायेमुळें बोलती ॥
या वस्तु दिसतात, स्वप्नेंचि असतात
त्या निश्चलाची कृती ॥ २ ॥

( चाल— भज गोविंदं भज गोविंदं )

नच अवलंबुनि अरि-सुहृदांवर
किंवा दैवी देखाव्यांवर ।
या देहाच्या आरोग्याची
चिंता कां इहलोकधनाची ।
विश्वात्मा, मी नित्य निरंतर
होईं कधिही यांत न अंतर ।
नलगे मजला दृश्याधार
प्यादीं पटगत वेषाकार ।
निश्चल परि मी सर्वां पाहीं
तेथें 'तें,' 'हें' भाव न राही ।
माझें प्रेम मिळालें मातें
व्यापी साऱ्या या विश्वातें ।
पूर्ण भरंवसा माझा त्यावरि
प्रेम तयावरि केवळ मी करिं ।
एक अनेकीं सत्यचि केवळ
सत्ता ज्याची विश्वीं निश्चल ।
मित्र जिवाचा, माझा साचा
चेला, गुरु, सुत, जनक सुखाचा ।
पति पत्नी वा धुनी मदीय
सर्वहि माझें, प्राण मदीय ।
माझा सारा तो अधिकार
जें तेजाचें तेज अपार ।
शान्ति मदीया, प्रकोप माझा
दुःखविमोचक भेषजराजा ।
रामचि माझा केवळ सुंदर
ॐकाराचें मंगल मंदिर ॥ १ ॥

ॐ तत् सत्.

---

## ज्याचें कार्य तोच करवून घेणार !

अमुक एका विशिष्ट उद्देशानें विशिष्ट कार्य करण्यासाठीं आपला जन्म आहे, असें रामाचें म्हणणें नाहीं; व अमुक एक कार्य मीच करणार, असा त्याचा बाणाहि नाहीं. सर्व कार्य परमेश्वराचें आहे; त्याचें कार्य तोच करवून घेणार; मग त्यांत मी-तूं-पणा कसला ? बुद्ध व त्याच्यासारखे पूर्वकालीं होऊन गेलेले दुसरे महात्मे यांच्या उदाहरणांचें काम काय ? धर्माच्या आज्ञांशीं—आत्मस्वरूपाशीं आपलें तादात्म्य होणें, हीच काय ती मुख्य महत्वाची बाब आहे. तें झालें म्हणजे झालें; बाकींच्या गोष्टींची चिंता करीत बसण्याचें आपल्याला कारण नाहीं. अनुयायांची खोगीरभरती करण्याची उठाठेव करण्यांत हंशील काय ! बुद्ध आणि ख्रिस्त यांचे तर शेंकडों अनुयायी होते ना ? पण त्यांपैकीं टिकले किती ? बुद्ध आणि ख्रिस्त यांच्या सर्व मित्रांनीं आणि अनुयायांनीं त्यांचा अखेर त्यागच केला ! बुद्धानें एकांतवासांत एकंदर सात वर्षें घालविलीं; व त्यांतील दोन वर्षें तर त्याच्याबरोबर कोणीहि नव्हतें; आत्मचिंतनांत राहून तो अरण्यांत एकटाच फिरत होता; व अशा स्थितींत असतांनाच त्याला आत्मदेवाचें दर्शन घडलें. त्यानंतर त्याच्या भोंवतीं शिष्यांची गर्दी जमूं लागली व त्यांना उपदेश करण्याचें काम तो आनंदानें करूं लागला. शिष्टांच्या कल्पनांनीं आणि मतांनीं भारले जाऊं नका ! त्यांचीं मतें आणि त्यांनीं दिलेला सल्ला सद्धेतूनें दिलेला असेल, पोक्तपणाचा असेल, त्याबद्दल वाद नाहीं; पण तत्त्वदृष्ट्या तो अगदीं फोल आहे. त्यांच्या सल्ल्यांत कांहीं अर्थ असता, धर्माच्या सनातन तत्त्वांना तो अनुसरून असता, तर आजवर शेंकडों बुद्ध निर्माण करण्याचें श्रेय त्यांना मिळालें असतें !

जगांतील सर्व आकारांना आणि व्यक्तिविशेषांना आपण फाजील मान देतों. या आसक्तींतून आपण आपल्याला मुक्त करून घेतलें पाहिजे. एखाद्या भांड्यांत ठेवलेल्या मधाचा आस्वाद घेत असतां माशीचे पाय मधांत चिकटले, म्हणजे संथपणानें पण निश्चयानें, आपले पाय त्यांतून बाहेर काढण्याचा ती प्रयत्न करते. याच न्यायानें जगांतील वस्तूंवर असलेलें आपलें प्रेम किंवा आसक्ति यांच्या बंधनांत आपण गुरफटून गेलेले आहों; त्यांतून युक्तीनें आपली सोडवणूक करून घेतली पाहिजे. चित्त निर्विषय करून घेण्याचा अभ्यास आपण देहांतापर्यंत चालू

ठेविला पाहिजे. धर्माचे नियम दुर्लंघ्य आणि निष्ठुर असून ते कोणाचीहि दयामाया बाळगीत नाहींत; धर्माचें चक्र जगावर अव्याहृत रीतीनें फिरत आहे. जो या धर्माचे नियम पाळतो, त्याच्याकडे धर्माचें नियंतृत्व येऊं शकतें. धर्माच्या—परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध जो आपल्या इच्छेचें बंड उभारतो, त्याच्या नियमांना न जुमानतां बेफामपणानें वागूं लागतो, त्याला भयंकर दुःख आणि यातना भोगाव्या लागून तो अखेरीस निश्चयानें चिरडला गेल्याशिवाय रहात नाहीं.

## वैराग्याचा त्रिशूल

धर्म हा शंकराच्या त्रिशूलाप्रमाणें असून तो खोट्या अहंकाराला ठार करतो. जो मनुष्य आपण होऊन देहाभिमान नाहींसा करतो—त्याचा यज्ञ करतो—त्याला हें जग इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें होऊन जातें. परंतु, जो मनुष्य देहाभिमानाला चिकटून बसतो, त्याचें सर्व सुख त्याच्यापासून हिरावून घेतलें जातें, तो केवळ दुःखाचा वांटेकरी बनतो. धर्म हा अग्नीप्रमाणें असून तो सर्व ऐहिक स्नेहाला आणि विषयासक्तीला जाळून खाक करतो; तो अज्ञानालाही जाळून टाकतो व त्याबरोबरच आध्यात्मिक प्रगतीला प्रतिबंधक होणाऱ्या सर्व विषयरूपी रोगजंतूंना नाहींसें करून चित्त शुद्ध आणि पवित्र बनवितो.

अन्न खाण्याच्या क्रियेचा आपल्या शरीराच्या सुदृढतेशीं जितका निकट संबंध आहे, तितकाच धर्माचा आपल्या जीवनाशीं—अस्तित्वाशीं सर्वतोपरी-निकट संबंध आहे. ईश्वराचें अस्तित्व नाशाबीत करणाऱ्या नास्तिकाला आपल्या शरीरांतील क्रिया कशा होतात, अन्न ग्रहण केल्यानंतर त्याचें पचन कसें होतें, वगैरे बाबतींत तरी माहिती असते काय ? अर्थात् नाहीं. जीवनाचा कायदा, आपली इच्छा असो किंवा नसो; आपल्याला खऱ्या धर्माकडे सक्तीनें खेंचून नेत असतो. 'शाश्वत जीवित पाहिजे असेल तर जीवनाचें मर्म ओळखा, धर्माची कांस धरा, नाहीं तर ईश्वरी नियमाखालीं चिरडले जा;' असा तो आपल्याला नेहमीं इषारा देत असतो. धर्म हा चाबकाचे तडाखे मारून आपणांस जागृत करीत असतो ! संकटांच्या आघातांनीं आत्मोन्नति करून घेण्याला आपल्याला भाग पाडीत असतो. धर्म किंवा जीवनाचा कायदा, सक्त आणि दुर्लंघ्य असून त्यांतून सुटणें शक्य नाहीं. फक्त धर्मालाच कायतें पारमार्थिक सत्यत्व आहे; बाकीच्या

सर्व वस्तु मिथ्या होत. जगांत भासमान होणारे सर्व आकार आणि आपले व्यक्तिविशेष हे धर्ममहोदधींतील केवळ बुडबुडे होत! जें नित्य असतें–शाश्वत टिकाऊ असतें तेंच सत्य, अशी सत्याची व्याख्या आहे, व या व्याख्येप्रमाणें जगाकडे पाहूं लागलें असतां आपलीं सर्व नातींगोतीं, स्नेहसंबंध, समाज आणि संस्था यांपैकीं एकहि टिकणारें नाहीं; जें जें दिसतें, तो तो सर्व नामरूपाचा खेळ आहे. त्रिशूलरूपी धर्माइतकें शाश्वत आणि चिरंतन या विश्वांत दुसरें कांहींहि नाहीं. जगांतील मनुष्य भ्रांत आणि संकुचित बुद्धीचे झाले असून अत्यंत श्रयोरूप धर्मापेक्षां बाह्य देखाव्यानें आणि जगांतील नामरूपात्मक पसाऱ्यानें भुलून जात आहेत. ही स्थिति कां, असा प्रश्न उत्पन्न होतो. याचें उत्तर हेंच कीं, अज्ञानामुळें खरें आणि खोटें, शाश्वत आणि अशाश्वत यांचा निवाडा त्यांना करतां येईनासा झाला आहे. यामुळें बाह्य वस्तूंचे मिथ्या आकार खरे आहेत, अशा भावनेनें जगांतील वस्तूंवर ते अवलंबून रहातात; व शाश्वत असा जो धर्म तो आकाशांतील अभ्राप्रमाणें चंचल आहे असें वाटून त्यावर त्यांचा विश्वास बसेनासा होतो; व याचा परिणाम भयंकर दुःखांत आणि आपत्तींत होतो. जगांतील दुःखें आणि संकटें यांच्या योगानें मनुष्यांना शिक्षण देण्याचा सृष्टिदेवीचा प्रयत्न चालला आहे; आणि तें शिक्षण व ज्ञान म्हणजे हें कीं, त्रिशूल किंवा त्रिशूली–शंकर यालाच वास्तविक सत्ता आहे, व मनुष्याच्या प्रेमाचे विषय होऊन बसलेले जगांतील सर्व पदार्थ असत्य आहेत, ते निव्वळ भ्रम होत; सांवली किंवा पिशाचयोनि यांच्याप्रमाणें केवळ काल्पनिक होत. ईश्वरानें जगरूपी प्रचंड खेळ चालविला असून बाह्यतः भासमान होणारीं सुखें आणि दुःखें, सौंदर्य आणि कुरूपता हे निरनिराळे पोषाख सृष्टिरूपी रंगभूमीवर विविध वेषांत विलसणाऱ्या भगवंतानें–श्रीविहारीनें जगाचे डोळे आपणांकडे लागावे, आपलें आध्यात्मिक ऐश्वर्य प्रत्येक मनुष्यानें केव्हांना केव्हां तरी प्रतीत करून घ्यावें, ह्याच हेतूनें कल्पिलेले आहेत.

आपले शत्रु आणि आपले मित्र यांच्या भासमान होणाऱ्या आकारांवर आपण सत्यतेचा आरोप करूं लागलों म्हणजे ते आपल्याला फसवतात आणि तोंडघशी पाडतात. परंतु जेव्हां शत्रूंवर भलत्याच हेतूंचा आणि दुष्ट स्वभावाचा आरोप करून त्यांचा आपण द्वेष करूं लागतों आणि त्यांचा प्रतिकार करण्याला प्रवृत्त होतों,

तेव्हां आपल्या अधोगतीचीच आपण तयारी करतों. वास्तविक फक्त ईश्वरच सत्य असतां इतर मनुष्य सत्य आहेत असें जेव्हां आपण अज्ञानजन्य आसक्तीमुळें मानूं लागतों, तेव्हांच आपण ईश्वराशीं बेइमान ठरतों; व त्यांचा आपण द्वेष करूं लागतों. तेव्हां आपण पहिली चूक दुरुस्त करण्याऐवजीं ती द्विगुणित करतों; आणि अशा रीतीनें दुःखांना आणि संकटांना आपण बोलावणें धाडतों. याकरितां सावध व्हा. **त्रिशूल–वैराग्य हेंच जीविताचें अंतिम साध्य आहे हें लक्षांत ठेवा.** पृथ्वीवरील पाषाणादिकांइतकी जिवंत सत्यता या वैराग्याच्या कल्पनेला आहे; व अशी स्थिति असल्यामुळें पाषाणाच्या लिंगानें वैराग्याची कल्पना उत्तम रीतीनें व्यक्त केली जाते. मनुष्याच्या डोक्यांत दगड मारला असतां त्याच्यावर जितका त्या दगडाचा परिणाम होतो, त्याच्यापेक्षां जास्त परिणाम त्रिशूलाचा, वैराग्याचा मनुष्यमात्रावर होतो. आत्मविस्मृति झालेल्या मनुष्याला जागृत करण्याला वैराग्यरूपी त्रिशूलाइतका दुसरा उपाय नाहीं! हें तत्त्व सदैव लक्षांत बाळगणें अत्यंत आवश्यक आहे.

## बाह्य आकारांवरील घातकी प्रेम

महंमदी आणि ख्रिस्ती धर्मांचे अनुयायी धर्माला–सनातन जीविताच्या या कायद्याला अथवा ईश्वराला गयूर व कहर असे शब्द वापरतात. हा कायदा मनुष्यांच्या ऐहिक योग्यतेकडे बिलकुल लक्ष देत नाहीं; व हा कायदा मोठा भयंकर आहे; अशा दोन कल्पना या दोन शब्दांनीं व्यक्त केल्या जातात. जगांतील कोणत्याहि विषयावर मनुष्य ममत्वबुद्धि ठेवावयास लागूं द्या, म्हणजे निसर्गाच्या क्रोधाला तो निःसंशय बळी पडलाच म्हणून समजा. हा सिद्धान्त किंवा हें सत्य मनुष्य लवकर शिकत नाहीं, याचें कारण हेंच कीं, सूक्ष्म अवलोकनशक्तीचा त्याच्या ठिकाणीं अभाव असतो; सारासार विचार त्याच्या ठिकाणीं फारच थोडा असतो. मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ति कोणत्याहि स्थितीचीं खरीं कारणें शोधून काढण्याकडे नसते; कारणापेक्षां कार्यावरच त्याची मदार जास्त असते. मनुष्याला आपले स्वतःचे दोष दिसत नाहींत; आपल्या डोळ्यांतील मुसळ न दिसतां दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ त्याला स्पष्ट दिसत असतें. आपले मनोविकार आणि आपल्या स्वभावांतील दोष यांचें तिऱ्हाइताप्रमाणें दूर उभें राहून निरीक्षण करण्याचें सामर्थ्य मनुष्याच्या ठिकाणीं नसतें; यामुळें आपल्या दोषांचें खापर तो

दुसऱ्याच्या माथीं मारतो आणि आपल्या दुःखाबद्दल तो दुसऱ्यांना जबाबदार धरतो. बाह्य आकारांना आपण फाजील महत्त्व देऊं लागलों, मिथ्या वस्तूंना आणि व्यक्तींना एका सत्तत्त्वाऐवजीं हृदयांत अवकाश देऊं लागलों, म्हणजे आपण आपल्या अधोगतीचा खड्डाच तयार करीत आहों, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अन्वयव्यातिरेकाच्या पद्धतीनें विचार करूं लागलें असतां जगांतील सर्व अनात्मवस्तु मिथ्या होत, व एका परमात्म्याव्यातिरिक्त इतर वस्तूंना वास्तविक सत्ता नाहीं, हा निरपवाद सिद्धान्त आपल्या मनांत ठसल्याशिवाय रहाणार नाहीं. ईश्वरावर विश्वास ठेवण्याऐवजीं इतरांच्या आश्वासनावर सर्वस्वी विश्वास ठेवण्यांत कितीतरी वेळां आपण चूक करीत नाहीं काय ? आपल्या मुलांच्या बाह्य शरीरांवर प्रेम करून ईश्वरी नियमाला लाथाडण्यांत त्यांच्या नाशाचा किंवा मृत्यूचा पाया आपण होऊन कितीतरी वेळां खणीत नाहीं काय ? आपल्या मित्रांवर विसंबून राहून आपणा सर्वांचा खरा मित्र जो ईश्वर त्याच्यावर श्रद्धा न ठेवण्यांत, ज्यांना मित्र म्हणून समजतों त्यांना बेइमानी बनविण्याचें पातक आपण कितीतरी वेळां करीत नाहीं का ? आपल्या ज्ञानदात्या गुरूंनीं आपणांवर अवलंबून राहावें, असा भलताच समज करून घेऊन आणि त्यांचा तसा समज करवून, आध्यात्मिक उन्नतीच्या शिखरांवरून त्यांना खालीं खेंचण्याचा आपला कितीतरी वेळां प्रयत्न नसतो का ? येशू ख्रिस्ताचा शिष्य पीटर यालहि कोंबडा आरवण्यापूर्वी येशूला आपण ओळखीत नाहीं,असें तीनदां कबूल करावें लागलें.* या न्यायानें प्रत्येक शिष्यानें आपल्या गुरूच्या बाह्य आकारावर अवलंबून न रहातां त्यांतील परमात्मभावावर अवलंबून रहाण्यास शिकलें पाहिजे. आपल्या स्त्रियांवरील प्रेमानें वेडावून जाऊन कुटुंबांत तंटेबखेडे आणि याच्यापेक्षांहि जास्त भयंकर स्थिति उत्पन्न करण्याला आपण कितीतरी वेळां कारणीभूत होत नाहीं काय ? जगांतील कोणत्याहि वस्तूला परमेश्वरापेक्षां जास्त महत्त्व तुम्हीं आपल्या मनानें देऊं लागा म्हणजे ईश्वरी प्रेमाचा भाला तुमच्या छातींत खुपसला गेलाच म्हणून समजा!

जगांतील क्षुद्र प्रेमाची गोष्ट कशाला ? प्रत्यक्ष गोपिकांचेंच प्रेम घ्या. श्रीकृष्णाच्या बाह्य सौंदर्यानें गोपी मोहित झाल्या होत्या;परंतु श्रीकृष्णाच्या बाह्य आकारावर

---

* सेंट ल्यूक याचें शुभवर्तमान, अ. २२ ओं. ३४.

प्रेम करण्याच्या चुकीबद्दल त्यांना प्रायश्चित्त पडलें. श्रीकृष्णाच्या विरहाबद्दल त्यांना अखेरीस अश्रु ढाळावे लागलेच ! प्रत्यक्ष पातिव्रत्याची मूर्तिमान् पुतळी अशी जी सीतादेवी तिनें श्रीरामचंद्रजींच्या नयनमनोहर मूर्तीला खरें मानण्याचाच काय तो गुन्हा केला. परंतु ह्या गुन्ह्याबद्दल केवढी भयंकर शिक्षा तिला भोगावी लागली ! अमूर्त रामाला मूर्त राम मानण्यांत—सर्व जगाचा सखा जो राम त्याला आपलाच राम मानण्यांत तिचा जो अपराध झाला, त्याबद्दल सीतादेवीसारख्या दिव्य स्त्रीलाहि घोर अरण्यांत दिवस कंठण्याची शिक्षा भोगावी लागली.

जगांतील भासमान होणाऱ्या वस्तूंचें सौंदर्य हें श्रीकृष्णाच्या लीलाविग्रही सौंदर्यासारखेंच आहे, असें म्हटलें तरी चालेल. मन हा एक प्रचंड राक्षस असून तो जगांतील सर्व विषयांना सहज गिळंकृत करून टाकतो. पण विषयरूपी सर्व प्राणी या राक्षसाच्या पोटांत गेल्यानंतर त्याचें पोट आंतून फाडून टाकतात. सर्व लोक जे नेहमीं आक्रोश करीत असतात कीं, "अरेरे ! माझी छाती फाटून गेली ! माझा घात झाला ! सर्वस्वीं घात झाला," याचें कारणहि हेंच होय! नाम आणि रूप यांच्या भ्रामक देखाव्यानें अगोदर भुलून गेलां कशाला, व आतां रिकामे ओरडतां कां, असाच या लोकांना प्रश्न केला पाहिजे. फक्त सद्वस्तूंवर प्रेम करा; एका ईश्वरावरच भिस्त ठेवण्यास शिका. अन्न खातांना ईश्वराचें स्मरण करा, तें पचवतांना त्याचें अनुसंधान ठेवा, ईश्वराबरोबरच चाला, आणि ईश्वराबरोबरच बोला. सारांश, ईश्वरच व्हा आणि आपली प्रत्येक कृति ईश्वरमयच होऊं द्या. खरें जीवित तें हेंच. सर्व विषयांचें अंतःकरणांतून निर्मूलन करून चित्त आत्मस्वरूपांत स्थिरावल्याशिवाय, व्यवहारांत ज्याला प्रेम म्हणतों, तें किती भ्रामक आणि अविश्वसनीय आहे, ह्याचा तुम्हांला प्रत्यय येणार नाहीं.

प्रियकरांनो ! फक्त ईश्वरच सत्य आहे; बाकी झाडून सर्व असत्य आहे.

* ला इलाह् इल्लिलाह्

---

* या कलमाचे दोन अर्थ होऊं शकतील. (१) प्राचीन ग्रीक लोक व आर्य लोक अनेक देवांची उपासना मान्य करीत; परंतु देवताबाहुल्याच्या कल्पनेचा यांत निषेध केला असून फक्त एक ईश्वर आहे, असा सिद्धान्त यांत सांगितला आहे. (२) 'ला इलाह् इल्लिलाह्' याच्यापुढील शब्द 'मुहम्मद रसूल अल्लाह्' असे आहेत. व त्यावरून कुराणांत सांगितलेली ईश्वराची कल्पनाच बरोबर आहे, व

## वैराग्याचा सक्त कायदा

महंमदाच्या अनुयायांना या तत्त्वाची बरोबर ओळख पटलेली नव्हती, व त्यानें प्रतिपादन केलेल्या तत्त्वांचा पुष्कळ बाबतींत त्याच्या अनुयायांनीं विपर्यास केला आहे. परंतु तें कसेंही असलें तरी ज्याला तत्त्वानुभव झाला असेल त्याला ही गोष्ट पटल्याशिवाय राहाणार नाहीं कीं, 'ब्रह्म सत्यम् जगन्मिथ्या,' ह्या सिद्धान्तावर आणि त्याच्या व्यावहारिक सत्यतेवर श्रद्धा नसल्यामुळें लोक आपलें जीवित यातनामय करीत असून हळूहळू मृत्यूच्या पंथास लागले आहेत; व अशा लोकांच्या तरणोपायाला या सिद्धान्ताशिवाय दुसरा मार्गच नाहीं. ख्रिस्तानेंहि जवळ जवळ हेंच तत्त्व प्रतिपादन केलें आहे, बुद्धाचेंहि हेंच म्हणणें आहे, आणि आपल्या आर्य ऋषींपैकीं प्रत्येकानें या किंवा त्या तऱ्हेनें हाच सिद्धान्त प्रतिपादन केला आहे. परंतु नुसत्या सत्य सिद्धान्ताच्या प्रतिपादनानें कितीसें काम होणार ? त्यांचा उपदेश आणि त्यांनीं प्रतिपादन केलेलीं तत्त्वें ज्या लोकांच्या कानांवर जाऊन आदळलीं, त्यांनीं त्या तत्त्वांचा प्रत्यक्ष अनुभव घेतला नसता, तर तीं तत्त्वें आजामितीपावेतों खास टिकलीं नसतीं; तसेंच तीं तत्त्वें निरनिराळ्या राष्ट्रांतील निरनिराळ्या काळच्या ज्ञानजिज्ञासूंना बळकट पुराव्याच्या आधारावर पुनः पुनः सिद्ध करून आचरणांत आणतां आलीं नसतीं, तर त्यांचें महत्त्व यापूर्वीं कधींच नष्ट झालें असतें.

वैराग्याचा कायदा अत्यंत सक्त आणि कडकडीत आहे. ती कांहीं नुसती भ्रामक कल्पना नव्हे, कीं तें नुसतें बुजगावणें नव्हे; कांहीं धर्मवीरांच्या आणि राष्ट्रनेत्यांच्या भ्रामक कल्पनांनीं राष्ट्रेंच्या राष्ट्रें कधीं फसलीं जाणें शक्य नाहीं; कांहीं दुबळ्या भावड्या माणसांच्या काल्पनिक भराऱ्यांनीं अनेक शतकांच्या कालाला भलतेंच वळण लागणें सर्वथा अशक्य आहे.

धर्मतत्त्वाच्या बरोबर न चालल्यामुळें, धर्माशीं विरोधी वर्तन ठेवल्यामुळें मनुष्यांच्या पाठीमागें दुःखपरंपरा लागते, ही गोष्ट लोकांच्या लक्षांत येत नाहीं.

---

महंमद हाच ईश्वराचा प्रेषित आहे, असा अर्थ होऊं शकतो; व असाच अर्थ सामान्यतः केला जातो. परंतु स्वामींनीं असा अर्थ घेतलेला नाहीं. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' या अद्वैतप्रतिपादक शब्दांत जो अर्थ आहे, तोच 'ला इलाह' या कलमाच्या अर्थांत आहे, असें स्वामींनीं म्हणणें दिसतें.

आपल्या रोगाच्या कारणांची बरोबर मीमांसा न झाल्यामुळें ते आपल्या रोगाचें खापर बाह्य परिस्थितीच्या माथ्यावर फोडतात व त्या परिस्थितीशीं झुंजूं लागतात; परंतु हें केवळ अज्ञान आहे. लोकांच्या आपणांसंबंधाच्या चांगल्या किंवा वाईट भाषणाला किंवा वर्तनाला आपल्या अंतःकरणांत थारा देऊं नका; ते स्वप्नवत्, मिथ्या आणि भ्रामक आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवून त्यासंबंधाचे विचार अजिबात विसरून जा. स्वप्नें म्हटलीं म्हणजे तीं कधीं शुभ असतील किंवा कधीं अशुभ असतिल, त्यांच्याबद्दल बिलकुल विचार करूं नका. स्वप्नांशीं भांडत बसण्यांत किंवा त्यांचा परस्पर मेळ घालीत बसण्यांत अर्थ कोणता? त्यांच्याबद्दल चिंता करण्यांत व्यर्थ कालापव्यय करूं नका. आपल्यांत चूक कोठें आहे ती पाहा, ती शोधून काढा. आपल्या पोटांत जडत्व आहे म्हणून स्वप्नें पडतात, हें लक्षांत ठेवा. याच न्यायानें लोक आपली निंदा करोत किंवा स्तुति करोत, त्याबद्दलचा विचार सोडून द्या; आणि आपली आध्यात्मिक स्थिति सुधारूं लागा. प्रपंचांतील ब-या वाईट प्रसंगांना, आपण आणि ईश्वर यांच्या दरम्यान येऊं देऊं नका. दुसऱ्यांनीं केलेला अपमान आणि दिलेला त्रास यांच्याबद्दल रागावून जाऊं नका. दुसऱ्यांच्या अपराधाबद्दल क्षमा करा; ज्याची क्षमा करतां येणार नाहीं इतके मोठे अपराध जगांत असणेंच शक्य नाहीं.

ईश्वरापुढें दुसऱ्या कशाचीहि किंमत मानूं नका; त्याच्याइतकें कोणत्याच गोष्टीला महत्व देऊं नका. दुसऱ्यांनीं केलेली स्तुति आणि निंदा यांचा आपल्यावर परिणाम होणें, याच्या इतका आत्मनाशाचा दुसरा कोणताहि रोग नाहीं. आपण ईश्वर आहों, ह्या कल्पनेचें नेहमी अनुसंधान राखा व परमात्मभावनेंत स्थिर राहून नेहमीं आत्मानंदाचीं गाणीं गात जा. लोकांच्या स्तुतीचा वर्षाव आणि टीकेचा भडिमार यांच्याबद्दल पूर्णपणें बेफिकीर राहा. रामाची प्रकृति नादुरुस्त असली, त्याचें शरीर आजारी असलें म्हणजे आजार हा एक ईश्वराच्या दरबारांतील नोकरच आहे, असें तो समजतो व एखाद्या सार्वभौम राजाप्रमाणें तो रोगाला हुकूम करतो कीं, 'या देहाभिमानरूपी शरीरांतून ताबडतोब निघून जा.' या हुकुमाबरोबर शरीरांतील आजारीपणा किंवा रोग ताबडतोब नाहींसा होतो. कारण, राजाचा हुकूम नोकरानें ऐकलाच पाहिजे. राम सिंहासनारूढ झाला म्हणजे शरीराचे रोग राहणार कसे! मी देहाभिमानाच्या झोंपडींत भिकाऱ्यासारखा शिरलों तरच रोग हे मला चाबकाचे फटकारे मारूं शकतात,

आणि माझ्या छातींत खंजीर खुपसूं शकतात. दुसऱ्यांच्या मतांसंबंधानें ह्या तऱ्हेचें धोरण स्वीकारा.

मनुष्याप्रमाणें राज्यांचीहि स्थिति अशीच आहे. ज्या राज्यांतील कायदे त्रिशूलाच्या नियमाला अनुसरून नाहींत, तीं राज्यें आपला स्वतःचा आपणच नाश करून घेतात. शायलॉक * प्रमाणें आपल्या वैयक्तिक हक्कांवर जोर देणें 'हें माझें,' तें 'माझें' असले मालकी हक्काचे विचार मनांत येऊं देणें म्हणजे ईश्वरी नियमाला विरोध करण्यासारखें आहे. ईश्वरी नियमाप्रमाणें आपल्याला जर कोणता हक्क असला तर तो हक्क ( ईश्वर ) हाच आहे. याच्याशिवाय दुसरा कोणचाहि हक्क म्हणजे अन्यायच होय! या तत्त्वाप्रमाणें दुसरें कोणी वागत नसलें तरी निदान संन्याशानें तरी त्याप्रमाणें वागलें पाहिजे--हें तत्त्व प्रत्यक्ष आचरणांत आणलें पाहिजे.

## सनातन जीविताचा उदय

धर्म हा सर्वव्यापी आहे, तो सर्वांचा आत्मा आहे; व या दृष्टीनें पाहातां धर्म म्हणजे रामच होय. आतां या स्थितीचा अनुभव होण्याला आपणांमधील अहं-

* शेक्सपिअर कवीनें ' वेनिस नगरचा व्यापारी ' ह्या नांवाचें एक नाटक लिहिलें आहे. प्राचीनकाळीं इस्रायल लोक व ख्रिस्ती लोक यांचें किती हाडवैर होतें व इस्रायल लोक ख्रिस्ती लोकांना कसे छळीत असत, याचें शब्दचित्र शेक्सपिअर यानें सदरहू नाटकांत रेखाटलें आहे. शायलॉक हा वेनिस नगरांतील प्रसिद्ध सावकार होता. अँटोनिओ नांवाचा त्या नगरांत एक ख्रिस्ती व्यापारी होता, त्याला पैशाची अत्यंत जरूर लागल्यामुळें त्यानें शायलॉकजवळ तीन हजार डकट (सुमारें ९००० रु.)तीन महिन्यांच्या मुदतीनें मागितले. परंतु अँटोनिओ हा शायलॉक ह्याला त्याच्या मारवाडी वर्तनामुळें पाण्यांत पाहात असल्यामुळें शायलॉक यानें पैसे देतांना कर्जरोख्यामध्यें एक विलक्षण अट घातली. ती अशी कीं, मुदतीच्या आंत अँटोनिओ यानें पैसे परत दिले नाहींत, तर त्याच्या हृदयाजवळचें एक रत्तल मांस त्यानें शायलॉक याला काढून द्यावें! गरजवंताला अक्कल नसल्यामुळें असली चमत्कारिक अटहि कबूल करणें अँटोनिओ याला भाग पडलें. पुढें ठरल्या मुदतींत अँटोनिओला रक्कम परत देतां आली नाहीं. तेव्हां शायलॉक यानें त्याजवर दावा लावला. अखेरीस न्यायाधिशापुढें खटला आल्यानंतर अँटोनिओचा स्नेही बॅसॅनिओ याची स्त्री पोर्शिया, ही वकिलाच्या वेषानें न्यायाधिशापुढें आली. व आपल्या वकिली डावपेंचानें तिनें शायलॉकचा बेत हाणून पाडला.

कार नाहींसा झाला पाहिजे—ठार झाला पाहिजे. हें कृत्य निर्दयपणाचें आहे खरें, परंतु प्रेमाचें हृद्गत यांतच आहे. कारण, अहंकाराचा मृत्यु म्हणजेच खऱ्या आत्म्याचा आणि सनातन जीविताचा उदय होणें होय. जो मनुष्य आपल्या खोट्या अहंकाराला चिकटून बसतो, आणि सर्व सत्ताधीश अशा परमात्म्याच्या ऐश्वर्यावर आपल्या अहंकाराचा हक्क प्रस्थापित करूं पाहातो, तो मनुष्य अहंकाररूपी गिधाडाच्या भक्ष्यस्थानीं पडलाच म्हणून समजा. आत्म्याच्या स्वातंत्र्याची कल्पना वेदान्त प्रतिपादन करतो; परंतु याचा अर्थ आपला देह आणि अहंकार यांना स्वातंत्र्य आहे, किंवा ते सर्व नियमांच्या आणि बंधनांच्या अतीत आहेत, असा नव्हे. असें समजणें म्हणजे परमात्म्यासंबंधानें विपरीत भावना करून घेणें होय! या विपरीत भावनेला हजारों लोक बळी पडत आहेत, हजारों लोक निराशावादाच्या खळग्यांत खोल खोल जात आहेत, व हजारों अंतःकरणांवर धर्माच्या या विपरीत भावनेचे वज्राघात कोसळत आहेत. धर्माशीं—जीविताच्या कायद्याशीं एकरूप होणें म्हणजेच धर्माच्या बंधनांतून मुक्त होणें होय. शिवोऽहम् या स्थितीच्या साक्षात्काराची खूण हीच आहे. जो मनुष्य वस्तुस्थिति आणि आंकडेशास्त्र या नांवांनीं संबोधित केल्या जाणाऱ्या भ्रामक स्थितीवर आणि नामरूपाच्या आधारावर अवलंबून राहातो, तो मनुष्य इंद्रियांनीं फसविला जात असून समुद्राच्या फेंसावर आपली इमारत बांधून आपण होऊन बुडत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु ज्याच्या अंतःकरणांत ही गोष्ट बाणून गेली आहे कीं, ईश्वर हाच सत्य आहे. जग हें भ्रामक आहे, व धर्म हीच काय ती खरी जिवंत शक्ति आहे, तो मनुष्य दगडी पायावर आपली इमारत बांधीत आहे, असें म्हटलें तरी चालेल. या शरीराची एवढी किंमत ती काय? हा देह स्वार्थी, अभिमानी, गर्विष्ठ किंवा लुच्चा आहे असें म्हणून पाहिजे त्यानें त्याचा अपमान करावा, तिरस्कार करावा, त्याला लाथा माराव्या, किंवा त्याला ठार करावा; त्याच्याबद्दल मला—सर्व देवांच्या देवाला दिक्कत वाटण्याचें कारण काय?

ही कांहीं रिकामी धमकी नव्हे; गीदड भपकी* नव्हे; भयंकर वाटलें तरी तें सत्य आहे.

---

* ही हिंदुस्थानी भाषेंतलि एक म्हण आहे. 'गीदड' म्हणजे कोल्हा, व 'भपकी' म्हणजे नाक डोळे वटारून दरडावणें. कोल्हा हा प्राणी जात्या भित्रा असल्यामुळें त्याचे

दुसऱ्या मनुष्यांच्या भावनांसंबंधानें आपण जितकी काळजी घेतों तितकी तरी काळजी आणि आस्था ईश्वराबद्दल, सर्वव्यापी धर्माबद्दल दाखविण्यास आपण तयार असलें पाहिजे. ईश्वरी नियमांवर श्रद्धा ठेवल्यामुळें, ईश्वरी कायद्याशीं राजनिष्ठेनें वागल्यामुळें दुसऱ्यांना अपाय न करतां मनुष्यांची अंतःकरणें दुखावलीं गेलीं तर त्याबद्दल फिकीर करण्याचें कारण काय ? त्याबद्दलची जबाबदारी आपणांवर येऊं शकत नाहीं. आपल्या वागण्यानें दुसऱ्याला काय वाटेल याचा विचार करण्यापेक्षां धर्माचें उल्लंघन होऊं न देण्याबद्दलची काळजी घेणें, हें निःसंशय आपलें श्रेष्ठ कर्तव्य आहे. आपल्या नातेवाइकांच्या लहरीप्रमाणें वागणें आणि ईश्वरी नियमांशीं विरोध करणें म्हणजे आपला आणि आपल्या नातेवाइकांचा नाश करण्यासाठीं संकटांना निमंत्रण करण्यासारखें आहे ! आपल्याला जास्त जवळ कोण ? आपले आप्तसंबंधी कीं ईश्वर ? ईश्वर हाच आपल्याला सर्वांत जास्त जवळ होय, व धर्म हाच खरा आप्त होय !

वय ँ सोम व्रते तव मनस्तनूषु बिभ्रतः
प्रजावन्तो अशीमहि ।

( तैत्तिरीय ब्राह्मण, द्वितीयकांड, प्रपाठक ४ अनुवाक २ )

'हे सोमदेवा ! तुझ्याकरितां कर्मानुष्ठान करणारे आम्हीं मन विवेकसंपन्न असतां व आम्हीं प्रजासंपन्न असत भोग भोगावे.'

वैदिक कालामध्यें कित्येक मंगलप्रसंगीं कुमारिका पवित्र अग्नीच्या भोंवतीं जमत आणि अग्नीच्या ज्योतीला वंदन करून पुढील स्तवन करीत असत.

त्र्यंबकं यजामहे सुगन्धिं पतिवेदनम् ।
उर्वारुकमिव बन्धनादितो मुक्षीय मामुतः ॥

( शुक्लयजुर्वेद. )

'हे सर्वसाक्षी देवा ! आमच्या पतीचें ज्ञान असणाऱ्या सुगंधयुक्त देवा, आम्हीं तुझें पूजन करतों. टरबूज जसें आपल्या देठापासून निराळें होतें, त्याप्रमाणें

---

अंगावर चालून गेलें असतां प्रथम दर्शनीं तो नाकडोळे वटारून उलट चालून येण्याचा आव घालतो; परंतु त्याच्या त्या गुरकावणीला प्रतिपक्षी भ्याला नाहीं, तर कोल्हा स्वतःच पळून जातो. यावरून 'कोल्ह्याची धमकी' म्हणजे पोकळ राग, अशा अर्थी ही म्हण प्रचारांत आली आहे.

आम्हीं (पित्याच्या गृहापासून) मुक्त व्हावें. परंतु त्यापासून (पतीच्या गृहापासून) कधींहि निराळ्या होऊं नये.'

विछडती दुलहनू वतनसे है जब्‌।
खडे हैं रोम और गला रुके है।
कि फिर न आनेकी है कोई ढब्‌।
खडे हैं रोम और गला रुके है।

नववधु (दुलहन्) जेव्हां (जब्) गांवाहून (वतनसे) निघते (बिछडती हैं) तेव्हां रोमांच (रोम) उभे रहातात (खडे हैं) आणि कंठ दाटून येतो; (और गला रुके हैं) कारण पुन्हां (कि फिर) परत येण्याचा (आनेकी) कांहीं योगायोग नाहीं; (कोई ढब् न) तिचें अंग पुलकित होतें, व तिचा कंठ दाटून येतो (खडे हैं रोम.........रुके हैं)*

प्राचीन आर्यकुमारिकांच्या मुखांतून निघणारी ही प्रार्थना रामाच्या अंतःकरणांतून मोठ्या जोरानें बाहेर येत आहे व त्याबरोबर आनंदाश्रूंचा प्रवाह चालला आहे.

हे देवा! हे धर्मा! हे सत्स्वरूपी परमात्मन्! या माझ्या मेंदूत आणि अंतःकरणांत तुझ्याखेरीज कोणत्याहि व्यक्तीसंबंधानें प्रेम वास करीत असेल तर माझा मेंदू व माझें अंतःकरण एकदम फुटून जावो. या माझ्या नसांतून आणि रक्तवाहिन्यांतून दुसरी कोणतीहि कल्पना संचार करीत असेल तर हें माझें रक्त एकदम गोठून जावो!

आहमजानि गर्भध। मा त्वमजासि गर्भधम्।
(अश्वमेध प्रकरण, तैत्तिरीय संहिता,
सप्तम कांड, चतुर्थ प्रपाठक, अनुवाक १९)

'गर्भस्थापना करणाऱ्या तुला मी बिलगतें, तूंहि मला चिकट.'

रामाचें त्रिशूलाबरोबर—सत्याबरोबर लग्न लागलें आहे, अशा स्थितींत वारांगनेप्रमाणें इतरांवर आसक्त होणें आणि त्यांच्याशीं संबंध ठेवणें, हें आतां संभवनीय आहे काय?

---

* कन्या सासुऱ्यासी जाये। मागें परतोनां पाहे। ऐसें झालें माझ्या जीवा। कधीं भेटसी केशवा॥ या तुकारामोक्तीचा व वरील पद्याचा भावार्थ एकच दिसतो.

## नसती उठाठेव करूं नका !

ही प्रेरणा अंधळेपणाची नाहीं, किंवा दुसऱ्या कोणाला अपाय करण्यासाठीं पतकरलेली ही कांहीं स्वार्थी नीति नाहीं! रामानें तुमचें असें काय घोडें मारलें आहे कीं, त्याबद्दल व्यक्तिविषयक संबंधाच्या संकुचित बंधनांत—चिखलांत त्याला ओढण्याचा तुम्हीं प्रयत्न करावा! मेहेरबानी करून असला भलताच खेळ तुम्हीं खेळूं नका, तुमच्या स्वतःच्या कल्याणासाठीं असल्या भानगडींत त्याला पाडूं नका, त्याच्याबद्दल तुम्हीं मुळींच उठाठेव करूं नका; यांतच देशाचें आणि मानवजातीचें कल्याण आहे. त्याच्या देहाची तुम्ही नसती काळजी केली नाहींत म्हणजे तो एकांतवासांत मरून जाईल, असें का तुम्हांला वाटतें? छे, छे, फक्त ईश्वरच कायतो सत्य आहे; आणि त्याच्याशीं तादात्म्य करून जो राहातो त्यावर संकटें येणार नाहींत; तसेंच शरीरासंबंधानें म्हणाल तर ईश्वरानें नियत केलेलें कार्य होण्यापूर्वीं तें खात्रीनें पडणार नाहीं!

दुसऱ्यानें स्वीकारलेल्या पवित्र संकल्पांत नसती ढवळाढवळ करणें चांगलें नाहीं. आपलें ध्येय आणि आपण यांच्या दरम्यान राम दुसऱ्या कोणालाहि येऊं देणार नाहीं. छे—प्रत्यक्ष मृत्यूलाहि येऊं देणार नाहीं! ईश्वरावर श्रद्धा नसलेल्या मनुष्यानें सर्व जगाचा इतिहास पालथा घालून काढलेल्या अनुमानावर आपल्या आयुष्याच्या तारवाची दिशा ठरविणें हें गैर आहे! रामाच्या भासमान स्वरूपाबद्दल तुम्हीं दाखविलेल्या प्रेमाची आणि श्रद्धेची त्याला किंमत ती काय? हें प्रेम आणि ही श्रद्धा खऱ्या रामाचा--रामाच्या सर्वव्यापी स्वरूपाचा अपमानच आहे! चला, दूर व्हा. बाह्य आकारांबद्दलच्या स्वप्नांतून जागे व्हा. देह आणि देहाभिमान यांच्यासंबंधाच्या विकारांना दूर झुगारून द्या, व धर्माशीं एकतानतेनें राहून दैहिक कल्पनांना त्यानें जशी रजा दिलेली आहे, त्याप्रमाणें तुम्हीं करा. विषयासक्तीच्या कल्पनांवर आत्मज्ञानाचा तेजस्वी प्रकाश पाडून त्यांना खाक करा; जगाविषयींच्या विचारांना आणि संकल्पांना अंतःकरणांतून काढून टाकून खऱ्या रामाच्या आनंदानें तें ओतप्रोत भरून जाऊं द्या.

वर हरचीज़् ज़ुज़् दिल्बर बायद् अज़् शहरेदिल् बेरूं कुनम्

'मनरूपी नगरांतून प्रियकराशिवाय बाकीच्या सर्व विचारांना मला काढून टाकूं दे.'

जगांतील विषयांवर आपलें जितकें प्रेम आहे, तितकें तरी ईश्वरावर असावयास नको काय ?

ईश्वरावर प्रेम करण्याला लोक कांकूं करतात, याचें कारण असें कीं, जगांतील प्रेमाच्या भ्रामक विषयांप्रमाणें आपण ईश्वरावर प्रेम केलें तरी तो आपणांवर प्रेम करणार नाहीं, अशी त्यांची समजूत असते. किती मूर्खपणाची आणि अज्ञानमूलक भ्रमाची कल्पना ! मित्रांनो, काय सांगूं ? परमात्म्याचें अंतःकरण तुमच्यावरील प्रेमानें भरून गेलेलें आहे, व तें फक्त तुमच्या प्रेमाचीच वाट पहात आहे ! त्याच्यावर तुम्हीं प्रेम करूं लागलां म्हणजे लगेच त्याचें अंतःकरण तुमच्यावरील प्रेमामुळें उचंबळून येईल.

आपले मित्र आणि शत्रु हे वास्तविक नसून तो केवळ आपल्या कल्पनेचा खेळ आहे; अर्थात् त्यांच्या वर्तणुकीसंबंधानें उगीच चर्चा करीत बसूं नका. त्यांच्या कृत्यांची मीमांसा करण्याच्या भरीस पडूं नका. तुम्हांस जर कांहीं करावयाचें असेल तर तुमच्या स्वतःसंबंधानेंच आहे. सर्वांचें आदिकारण असें जें आपलें स्वरूप त्याच्यासंबंधानेंच फक्त विचार करा.

एखादें पक्ष्याचें लहानसें पिलूं नुकतेंच उडूं लागण्याचा प्रयत्न करूं लागलें, म्हणजे तें एका खांदीवरून उडून दुसऱ्या खांदीवर जातें, दुसरीवरून तिसरीवर जातें; परंतु भूमीवरील कोणत्याही वस्तूचा आधार न घेतां आकाशांत उंच उंच भराऱ्या मारणें त्याला आरंभीं आरंभीं जड जातें. ब्रह्मज्ञानाचा अभ्यास करणाऱ्या मनुष्याची स्थितीहि अशीच असते. तो एखाद्या वस्तूची किंवा मनुष्याची आपल्या चित्तांतील आसक्ति काढून टाकीत असतो; परंतु दुसऱ्या कोणत्या तरी विषयांत तो अडकून पडतो. एका भ्रमाचा आधार घेतल्याशिवाय दुसरा एखादा भ्रम त्याला काढून टाकतां येत नाहीं. पृथ्वीवरील सर्व विषय भ्रामक आहेत, असें समजून सर्व विषयांवरून आपलें चित्त काढून परमात्मस्वरूपांत चित्त लीन करण्याचें काम त्याच्यानें एकदम होत नाहीं. परंतु ब्रह्मानुभवांत मुरून गेलेल्या ज्ञानाची स्थिति निराळी असते. जगांतील कोणताहि एखादा विषय भ्रामक आहे, असें दिसून येतांच त्याचें चित्त एकदम परमात्मस्वरूपाकडे धांव घेतें. जगांतील लहानसहान गोष्टींतलि अनुभवाचा फायदा घेऊन आपलें चित्त परमात्मस्वरूपाकडे वळविण्यास शिकणें हीच परमा-

र्थाची कला होय. एक वस्तु भ्रामक आहे असें समजलें, म्हणजे खरा ज्ञानी सर्व विषयांबद्दलचें आपलें वैराग्य दृढ करतो.

सत्याचा त्रिशूल, देहाभिमानाचा मृत्यु हाच खरा धर्म आहे, ही गोष्ट ज्यानें ओळखली नाहीं, त्याच्या अंतःकरणावरील मायेचें पटल अत्यंत दृढ झालेलें आहे, व त्याची स्थिति अत्यंत शोचनीय आहे, असें निश्चित समजावें. त्रिशूल हा सर्व देहाभिमान पार नाहींसा करून टाकतो; व अशा रीतीनें व्यक्तिविषयक अहंकार नाहींसा होणें म्हणजेच सनातनजीवित होय ! याचा अनुभव करून घेऊन मुक्त व्हा.

———



# जीवन्मुक्ति

## कालीकमलीबाबा



माल्यांत जाण्यासाठीं राम जेव्हां लाहोराहून निघाला, तेव्हां विष्णुपुराणाचें फारसी भाषेंतील रूपांतर तो वाचीत होता. विष्णुपुराण हा अद्वैतशास्त्रावरील एक अतिशय दांडगा ग्रंथ आहे. या पुराणाचें संस्कृतमधून फारसी भाषेंत व फारसी भाषेंतून लॅटिन भाषेंत रूपांतर झालें असून इमर्सन व थोरो यांच्यासारखे प्रसिद्ध तत्त्वज्ञ ग्रंथकार लॅटिनमधील या भाषांतराचा आपल्या ग्रंथांत मोठा गौरव करतात. विष्णुपुराणाच्या फारसी भाषेंतील रूपांतरावरून पंजाबी भाषेमध्यें भाषांतर करण्यांत आलें आहे. पंजाबी भाषेंतील विष्णुपुराणाचा आधार घेऊन आणि त्यांत सुधारणा करून प्रसिद्ध सत्पुरुष कालीकमलीबाबा यांनीं अनुभव-प्रकाश या नांवाचा एक ग्रंथ केला आहे. या ग्रंथाचें पर्यालोचन केलें असतां तो सत्पुरुष किती उच्च दर्जापर्यंत जाऊन पोहोंचला होता, आणि त्याची मनःस्थिति किती उदात्त बनली होती, याची अंधुक कल्पना आपणांपुढें उभी राहाते. या सत्पुरुषाजवळ स्वतःची मालमत्ता किती होती हें पाहूं लागलें, तर एका काळ्या कांबळीशिवाय दुसरी कोणतीहि वस्तु नव्हती, असें दिसून येतें. तो मोठा जाडा पंडित होता, अशीहि स्थिति नाहीं. एकाच कुटुंबावर आपल्या चरितार्थाचा भार पडूं नये, या उद्देशानें तो दररोज दारोदार भिक्षा मागत असे. अशा मनुष्याला आपल्या कामाचा बडेजाव न करतां शांतपणानें किती विलक्षण कामगिरी करून दाखवतां येते, याचें प्रत्यंतर कालीकमलीबाबा यांच्या चरित्रांत पाहावयास सांपडतें. या सत्पुरुषाच्या नांवावर मोठमोठ्या नद्यांवर पूल बांधले जात आहेत, सडका तयार केल्या जात आहेत, धर्मशाळा उभारल्या जात आहेत, अन्नवस्त्र वांटलें जात आहे, लोकांना शिक्षण दिलें जात आहे; तसेंच हिमालयाखालच्या मैदानांतील तापलेल्या वाळूवर आणि त्याच्या अत्युच्च शिखरांवर राहणाऱ्या शेंकडों गरीबगुरीब लोकांना काम मिळत आहे.

### खरें काम केव्हां होतें ?



मनुष्यानें केलेले बेत आणि ठरविलेली धोरणें, यांची किंमत धुकें आणि धूर

यांच्यापेक्षां मुळींच जास्त नाहीं. ऐहिक हिताच्या दृष्टीनें केवढेहि अवाढव्य बेत ठरविले तरी त्यामुळें खरें काम होऊं शकत नाहीं. खरें काम ईश्वरानुभवाच्या दिव्य स्थितींत राहिल्यानेंच होऊं शकतें. निरनिराळ्या मनुष्यांना निरानिराळ्या स्थितींत राहून असली उदात्त स्थिति प्राप्त होऊं शकते. अमुक एक परिस्थिति त्यासाठीं असलीच पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं. हजारों लोकांच्या समुदायांत राहून सारखें काम करीत असतांहि एखाद्याला ही दिव्यस्थिति प्राप्त होऊं शकते; कित्येकांना एकांतांत राहिल्यानें या स्थितीचा अनुभव घेतां येतो, कित्येकांना आपत्ति ह्याच या दिव्य स्थितीकडे नेण्याला कारणीभूत होतात; ग्रंथ लिहीत असतां ईश्वरी साक्षात्काराचा अनुभव घेऊन कांहींना उदात्त ग्रंथ लिहितां येतात, तर जनसमुदायांतून व्याख्यानें देत असतां कित्येकजणांच्या अंतःकरणांतून ईश्वरी प्रकाश चमकूं लागून त्याचें तेज त्यांच्या वाणीच्या द्वारें लोकांवर परिणाम करतें. कित्येक इसम ऐन लढाईंत गुंतले असतां आणि शत्रुसैन्याच्या गोळ्या त्यांच्या छातीवर येऊन आदळत असतां देहाभिमानाचा त्याग करूं शकतात; आणि असेल पुरुष, प्रख्यात योद्धे म्हणून जगाच्या निदर्शनास येतात. कित्येकजण कलाकौशल्याच्या कामांत गढून गेले असतां दिव्य सौंदर्याचा अनुभव करूं शकतात. एखादा चोरसुद्धां मोठ्या चातुर्यानें आणि कौशल्यानें आपलें चोरीचें काम करणारा असला, तर तोहि देहाभिमान विसरून जाऊन शद्वातीत अशा त्यागाच्या स्थितींत जाऊं शकतो. चौर्यकर्मांतील खरें यशसुद्धां देहबुद्धीचा निरास झाल्याशिवाय येऊं शकत नाहीं. आतां चोरी करणें हें वाईट कृत्य आहे, याचें कारण असें कीं, खोट्या धनाला खरें मानून चोर चोरी करण्याला प्रवृत्त होतो; व या त्याच्या विपरीत भावनेबद्दल ईश्वरी कायद्याची कुऱ्हाड त्याच्या डोक्यावर कोसळल्याशिवाय रहात नाहीं, ही गोष्ट निराळी.

ज्या मानानें आपण खरे जिवंत राहूं, ऐहिक विषयांसंबंधानें मरण्यास—विषयातीत होण्यास शिकूं, त्या मानानें आपल्या हातून खरें काम होईल. हा जिवंतपणा किंवा मृत्यु उदात्त क्रिया करण्याला समर्थ करतो. एकांतवास, समाज, साधनें आणि उपकरणें हीं उदात्त क्रिया करण्याचें सामर्थ्य आपल्याला देऊं शकत नाहींत. मोठाल्या पुरुषांचीं चरित्रें लिहिणारे त्यांच्या बाह्य स्थितीचाच तेवढा विचार करतात; अंतरंगाकडे त्यांचें लक्ष जात नाहीं, व त्यामुळें जगांतील विख्यात पुरु-

षांना जें यश प्राप्त होतें त्याचें श्रेय, असले मूर्ख चरित्रकार कधीं कधीं त्यांच्या मनोहर भाषाशैलीला व क्वचित त्यांच्या अनुयायांच्या संख्येला देतात; परंतु असें करण्यांत यशाच्या गुरुकिल्लीकडे त्यांचें दुर्लक्ष होत असतें. ही त्यांची विचारसरणी किती अप्रयोजक असते! एखाद्या ग्रंथकारानें एखाद्या झाडाखालीं बसून उत्तम ग्रंथ लिहिला असला तर 'त्या झाडाच्या फांद्यांवर अमुक अमुक पक्षी उड्या मारीत होते,' म्हणून ग्रंथ उत्तम वठला असें प्रतिपादन करणें जितकें हास्यास्पद आहे, तितकीच ही विचारसरणी हास्यास्पद नाहीं काय? आपली परिस्थिति आणि आपल्याला येणारे अनुकूल योग, यांची वास्तविक किंमत ती काय? एका प्राचीन ऋषीनें एका योद्धयाच्या यशाचें वर्णन करतांना त्याचें श्रेय आंतल्या आणि बाहेरच्या देवाला—इंद्र आणि वरुण यांना दिलें आहे; व त्यानें तें यथायोग्य केलें नाहीं काय? तो ऋषि म्हणतो:—

सुदासमिंद्रावरुणावसावतम् ।

(ऋग्वेद.)

'हे इंद्र व वरुणहो! सुदासाचें रक्षण करा.'

फारसी वाङ्मयांतील प्रसिद्ध कवि बुल्लाशहा म्हणतो त्याप्रमाणें 'पाकोळ्या गरुड पक्ष्यांचा पराभव करतात,' असें आपण नित्यशः पहातों. याचा अर्थ असा कीं, आपल्या आशांचे आणि मनोराज्यांचे बुडबुडे फुटून विलय पावतात; किंवा येशु ख्रिस्त म्हणतो त्याप्रमाणें 'आपल्या भंग पावलेल्या आशा ह्या विटा असून त्या मोठमोठ्या इमारतींच्या कोणाशिला आहेत,' असें मानण्यांत येतें. आपल्या आशा जरी नेहमीं विफल होत असतात तरी आपल्या अंगीं वैराग्य बाणत नाहीं. बाह्य स्थितीवर अवलंबून न राहणें, ज्याला व्यावहारिक ज्ञान असें भपकेदार नांव देण्यांत येतें, त्याची कांस न धरणें, ही यशाची किल्ली आहे. आपली जगांतील सर्व नातींगोतीं, स्नेह, आशा आणि आकांक्षा म्हणजे निव्वळ फसवणूक होय; भ्रमांतील भ्रम होय! जग हें नश्वर आहे, हा विचार आपल्या मनांत येण्यास सुरेश्वराचार्य किंवा शंकराचार्य यांच्या सूक्ष्म तर्कशक्तीची अवश्यकता नाहीं! ज्यांना डोळे आहेत त्यांना व्यवहारांतील प्रत्येक लहान सहान अनुभव तोफेच्या भयंकर आवाजाप्रमाणें जगाचें मिथ्यात्व प्रतिपादन केल्याशिवाय राहात नाहीं.

तत्त्वमस्यादि वाक्यानाम् । स्वतःसिद्धार्थबोधनात् ।
अर्थान्तरं न सन्द्रष्टुम् । शक्यते त्रिदशैरपि ॥

महात्म्यांचें बंड, सुधारकपणा, मानमरातब, अधिकाराच्या जागा व ऐहिक संबंध यांना स्वप्नापेक्षां जास्त किंमत नाहीं; आपल्या विकृत कल्पनाशक्तीनें उत्पन्न केलेले ते भ्रामक देखावे आहेत. आकाशांतील मेघांचे बदलणारे आकार व संधिप्रकाशांत भासमान् होणारीं भुतेंखेतें, यांच्यापेक्षां त्यांना जास्त महत्त्व नाहीं. आपणांमधील आत्मस्वरूपाशीं—रामाशीं आपण विरोध करूं लागलों म्हणजे आपणांपुढील मार्ग—धर्मानें आंखून दिलेला मार्ग आपणांस दिसेनासा होतो; व असें झालें म्हणजे दुःख भोगण्याचें आपल्या नशिबीं आलेंच पाहिजे. आपलें परमात्मस्वरूपाशीं तादात्म्य झालें म्हणजे उन्नतीचे खरे मार्ग, खऱ्या प्रेरणा, खऱ्या मनःप्रवृत्ति आपल्या अंतःकरणांत आपोआप उदित होतील आणि त्या आपणांस सृष्टींतील रमणीय देखावे, पर्वतांतील अपूर्व वनश्री, अंतःकरणाला आनंद देणारे रमणीय ओढे, व ऐश्वर्य आणि पावित्र्य यांच्याकडे नेल्याशिवाय राहाणार नाहींत. सारांश, आपण आत्मदेवाच्या आनंदांत बुडून गेलों म्हणजे जगांतील सर्व जीवन आणि प्रेम यांना आपल्याला आकर्षित करून घेतां येईल.

## अहंकाराचा यज्ञ

वैदिक कालांतील यज्ञासंबंधाच्या अत्यंत सूक्ष्म, गहन आणि भव्य अशा विधींमध्यें देहाभिमानाचा यज्ञ करण्याचेंच तत्त्व प्रमुखत्वेंकरून आहे. प्राचीन कालांतील ऋषींना रुद्र ही देवता जितकी भयंकर आणि सत्त्य वाटत असे, तितकेंच मृत्युमधील जीवनाचें तत्त्व रामाला भयंकर आणि सत्य वाटतें. या तत्त्वाची हेटाळणी करा म्हणजे दुःखाचे तीव्र बाण तुमच्या अंतःकरणांवर येऊन आदळलेच म्हणून समजा.

नमस्ते रुद्र मन्यव उतोत इषवे नमः ।
बाहुभ्यामुत ते नमः ॥ १ ॥ ( यजुर्वेद )

' हे रुद्रा—रुद्रस्वरूपी धर्मा ! तुझ्या क्रोधाला नमस्कार असो; तुझ्या ( अचुक ) बाणांना आणि बाहूंना मी वंदन करतों.

व्यवहारांतील आपल्या बारीक सारीक अनुभवांत सर्व जगाचा इतिहास वास्तविक संकलित झालेला असतो. परंतु तो वाचण्याची आपल्याला बुद्धि होत नाहीं.

एखादा क्षुद्र मनुष्य होणें हें जितकें सोपें आहे, तितकेंच बुद्ध किंवा खिस्त होणें सोपें आहे. परंतु तें केव्हां ? बुद्ध किंवा खिस्त होण्याची किंमत देण्याला आपण तयार होऊं, आणि देहाभिमानाला अजिबात रजा देऊन ईश्वरी प्रेरणेप्रमाणें सर्वस्वीं वागण्यांत तत्पर राहूं तेव्हां. एका म्यानांत दोन तरवारी कधीं रहात नाहींत. अहंकर्तृत्वाची भावना टाकून देऊन लोकांनीं केलेली निंदा किंवा स्तुति यांना भीक न घालण्याचा आपण प्रयत्न करूं लागलों, 'आजचा काळ मजेंत गेला म्हणजे झालें, उद्यांची काळजी कशाला,' या ध्येयाचा आपण त्याग केला, व सत्य प्रतिपादन करण्यापेक्षां त्याच्याशीं तद्रूप होण्यांतच आपण धन्यता मानूं लागलों, तसेंच सूर्य आकाशांत उदित होतो आणि त्याच्या सत्तेनें सर्व व्यवहार चालतात तरीहि तो सर्व व्यवहारापासून अलिप्त असतो, त्याप्रमाणें आपण वागूं लागलों, तर आपण सर्व देवांचे देव बनूं शकूं. लोक आपल्यासंबंधानें काय म्हणतात, याचा विचार आपल्या डोक्यांत आला म्हणजे आपली प्रगति थांबलीच म्हणून समजा. वास्तविक जग जर नाहींच, तर त्यांतील लोकांच्या बोलण्याकडे लक्ष देण्याचें कारण काय ? जग हा भ्रम असून फक्त ईश्वरालाच सत्यत्व आहे.

## प्रगतीकरितां दुःख कां ?

सोनें शुद्ध होण्याला अग्नीची जरूर असते, त्याप्रमाणें मनुष्याच्या शीलाची प्रगति होण्याला जगांत दुःखाची अवश्यकता आहे, असें कांहीं लोक प्रतिपादन करतात. धडपड केल्याशिवाय सृष्टीमध्यें कोणाचीच प्रगति होत नाहीं, ही गोष्ट खरी, व आजपर्यंतची स्थिति कदाचित् अशी असेल; परंतु ती चिरकाल कायम टिकेल असें मानण्याला काय आधार आहे ? कोणतेंहि रासायनिक द्रव्य नवजातस्थितींतून गेल्याशिवाय, त्याचें पूर्वस्वरूप बदलल्याशिवाय तें दुसऱ्या वस्तूंवर परिणाम करूं शकत नाहीं. कोणतेंहि बीज अगोदर जमीनींत कुजतें तेव्हांच त्याच्यापासून अंकुर उत्पन्न होतो. कोणत्याहि दोन धातूंचें मिश्रण करावयाचें झाल्यास त्या तापवून वितळण्याच्या स्थितीपर्यंत जाव्या लागतात, एरव्हीं त्यांचें मिश्रण बनूं शकत नाहीं. मनुष्याची स्थितीहि अशीच असते. मनुष्य जगांतील बाह्य वस्तूंवर आपल्या सुखासाठीं अवलंबून राहतो, व भावी सुखाच्या आशेनें आपले दिवस काढीत असतो.

परंतु एकाएकीं त्याच्यावर संकटें कोसळतात, आणि त्यांच्या भाराखालीं त्याच्या सर्व आशा चुरडल्या जातात. अशा रीतीनें आपत्तींच्या आघातानें त्याच्या मनावर उदासीनतेचा पगडा बसतो, व ही उदासीनतेची–वैराग्याची स्थिति कांहीं वेळ राहिली म्हणजे त्याला पुन्हां यश येऊं लागतें. येशू ख्रिस्तासंबंधानें लोकांचे समज कांहींहि असोत; परंतु खरी स्थिति अशीच असली पाहिजे कीं, ईश्वरी मार्गातून मनुष्य च्युत झाल्याशिवाय–वैराग्याच्या मार्गांत तो अडखळून पडल्याशिवाय त्याच्यावर संकटें कधींहि यावयाचीं नाहींत. ख्रिस्ताचा छळ झाल्यामुळें तो समचित्त झाला आणि प्रत्यक्ष सुळावर चढविण्यापूर्वी त्यानें आपण होऊन आपणांस वैराग्याच्या शूलावर चढवून घेतलें व यामुळें तो सर्व जगाला सर्वकालीं वंदनीय झाला ही गोष्ट खरी. परंतु दुःख आणि छळ यांच्या पाठीमागून नेहमीं यश आणि सुख हीं नियमानें येतातच असें नाहीं. पुष्कळ वेळां एक दुःख, दुःखपरंपरेचें सूचक असतें. दुःख हें कधीं एकटेंच येत नाहीं, त्यांची परंपराच एकामागून एक येत असते, अशी म्हण आहे. आपणांवर एक विपत्ति येऊन कोसळली असतां तितक्यानें आपण जागे झालों, आपली वृत्ति वैराग्यशील बनली तर आपलें चित्त, चैतन्याच्या प्रकाशाकडे वळल्याशिवाय खात्रीनें राहणार नाहीं. परंतु याच्या उलट स्थिति झाली व एका दुःखाच्या आघातानें ईश्वरी नियमांना लाथाडण्याची आपली वृत्ति बळावली तर पूर्वीपेक्षांहि जास्त भयंकर दुःखें आपणांवर कोसळल्याशिवाय राहाणार नाहींत. ईश्वरी कायदा कडक आहे, व त्याची अंमलबजावणी कधींहि टळत नाहीं. परंतु तो कायदा तितकाच गहन आहे. ईश्वरी कायद्यांचें ज्ञान करून घेऊन त्यांना अनुसरून आपण वागलों नाहीं तर हजारों संकटें आपणांवर आघात केल्याशिवाय कधींहि राहणार नाहींत. ज्यांच्यामध्यें वैराग्यशीलता असेल तेच उन्नतीच्या शिखरावर जाऊन पोहोंचतील. पूर्वी बाष्पयंत्राची शक्ति नियमित करणारी नियामक यंत्रें नव्हतीं. व त्यामुळें वाफेची शक्ति हुकुमी ताब्यांत राहात नसे. परंतु अशीं यंत्रें आतां झालेलीं असल्यामुळें वाफेची शक्ति विनाकारण वांया जाण्याचें कारण नाहीं. याच न्यायानें वैराग्यशीलता हें दाबाचें यंत्र असून तें आपण आपल्या स्वाधीन करून घेतलें म्हणजे पशूंना वठणीवर आणण्याला शासनाची अवश्यकता असते, त्याप्रमाणें दुःखें आणि विपत्ति यांची मनुष्यांच्या उन्नतीसाठीं जगांत आवश्यकता राहाणार नाहीं.

## रोग एक व उपायहि एकच

भौतिक शरीराशीं तादात्म्य करून घेऊन काम करीत राहाणें, हा जगांतील संकुचित राज्यसंस्थांच्या दृष्टीनें गुन्हा ठरत नाहीं. परंतु, परमेश्वराच्या सार्वत्रिक आणि सर्वव्यापी राज्यामध्यें हाच काय तो मुख्य गुन्हा आहे; व बाकीचे सर्व गुन्हे किंवा दोष, हे केवळ ह्याच्या निरनिराळ्या शाखा होत. रोग एक आहे आणि त्यावर उपायहि एकच आहे. 'ब्रह्म सत्यम् जगन्मिथ्या' हा वेदान्ताचा नियम मोडणें हें सर्व तऱ्हेच्या रोगांचें मूळ आहे. हा नियम मोडल्यानें कधीं या तऱ्हेच्या रोगाची उत्पत्ति होईल किंवा कधीं त्या तऱ्हेच्या रोगाची उत्पत्ति होईल; परंतु तें कसेंहि असलें तरी रोगाचें मूळ तेंच आहे आणि त्यावर उपाय म्हटला म्हणजे आपल्या परमात्मभावाशीं तादात्म्य करून घेणें हाच फक्त आहे. परंतु तसें करण्याऐवजीं एकदां आत्मदृष्ट्या आपण आपली फसगत करून घेतली-आपण मोहवश झालों म्हणजे बाकीच्या फसवणुकी क्रमाक्रमानें आपोआपच उत्पन्न होतात.

रामाचे हे विचार म्हणचे एखाद्या संन्याशाचे नुसते कल्पनेचे तरंग, कल्प-नेचे फवारे असून समाजांत राहाणाऱ्या मनुष्याला त्यांचा कांहीं उपयोग नाहीं काय ? हौदांतील पाण्याचा त्या ठिकाणीं कांहीं उपयोग होत नाहीं, परंतु यावरून ज्या शेतांतून तें पाणी जातें, त्यांनीं आपल्या पिकासाठीं त्याचा उपयोग करून घेऊं नये, असा अर्थ होतो काय ? प्रत्येक मनुष्याच्या जीविताला लागू पडणारा जीवनाचा शाश्वत कायदा राम सांगून ठेवीत आहे. 'ब्रह्म सत्यम् जग-न्मिथ्या' हा तो कायदा होय! व जगांतील सर्व नियम—रसायनशास्त्र, प्राणि-शास्त्र, मानसशास्त्र वगैरे संबंधाचे सर्व नियम हे या त्रिकालबाधित कायद्याचीं निरनिराळीं रूपें होत.

कार्य आणि कारण यांच्यासंबंधाचा सार्वत्रिक नियम, जगांतील सर्व तऱ्हेचीं ऐहिक नातींगोतीं, आपल्या आकांक्षा आणि कर्तव्यकर्में हे केवळ स्थित्यंतराचे बिंदु होत. विचाराचीं हीं केवळ बदलणारीं प्रमाणें असून रस्त्यांतील खाणावळी, मुलींच्या बाहुल्या यांच्यापेक्षां त्यांची किंमत जास्ती नाहीं. परंतु आपल्या बुद्धि-रूपी क्षितिजांवर एकदां आत्मसूर्य प्रकाशूं लागला—आत्मस्वरूपाची आपल्या ठिकाणीं जाणीव उत्पन्न झाली म्हणजे जगांतील सर्व तऱ्हेचे नियम आणि कार्य-कारणमालिका, आकाशांतील ग्रह आणि उपग्रह यांच्याप्रमाणें आपल्याभोंवतीं—

आत्मसूर्याभोंवतीं भ्रमण करीत आहेत, असा आपल्याला अनुभव येईल; एवढेंच केवळ नव्हे तर जेवणाची वेळ झाली म्हणजे लहान मुलें जशीं आईजवळ जातात, त्याप्रमाणें जगांतील सर्व नियम आपणांजवळ आल्याशिवाय राहाणार नाहींत.

' यथेह क्षुधिता बाला मातरं पर्युपासते ' ।

( सामवेद. )

लहान मूल ज्याप्रमाणें सहजरीतीनें चालूं लागतें, त्याप्रमाणें सहज आणि स्वाभाविक रीतीनें मरण्यास मनुष्यानें तयार झालें पाहिजे. ही मृत्यूची स्थिति देहांत असतांनाच प्राप्त व्हावयाची असून ही मोठी विलक्षण आहे. या स्थितींत गेल्यानंतर नोकर हा मनुष्याचा नोकर असत नाहीं, शिष्य हा शिष्य राहात नाहीं; या स्थितींत राजाचा राजेपणा, मित्रांचें मित्रत्व, शत्रूंचें शत्रुत्व, लोकांच्या आश्वासनांचें आश्वासन, धाकाचा धाक, तरतूदीची तरतूद व हक्कांचा हक्क नाहींसा होऊन सर्व ईश्वर होतो. सद्वस्तूशिवाय कांहीं शिल्लक राहात नाहीं. सद्वस्तूशीं अंतःकरणाचें तादात्म्य झालें म्हणजे आपल्या अंतःकरणाची प्रेरणा सर्व जगावर जाऊन आदळते; परंतु आपलें मन सद्वस्तूशीं विसंगत झालें म्हणजे आपल्या मनाशीं जगाचा सूर मिळेनासा होतो. आपल्या शरीराची कोणी निंदा केली असतां आपण तिचा प्रतिकार करूं लागलों, ' जशास तसें,' या न्यायाचा अवलंब करून आपणहि दुसऱ्यांची निंदा करूं लागलों, तर आपण अधोगतीस जाऊं लागतों. आपला उपहास झाला असतां किंवा आपणांवर कुत्सित टीकेचा भडिमार झाला असतां त्याकडे दुर्लक्ष करणें, याच्यापेक्षां मोठेपणाचें दुसरें कोणतेंहि निश्चित लक्षण नाहीं. एखादा मनुष्य वकिलीचा धंदा करीत असतां कांहीं दिवसांनीं न्यायाधीश बनला म्हणजे लगेच त्याच कचेरींतील सर्व लोक त्याच्याबद्दल आदर आणि पूज्यभाव दाखवूं लागतात. याच न्यायानें आपल्या गुणांची वकिली करण्याचा धंदा सोडून देऊन आपण ईश्वराच्या तटस्थ स्थितींत प्रवेश केला म्हणजे सर्व जगाचा आपल्यासंबंधीचा पूर्वीचा भाव अजीबात बदलून जाईल; आणि गलबताची दिशा बदलली असतां त्यावरील होकायंत्राची सुई जशी बदलते, त्याप्रमाणें आपणांविषयींचें लोकांचें धोरण खास बदलल्याशिवाय रहाणार नाहीं. आपणांस इतर लोक फसवीत असतील तर त्याचें कारण आपण ईश्वराला फसवून आपल्या अंतःकरणांतून त्याला बाहेर काढून लावलें आहे हेंच होय.

पंडित जेम्स याचें पुढील वाक्य अक्षरशः खरें आहे. तो म्हणतो:–'आपल्या भोंवतालच्या प्रत्यक्ष जड वस्तूंची आपल्या अंतःकरणावर होणारी जाणीव किंवा संवेदना कमी कमी होत जाणें, व दूरस्थ वस्तुस्थितीचा आपल्या कृतीवर जास्त परिणाम होत जाणें, हाच जीविताचा पाया आहे. पशूंवर फक्त भौतिक सृष्टीचाच परिणाम होतो; परंतु पशूंना अदृश्य असलेल्या जीवनाच्या तत्वांचें मनुष्याला ज्ञान होऊं लागलें व जडसृष्टीइतकेंच त्याचें महत्व मनुष्याला वाटूं लागलें, म्हणजे मनुष्याचा उद्धार होऊं लागला असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु जगांतील नश्वर आकारांवर व जड संपत्तीवर तो सर्वस्वीं अवलंबून राहूं लागला म्हणजे तो अज्ञानांत गुरफटला व ईश्वरी प्रकाशाला पारखा झाला असें म्हटलें तरी चालेल.

'या निशा सर्वभूतांना तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥
(भगवद्गीता. अ. २।६९)

---

## ज्ञानाची थोरवी

खलील्‌ आं रोज्‌ बा आतिश्‌ हमीं गुफ्त्‌
अगर्‌ मूये जे मन्‌ बाकीस्त दर सोज्‌
बदू मीं गुफ्त्‌ आं आतिश्‌ कि ए शाह्‌
बपेशत्‌ मन्‌ बिमीरम्‌ तो दर्‌ अफरोज्‌

अब्राहाम याला जिवंत जाळलें जाण्याची शिक्षा झाल्यानंतर तो अग्नीला म्हणाला:—'देहाभिमानाचा एकहि केंस माझ्या ठिकाणीं अवशेष राहिला असेल तर तो साफ जाळून टाक; तो शिल्लक ठेवूं नको. परंतु अब्राहाम याला जणूं काय उत्तर देण्यासाठींच पूज्य भावानें अग्नी विझून गेला व तो अब्राहाम याला म्हणाला कीं, 'हे राजा! तुं खुशाल राहा. मला तुझ्यासमक्ष नाहींसा होऊं दे.'

परमेश्वरी कायदा असा आहे. तुम्ही ईश्वराशीं जशा रीतीनें वागाल तशा रीतीनें तो तुमच्याशीं वागतो. सभ्यपणाच्या वागणुकींत तो कोणालाहि हार जाणार नाहीं!

रुचं ब्राह्मम् जनयन्तो देवा अग्रे तदब्रुवन् ।
यस्त्वेवं ब्राह्मणो विद्यात्तस्य देवा असन्वशे ॥
( यजुर्वेद संहिता. )

सर्वाण्येनम् भूतान्यभिक्षरन्ति.
( बृहदारण्यकोपनिषद्. )

सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति.
( तैत्तिरियोपनिषद्. )

उत्पत्तिकर्ते देव सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मोपासकांना उद्देशून म्हणाले—' जो जो ब्रह्मज्ञान संपादन करील त्याची सेवा करण्याला आम्हीं आज्ञाधारक नोकरांप्रमाणें तयार आहोंत. '

' सर्व भूतें त्याच्यामध्यें येऊन मिळतात. '
' सर्व देव त्याला बलि देतात. '

---

## वेदान्ताविरुद्ध एक आक्षेप

वेदान्त मनुष्याच्या अंतःकरणांतील सर्व कोमल भाव आणि सौंदर्याची दृष्टी नाहींशी करून आपल्या सर्व नातेवाइकांसंबंधानें निष्ठुरपणाचें वर्तन करावें, जगांतील कोणत्याहि वस्तूवर प्रेम करूं नये, असा उपदेश करीत नाहीं काय ?

होय ! वेदान्ताचा तसा उपदेश आहे. सत्यासंबंधानें, सद्वस्तूसंबंधानें मनुष्याचें प्रेम इतकें दृढ व्हावें कीं, जगांतील सर्व वस्तु आणि त्यांच्यामधील कार्यकारणपरंपरा; तसेंच सर्व मनुष्यें आणि त्यांचीं मतें, यांची त्याला मुळींच किंमत वाटूं नये, असें वेदान्त प्रतिपादन करतो. या उपदेशामुळें अंतःकरणांतून मानवी भावना किंवा खरें पाहूं गेलें तर पशुभावना नाहींशा केल्या तर त्याच्या ऐवजीं परमात्मविषयक भावनांचा प्रवाह मनुष्याचें अंतःकरण भरून टाकतो. अंतःकरणांतील कृत्रिम प्रकाश काढून टाकून, तो आत्मसूर्याचा दिव्य आणि आनंदमय प्रकाश सर्वत्र पसरून आनंदी आनंद करून सोडतो. अध्यात्मज्ञानाचा पुष्कळसा अनुभव असलेला एक इंग्रजी मनुष्य लिहितो कीं, ' आपल्या स्वतःसंबंधानें विचार करण्याचें मनुष्यानें अजीबात सोडून द्यावें, याच्यासारखें सुख दुसरें कशांतच नाहीं. या तत्त्वावर माझा पूर्वी केव्हांहि विश्वास नव्हता. परंतु अनुभवानें

त्यांतील हद्दत मला पूर्णपणें समजलें आहे. स्वतःसंबंधानें विचार सोडून द्यावयाचा त्यांत अर्धवटपणा बिलकुल उपयोग नाहीं; शरीरासंबंधानें थोडीशीसुद्धां प्रीति अंःतकरणांत शिल्लक राहिली तर त्यामुळें सर्व काम बिनसून जाईल; आपल्याला एखाद्या परकी मनुष्यासंबंधानें जितकी सहानुभूति वाटते त्याच्यापेक्षां रेंसभरहि जास्त सहानुभूति आपल्या देहासंबंधानें आपल्याला वाटतां कामा नये.'

आपल्या पुढील उद्योगासंबंधाचे वर्षानुवर्षांचे ठरलेले बेत आणि ठरविलेलीं धोरणें, आपली लोकांमधील कीर्ति आणि लोकांचें आपल्या संबंधाचें मत, आपल्या ओळखीच्या मनुष्यांचे शब्द यांचा निरास करण्यास शिका; त्यांच्या-संबंधाची आपली आसक्ति काढून टाका. आपणांवर प्रेम करणाऱ्या जिवलगांनीं आलिंगन देण्यासाठीं पुढें केलेले हात बाजूला सारा, आणि हातांतील हातमोजे जितक्या लीलेनें काढून टाकले जातात तितक्या लीलेनें देहावरील प्रेम आणि आसक्ति काढून टाका. लोकप्रियतेच्या आशा व पुढें उद्भवणाऱ्या रोगांसंबंधाची भीति यांना अजीबात रजा देऊन आपल्या शरीरासंबंधाच्या संकुचित भावना झुगारून देऊन मोकळे व्हा. देहावरील आसक्तीचें आवरण फेंकून द्या. हजारों वर्षांच्या संस्कारानें देहाविषयींचीं आसक्ति तुमच्या ठिकाणीं दृढ होऊन गेलेली आहे; परंतु तांदुळावरील तुसाइतकीच या देहाची किंमत आहे, असा विचार मनांत आणून देहबुद्धीला फांटा द्या. देहाविषयींचें नुसतें वैराग्य दृढ करू-नच राहूं नका; तर त्याच्याहिपुढें जाऊन आत्मज्ञान संपादन करा, आणि पर-मात्मभावनेच्या अचल आणि दिव्य मंदिरांत राहण्याचा अभ्यास करून आपली मुक्तता करून घ्या. अंतःकरणांत त्यागबुद्धि एकदां पूर्णपणें बाणली म्हणजे कशी स्थिति होते तें पहा तर खरें ! तशी स्थिति झाली म्हणजे ऐहिकदृष्ट्या तुम्हीं पूर्णपणें भिकारी आणि कंगाल असे दिसलांत, तरी अध्यात्मदृष्ट्या तुम्हीं सर्व चराचराचे अधिपति व्हाल !

ह्रीश्च ते लक्ष्मीश्च पत्न्यौ । अहोरात्रे पार्श्वे नक्षत्राणि
रूपम् । अश्विनौ व्यात्तम् । इष्टं मनिषाणा ( यजुर्वेद. )

" यश आणि लक्ष्मी ह्या तुझ्या पत्न्या आहेत, दिवस आणि रात्र उजव्या व डाव्या बाजू आहेत; नक्षत्र हें तुझें रूप आहे; द्यावापृथ्वी हें तुझें पसर-लेलें तोंड आहे. सर्व सदिच्छा सफल कर.

ॐ! ॐ!! ॐ!!!

# चित्ताची समता

( ता. १९ फेब्रुवारी १९०३ रोजीं खासगी वर्गात दिलेलें व्याख्यान. )



थोड्या दिवसांपूर्वी एका गृहस्थानें रामाला असा प्रश्न विचारला होता कीं, 'हल्लींच्या युगांत मनुष्याला वेदान्ताचा अनुभव करून घेतां येणें शक्य आहे काय?' सदरहू गृहस्थाच्या बोलण्यावरून त्याचें असें मत दिसलें कीं, वेदान्ताचा अनुभव करून घ्यावयाचा असेल, तर मनुष्यानें घरादाराचा त्याग करून हिमालयासारख्या पर्वतांत जाऊन राहिलें पाहिजे; परंतु यावर राम म्हणतो कीं, असें करण्याची मुळींच जरूर नाहीं. अरण्यांत गेल्याशिवाय आत्मज्ञान संपादन करतां येत नाहीं, ही कल्पना चुकीची आहे.

## वेळाची तक्रार !

हल्लींच्या काळांत लोकांची नेहमीं वेळासंबंधानें तक्रार असते. लोक नेहमीं म्हणतातः—'का५हो ! काय करावें ? आम्हांला पुष्कळ गोष्टी करतां येतील; पण त्या करण्याला आम्हांला वेळ आहे कोंठें ? आमच्या पोटाचा उद्योगधंदा करण्यांत बहुतेक वेळ जातो; स्नेही आणि सोबती यांच्याशीं बोलण्याचालण्यांत थोडासा वेळ जातो; मिळून एकंदरींत कांहीं करावयाचें म्हटलें तर वेळाची मोठी पंचाईत पडते.' तुम्हीं खिस्ती लोक अशी प्रार्थना करतां कीं, 'हे देवा ! आमचें शत्रूंपासून रक्षण कर.' परंतु या प्रार्थनेऐवजीं आधुनिक काळांतील मनुष्याला खरोखर अशीच प्रार्थना करण्याची वेळ आली आहे कीं, 'हे देवा ! माझें मित्रांपासून रक्षण कर !' हे लोक म्हणतात, 'आमचे स्नेहीसोबती आमचा सर्व वेळ खाऊन टाकतात. व्यवहारांतील काळज्या, चिंता आणि खेद यांत वेळ जातो तो निराळाच. याशिवाय आमचीं मुलेंबाळें आणि घरांतील आप्तमंडळी यांच्याकरितां आम्हांला रोज थोडा तरी वेळ खर्चीं घालावा लागतो. आमच्याकडे कोणी पाहुणे भेटण्यास आले म्हणजे त्यांच्या भेटी घ्याव्या लागतात, आणि त्यांना उलट परत भेटी द्याव्या लागतात. जगांत काय चाललें आहे, हें समजावून घेण्यासाठीं वर्तमानपत्रें वगैरे वाचण्यांत कांहीं वेळ घालविल्या-

शिवाय आमचें चालतच नाहीं. अशा स्थितींत आध्यात्मिक प्रगति करून घेण्यांला वेळ राहणार कोठून? आमचीं नित्याचीं कर्तव्यकर्में केल्याशिवाय गत्यंतर नाहीं; त्यांत आमचा बहुतेक सर्व वेळ निघून जातो; आमचे नित्याचे व्यवसाय करण्याखालीं आम्हाला जेवणालासुद्धां पुरेसा अवकाश मिळत नाहीं.' कर्तव्यकर्मांच्या ओझ्याखालीं तुमचा सर्व जन्म फुकट जातो, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं; पण यावर असा प्रश्न विचारतां येण्यासारखा आहे कीं, ज्या कर्तव्यकर्मांचा तुम्हीं एवढा बाऊ करून दाखवितां तीं आलीं कोठून? व तीं तुमच्यावर लादलीं कोणी? अर्थात् तुम्हींच. तुम्हींच आपलीं कर्तव्यकर्में उत्पन्न करतां, आणि तीं आपणांवर लादून घेतां! रोज कचेरींत जाऊन काम करणें हें आपलें कर्तव्य आहे असें तुम्हीं मानतां; परंतु तें तरी तुम्हांला कोणी लावून दिलें? अर्थात् ती तुमचीच भावना आहे. आपल्या नोकराला निष्ठुर-पणानें राबविणाऱ्या धन्याप्रमाणें कर्तव्यकर्म तुम्हांला अहोरात्र राबवीत आहे, असें दिसतें; परंतु अशी स्थिति असतां कामा नये. एकंदरींत कर्तव्यकर्मांचें बारकाईनें निरीक्षण केलें असतां असेंच म्हणावें लागतें कीं, ज्या कर्तव्यकर्मांनीं तुम्हांला गुलाम करून सोडलें आहे; त्यांची ती गुलामगिरी करण्याचें तुम्हीं आपण होऊन पत्करलें आहे! वास्तविकपणें पाहिलें तर तुम्हांला बांधणार कोण? तुम्हीं आपण होऊन आपल्याला बद्ध करून घेतलें आहे; कर्तव्यकर्मांची नसती ब्याद तुम्हीं आपल्यामागें लावून घेतली आहे. अशा रीतीनें विचार केला असतां तुम्हांला आपली मानासिक स्थिति उदात्त करतां येऊन पूर्ण सुखी होतां येईल.

एकदां एक गृहस्थ पंडित जॉन्सन याजकडे आला आणि म्हणाला—"पंडि-तजी, मी साफ बुडलों आहें. कोणतेंहि काम करण्याला मी नालायक बनलों आहें; मला कोणतेंहि काम करवत नाहीं. या जगांत मनुष्याला काय करतां येणें शक्य आहे?" त्या गृहस्थाचा हा विचित्र प्रश्न ऐकून जॉन्सन याला कांहींच उलगडा होईना. 'तुझ्या म्हणण्याचा अर्थ तरी काय, तें नीट स्पष्ट करून सांग,' असें जॉन्सन त्या गृहस्थाला म्हणाला. त्यावर तो गृहस्थ म्हणाला, "या जगांतील मनुष्याचें आयुष्य फार फार तर शंभर वर्षांचें असेल; व अनंत कालाच्या दृष्टीनें पाहिलें असतां शंभर वर्षांचा हा काल म्हणजे कांहींच नाहीं. यांपैकीं निम्मीं वर्षें झोपेंत जातात. तसेंच बाळपणांत आयुष्याचीं बरींच वर्षें निघून जातात व म्हातारपणांतहि बराचसा काळ अशक्त आणि दुबळ्या स्थितींत

कांहीं न करतां निघून जातो. राहतां राहिला मधला तारुण्याचा काळ. या काळांतील बराच भाग नानातऱ्हेच्या दुष्ट विचारांत आणि मोहांत फुकट जातो; कांहीं काल खेळण्यासवरण्यांत जातो; कांहीं काल खाण्यापिण्यांत आणि शरीराची बडदास्त ठेवण्यांत वांया जातो. प्रपंच्यामध्यें क्रोध, मत्सर, चिंता, दुःख आणि यातना यांच्या तडाक्यांत बराच काळ व्यर्थ जातो. बाकी शिल्लक राहिलेल्या वेळांत आपल्या कुटुंबांतील मंडळी, आपले स्नेहसोबती आणि नातेवाईक यांच्या हितासाठीं झटावें लागतें; व यामुळें स्वतःच्या कल्याणाचा कांहीं उद्योग करण्याला मनुष्याला फुरसत मिळत नाहीं. आपले जुने आप्तसंबंधी लोक मरतात त्यांच्याबद्दल शोक करण्यांत, आणि नवीन जन्मलेल्या मुलांबद्दल आनंदोत्सव करण्यांत आमचा कितीतरी वेळ फुकट जातो. अशा स्थितींत आपली खरी उन्नति करून घेण्याला आणि आपलें ईश्वरत्व अनुभवण्याला मनुष्याला मोठी पंचाईत पडावी, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. छे, हो! वेळच नाहीं, त्याला करणार काय? प्रार्थनामंदिरें, धर्म, धर्माचे प्रवर्तक आणि उपदेशक यांचा अशा स्थितींत उपयोग काय? धर्माचें ज्ञान संपादन करण्याला मनुष्याला जेथें वेळ नाहीं, तेथें धर्मांनीं आणि प्रार्थनामंदिरांनीं काय रडावें? छे छे! या स्थितीमुळें माझी तर मति अजीबात गुंग होऊन गेली आहे!" त्या गृहस्थाचे हे शब्द ऐकून जॉन्सन याला हंसू आलें नाहीं, किंवा त्याच्या भाषणावर टीकेचा भडिमार करण्यालाहि त्यानें सुरवात केली नाहीं. त्या गृहस्थानें वर्णन केलेली शोचनीय स्थिति पाहून जॉन्सन याला रडूं आलें, व सहानुभूतीच्या शब्दानें तो त्याला म्हणालाः—"धर्मज्ञान संपादन करण्याला मनुष्यांना फुरसत नसेल तर त्यांनीं खरोखर आत्महत्याच करावी! मित्रा, तूं आपली एक तक्रार मला सांगितलीस, परंतु त्यापेक्षां जास्त शोचनीय अशी माझी एक तक्रार आहे." पंडित जॉन्सन याला तक्रार करण्याला काय कारण आहे, असा त्या गृहस्थानें प्रश्न केला. त्यावर दुःखाचा उमाळा आल्याचें सोंग करून जॉन्सन म्हणालाः—'हें पहा, माझी स्थिति तर फारच केंविलवाणी झाली आहे. या पृथ्वीवरील जमीनींतून माझें उदरपोषण कसें होईल, याचा मला मोठा प्रश्न पडला आहे. मला पुरेल इतकें अन्न देणारी जमीन पृथ्वींत कोठेंच नाहीं!' जॉन्सन याचे हे शब्द ऐकून आश्चर्यचकित होऊन तो गृहस्थ म्हणाला, 'पंडितजी, हें काय! असें कसें होईल? आपल्याला पुष्कळ अन्न लागतें, दहा मनुष्यांना पुरेल इतकें अन्न आपण खातां,

ही गोष्ट मला कबूल आहे. परंतु पोटाची चिंता आपल्याला पडली, हें मोठें आश्चर्य आहे. अन्नाची पैदास्त करणारी जमीन जगांत काय थोडी आहे? आपली ही पृथ्वी एवढी मोठी असतां अन्नोदकाची काळजी आपल्याला पडावी, हें मोठें अद्भुत आहे.' यावर जॉन्सन म्हणाला, "अहो! आपली ही पृथ्वी म्हणजे तुम्हीं काय समजतां? ही पृथ्वी केवढीशी आहे? आपल्या ह्या भूगोलाला जवळ जवळ अस्तित्व नाहींच म्हटलें तरी चालेल. आकाशांतील अनंत सूर्य आणि अनंत तारे यांच्या दृष्टीनें विचार केला, तर आपली पृथ्वी केवळ बिंदुवत् आहे. ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीनें या पृथ्वीचा हिशेब काय? बरें, या लहानशा भूगोलावर पाहिलें तर तीन हिस्से जमीन पाण्यानें व्यापलेली आहे. आतां राहतां राहिला एक हिस्सा; त्यांत तरी वाळूचीं केवढालीं मैदानें आहेत, मोठमोठाले पर्वत आणि खडक यांनीं कितीतरी जागा अडवून टाकिली आहे, मोठमोठाल्या नद्या आणि सरोवरें यांनीं पृथ्वीचा कितीतरी भाग आच्छादित केला आहे, लंडनसारख्या प्रचंड शहरांनीं पृथ्वीचा कितीतरी भाग अडवला गेला आहे; याशिवाय रस्ते, मोठाल्या सडका यांनीं पृथ्वीचा कितीतरी भाग मर्यादित केला आहे. या सगळ्याचा विचार केला असतां पृथ्वीवर फार थोडीच जमीन शिल्लक राहाते. शिवाय पृथ्वीवरील मनुष्यांची संख्या पाहिली तर ती किती मोठी! व इतक्या माणसांना अन्न पुरवण्याला त्या मानानें फारच थोडी जमीन आहे. बरें, या जमीनीच्या लहानशा तुकड्यांत उत्पन्न होणारें सर्व पीक तरी मनुष्यांच्या वांट्यास येतें का? तर तेंहि नाहीं. पशु, पक्षी, मुंग्या, हत्ती, घोडे इत्यादि प्राण्यांची उपजीविका याच अन्नांतून व्हावयाची. मग मनुष्यांच्या निर्वाहाला कितीसें अन्न शिल्लक राहाणार? बरें, मनुष्यांची संख्या तरी लहान सहान आहे! या एकट्या लंडन शहरांतच लाखों लोकांची वस्ती आहे, व या अफाट वस्तीला इतकें थोडें अन्न पुरावयाचें म्हणजे पंचाईतच आहे. हा विचार मनांत आला म्हणचे माझा योगक्षेम कसा चालेल, याची चिंता मला अहोरात्र लागावी, यांत आश्चर्य वाटण्याचें कांहीं कारण आहे का? माझ्या या विचारसरणींतून असा निष्कर्ष निघतो कीं, अन्नावांचून उपाशीं मरण्याचें माझ्या खास नशिबीं येणार!" यावर तो गृहस्थ म्हणाला:—"पंडितजी, आपली विचारसरणी अगदीं बरोबर आहे. परंतु तें कसेंहि असलें तरी एवढ्या पृथ्वीमध्यें आपल्याला पोटापाण्याला कांहीं कमी पडणार नाहीं."

जॉन्सन म्हणालाः—" माझी पोटापाण्याची चिंता व्यर्थ आहे असें जर आपण म्हणतां, तर आपल्याला आध्यात्मिक उन्नति करून घेण्याला वेळ नाहीं, या आपल्या तक्रारींतहि कांहीं अर्थ नाहीं; ती निराधार आहे, असें मी म्हणतों. पृथ्वीमध्यें भौतिक अन्नाला कमी नाहीं, तर आध्यात्मिक अन्न प्राप्त करून घेण्यालाहि वेळ कमी नाहीं." त्या गृहस्थाच्या प्रश्नाला पंडित जॉन्सन यानें जें उत्तर दिलें तेंच उत्तर राम देत आहे. हल्लींच्या सुधारणेच्या युगांत मनुष्याला आपली उन्नति करून घेण्याला पुरेसा वेळ नाहीं, अशी सबब लोक पुढें आणतात; परंतु तुम्हीं आपल्या वेळाचा उपयोग करूं लागलां, तर आपली उन्नति करून घेण्याला तुम्हांला पुष्कळ वेळ मिळेल. असें रामाचें म्हणणें आहे.

## करकरण्याला भिऊन कसें होणार !

एक मनुष्य घोड्यावर बसून दूर असलेल्या एका गांवीं जात होता. जातांना वाटेंत त्याला एक मोट दिसली. हिंदुस्तानांत राहाटानें विहिरींतून पाणी काढण्याची चाल बरेच ठिकाणीं दिसून येते. अशा रीतीनें विहिरींतून पाणी काढलें जात असतां एकसारखा करकर आवाज होत असतो. या गृहस्थानें राहाटानें पाणी निघत असतांना पाहिलें, तेव्हां आपल्या घोड्याला पाणी पाजण्यासाठीं तो त्या विहिरीजवळ घोड्याला घेऊन गेला. राहाटाचें तें करकरणें घोड्याच्या परिचयाचें नसल्यामुळें पन्हळींतून येणारें पाणी तो पिईना. तें पाहून त्या गृहस्थानें तेथील शेतकऱ्यांना बोलावलें, आणि राहाटाचा तो आवाज बंद करण्याला सांगितलें. शेतकऱ्यांनीं त्याच्या म्हणण्याप्रमाणें राहाट थांबविला, तेव्हां राहाटाचें करकरणें बंद झालें; परंतु त्याजबरोबर पाणी येण्याचेंहि बंद झालें. अर्थात् घोड्याला पाणी मिळेनासें झालें. पन्हळीजवळ पाणी पिण्याकरितां घोडा गेला, पण तेथें पहातो तों पाण्याचा थेंब नाहीं; तें पाहून शेतकऱ्यांना उद्देशून घोडेस्वार म्हणाला, " तुम्हीं किती चमत्कारिक लोक आहां! राहाटाचा आवाज बंद करण्याला मी तुम्हांला सांगितलें, पाणी बंद करा म्हणून सांगितलें नाहीं; परंतु पाहातों तों पाणीच बंद केलेंत ! तुमच्या येथें आलेल्या एखाद्या मनुष्याच्या घोड्याला तुम्हीं पाणी मिळूं देत नाहीं, इतकी निष्ठुरता तुमच्या ठिकाणीं आली कशी?" यावर शेतकरी म्हणाले, " महाराज, आपण असें काय बोलतां ! आमच्या येथें आपण आलांत हें आमच्यावर मोठे

उपकार आहेत, व आपला आदरसत्कार करावा, अशी आमची मनापासून इच्छा आहे. आपल्या घोड्याला पाणी मिळूं द्यावयाचें नाहीं, असला निष्ठुर-पणाचा विचार आमच्या मनांत येणें शक्य नाहीं; परंतु आपल्या म्हणण्या-प्रमाणें आम्हांला वागतां येत नाहीं, याबद्दल वाईट वांटतें. आपल्या घोड्याला पाणी पाजावयाचें असेल तर राहाटाचा आवाज बंद करून चालणार नाहीं. राहाटाचा अवाज चालूं असतां आपल्या घोड्याला थोपटून त्याला पाणी प्यावयास लावणें हाच एक उपाय आहे. राहाटाचा आवाज बंद करावयाचा म्हणजे रहाट बंद केला पाहिजे, व राहाट बंद केला म्हणजे आपल्या घोड्याला पाणी कसें मिळणार?" याच न्यायानें राम म्हणतो कीं, वेदान्तज्ञानाचा अनुभव करून घ्यावा असें तुम्हांला वाटत असेल, तर सर्व तऱ्हेचे आवाज चालले असतां त्यांतच तुम्हीं आपलें काम करून घेण्यास शिकलें पाहिजे; जगांतील सर्व कष्टमय स्थितींत राहूनच आत्मज्ञान संपादन करून घेण्यास तुम्हीं शिकलें पाहिजे. या जगांतील सर्व तऱ्हेचा गोंगाट व सर्व तऱ्हेचीं दुःखें नाहींशीं होतील, व नतर आपण आत्मसाक्षात्कार करून घेण्याचा अभ्यास करूं, अशी आशा करणें व्यर्थ आहे. हिमालयाच्या उच्च शिखरावर गेलें असतां सर्व तऱ्हेच्या त्रासांपासून आपण मुक्त होऊं, अशी तुमची कल्पना असेल तर ती निःसंशय चुकीची आहे. हिमालयामध्यें कोणत्याच तऱ्हेचा त्रास नाहीं, अशी स्थिति तुम्हांला आढळून येणार नाहीं. तुम्हीं अरण्यांत जा किंवा पाहिजे त्या ठिकाणीं जा, तुमच्या मागचीं दुःखें आणि चिंता हीं नाहींशीं होणार नाहींत. तुम्हीं कोठेंहि गेलां तरी तीं तुमचा पाठलाग केल्याशिवाय राहणार नाहींत. तुम्हांला जर वेदान्तज्ञानाचा अनुभव करून घ्यावयाचा असेल, खरें सुख पाहिजे असेल तर जगरूपी राहाटाच्या करकरण्यानें तुम्हीं भिऊन जातां कामा नये. आजपर्यंत जगांत जे महात्मे उत्पन्न झाले, ते आपल्या भोंवतालच्या बिकट परिस्थितीला न जुमानतां उत्पन्न झाले आहेत. प्रतिकूल परिस्थितीचे आघात सोशीत असतांहि आपली प्रगति कायम ठेवणारे पुरुषच महात्मे म्हणून वाखाणले जातात. इत-केंच नव्हे तर परिस्थिति जितकी बिकट, मार्गांत अडचणी जितक्या जास्ती, तितके मोठे पुरुष जगांत उदयास येतात. प्रतिकूल परिस्थिति उन्नतिला पोषक असल्यामुळें संकटें, दुःखें यांनीं खचून जाण्याऐवजीं त्यांचें अभिनंदन करणेंच योग्य आहे. तुमच्या

हल्लींच्या परिस्थितींत राहूनच वेदान्त अंगीं बाणून घेण्याचा प्रयत्न करा; व अशारीतीनें अभ्यास केल्यानंतर वेदान्तज्ञान तुमच्या अंगीं पूर्णपणें मुरून गेलें, म्हणजे कसल्याहि प्रकारची बिकट परिस्थिति असली तरी तिनें तुमच्यापुढें मान वांकवलीच पाहिजे–तुमचें दास्यत्व करण्यास तयार झालें पाहिजे. मग तुम्हीं परिस्थितीचे स्वामी बनाल. समाज आपल्याला काय म्हणेल, जगांतील लोक आपल्याला नांवें ठेवतील कीं काय; आपल्या वर्तनावर लोक कुत्सित टीका करतील कीं काय, अशा तऱ्हेचे विचार तुमच्या मनांत येत असतील तर त्यांना अजीबात रजा द्या. समाजाच्या किंवा जगाच्या मतांबद्दल विचार करण्याचें तुम्हांला कारणच काय? वास्तविक विचार केला तर तुम्हीं या विस्तीर्ण जगांत रहात नाहीं; अर्थात् या जगाबद्दल चिंता करण्याचें तुम्हांला कारण नाहीं. या अफाट जगामध्यें रहाणारे मनुष्य खरोखर पाहिले तर किती थोडे आहेत! सर्व जगाचें लक्ष ज्यांच्या वर्तनाकडे लागून राहातें असे मनुष्य फारच क्वचित्. बहुतेक सर्वजण आपण स्वतः उत्पन्न केलेल्या एका लहानशा जगांत राहात असतात. तुम्हीं आपलें राहाण्याचें जग मनानें उत्पन्न करून त्यांत आपणांस कोंडून घेतां. आपल्या लहानशा कुटुंबाच्याबाहेर किंवा आपल्या जातीबाहेर ज्यांची जगासंबंधाची कल्पना आहे, असे मनुष्य या जगांत फारच थोडे असतात. ' ही माझी बायको, हा माझा मुलगा, हें माझें घर,' असल्या क्षुद्र कल्पनांच्या जगांत राहणारेच बहुतेक सर्व लोक आहेत. या क्षुद्र जगाच्या पलीकडे विस्तीर्ण अशा जगांत तरी निदान राहाण्यास शिका. तुमच्या मनाला जर कोणी खचवीत असलें तर तें हें अवाढव्य विश्व नसून, तुम्हीं आपल्या मनानें उत्पन्न केलेलें क्षुद्र जगच होय. या क्षुद्र जगापलीकडे जाऊन पोहोंचा, म्हणजे अखिल विश्व तुमच्यापुढें लोटांगण घातल्याशिवाय राहाणार नाहीं.

## खरें कर्म म्हणजे काय ?

आपण अहोरात्र कामांत गढून गेलेलों असून आपल्याला फुरसत नाहीं, अशी लोकांची नेहमीं तक्रार असते. आतां खरें काम म्हणजे काय, खरें कार्यव्यापृतत्व कशाला म्हणतात, याचा थोडासा विचार करूं. व असा विचार केला असतां

आपण मनानें उत्पन्न केलेलें जग म्हणजे काय, याची तुम्हांला बरोबर कल्पना होईल. या देशांतील लोक वेळासंबंधानें नेहमीं तक्रार करीत असतात; परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, लोक नेहमीं वेळाचा अपव्यय करीत असूनही, आम्हांला वेळ नाहीं, अशी तक्रार करतात. रिकामटेकडेपणाच्या गोष्टी करण्याला इकडील लोकांना इतकी फुरसत आहे, तरी आपल्याला फुरसत म्हणून मिळत नाहीं, असें ते नेहमीं रडगाणें गातात. केवढी मौजेची ही गोष्ट ! वेळाचें काय करावें हें लोकांना समजत नाहीं, आणि शिवाय त्यांना वेळ कसा तो मिळत नाहीं ! लोकांच्या या तक्रारीचें बीज कामाच्या स्वरूपाविषयींच्या गैरसमजांत आहे. वास्तविक पाहिलें तर ज्याला खरें काम असें म्हणतां येणार नाहीं,अशा कामांतच खरोखर लोक गढून गेलेले असतात, आणि त्यांचा विनाकारण बडेजाव करतात. कामाची व्याख्या निरनिराळे लोक निरनिराळी करतात. भौतिक शास्त्र किंवा यंत्रशास्त्र यांवरील ग्रंथकार कामाची व्याख्या एकतऱ्हेनें करतात आणि आम्हीं निराळ्याच तऱ्हेनें करतों. सपाट भूमीवरून चालत जाणें किंवा गुळगुळीत पृष्ठभागावरून एखादा चेंडू फेंकणें म्हणजे काम किंवा कर्म करणें नव्हे, असें ते प्रतिपादन करतात. एखाद्या टेंकडीवर उंच चढत जाण किंवा पृथ्वीच्या आकर्षणाविरुद्ध वर जाणें म्हणजेच खरें काम किंवा क्रिया होय, अशी त्यांची कर्माची व्याख्या आहे. मानसशास्त्राच्या दृष्टीनें क्रियेची व्याख्या याहून निराळ्या तऱ्हेची आहे. एखाद्या कार्यांत आपलें मन गढून गेलेलें असलें तर तें खरें कर्म, असें तें शास्त्र प्रतिपादन करतें. कार्यामध्यें मन गढून न जातां क्रिया होत राहाणें हें त्या शास्त्राप्रमाणें खरें कर्म नव्हे. आपण श्वासोच्छ्वास करतों, पण मानसशास्त्राच्या दृष्टीनें त्याची कर्मांत गणना होत नाहीं. आपल्या शरीरांतील रक्तवाहिन्यांतून रक्ताचें अभिसरण होत असतें, व एका दृष्टीनें हेंहि कर्मच आहे; परंतु मानसशास्त्रवेत्ते याला कर्म म्हणणार नाहींत. खरें कर्म म्हणजे काय, हें दर्शित करण्यासाठीं मानसशास्त्रवेत्ते पुढील गोष्ट देत असतात, व ती लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

एका मनुष्यानें पुष्कळ वर्षेंपर्यंत लष्करांत नोकरी केली, व नोकरीची मुदत संपल्यानंतर तो आपल्या घरीं येऊन सुखानें कालक्रमणा करूं लागला. लष्करी कवायतींत त्याचे दिवस गेले असल्यामुळें कवाईत त्याच्या अगदीं अंगवळणीं पडून गेली होती. एके दिवशीं दुधाची चरवी आपल्या खांद्यावर घेऊन तो मनुष्य

रस्त्यांतून चालला होता. एका थट्टेखोर विनोदी मनुष्यानें त्याला समोरून येतांना पाहिलें, व त्याची जरा थट्टा करावी असें मनांत येऊन तो त्याच्याजवळ गेला, आणि एकदम 'खडे रहो;' असें मोठ्यानें ओरडला. 'खडे रहो;' असे शब्द ऐकल्याबरोबर पलटणींतील लोक आपले हात खालीं करून उभे रहातात, ही गोष्ट तुम्हांला माहीतच असेल. त्याप्रमाणें त्या लष्करी मनुष्यानें 'खडे रहो;' हे शब्द ऐकतांच आपल्या नेहमींच्या संवयीमुळें आपले हात खालीं केले, व त्यामुळें त्याची खांद्यावरची चरवी एकदम खालीं पडून दूध गटारांत वाहून गेलें. रस्त्यांतील आसपासच्या लोकांना आणि दुकानदारांना तो प्रकार पाहून हंसूं कोसळलें. आतां 'खडे रहो,' हे शब्द ऐकतांच त्या लष्करी मनुष्यानें एकदम आपले हात खालीं केले, परंतु ही त्याची हातांची क्रिया, मानसशास्त्राच्या दृष्टीनें कर्माच्या सदरांत येत नाहीं. ज्या क्रियेमध्यें मन गुंतलेलें नसतें तिला मानसशास्त्रांत परावृत्त क्रिया म्हणतात; व ती क्रिया म्हणजे खरें कर्म नव्हे, असें मानसशास्त्र म्हणतें.

आतां मानसशास्त्राच्या या व्याख्येप्रमाणें दर चोवीस तासांत आपण ज्या क्रिया करतों, त्यांपैकीं किती क्रिया खऱ्या क्रिया ठरतील, असा रामाचा प्रश्न आहे. आपण जेवतों हें या दृष्टीनें कर्म आहे काय? अर्थात् नाहीं. आपण चालतों किंवा इतर क्रिया करतों, त्यांना मानसशास्त्र कर्म म्हणेल काय? नाहीं. कारण, या क्रिया होत असतां आपल्याला तिकडे लक्ष द्यावें लागत नाहीं. व ज्या क्रियांमध्यें आपल्याला लक्ष ठेवावें लागत नाहीं, मनाचा व्यापार करण्याची जरूर लागत नाहीं, त्या क्रिया मानसशास्त्राच्या दृष्टीनें खरें कर्म नव्हे; अर्थात् अशा क्रिया होत असतां आपण आपला वेळ व्यर्थ घालवतों, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एवढ्या या फुकट जाणाऱ्या वेळाचा आपल्याला चांगला उपयोग करतां येणार नाहीं काय? कांहीं क्रिया करीत असतां आपलें मन पूर्णपणें गढून गेलेलें असतें. दुसऱ्या कांहीं अशा क्रिया असतात कीं, त्यांमध्यें आपलें मन अर्धवट गुंतलेलें असतें. ज्या क्रियांमध्यें मन अर्धवट गुंतलेलें असतें त्या होत असतां आपल्या मनाला दुसरा कांहीं उद्योग लावून देतां येणें शक्य आहे; व अशा रीतीनें वागलें असतां आपल्या वेळाचा सदुपयोग होऊन एका दिवसांत व एका आयुष्यांत आपल्याला सध्यांपेक्षां कितीतरी जास्त काम निःसंशय करतां येईल. हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठीं राम आतां एक गोष्ट सांगत आहे.

एकदां दोन मुलगे रस्त्यांतून चालत होते; ते एकमेकांचे स्नेही होते. त्यांपैकीं एकजण आपल्या सोबत्याला म्हणाला, "गड्या, त्या पलीकडच्या देवळांत थोड्या वेळानें कीर्तन व्हावयाचें आहे, तरी आपण तिकडे जाऊं या." त्याचा संवगडी म्हणाला, "छे, कथाकीर्तन ऐकून काय करावयाचें आहे? त्यामुळें उगाच वेळ मात्र फुकट जाईल. कथेमध्यें त्याच त्याच गोष्टी चाललेल्या असतात; त्या ऐकण्यांत गंमत ती काय? आपण विटीदांडू खेळावयास जाऊं. खेळण्यांत वेळ तरी मौजेनें जाईल." अशा रीतीनें दोघांचीं दोन मतें पडलीं. व त्यांपैकीं एकजण देवळांत कीर्तन ऐकण्यासाठीं गेला व दुसरा विटीदांडू खेळण्यासाठीं दुसऱ्या रस्त्यानें निघून गेला. कीर्तन ऐकण्यास गेलेला मुलगा देवळांत गेला व पाहातो तों बुवांचें कीर्तन रंगांत आलें होतें; परंतु बुवांचें चाललेलें विवेचन त्याला बरोबर समजेना. तेव्हां कीर्तन ऐकण्याला आपण आलों कोठून असें त्याला होऊन गेलें. त्याचें मन विटीदांडूच्या खेळाकडे गेलें. आपला संवगडी आपल्या लहानग्या मित्राबरोबर विटीदांडू खेळत असेल, व त्या ठिकाणीं मोठी मौज चालली असेल, अशा विचारांत त्याचें मन गढून गेलें. याप्रमाणें दोन तास निघून गेले, परंतु त्याचें मन आपल्या बरोबरच्या मित्रांबरोबर खेळण्याकडे लागून राहिलें होतें; व बोवांच्या कीर्तनाऐवजीं त्याच्या मनाच्या दृष्टीपुढें विटीदांडूचा खेळ चालला होता. त्याचा दुसरा संवगडी जो निघाला तो तडक खेळण्याच्या मैदानाकडे गेला. परंतु त्या ठिकाणीं जाऊन पाहातो तों आपले नेहमीचे बरोबरचे सोबती कोणीच आलेले नाहींत, असें त्याला दिसून आलें. यामुळें त्याचें मन खट्टू झालें. त्याला कांहीं सुचेनासें होऊन तो एकटाच मैदानावर इकडे तिकडे फिरूं लागला. फिरतां फिरतां त्याच्या मनांत असे विचार येऊं लागले, 'आपण खेळण्यासाठीं इकडे आलों पण शेवटीं खेळ नाहीं तो नाहींच! त्यापेक्षां आपल्या मित्राबरोबर देवळांत कथा ऐकण्याला गेलों असतों तर किती छान झालें असतें! अगोदर देवळांत गेलों असतों, तर निदान चार चांगले शब्द तरी कानावर येते. पण आतां उपयोग काय? आतां जावें तर उशीर फार झालेला आहे. आपण तेथें जावें तों कीर्तन आटोपूनसुद्धां जाईल.' अशा रीतीनें विचार करीत असतां देवळांत चाललेल्या कीर्तनांत त्याचें चित्त गढून गेलें. पुढें दोन तीन तास गेल्यानंतर त्या दोघां मुलांची फिरून रस्त्यांत गांठ पडली. देवळांत गेलेला मुलगा म्हणाला,

“ गड्या, कथेला गेलों त्यापेक्षां खेळावयास गेलों असतों तर किती मौज झाली असती ! ” त्याचा सोबती म्हणाला, “ गड्या, उगीच वणवण करीत फिरत गेलों, त्यापेक्षां तुझ्याबरोबर कथेला आलों असतों तर किती बहार झाली असती ! ” जगांतील लोकांची स्थिति हुबेहुब याच मासल्याची आहे. लोक शरीरानें काम करीत असतात, परंतु त्यांचीं मनें दुसरीकडेच भटकत असतात. आज या ठिकाणीं एवढे लोक जमले आहेत, परंतु व्याख्यानाकडे किती लोकांचें चित्त असेल ? येथें जमलेल्या लोकांपैकीं एखाद्याचें चित्त आपल्या मुलाकडे गेलेलें असेल, तर दुसऱ्याचें आपल्या मित्राबरोबर गेलें असेल. सारांश, मन एका ठिकाणीं राहणें फार कठीण आहे. तें या ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं, एका विषयावरून दुसऱ्या विषयावर, अशारीतीनें एकसारखें भटकत असतें. तुम्हीं शरीरानें एखादें काम करीत असलां, तरी जोंपर्यंत तुमचें मन त्या कामांत नाहीं, तोंपर्यंत मानसशास्त्रदृष्ट्या तें काम तुम्हीं केलें आहे, असें म्हणतां येणार नाहीं. तुम्हीं प्रार्थनामंदिरांत जातां, परंतु प्रार्थनेकडे तुमचें चित्त नसतें. तुम्हीं व्याख्यान ऐकत असतां, परंतु व्याख्यानाकडे तुमचें चित्त नसतें; तरीहि तुमचें चित्त ईश्वराकडे लागलेलें असतें. ईश्वरासंबंधानें विचार तुमच्या मनामध्यें एकसारखे घोळत असतात. तात्पर्य, मनानें केलेलें कामच खरें काम होय. * पुष्कळवेळां अशी स्थिति होते कीं, एखाद्या मनुष्याच्या बाह्य कृतीवरून तो अत्यंत नीच असेल अशी तुमची कल्पना होते. परंतु वस्तुतः तो मनुष्य पवित्र अंतःकरणाचा आणि वंद्य असतो; त्याचें अंतःकरण ईश्वरविषयक भावनेमध्यें स्थिर झालेलें असतें. कित्येक वेळां बाह्यतः निर्मल आणि पवित्र दिसणारे मनुष्य नीच आणि कुत्सित असतात. या जगांत कांहीं लोक पापी आणि नीच असून ऐश्वर्यांत लोळत असतात असें आपण पाहातों; परंतु यावरून पातकामुळें ऐहिक वैभव प्राप्त होतें, असें अनुमान करूं नका, असें वेदान्त सांगतो. जे मनुष्य बाह्यतः दुष्ट आणि नीच दिसतात, ते अंतःकरणाचे पवित्र नसतीलच असें म्हणतां येणार नाहीं. सारांश, मनुष्याच्या बाह्यकृतीवरून त्याच्याबद्दल अनुमान काढूं नका. एखाद्या मनुष्यानें चोरी केली असेल किंवा खून केला असेल, परंतु तेवढ्यावरून त्या मनुष्याचा तिरस्कार करूं नका.

हिंदुस्तानांत एका प्रसिद्ध दरवडेखोराची एक गोष्ट राम आतां सांगणार आहे.

* मनःकृतम् कृतं राम न शरीरकृतम् कृतम् ॥ योगवासिष्ठ.

## यशाचें बीज

राम लहान असतां एका दरवडेखोराच्या तोंडून सदरहू हकीकत त्यानें ऐकली आहे. तो दरवडेखोर एका सोबत्याजवळ आपली हकीकत सांगत होता. 'या लहान मुलानें आपली हकीकत ऐकली तरी त्यांत कांहीं बिघडत नाहीं;' असें वाटून निर्भयपणानें त्यानें आपला सर्व वृत्तांत सांगितला; व अशा रीतीनें तो रामाला ऐकावयास मिळाला. एकदां एका श्रीमान् मनुष्याच्या घरांत शिरून त्याचें सर्व जवाहीर चोरून नेण्याचा त्या दरवडेखोरानें बेत केला. पहिल्या प्रथम रात्रींच्या वेळीं त्या श्रीमान् मनुष्याच्या घरांत कोणत्या उपायानें शिरावें असा प्रश्न त्याच्या मनांत येऊन त्यासाठीं त्यानें पुष्कळ विचार करून पाहिला; परंतु तसें करण्याचा उपाय त्याला सुचेना. शेवटीं विचार करतां करतां त्याला एक युक्ति सुचली. त्या मनुष्याच्या घराजवळ एक उंच झाड होतें. तें झाड घराच्या तिसऱ्या मजल्यापर्यंत उंच गेलेलें होतें. आपल्याबरोबर दाराची एक शिडी तयार करून घेऊन त्या झाडावर चढून तेथून तिसऱ्या मजल्याच्या खिडकींत शिरण्याचा त्यानें विचार ठरविला, व त्याप्रमाणें तो रात्रीच्या वेळीं झाडावर चढून गेला. आणि शिडी झाडाला टांगून तिच्या हेलकाव्यांबरोबर घराच्या तिसऱ्या मजल्यावर तो जाऊन पोहोंचला; व आपण आल्या वाटेनें त्यानें आपल्या बरोबरच्या तीन दरवडेखोरांना आंत घेतलें. घरांतील मंडळी पांचव्या मजल्यावर निजलेली होती व जडजवाहीर तिसऱ्या मजल्यावर पुरून ठेवलें होतें. तें कोणत्या ठिकाणीं ठेवलेलें असेल, याचा तो विचार करूं लागला. पूर्वीं हिंदुस्तानांतील लोक आपला पैसाअडका किंवा जडजवाहीर जमिनींत पुरून ठेवीत असत. परंतु अलीकडे लोक पेटीमध्यें आपले पैसे ठेवूं लागले आहेत. असो; दरवडेखोरांनीं विचार करून एक जागा शोधून काढली, व त्या ठिकाणीं खणून तेथें असलेलें जवाहीर त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलें; इतकी खटपट करून अखेरीस आपल्याला यश आलेलें पाहून त्या दरवडेखोरांना मोठा आनंद झाला. इतक्यांत एक मोठा आवाज त्यांच्या कानीं आला. तो ऐकतांच त्या दरवडेखोरांच्या मनाची अगदीं विलक्षण स्थिति होऊन गेली. या वेळच्या आपल्या मनाच्या स्थितीचें त्या दरवडेखोरानें हुबेहुब वर्णन केलें तें रामानें ऐकलें आहे, व तें तो कधींहि विसरणार नाहीं. आवाज ऐकतांच तो दरवडेखोर घाबरून गेला.

भीतीनें त्याचें अंग लटलटां कांपूं लागलें. अंगाला दरदरून घाम आला; व आतां आपण निश्चित मरणार, असें त्याच्या मनानें घेतलें. त्यावेळच्या स्थितींत एखादा उंदीर येऊन आपल्याला मारूं शकेल, असेंही त्याला वाटलें व खरोखर तो आवाज कांहीं उंदरांचाच होता ! परंतु ह्यावेळीं ती गोष्ट त्याला माहीत नसल्यामुळें आपण चोरी करण्यास आल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. तो ईश्वराची प्रार्थना करूं लागला. भीतीमुळें ईश्वराची प्रार्थना करण्यांत त्यावेळीं त्याची इतकी एकाग्रता झाली कीं; तो जवळ जवळ समाधीच्या स्थितीपर्यंत जाऊन पोहोंचला. ईश्वराची करुणा भाकतांना तो म्हणूं लागला, 'हे ईश्वरा ! या संकटांतून माझा बचाव कर, म्हणजे तावडतोब संन्यास घेऊन मी आपलें पुढील सर्व आयुष्य तुझ्या सेवेंत खर्च करीन.' अशा रीतीनें एकाग्रचित्तानें आणि भक्तियुक्त अंतःकरणानें त्यानें ईश्वराची प्रार्थना केली. यावेळीं त्याच्या चित्ताची पूर्ण तादात्म्यस्थिति झाली होती. व याचा परिणाम अखेरीस काय झाला ? पूर्वीचा आवाज ऐकूं येईनासा झाला, व तो आणि त्याचे इतर दरवडेखोर सोबती घरांतून सुरक्षित बाहेर पडले. आतां सदरहू मनुष्य दरवडेखोर असूनहि संकटांत कां होईना, पण त्याचें ईश्वराशीं तादात्म्य झालें ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. म्हणून राम म्हणतो कीं, बाहेरच्या क्रियांवरून कोणाचीहि पारख करूं नका. मनुष्याची खरी योग्यता त्याच्या बाह्य कृतीवरून ठरवावयाची नसून त्याच्या विचारांवरून, भावनांवरून ठरवावयाची असते. एखादा मनुष्य कलावंतिणीच्या घरांत रहात असूनहि सत्पुरुष असूं शकेल. बुद्ध देव एकदां एका विश्वयोषितेच्या घरीं गेला होता; परंतु एवढ्यावरून तो सत्पुरुष नव्हता, असें कोणी म्हणूं शकेल काय ? अर्थात् नाहीं. येशू ख्रिस्तहि मेरी मॅगडॅलेन हिच्या घरांत राहात होता. व या स्त्रीची लोकांमध्यें एवढी किर्ति होती कीं, तिला दगड मारण्यापर्यंत लोकांची मजल गेली होती. परंतु यावरून येशू ख्रिस्त साधु नव्हता, असें कोणी म्हणत नाहीं. हिंदुस्तानामध्येंहि दुष्ट आणि नीच लोकांच्या सहवासांत असलेले कांहीं सत्पुरुष होऊन गेले. परंतु यामुळें त्यांच्या साधुत्वांत मुळींच व्यत्यय येत नाहीं. एखाद्या मनुष्याच्या स्नेहावरून किंवा त्याच्या स्वतःच्या बाह्य कृतीवरून त्याची योग्यता ठरवूं नका. दुसऱ्यासंबंधानें आपलीं मतें ठाम बनवूं नका. दुसऱ्याबद्दल चांगलीं किंवा वाईट मतें देण्याला आपल्याला अधिकार नाहीं. मनुष्याच्या विचारांवरून त्याचें खरें स्वरूप ठरतें. तुरुंगांत राहूनहि

मनुष्य स्वर्गाच्या उच्च स्थितींत असूं शकतो. बनियन यानें ' एका धर्मजिज्ञासूचा प्रवास ' या नांवाचा आपला ग्रंथ तुरुंगांतच लिहिला. मिल्टन् कवीचें सर्वांत प्रसिद्ध काव्य, तो दोन्ही डोळ्यांनीं अंधळा असून तुरुंगांत असतां प्रसिद्ध झालें. डॅनियल डी फो याचें ' रॉबिन्सन क्रूसो ' बंदिवासांतच लिहिलें गेलें. सर वॉल्टर रॅले यानें आपला ' जगाचा इतिहास ' तुरुंगांतच लिहिला. आपली परिस्थिति अमुक एका तऱ्हेची असावी, अशी आपण अपेक्षा करतों; परंतु शरीरानें आपण ज्या ठिकाणीं असतों, त्या ठिकाणीं वास्तविक आपण रहात नसून आपले विचार ज्या ठिकाणीं असतील त्या ठिकाणींच आपण रहात असतों, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां जिवंतपणांतील मृत्यु, असें ज्या स्थितीला म्हणतां येतें, त्या स्थितीसंबंधानें आपण थोडासा विचार करूं. राम असें सांगतो कीं, अखिल विश्वाशीं तादात्म्य पावणें--परमात्मभावनेंत कायमचें स्थिर होणें, हेंच यशाचें मर्म आहे. आतां सांगितलेल्या गोष्टींत त्या दरवडेखोराला जें यश आलें त्यांतील बीज हेंच होय. तुम्हांला सर्वांना हें यश प्राप्त करून घेतां येईल. फक्त त्याच्याप्रमाणें तुम्हीं अंतःकरणापूर्वक ईश्वराशीं-आपल्या आत्मस्वरूपाशीं तद्रूप व्हा म्हणजे झालें. घरांतील मालकाची जिनगी कोठें आहे, तें एकाग्र चिंतनानें त्याच्या लक्षांत आलें. अर्थात्, त्या दरवडेखोराला मिळालेलें यशहि वेदान्त प्रत्यक्ष आचरणांत आणल्याचाच परिणाम होय. त्याच्याप्रमाणें तुम्हीं अभ्यास करूं लागलां, तर तुम्हींहि यशस्वी झाल्याशिवाय राहाणार नाहीं. अशा रीतीनें यशाची गुरुकिल्ली हस्तगत करून घेणें प्रत्येकाच्या स्वाधीन आहे. आतां दरवडेखोराच्या कृत्यासंबंधानें एक गोष्ट आपणापुढें उभी राहाते. ती ही कीं, त्याचा हेतु वाईट होता. चोरी करणें, दुसऱ्याचें जडजवाहीर हिरावून नेणें, हा अन्याय आहे, मोठें पातक आहे. व ईश्वरी नियमाप्रमाणें अशा तऱ्हेच्या अन्यायाचें, गुन्हेगारीचें प्रायश्चित्त केव्हांना केव्हां तरी मिळालेंच पाहिजे, हें निश्चित आहे; परंतु गुन्ह्यासंबंधाचा प्रश्न सोडून दिला तर चोरी करण्यामध्यें त्याला जें यश प्राप्त झालें, त्या प्रश्नाचा स्वतंत्र रीतीनें विचार केला असतां, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं कीं, देहात्मभावनेच्या पलीकडे जाऊन पोहोंचणें, देहाचा विसर पडणें, यांतच यशाचें बीज आहे. आतां चोरी हा गुन्हा असल्यामुळें त्याला त्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागलेंच. त्याच्या अंतःकरणांत जी भीति उत्पन्न झाली ती त्याच्या दुष्ट हेतूंचा परिणाम होय. मनुष्यांनीं कोणत्याहि कृत्यासंबंधानें विचार

करतांना त्यांतील चांगल्या आणि वाईट अशा दोन्ही बाजूंचा विचार अवश्य केला पाहिजे. मनुष्याच्या नुसत्या गुणांचा किंवा नुसत्या दोषांचा एकागी विचार करून उपयोगी नाहीं. परंतु पुष्कळ वेळां आपण या तत्त्वाप्रमाणें वागत नाहीं, ही आपली चूक होय. एखाद्या मनुष्याच्या कृत्यावरून आपण त्या मनुष्यासंबंधानें बरें किंवा वाईट मत एकदम बनवून टाकतों. परंतु एखादा दरवडेखोरहि कित्येक वेळां चांगला असूं शकतो, ही गोष्ट आपण विसरतों. प्रत्येक मनुष्यामध्यें चांगलें आणि वाईट, गुण आणि दोष अशा परस्पर-विरोधी धर्मांचें मिश्रण असतें. एखाद्या मनुष्याच्या चांगल्या कृत्यावरून तो सर्वस्वी चांगलाच असला पाहिजे, असा आपण समज करून घेतों. परंतु चांगल्या मनुष्यामध्येंहि दोष नसतात असें नाहीं. ख्रिस्तासारखे साधुपुरुष, धर्मोपदेशक, संन्यासी वगैरे लोकांमध्येंहि कांहीं दोष नसतात असें नाहीं. अर्थात्, एखाद्या मनुष्याच्या दोषाचा विचार न करतां त्याच्या गुणांचें फाजील स्तोम माजवून त्याच्याबद्दल नसता पूज्यभाव वाढवणें, हें गैर आहे; म्हणून सत्य आणि असत्य ह्यांच्या योग्य मर्यादा आंखणें, चांगल्यावाईटाची योग्य निवड करणें, हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे.

## त्रिविध समतोलता

आतां सध्यांच्या स्थितींत मनुष्याला आत्मज्ञान प्राप्त करून कसें घेतां येईल हा जो प्रश्न आहे, त्याच्याकडे आतां आपण वळूं. या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं, आत्मानुभव करून घेणें हें स्वतः मनुष्यावर अवलंबून आहे; त्याच्या अंतःस्थितीवर अवलंबून आहे. जगांतील सर्व मनुष्यांच्या स्वभावाचें, मानसिक स्थितीचें तीन तऱ्हेनें वर्गीकरण करतां येणें शक्य आहे. कांहीं मनुष्यांच्या मनाची स्थिति अस्थिर असते. कांहींच्या मनाची स्थिति स्थिरतेची असते. दुसऱ्या कित्येकांची स्थिति तटस्थतेची असते. आतां अस्थिर समतोलतेची स्थिति म्हणजे काय? असा प्रश्न उत्पन्न होतो. आपल्या हातावर एखादी लेखणी उभी करून ठेवली म्हणजे तिची जी स्थिति होते, ती अस्थिर समतोलतेची स्थिति होय. हातावर लेखणी उभी ठेवली असतां ती किंचित्काल तशीच राहूं शकणार नाहीं, असें नाहीं; परंतु वाऱ्याच्या एका झुळकेबरोबर ती खालीं पडेल. सबब ही स्थिति अस्थिर आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां आपल्या दोन बोटांमध्यें एखादी लेखणी वरच्या टोंकाशीं लोंबती ठेवा;

अशा स्थितींत हातांतील लेखणी स्थिर असते, परंतु ती लोंबती असल्यामुळें तिला किंचित् धक्का दिल्याबरोबर ती लंबकाप्रमाणें एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे अशा रीतीनें हेलकावे खात राहील; परंतु कांहीं वेळानंतर आपल्या पूर्व स्थितीवर येऊन ती थांबेल. ही जी लंबकाप्रमाणें लेखणीची स्थिति असते, तिला लेखणीचें स्थिरसमतोलत्व असें म्हणण्यास हरकत नाहीं; अस्थिरस्थितीमध्यें व स्थिरस्थितीमध्यें फरक आहे तो हा कीं, लेखणीला धक्का लागून तिची स्थिति बदलली तर पहिल्या स्थितींत लेखणी पूर्ववत् होत नाहीं, परंतु दुसऱ्या स्थितींत ती पूर्ववत् होते. या शिवाय लेखणीची तिसरी एक स्थिति आहे. मेजावर लेखणी आडवी ठेविली असतां जी स्थिति असते, ती सामान्य समतोलत्वाची किंवा तटस्थतेची स्थिति आहे, असें म्हटलें तरी चालेल. मेजावर कोठेंहि लेखणी ठेवली, तरी ज्या स्थितींत ठेवावी त्या स्थितींत ती कायम राहाते. हाच न्याय जगांतील सर्व मनुष्यांना लागू पडतो. जगांतील कांहीं लोक व्यग्र स्थितींत असतात; त्यांच्या मनाची स्थिति नेहमीं बिघडलेली असते; त्यांच्या मनाला समता—स्थिरता कशी ती माहीत नसते. बाह्य परिस्थिति अनुकूल झाली म्हणजे त्यांच्या मनाला विश्रांति मिळते. परंतु तीच परिस्थिति बदलल्याबरोबर त्यांची मानसिक स्थिति एकदम बिघडून जाते. कित्येक जण शांत, समाधानी असे असतात. परंतु बाह्य स्थिति प्रतिकूल झाल्याबरोबर लंबकाप्रमाणें त्यांच्या मनाचीं आंदोलनें सुरू होतात, व तीं पुष्कळ काळपर्यंत टिकतात. या जगांतील बहुजनसमाजाची स्थिति अशीच असते. तुम्हीं रस्त्यांतून चालत असतां एखादा मनुष्य तुम्हांला भेटतो आणि तो तुमची निंदा करतो; तुमच्या मनाला लागतील असे शब्द उच्चारतो, व नंतर तो तेथून निघून जातो; परंतु त्याच्या शब्दाचा तुमच्या मनावर जो परिणाम झालेला तो तसाच राहातो; व कित्येक वेळां तासच्यातास, दिवसच्या दिवस, आठवडेच्या आठवडे, महिनेच्या महिने, किंबहुना वर्षेंच्या वर्षें त्याचे शब्द तुमच्या मनांत घोळत राहतात. आपली निंदा झाल्यामुळें तुम्हांला वाईट वाटतें, तुम्हीं खिन्न होतां; त्यामुळें तुमच्या मनाची एक प्रकारची आंदोलनस्थिति होते. मनांत कधीं चांगल्या विचारांचा तर कधीं वाईट विचारांचा पगडा बसतो, व या स्थितीमुळें तुमच्या मनाला कधींहि शांतता मिळत नाहीं. अशा रीतीनें तुम्हीं आपला नाश करून घेतां. आतां या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे, ती अशी कीं, निंदेचे शब्द उच्चारण्याला

त्या मनुष्याला फारसा वेळ लागला नाहीं, तें कृत्य कांहीं क्षणांत होऊन गेलें; परंतु त्याचा तुमच्या मनावर झालेला परिणाम मात्र पुष्कळ काळपर्यंत टिकला. याच न्यायानें तुमच्या आयुष्यांतील पुष्कळ गोष्टी प्रत्यक्ष घडण्याला फारच थोडा वेळ लागतो; परंतु त्यांचे परिणाम तुमच्या मनांत चिरकाल राहातात. ही मनाची आंदोलनात्मक स्थिति तुम्हांला नाहींशी करतां आली, प्रत्येक कृत्यानें मनांत उत्पन्न होणाऱ्या विचारांची खळबळ किंवा गडबड तुम्हांला प्रयत्नानें दाबून टाकतां आली, तर तुमचें जीवित दिव्य बनून जाईल. जगांतील लोकांचा हजारों वर्षांचा अनुभव तुम्हांला आपल्या अवघ्या तीस वर्षांतहि घेतां येईल! आपल्या मनाला झालेला रोग कोणत्या प्रकारचा आहे तें ओळखा; त्याच्या स्वरूपाची बरोबर चिकित्सा करा; व विचारानें आणि विवेकानें त्याचें मूळ खणून काढा. आपल्या मनाची आंदोलनात्मक स्थिति होणें, एखादी गोष्ट घडून आली असतां तिचे भावी परिणाम शुभ किंवा अशुभ होतील याबद्दल साशंकवृत्ति होऊन चित्ताचे हेलकावे सुरू होणें, हाच कायतो रोग मनुष्याला जडलेला असतो. आतां कांहीं मनुष्य तिसऱ्या तऱ्हेचे असतात. त्यांना धीरपुरुष, मुक्तपुरुष असें म्हणण्यास हरकत नाहीं. भोंवतालची परिस्थिति कशीहि असली, केवढालीं संकटें अंगावर येऊन कोसळलीं, तरी ज्यांच्या चित्ताची शांति भंग पावत नाहीं, मनाची समतोलता ढळत नाहीं, अशा वृत्तीचे मनुष्य या तिसऱ्या वर्गांतील होत. या मनुष्यांना भरसमुद्रांत तुफानानें उसळणाऱ्या लाटांवर नेऊन ठेवा; त्यांच्या मनाची स्थिति जशीच्या तशी असते. त्यांना घनघोर रणसंग्रामांत घेऊन जा, त्यांच्या मनाची स्थिरता यत्किंचित्हि ढळत नाहीं. त्यांच्या मित्रांनीं त्यांची कितीहि स्तुति केली तरी तिनें ते खुलून चढून जात नाहींत. तुमच्या स्तुतिस्तोत्रांकडे ते बिलकुल लक्षच देत नाहींत. तुम्हीं त्यांची स्तुति करून त्यांच्याजवळून निघून जा. त्यांचें मन पूर्वीप्रमाणेंच पवित्र आणि शांत असतें. तुमच्या शब्दांचा त्यांच्या वृत्तीवर कांहींच परिणाम होत नाहीं. एखाद्या मुक्त पुरुषाच्या सहवासांत हजारों वर्षें राहिल्यानंतर तुम्हीं त्याला सोडून निघून गेलां, तरी त्याच्या मनावर कोणत्याच तऱ्हेचा विकार होत नाहीं. असल्या पुरुषांची स्थिति आरशाप्रमाणें असते. आरशापुढें उभें राहातांच तो तुमचा चेहरा प्रतिबिंबरूपानें तुम्हांला दाखवितो. आतां तुमचा चेहरा जसा असतो, तसाच आरशामध्यें दिसतो असें नाहीं. तुम्हीं आपल्या उजव्या कानांत भिगबाळी

घातली असली तर आरशामध्यें ती तुमच्या डाव्या कानांत आहे असें दिसतें. तुमच्या उजव्या अंगाकडील वस्तु आरशांत डावीकडे दिसतात, व डाव्या बाजूकडील वस्तू उजवीकडे दिसतात. परंतु तें कसेंहि असलें, तरी तुमचें प्रतिबिंब दाखविण्याचें काम आरसा नेहमीं करीत असतो. तुम्हीं शंभर वर्षें आरशापुढें उभे राहिलांत तरी आज जी स्थिति तुम्हांला दिसत आहे, तशीच शंभर वर्षांनीं दिसेल; तुमचें प्रतिबिंब वठविण्याचें काम तो केव्हांहि करीत राहील. परंतु तुम्हीं आरशाजवळून दूर व्हा म्हणजे तो आपला जशाचा तसा कायमच आहे. हाच न्याय ज्ञानी पुरुषांना—जीवन्मुक्तांना तंतोतंत लागू पडतो. ज्या मनुष्याच्या मनावर बाहेरच्या कोणत्याहि वस्तूचा कायमचा असा कांहींच परिणाम होत नाहीं, ज्याचें चित्त नेहमीं निष्पाप आणि निष्कलंक असतें, ज्याची मुक्तस्थिति कधींच ढळत नाहीं, ज्याच्या चित्ताला कोणताच विकार स्पर्श करूं शकत नाहीं, असा मनुष्य या कोटींत गणला जातो. अशा मनुष्याची तुम्हीं पाहिजे तितकी स्तुति करा, परंतु तुमची पाठ फिरतांच तुमच्या स्तुतीचा त्याच्या मनावर बिलकुल परिणाम झालेला तुम्हांला आढळून येणार नाहीं. तुम्हीं त्याची निंदा करा, त्याच्यावर टीकेचा भडिमार करा; तुम्हीं निघून जातांच तुमच्या टीकेचा त्याच्या मनांत प्रवेश झालेला नाहीं असेंच दिसून येईल. कारण, मुक्त मनुष्य निंदा आणि स्तुति अशा दोहींना भीक घालीत नाही; तो दोहींच्या अतीत झालेला असतो. परमात्मभावनेंत मुरून गेल्यामुळें त्या दोहींना तो सारखेंच तुच्छ लेखतो.

## चित्तस्थिरतेचा उपाय

यासाठीं रामाचें म्हणणें असें आहे कीं, तुम्हीं वेदान्ताचा अभ्यास करा. वेदान्ताच्या तत्वांचें सतत मनन करा, ॐ किंवा या सारख्या दुसऱ्या मंत्राचा जप करून परमात्मभावनेचे संस्कार आपल्या अंतःकरणांत दृढ बाणवून घ्या. 'अहं ब्रह्मास्मि' या भावनेचा निदिध्यास करा. व अशा रीतीनें तुम्हीं अभ्यास करूं लागलां म्हणजे कालेंकरून तुमच्या मनाची स्थिति अजिबात पालटून जाईल; तुमच्या मनाची अस्थिरता मोडत जाऊन तें स्वरूपांत स्थिर होत जाईल. व हळूहळू बाह्य परिस्थितीचा तुमच्या मनावर परिणाम होत नाहींसा होईल. सारांश, तुमची वृत्ति सदासर्वदा समतोल राहील. परंतु अशी स्थिति होण्याला आत्मस्वरूपासंबंधाच्या भावना, 'अहं ब्रह्मास्मि' हा वेदान्ताचा

उपदेश तुम्हीं आपल्या डोळ्यांपुढें निरंतर ठेवण्याचा अभ्यास करीत गेलें पाहिजे. बाह्य परिस्थितीचा आपल्या मनावर कांहींहि परिणाम होऊं न देण्याला कोणते उपाय योजावे, कोणत्या साधनांचा अवलंब करावा, असा प्रश्न याठिकाणीं उत्पन्न होईल; व या बाबतींत स्वानुभवाचा एक उपाय राम तुमच्यापुढें मांडीत आहे. हा उपाय सामान्यतः प्रतिपादन केला जात नाहीं; परंतु रामाच्या या उपदेशाप्रमाणें तुम्हीं स्वतः अभ्यास करा म्हणजे त्याचे परिणाम किती विलक्षण होतात, तें तुमच्या प्रत्ययास येईल. पुष्कळ वेळां अशी स्थिति होते कीं, अनेक लोक रामाकडे येतात आणि त्याच्यावर टीका करूं लागतात, त्याचा उपहास करतात आणि आल्या पावलीं निघून जातात. आतां अशा लोकांच्या टीकेचा आपल्या मनावर मुळींच परिणाम होऊं नये; यासाठीं राम एका उपायाचा अवलंब करतो. असें करण्याचे अनेक मार्ग आहेत. परंतु रामाचा उपाय पुढीलप्रमाणें आहे. या मेजावर हें लहानसें पुस्तक ठेवलेलें आहे; तें तुम्हीं पहात आहांच. हें पुस्तक खरोखर अद्भुत आहे. हें पुस्तक ज्या मनुष्यानें लिहिलें त्याची बरोबरी करणारा मनुष्य जगांत आढळून येणें शक्य नाहीं. हा मनुष्य फारसा प्रसिद्ध नाहीं व हिंदुस्तानांत त्याचें नांवहि लोकांच्या फारसें तोंडीं नाहीं. श्रीभगवद्गीतेइतकें* हें पुस्तक सर्वत्र प्रसिद्ध नाहीं; व त्याचा लेखक लोकांना माहीतही नाहीं; परंतु अशा मनुष्यानें लिहिलेल्या या पुस्तकांत जगांतील सर्व बुद्ध, ख्रिस्त, कृष्ण वगैरे अवतारी पुरुषांनीं प्रतिपादन केलेलीं तत्त्वें सांठविलेलीं आहेत. हें पुस्तक संस्कृतमध्यें असून त्यापैकीं एखादा श्लोक वाचतां-क्षणीं रामाची चित्तवृत्ति तल्लीन होऊन जाते. या लहानशा पुस्तकांतील एखाद्या श्लोकाचाहि अंतःकरणावर विलक्षण परिणाम होऊन राम परमात्मस्वरूपाशीं एकदम तद्रूप होतो. या ग्रंथाचा प्रभावच असा आहे कीं, हजारों जन्मांचे पातकांचे संस्कार नाहींसे करण्याचें सामर्थ्य त्याच्या प्रत्येक श्लोकामध्यें आहे. त्यांतील दिव्य तत्त्वें मनुष्याच्या अंतःकरणावरील विषयवासनारूपी मायेचा पडदा फाडून टाकण्यास समर्थ आहेत. अशा तऱ्हेचें एखादें पुस्तक तुम्हीं आपल्याजवळ नेहमीं बाळगा. कित्येक गीतें किंवा स्तोत्रें अंतःकरणाला उदात्त बनवून स्फूर्ति देणारीं असतात. अशा तऱ्हेचीं जीं जीं काव्यें किंवा स्तोत्रें तुमच्या मनाला आवडतील



* सहरहू उल्लेख अवधूत गीतेसंबधानें असावा.

तीं तीं आपल्याजवळ नेहमीं बाळगा; उदाहरणार्थ:—बायबलांतील 'पहाडावरील उपदेश;' असले उदात्त भाग किंवा प्रसंग आपल्या चोपडींत उतरून घेऊन ते आपल्याजवळ सदोदित ठेवा. किंवा हें पुस्तक तुम्हीं आपल्याजवळ बाळगीत जा. सारांश, चित्तवृत्ति प्रसन्न करून अंत:करणांत ईश्वरी भावना जागृत करणारें कोणतेंहि स्फूर्तिजनक काव्य तुम्हीं आपल्या स्मरणवहींत लिहून ठेवून ती खिशांत नेहमीं ठेवीत जा; व जेव्हां जेव्हां आपल्या मित्रांच्या किंवा आपल्याला अप्रशस्त वाटतील अशा मनुष्यांच्या बैठकींत कांहीं वेळ घालविल्यामुळें तुमच्या चित्ताची समता बिघडली असेल, मन व्यग्र किंवा उदास झालें असेल, चित्त आंदोलन पावूं लागलें असेल, अशा वेळीं आपल्या चित्ताची बिघडलेली घडी पुन्हां नीट बसवून तें शांत आणि स्थिर करण्यासाठीं आतां सांगितलेल्या ग्रंथांतील किंवा तुम्हांला पसंत असलेल्या दुसऱ्या कोणत्याहि पवित्र ग्रंथांतील निवडक उतारे वाचीत जा; आणि त्यांतील उदात्त आणि स्फूर्तिजनक भावनांशीं तद्रूप होऊन जाण्याचा अभ्यास करा. या अभ्यासाचा चित्त स्थिर करण्याच्या कामीं विलक्षण उपयोग होतो, असें तुमच्या अनुभवास आल्याशिवाय राहणार नाहीं.

आजच्या या व्याख्यानांत मनुष्यांना कोणता रोग जडला आहे, या संबंधाची चिकित्सा करण्यांत आली आहे. चित्ताची आंदोलनात्मक स्थिति, या रोगानें सर्व लोक पछाडले गेले असून त्यावर कोणता उपाय योजावा, तेंहि आज सांगण्यांत आलें आहे. या विषयाचा जास्त विचार पुढें केव्हां तरी करण्यांत येईल.

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

# दुःखांतून स्वानंदाकडे

(रविवार ता. ८ फेब्रुवारी १९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान)



लोकांना दुःखें भोगावीं कां लागतात, या जगांत दुःखाची उत्पत्ति कां झाली, या प्रश्नाचा विचार आजच्या व्याख्यानांत करण्यांत येणार आहे.

मोठमोठ्या पुरुषांचें या मुद्यावर म्हणणें काय आहे, मोठमोठ्या विद्वान् ग्रंथकारांचा या विषयावर अभिप्राय काय आहे, ऐतिहासिक पुराव्यावरून काय निष्कर्ष निघतो, अशा दृष्टींनीं आजच्या विषयाचें प्रतिपादन केलें जाणार नाहीं. मोठमोठे लेखक, ग्रंथकर्ते आणि विचारवंत पुरुष यांनीं जे सिद्धान्त लिहून ठेवले आहेत ते सत्य आहेत, त्यांच्या अनुभवाला पटले आहेत, याबद्दल कोणाचाहि मतभेद नाहीं; परंतु जगांतील सर्व प्रसिद्ध ग्रंथकारांचे ग्रंथ एकत्र केले तरी विवेचक बुद्धीनें त्यांचें तुम्हीं स्वतः पर्यालोचन केल्याशिवाय, स्वानुभवाच्या दृष्टीनें त्यांतील सिद्धान्ताचा तुम्हीं स्वतः विचार केल्याशिवाय तुम्हांला त्यांचा यत्किंचित् उपयोग होणार नाहीं. राम आज जें विवेचन करणार आहे, तें स्वानुभवावरून करणार आहे. व तुम्हीं प्रयत्न केल्यास तुमच्यापैकीं प्रत्येकाला हा अनुभव घेतां येणें शक्य आहे, असें रामाचें म्हणणें आहे.

आधुनिक काळांत मोठमोठ्या मनुष्यांच्या नांवावर विकलें जाण्याची चाल पडून गेली आहे! एखादा वक्ता भाषण करूं लागला असतां, एखादा प्रसिद्ध ग्रंथकार, इतिहासकार, किंवा भौतिक शास्त्रवेत्ता यांच्या नांवाचा मोठ्या जोरानें उल्लेख करतो; 'अमुक अमुक ग्रंथकार असें असें म्हणतो, व तें खरें असलेंच पाहिजे,' असा त्याच्या बोलण्याचा झोंक असतो. व असल्या युक्तीचा अवलंब करणाऱ्या मनुष्याला टाळ्यांचा गजरहि मिळतो; असल्या मनुष्याच्या विद्वत्तेची आणि अधिकारसंपन्नतेची लोक तारीफ करीत सुटतात; परंतु ही संवय अत्यंत घातुक आहे, असें राम म्हणतो. व तो आतां जें विवेचन करणार आहे तें दुसऱ्यांच्या नांवावर भिस्त ठेवून करीत नसून स्वतःच्या अनुभवावरून करीत

आहे, व तुम्हीं स्वतः प्रत्यक्ष प्रयोग केल्यास—स्वानुभवानें चालल्यास तुम्हांला काय काय शिकतां येईल, हें तो तुमच्यापुढें आज मांडीत आहे.

जगांतील लोकांना जीं मोठमोठीं दुःखें भोगावीं लागतात, त्याचें कारण हें कीं, लोक स्वतःच्या प्रत्ययानें चालत नाहींत; ते दुसऱ्यांच्या मतांवर फाजील भिस्त ठेवतात, व दुसऱ्यांच्या मतांवरून आपलीं मतें बनवितात. सारांश, आपली वृत्ति अंतर्मुख करण्याऐवजीं बहिर्मुख करतात, व यामुळें त्यांची फसगत होते. दुसऱ्या लोकांचीं मतें आपण प्रमाणभूत मानतों. आपल्या ठिकाणीं आत्मविश्वासाचा अभाव असल्यामुळें दुसऱ्यांच्या मतांचें आपण फाजील स्तोम माजवितों. दुसऱ्यांच्या म्हणण्यावर आपला जितका विश्वास असतो, तितका स्वतःच्या अंतःसामर्थ्यावर नसतो. महंमद, बुद्ध किंवा कृष्ण यांना आपण पूज्य मानतों; परंतु आपली पूज्यता येथेंच थांबत नाहीं. आपल्या कल्पनेनें उत्पन्न केलेल्या किती तरी थोतांडांपुढें आपण आपली मान वांकवतों ! रस्त्यांतील एखादा चटोर मुलगा आपली निंदा करतो, व तेवढ्यानें आपल्या मनांत चलबिचल होते; आपल्या मनाला अतिशय वाईट वाटतें. दुसऱ्यांचीं आपल्याविरुद्ध मतें आणि त्यांनीं आपल्या वर्तनावर केलेली टीका, यांना आपण फाजील महत्त्व देतों. लोकांची मर्जी राखण्यांत, त्यांची खुषामत करण्यांत आपण आपल्या वेळाचा कितीतरी अपव्यय करतों. आपल्या स्वतःच्या वर्तनाकडे आत्मदृष्टीनें पाहण्याऐवजीं इतर लोकांच्या दृष्टीनें पाहण्याची आपल्याला संवय लागून गेली आहे, व आपल्या दुःखाचें मूळ हेंच होय. दुसऱ्यांच्या डोळ्यांनीं आपल्या वर्तनाकडे पाहण्याच्या संवयीलाच गर्व किंवा आत्मप्रौढी असें म्हणणें सयुक्तिक होईल. लोकांनीं आपल्याला चांगलें म्हणावें, ही जी मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति, तीच समाजाच्या आणि धर्माच्या प्रगतीला अडथळा करणारी गोष्ट आहे.

एका अर्धवट माथें फिरलेल्या मनुष्याची एक मोठी गंमतीची गोष्ट सांगतात. तुमच्या इकडे एप्रील महिन्याच्या पहिल्या तारखेला जशी एकमेकांची चेष्टा कुचेष्टा करण्याची चाल आहे, त्याप्रमाणें हिंदुस्तानांत शिमग्याच्या दिवसांत स्नेही सोबती आपापसांत थट्टा, विनोद करून एकमेकांची करमणुक करून घेतात. हा वेडा ज्या गांवांत राहात होता त्या गांवांतील कांहीं मुलांनीं शिमग्याच्या दिवसांत या मनुष्याची चेष्टा करून आपली करमणूक करून घेण्याचा बेत केला.

त्यांनीं त्या मनुष्याला यथेच्छ दारू पाजली, व तो दारूच्या धुंदीनें तर्र होऊन गेला आहे असें पाहतांच ते त्याला आपल्या एका मित्राकडे घेऊन गेले. त्या वेड्या मनुष्याला पहातांच ठरल्याप्रमाणें तो त्यांचा स्नेही मोठ्यानें रडण्याचा बहाणा करून त्या वेड्याला म्हणाला, 'काय करावें ! तुझी स्थिति पाहून मला भडभडून येतें. मी नुकताच तुझ्या घरीं गेलों होतों. तेथें जाऊन पाहतों तों तुझी बायको विधवा झालेली मला दिसली ! केवढी दुःखाची गोष्ट ! ' आपली बायको विधवा झाल्याचें वर्तमान ऐकतांच त्या वेड्या मनुष्यालाहि रडें कोसळलें. त्याचा आक्रोश ऐकतांच आसपासचे लोक तेथें जमा झाले व 'काय झालें 'म्हणून चौकशी करूं लागले. तेव्हां तो वेडा म्हणाला, ' अहो, काय झालें म्हणून काय विचारतां ? माझी बायको विधवा झाली ! माझ्यावर दुःखाचा डोंगर कोसळला!' यावर ते मनुष्य म्हणूं लागले, ' अरे, तूं हें म्हणतोस तरी काय ? तूं जिवंत असतां तुझी बायको विधवा होईल कशी ? तूं जिवंत आहेस ही गोष्ट निःसंशय आहे. कारण, आपली बायको विधवा झाली म्हणून तूं प्रत्यक्ष शोक करीत आहेस. तूं जिवंत असणें आणि तुझी बायको विधवा होणें या दोन्ही गोष्टी परस्पर विरुद्ध नव्हेत काय ? ' त्यावर तो वेडा मनुष्य पुन्हां म्हणाला, ' छे ! तुम्हांला कांहीं समजत नाहीं ! अहो, माझा हा स्नेही नुकताच माझ्या घरीं गेला होता. त्यानें माझी बायको विधवा झालेली प्रत्यक्ष पाहिलेली आहे; मग प्रत्यक्ष पाहिलेली गोष्ट खोटी कशी असणार ? ' इतकें झाल्यानंतर त्या मूर्ख मनुष्याच्या भोंवतीं जमलेले लोक त्याच्या मूर्खपणाबद्दल हंसूं लागले. त्या मनुष्याप्रमाणें आपल्यालाहि ही गोष्ट ऐकून हंसूं आल्याशिवाय राहात नाहीं. कारण, एखादा पुरुष जिवंत असतां त्याच्या बायकोनें विधवा होणें, ही कल्पना निवळ वेडेपणाची आहे. परंतु असला उपहासकारक देखावा या गोष्टींतल्या वेड्या मनुष्याच्याच ठिकाणीं दिसून येतो असें नाहीं; तर जगांतील सर्व धर्म आणि धर्मपंथ, तसेंच सर्व संभावित म्हणून समजले जाणारे व मोठ्या ऐटीनें आणि ख्याली खुशालीनें राहणारे शिष्ट अशाच प्रकारची घोडचूक करीत आहेत ! प्रत्येक बाबतींत आपल्या डोळ्यांचा आणि आपल्या मेंदूचा उपयोग न करतां ते दुसऱ्यांच्या डोळ्यांनीं पाहातात, आणि इतर मनुष्यांच्या कल्पनेवर फाजील भिस्त ठेवतात. आपला आत्मा शुद्ध व अविकार्य असून तो सर्व ज्योतींचीहि ज्योति आहे; आत्मा हा अमर असून विभु आहे; त्याचा नाश होणें कधींहि शक्य नाहीं. तो सच्चिदानंदस्वरूपी

असून सर्वसाक्षी आहे; परंतु असें असूनहि आम्हांला सुख कसें प्राप्त होईल, असे उद्गार ते केंविलवाण्या स्वरानें काढतात! आणि संकटांत सांपडले असतां दीनवाणीनें ते ईश्वराची करुणा भाकतात. ते देवळांत जाऊन देवापुढें नाक घासतात. मूर्तीपुढें लोटांगणें घालतात, व आपण क्षुद्र कीटक आहों, अशा आशयाचे उद्गार काढून ईश्वराची प्रार्थना करतात. अमका लेखक, धर्मोपदेशक किंवा साधु आपण सर्व पापी आहों, मुंग्यामाशांप्रमाणें क्षुद्र जंतु आहों, असें म्हणतो एवढ्यावरूनच आपण पापी आहों, अशी लोकांची ठाम भावना होऊन बसते. परंतु ही स्थिति खास चांगली नाहीं. तुम्हीं आपल्या जीविताचें ध्येय ओळखा, आत्मानुभव करून घेण्याचा प्रयत्न करा, मोहरूपी मदिराप्राशन करून उन्मत्त झाल्यामुळें आपण मर्त्य आहों, अशी जी तुमची चुकीची भावना झाली आहे, ती आपल्या डोक्यांतून अजिबात काढून टाका; आणि आत्मविश्वास बाळगून आपल्या पायांवर उभें राहण्यास शिका. आपण लहान आहों कीं मोठे आहों, श्रीमान् आहों कीं गरीब आहों, याबद्दल बिलकुल काळजी करूं नका. आपलें परमात्मत्व—ईश्वरत्व अनुभूत करून घ्या. जगांतील कोणत्याहि गोष्टीबद्दल भीति बाळगूं नका. बहिर्वृत्तीला फांटा देऊन अंतर्मुख व्हा. दुसऱ्या लोकांचीं आपल्यासंबंधानें काय मतें आहेत, हा प्रश्नच मनामध्यें येऊं देऊं नका. लोक कांहींहि म्हणोत; परंतु आपल्या वास्तविक स्वरूपाच्या दृष्टीनें विचार केला असतां तुमच्याइतकें श्रेष्ठ जगांत कोणीच नाहीं. लोक म्हणतात कीं, वेदान्त आम्हांला असें शिकवितो, बुद्धधर्माचा असा उपदेश आहे, किंवा दुसरा एखादा धर्म अमुक तत्त्व प्रतिपादन करतो; परंतु यावर राम म्हणतो कीं, आत्मदृष्टीनें पाहिलें असतां आपण दीन आहों, दुबळे आहों, वगैरे सर्व तऱ्हेच्या कल्पना चुकीच्या आहेत. आपलें परमात्मत्व अनुभवास आणून घ्या म्हणजे खरी स्थिति काय आहे, तें तुम्हांला प्रत्यक्ष दिसेल.

## पर्वत व खार यांचा संवाद

(चालः—चंद्रकांत राजाची कन्या.)

गिरि—खारींचा कलह माजला, आला रंगांत।
गिरि खारीतें वदे, 'क्षुद्र परि किति गे ढंगांत' ॥ १ ॥

वदे तया ती 'तूं बहु मोठा संशय नच कांहीं ।
ऋतु सारे एकत्र, तरी हो वर्ष एक पाहीं ।। २ ।।
स्थानीं माझ्या कुणीहि बैसो पर्वा नच मातें ।
तव गुरुता मज, मम लघुता तुज जुळे न हें नातें ।। ३ ।।
अर्थचपलता नसे तुला, हे बोल तुझे वांया ।
नाहीं कुठें भी म्हणतें ? अससी तूं आमुचा पाया ।। ४ ।।
बुद्धिभेद या जगांत सारा, नसे तुला याला ।
जगज्जाल निर्मिलें प्रभूनें; ज्याचें बळ त्याला ।। ५ ।।
वाहुनि नेसी गहना पृष्ठीं तें मज बळ नाहीं ।
कवच तुला भेदितां न येतें, नवल हेंच पाहीं' ।। ६ ।।

---

ह्याच न्यायानें तुमचें शरीर एखाद्या लहानशा खारीप्रमाणें क्षुद्र असेल, व दुसऱ्या एखाद्याचें शरीर पर्वताप्रमाणें प्रचंड असेल. परंतु त्यासंबंधाचा विचार मनांत आणूं नका. आतां सांगितलेल्या गोष्टींतील खारीच्या अंगचा शहाणपणा आपल्या अंगीं आणा. तसेंच हीहि गोष्ट लक्षांत ठेवा कीं, तुम्हीं जरी क्षुद्र असलां तरी तुम्हांला करावयाची अशी कामगिरी या जगांत कांहींतरी आहेच. व ती कामगिरी धिप्पाड शरीराच्या कोणत्याहि प्राण्याला करतां येण्यासारखी नाहीं. या जगांत उत्पन्न झालेल्या प्रत्येक जीवाला आपलें नियतकार्य केलेंच पाहिजे; व तें करण्यांत कोणताहि कमीपणा नाहीं. अशा स्थितींत आपण क्षुद्र आहों, अशी कल्पना विनाकारण कां करून घेतां ? मोठ्या आनंदानें आणि संतोषवृत्तीनें राहून आपलें कार्य करीत जा.

## आत्मविश्वास बाळगा

एकदां एक गृहस्थ रामाकडे आला, व आपला वरिष्ठ अम्मलदार आपल्याला नेहमीं टाकून बोलतो, अशी तक्रार करूं लागला. या तक्रार करणाऱ्या मनुष्याला रामानें स्वच्छ सांगितलें कीं, 'आपण क्षुद्र आहों अशी तुझी स्वतःची कल्पना आहे, व यामुळें तुझा वरिष्ठ अम्मलदार तुला तुच्छ लेखतो.' व हें तत्त्व निःसंशय खरें आहे. आपणच आपली किंमत कमी करून घेतली,

आपल्या ठिकाणीं स्वाभिमानाचा अभाव असला, तर लोकांनीं तरी आपल्याला काय म्हणून मान द्यावा ? आपल्या ठिकाणीं स्वाभिमान असला तर आपला मान ठेवणें लोकांना भाग आहे. आपल्याच पुस्तकाची किंमत आपण एक आणा ठरविली, तर लोक तरी त्याची किंमत दोन आणे काय म्हणून देतील ? परंतु आपल्या पुस्तकाची आपणच किंमत दोन रुपये ठरविली, तर लोक आपखुषी-नेंच ती किंमत देतील ! तुम्हीं आपली स्वतःची किंमत एकदां ठरविली म्हणजे त्याच्यापेक्षां जास्त किंमत तुम्हांला कोणीहि देणार नाहीं. यासाठीं आपली किंमत अत्युच्च ठरवा, आपलें परमात्मत्व--ईश्वरत्व अनुभवास आणून द्या, म्हणजे मग प्रत्येक मनुष्य तुमच्याकडे त्या दृष्टीनें पाहूं लागेल.

लोक म्हणतात कीं, श्रद्धा ठेवा म्हणजे तुमचें सर्व कार्य होईल. कारण, श्रद्धा हें तारक तत्त्व आहे. श्रद्धेचें महत्त्व खरोखरीच अद्भुत आहे, यांत शंका नाहीं. परंतु, आत्म्याव्यतिरिक्त जगांतील इतर तत्वांवर श्रद्धा ठेवल्यानें तुमचें कल्याण खात्रीनें होणार नाहीं. आत्मविश्वास बाळगा, आपण परमात्मा आहों ही भावना दृढ करा, म्हणजे तुम्हीं भवसागरांतून तरून गेल्याशिवाय खास राहणार नाहीं. आपलें वास्तविक स्वरूप ओळखून त्याच्यावर विश्वास ठेवा, त्याला पूज्य मानूं लागा, म्हणजे जगांतील प्रत्येक मनुष्य तुम्हांला पूज्य मानूं लागेल; असो.

आपला वरिष्ठ अम्मलदार आपल्याला वाईट रीतीनें वागवतो, अशी तक्रार ज्या गृहस्थानें रामापाशीं केली होती, तो मनुष्य रामानें केलेला बोध ऐकून श्रद्धावान् बनला, व ईश्वराची नेहमीं भक्ति करूं लागला. भक्ति याचा अर्थ अमुक तमुक मंत्राचा जप करणें, किंवा देवाचें नांव घेणें, असा सामान्यतः समजला जातो. परंतु हा अर्थ बरोबर नाहीं. खरी भक्ति याचा अर्थ परमात्मभावना दृढ करणें, आत्मानुसंधान राखीत जाणें असा आहे. अशा तऱ्हेनें तो मनुष्य भक्ति करूं लागला, व त्याचा परिणाम असा झाला कीं, आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें आपल्याला चांगल्या रीतीनें वागविलेंच पाहिजे, अशी आत्म-श्रद्धा त्याला वाटूं लागली. पुढें एके दिवशीं आपल्या वरिष्ठ अम्मलदाराची तब्बेत कांहीं कारणानें गरम झाली आहे, असें त्याला दिसून आलें. त्यावर प्रसन्न चित्तानें आणि मृदु भाषेनें तो आपल्या अम्मलदाराला म्हणाला, 'महाराज ! आपण माझ्यापेक्षां दरमहा जास्त पगार मिळवितां, ही गोष्ट खरी आहे; तसेंच मला न झेपणारीं अशीं कांहीं कामें आपण करतां, हीहि गोष्ट मला कबूल आहे. मला

आपण पूज्य आहां, आपल्यावांचून माझें कांहीं चालावयाचें नाहीं, ही गोष्ट खरी; परंतु त्याबरोबर आपल्यालाहि माझ्यापासून काम करून घ्यावयाचें आहे, हेंहि तितकेंच खरें आहे. माझी व्यक्तिशः कांहीं किंमत नसेल; परंतु मी ज्या जागेवर आहें, त्या जागेवर कोणी तरी मनुष्य असल्याशिवाय आपलें चालेल काय? खास नाहीं. मला जितके आपण पाहिजे आहां, तितकाच आपल्याला मी पाहिजे आहें! इतकेंच नव्हे तर, असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं कीं, माझी गरज आपल्याला प्रथम लागली, तेव्हां मला आपली गरज वाटत आहे! या जागेचें काम करण्यासाठीं आपल्याला कोणातरी मनुष्याची जरूरी वाटली, व आपण मला या जागेवर बोलावलेंत. वास्तविक मी तुमची नोकरी करीत नाहीं. मी आपल्या स्वतःची नोकरी करीत आहें; आपली उपजीविका चालावी यासाठीं मी नोकरी करीत आहें; अर्थात् मी तुमचा नोकर नसून आपला स्वतःचा नोकर आहें! मी कोणाची हांजी हांजी करणार नाहीं; योग्य आणि सरळ मार्गानें नोकरी करावयाची असली तर त्याला माझी हरकत नाहीं.'

## स्वावलंबी बना

वस्तुस्थिति अशी असल्यामुळें जगांतील कोणत्याहि मनुष्यावर तुम्हीं अवलंबून नाहीं. आपण स्वतःकरितां नोकरी करीत आहों, ही जाणीव ज्या नोकराला झाली आहे, असा नोकर कोणत्याहि मालकावर अवलंबून नाहीं. बाह्यतः दिसणारें अवलंबन हें खरें अवलंबन नव्हे. खरें अवलंबन आपल्या स्वतःवर अवलंबून आहे. अशी स्थिति असल्यामुळें आपण आत्म्यावर अवलंबून आहों, हें जाणून जगांतील वस्तूंवर अवलंबून राहण्याचें सोडून द्या. आपण ईश्वरावर अवलंबून आहों, ख्रिस्त, महंमद, बुद्ध, कृष्ण, अथवा जगांतील इतर अवतारी पुरुष यांच्यावांचून आपलें चालावयाचें नाहीं, असें तुम्हीं कां मानतां? तुम्हांला कोणावरहि अवलंबून राहण्याचें कारण नाहीं. तुमच्यापैकीं प्रत्येक जण नेहमीं मुक्तच आहे. आपल्या स्वातंत्र्यासंबंधाची ही कल्पना निरंतर मनांत बाळगा, तिचा निदिध्यास करा, म्हणजे तुम्हीं पूर्ण सुखी व्हाल.

आशियाखंडांतील एका बादशहापुढें एकदां एका मनुष्याला आरोपी म्हणून आणण्यांत आलें. तो मनुष्य बादशहाला नमस्कार करीत नाहीं, असा त्याच्यावर आरोप ठेवण्यांत आला होता. बादशहापुढें आल्यानंतर शिरस्त्याप्रमाणें त्यानें

बादशहाला मुजरा वगैरे केला नाहीं. हें पाहातांच त्याला अतिशय क्रोध आला व त्या आरोपीला उद्देशून तो बादशहा म्हणालाः—" माझी सत्ता केवढी मोठी आहे, व माझी शिस्त किती कडक आहे, हें तुला माहीत नाहीं काय ? तूं मला कुर्निसात करीत नाहींस, परंतु या तुझ्या हट्टवादीपणाबद्दल तुझी गर्दन छाटण्यास मी कमी करणार नाहीं, हें तूं पक्कें लक्षांत ठेव!" बादशहाचें हें उद्दामपणाचें भाषण ऐकल्यानंतर तो मनुष्य क्रोधानें संतापून गेला; आणि बादशहाबद्दल तुच्छता दर्शवून म्हणाला, 'तूं आपल्या सत्तेबद्दल एवढी घमेंड मिरवितो आहेस, परंतु तूं केवळ बाहुलें आहेस! तूं मला ठार मारणार म्हणून म्हणतोस, परंतु मला मारण्याचें सामर्थ्य तुझ्यामध्यें नाहीं, कारण मी स्वतंत्र आहें. मी पाहिजे तर तुझ्या तोंडावर थुंकेन, तुझा अपमान करीन, मग त्याबद्दल या शरीराला सुळावर जाण्याची वेळ आली तरी हरकत नाहीं! मी ह्या शरीराचा साक्षी आहें; परंतु तूं मात्र देहाभिमानानें बद्ध झालेला आहेस. तुझ्या ठिकाणचें सामर्थ्य उसनें आहे, परंतु माझें सामर्थ्य पारमार्थिक आहे!' या न्यायानें आपण जगांतील सर्व वस्तूंचे मालक किंवा स्वामी आहों, याचें मनन करा; आत्मदृष्टीनें सर्वत्र पहा. दुसऱ्यांच्या दृष्टीनें पाहूं नका. आपण स्वतंत्र आहों, सर्व सत्ताधीश आहों, सर्व देवांचेहि देव, राजांचेहि राजे आहों, अशी निरंतर भावना करीत जा.

## प्रकाशाशिवाय उपाय नाहीं!

'लोकांना दुःखें कां भोगावीं लागतात,' असा प्रश्न आहे. या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं, त्यांना स्वरूपाचें विस्मरण पडलें आहे; व यामुळें दुसरे लोक आपल्याला जसें समजतात तसेच आपण आहों, अशी त्यांची भावना होऊन गेली आहे. हें अज्ञान नाहींसें होईपर्यंत, आपल्या परमात्मस्वरूपाचा मनुष्य अनुभव करून घेत नाहींत तोंपर्यंत, त्यांच्यामागें लागलेलीं दुःखें नाहींशीं होणार नाहींत.

अविद्या—अज्ञान म्हणजे अंधकारच होय! तुम्हीं एखाद्या अंधाऱ्या जागीं गेलां तर त्या ठिकाणची भिंत किंवा दुसरी कोणती तरी वस्तु तुम्हांला लागून थोडीबहुत तरी दुखापत झाल्यावांचून राहाणार नाहीं. अंधारांत जावयाचें म्हणजे कांहींतरी इजा होणारच, त्याला उपाय नाहीं. हिंदुस्तानांतील गरिबगुरीब लोक लहानलहान झोंपड्यांतून राहातात. हे लोक इतके भिकारी असतात कीं घरांत दिवा ठेवण्याचेंहि त्यांना सामर्थ्य नसतें. अशा गरीबगुरीब लोकांच्या वस्ती-

तून हिंडतांना रामानें अशी स्थिति पाहिली आहे कीं, घराचा मालक आपली बायको व इतर माणसें यांना उद्देशून नेहमीं असे रागानें उद्गार काढी कीं, 'अमुक अमुक ठिकाणची वस्तु माझ्या डोक्याला लागली; अमुक वस्तु माझ्या पायाला लागली; या सर्व वस्तु तुम्हीं अस्ताव्यस्त कां ठेवतां? अशा आशयाचे उद्गार काढून तो घरांतील माणसांवर नेहमीं चरफडत असे. परंतु या चरफडण्यांत अर्थ काय? घरांत जोंपर्यंत अंधार आहे, तोंपर्यंत घरांतील वस्तु कोठेंहि, कशाहि ठेवल्या तरी त्या हातापायाला लागणारच. त्याबद्दल ओरड करण्यांत अर्थ काय? घरांत दिवा लावून अंधार नाहींसा करा, म्हणजे घरांतील वस्तु कोठेंहि कशाहि ठेवल्या असल्या तरी त्यापासून अपाय होण्याची बिलकुल धास्ती नाहीं.

जगांतील लोकांची स्थिति हुबेहुब याच मासल्याची असते. आपली परिस्थिति फार वाईट आहे, आपली सांपत्तिक स्थिति अगदीं वाईट झालेली आहे, अशी लोक नेहमीं तक्रार करीत असतात. परंतु जोंपर्यंत आपली मनःस्थिति सुधारली नाहीं, तोंपर्यंत आपली बाह्यस्थिति कितीहि चांगली झाली, तरी आपल्यामागची दुःखपरंपरा नाहींशी होणार नाहीं. लोकांची कल्पना अशी असते कीं, आपण पैशाचे ढीगचे ढीग मिळविले, मोठमोठ्या हवेल्या बांधल्या, जमीनजुमला खरेदी केला म्हणजे आपलीं दुःखें नाहींशीं होऊन आपण पूर्ण सुखी होऊं. परंतु ही कल्पना किती वेडगळपणाची आहे! झोंपडींतील जिन्नस इकडचे तिकडे नेऊन ठेवले किंवा तिकडचे इकडे आणले, तरी झोंपडींत जोंपर्यंत अंधार आहे, तोंपर्यंत त्यांपासून आपल्याला इजा झाल्यावांचून राहात नाहीं; त्याचप्रमाणें ही स्थिति आहे. आपली परिस्थिति कितीही बदलली तरी जोंपर्यंत आपल्या अंतःकरणांत अज्ञानांधकार संचार करीत आहे, तोंपर्यंत आपल्या मागची दुःखें आणि विपत्ति टळणें शक्य नाहीं. हृदयांत आत्मसूर्याचा प्रकाश पडला म्हणजे जगांतील कसलीहि प्रतिकूल परिस्थिति तुमच्या सुखाच्या आड येऊं शकणार नाहीं. अज्ञानजन्य दुःखें नाहींशीं होण्याला आत्मज्ञानाशिवाय दुसरा कोणताहि उपाय नाहीं.

हिमालयांत कांहीं भागांमध्यें रानटी लोकांचे संघच्यासंघ राहतात. व त्यांना कधीं विस्तव पेटवणें माहीत नाहीं. ज्यामध्यें पूर्वीं जे रानटी लोक राहात

असत, त्यांना अग्नीचा उपयोग माहीत नसे. ते मासे सुकवून त्याच्यावर आपली उपजीविका करीत असत. आपले खाण्याचे जिन्नस सूर्याच्या उन्हांत ठेवून त्यावर आपला उदरनिर्वाह करीत. सूर्यास्तापूर्वी ते झोंपीं जात, व सूर्योदयाबरोबर जागे होत. हिमालयांत राहणाऱ्या रानटी लोकांची स्थितीहि याचप्रमाणें आहे. या लोकांपैकीं कांहीं लोकांच्या राहण्याच्या ठिकाणीं एक मोठी गुहा होती. आपले प्राचीन काळचे कांहीं पूर्वज त्या गुहेमध्यें राहात असत, अशी या लोकांची कल्पना होती. त्यांचे कांहीं पूर्वज त्या गुहेंतील चिखलांत रुतून मेले होते, व कांहींचीं डोकीं अंधारामुळें गुहेंतील दगडांवर आपटून फुटलीं होतीं. परंतु आपले पूर्वज त्या गुहेंत अंधारामुळें मेले, ही कल्पना त्यांना नसल्यामुळें त्या गुहेंत मोठा थोरला राक्षस आहे, व त्यानें आपल्या पूर्वजांना खाऊन टाकलें, अशी त्यांची अगदीं ठाम समजूत झाली होती ! यामुळें ते त्या गुहेला मोठी पवित्र मानीत. परंतु एकदां त्या राक्षसाला गुहेंतून पिटाळून लावावा, असें त्यांच्या मनानें घेतलें. या रानटी लोकांच्या मूर्खपणाबद्दल तुम्हांला हंसूं येत आहे; परंतु आजकालचे लोक या रानटी लोकांपेक्षां जास्त हास्यास्पद गोष्टी करीत आहेत; असो. त्या राक्षसाला गुहेंतून घालवून देण्यासाठीं काय उपाय योजावा, असा विचार ते लोक करीत असतां, त्यांपैकीं एकजण म्हणाला, 'आपण सर्वजण त्या गुहेपाशीं जाऊन त्या राक्षसापुढें लोटांगण घातलें, तर तो आपलें म्हणणें खात्रीनें ऐकेल.' या कल्पनेप्रमाणें ते सर्वजण मिळून गुहेपाशीं गेले, व त्या गुहेपुढें दंडवत् प्रणाम करून कित्येक दिवसपर्यंत राहिले; परंतु या लोटांगणांचा त्या राक्षसाच्या मनावर यत्किंचित्हि परिणाम झाला नाहीं. नंतर दुसऱ्या एका मनुष्यानें दुसरी एक तोड सुचविली. तो म्हणाला, 'आपण सर्वजण मिळून भाले तिरकमठे घेऊन त्या राक्षसापाशीं लढूं, आणि त्याला चीत करून गुहेंतून घालवून देऊं.' लगेच हातांत भाले तिरकमठे घेऊन सर्व लोक त्या गुहेपाशीं आले, आणि गुहेंतील अंधारांत तीर मारूं लागले, व काठ्यांनीं झोडपूं लागले. परंतु राक्षस कसला मख्खम ! तो आपल्या जागेवरून मुळींच हालेना. यानंतर त्यांच्यांतील तिसरा एक मनुष्य म्हणाला, 'मित्रांनो, थांबा ! थांबा ! ! अशा रीतीनें लढाई करून का तो राक्षस आपल्या हातीं लागणार ? राक्षस कसला बलाढ्य ! त्याच्यापुढें आपलें काय चालणार ? अरे तुम्हीं वेडे आहां. राक्षसाला जिंकण्याचें इंगित तुम्हांला अजून समजलें नाहीं. आपण सर्वजण उपास करूं या, म्हणजे तो राक्षस

हां हां म्हणतां निघून जाईल !' त्या मनुष्याची ही कृति त्या रानटी लोकांच्या डोक्यांत शिरली, व त्यांनीं उपास करण्याला सुरवात केली. पुष्कळ दिवसपर्यंत अन्नपाण्यावांचून त्यांनीं आपली उपासमार करून घेतली; परंतु तो राक्षस अशानें थोडाच बधणार ? यानंतर आणखी एका मनुष्यानें असें सुचविलें कीं, 'आपण दानधर्म करूं या.' व त्याप्रमाणें त्या लोकांनीं आपल्याजवळची होती नव्हती तेवढी पुंजी आपल्या जातभाईंना देऊन टाकली. परंतु दानधर्मानें राक्षस वळला नाहीं ! शेवटीं एक मनुष्य पुढें झाला व म्हणाला, 'बाबांनो ! तुमचे सर्व उपाय थकले. आतां मी सांगतों त्याप्रमाणें वागा, म्हणजे राक्षस गुहेंतून पळालाच म्हणून समजा. मोठमोठे बांबूचे तुकडे, थोडेंसें गवत व माशांचें तेल माझ्याकडे घेऊन या, म्हणजे मी राक्षसाला क्षणांत ठार करतों !' त्या मनुष्याच्या सांगण्याप्रमाणें त्या लोकांनीं सर्व सामुग्री गोळा केल्यानंतर त्या मनुष्यानें बांबूच्या काठ्यांना गवत बांधलें, व एका गारगोटीवर दगड घांसून त्या अग्नीनें तें गवत पेटविलें, व अशा रीतीनें दिवट्या तयार केल्या. त्या दिवट्या पाहून त्या रानटी लोकांना मोठें आश्चर्य वाटलें. कारण, त्यांनीं अग्नी पेटविलेला पूर्वीं कधींच पाहिला नव्हता; इतकें झाल्यावर त्या दिवट्या घेऊन गुहेंत जाण्यास त्यानें आपल्या सोबत्यांस सांगितलें. व 'गुहेंत गेल्यावर तो राक्षस तुम्हांला एखाद्या कोनाकोंपऱ्यांत आढळून आल्यास त्याचे कान उपटून त्याला गुहेबाहेर घालवून द्या.' असा त्यानें इषारा दिला. आरंभीं या मनुष्याचें म्हणणें त्यांना खरेंच वाटेना. कारण ते म्हणाले, 'आमच्या बापजाद्यांनीं आम्हांला असें सांगितलें आहे कीं, राक्षसापुढें लोटांगणें घातलीं असतां, उपास केले असतां किंवा पुष्कळसा दानधर्म केला असतां, राक्षस गुहेंतून निघून जाईल. त्याप्रमाणें आम्हीं पुष्कळ दिवस करून पाहिलें; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं, आतां हा वेडगळ मनुष्य आम्हांला ही भलतीच कल्पना सांगत आहे; याच्या म्हणण्याकडे लक्ष देण्यांत अर्थ नाहीं.' असें म्हणून त्यांनीं दिवट्या विझवून टाकल्या. परंतु सर्वच लोकांना कांहीं ही विचारसरणी पसंत पडली नाहीं. त्यांपैकीं कांहीं जणांनीं त्या मनुष्याच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याचा निश्चय केला. व गुहेंत दिवट्या घेऊन जातात तों त्याठिकाणीं राक्षस दिसला नाहीं. ते त्या गुहेंत खोल खोल गेले, परंतु राक्षसाचा पत्ता नाहीं. नंतर त्यांच्या मनांत अशी कल्पना आली कीं, गुहेंतील कोनाकोंपऱ्यांत राक्षस जाऊन

लपून बसला असेल. त्याप्रमाणें त्यांनीं सर्वत्र जाऊन पाहिलें, परंतु राक्षस कोठेंहि दिसला नाहीं. जणूं कांहीं तो गुहेंत कधींच नव्हता!

याच न्यायानें अज्ञानरूपी अंधकार हा राक्षस असून तो आपल्या अंतःकरण-रूपी गुहेमध्यें शिरला आहे, व त्यामुळें या गुहेचा नरक बनला आहे. आपल्या अंतःकरणरूपी गुहेंत या राक्षसानें धुमाकूळ मांडला असून आपलीं सर्व तऱ्हेचीं दुःखें आणि विपत्ति त्याच्यामुळें उत्पन्न झालीं आहेत, बाह्य परिस्थितीमुळें नव्हे. कल्पना करा, एक मनुष्य आपल्याजवळ येतो, आपल्याला शिव्या देतो किंवा आपला उपहास करतो; आतां त्या मनुष्याच्या शिव्या किंवा उपहास हे एक प्रकारचें विषारी अन्न असेल; परंतु तें तुम्हीं सेवन केलेंत तर तें तुम्हांला अपाय करील, एरव्हीं करणार नाहीं. एखाद्या मनुष्यानें आपली कुचेष्टा केली तर ती तुम्हीं आपल्या अंगीं लावून घेतली नाहींत तर तुम्हांला राग येण्याचा संभव नाहीं. रामाला असला अनुभव पुष्कळ वेळां आलेला आहे. तो रस्त्यांतून जात असतां भोंवतालच्या लोकांनीं त्याची पुष्कळ वेळां कुचेष्टा केली आहे. परंतु असली कुचेष्टा खरी आहे असें मानून आपण आपल्या ठिकाणीं लावून घेतली नाहीं, तर असल्या कुचेष्टेचा आपल्यावर यत्किंचित्‌हि परिणाम होणार नाहीं. जो मनुष्य आपल्या विरुद्ध लोकांनीं केलेल्या टीकेचा भडिमार शांतपणानें सहन करतो, असल्या विषारी अन्नाचें सेवन करीत नाहीं, ज्याला लोकांनीं केलेल्या मानापमानाची किंमत सारखीच वाटते, व ज्या मनुष्याच्या मनाची समता जगांतील कोणत्याहि गोष्टीनें भंग पावत नाहीं, त्या मनुष्याला आत्मसा-क्षात्कार झाला आहे, असें वेदान्त प्रतिपादन करतो. लोक आपल्यासंबंधानें काय म्हणतात त्याकडे बिलकुल लक्ष न देतां आपला परमात्मभाव दृढ करा, त्याच्यावर श्रद्धा ठेवा; व जे लोक तुमची निंदा किंवा उपहास करीत असतील, अशा लोकांची कींव करा. आपल्याला लोक वाईट रीतीनें वागवितात, आपण लोकांच्या पायां-खालीं तुडविले जात आहोंत किंवा आपला अधःपात होत आहे, अशा तऱ्हेच्या विचारांना आपल्या मनांत थारा देऊं नका. आपली परमात्मभावना दृढ करा. मनन आणि निदिध्यास यांच्यायोगानें त्या भावनेंत निरंतर राहण्यास शिका. परमात्म्याव्यतिरिक्त दुसरी कोणतीहि भावना करणें हा अंधकार होय! तें केवळ अज्ञान आहे. या अंधकारानें आपण स्वतःकरितां जगाचा नरक बनविला आहे. या अज्ञानांधकारांतून मुक्त होण्यासठीं आत्मज्ञानदीपाशिवाय

दुसऱ्या कोणत्याहि उपायांचा तुम्हीं अवलंब केलात, तर त्यांत तुम्हांला अखेरीस अपयश आल्याशिवाय राहणार नाहीं.

## स्वतः प्रयत्न करा

जगांत कोट्यवधि ख्रिस्त उत्पन्न झाले तरी आपल्या अंतःकरणांतील अज्ञानांधकार नाहींसा करण्यासाठीं तुम्हीं स्वतः झटल्याशिवाय त्यांचा तुम्हांला यत्किंचितूहि उपयोग होणार नाहीं. केव्हांहि दुसऱ्यावर अवलंबून राहूं नका. या धर्मांत शिरा, त्या धर्माची कांस धरा, या देवाची पूजा करा, त्या देवाची उपासना करा, असल्या नकली मार्गांचा आत्मोन्नतीच्या कामीं काडीमात्र उपयोग नाहीं, हें लक्षांत ठेवा. अंधकार नाहींसा करण्याचा खरा उपाय म्हटला म्हणजे प्रकाश—जिवंत प्रकाश—आपल्या परमात्मभावनेवर अचल श्रद्धा, हाच आहे; याशिवाय दुसरा कोणताहि नाहीं.

सकल स्त्रीपुरुषांच्या आकारांमध्यें भासमान होणाऱ्या परमात्मन्! प्रत्येक रूपांत दृग्गोचर होणाऱ्या आत्मरूपा! सर्व शरीरांमध्यें विलसणाऱ्या प्रेममय आत्मन्! सर्व रूपांमध्यें नटणाऱ्या हे प्रेमस्वरूपी माते! प्रकाश याचा अर्थ आत्मसाक्षात्कार. आत्मानुभव इतक्या उच्च दर्जापर्यंत जाऊन पोहोंचला पाहिजे कीं, त्यापुढें जगांतील सर्व तऱ्हेचीं भासमान होणारीं शरीरें—आकार मृगजलवत् होऊन जातील. सर्वत्र ब्रह्मभाव झाला म्हणजे सर्व आकार मिथ्या आहेत, असा तुम्हांला अनुभव येईल. एखादा मनुष्य पाहिला म्हणजे तो एक साहंकार जीव आहे, अशा दृष्टीनें सामान्य मनुष्य त्याच्याकडे पाहातात. परंतु ब्रह्मानुभव बाणलेला मनुष्य, इतर मनुष्याच्या बाह्य आकाराकडे पाहात असूनहि पाहात नाहीं; त्याच्या ज्ञानदृष्टीला जगांतील भासमान होणारे आकार मिथ्या आहेत असें दिसतें.

अज्ञानाचा नाश होणें म्हणजेच ईश्वराची भेट होणें, आत्मसाक्षात्कार होणें—परमात्मभाव होणें होय! व अशी स्थिति झाली म्हणजे मनुष्य सर्व तऱ्हेच्या भीतीपासून आणि चिंतेपासून कायमचा मुक्त होतो.

हे परमात्मन्! सर्व शरीरांमध्यें विलसणाऱ्या, हे प्रेमस्वरूपी ईश्वरा! लोक ज्यांना आपले शत्रु म्हणून मानतात, ते माझा आत्मा होत; लोक ज्यांना आपले

मित्र म्हणून समजतात, तेहि माझा आत्माच होत. मनुष्यांच्या व्यक्तिविशेषाकडे--त्यांच्या क्षुद्र अहंकाराकडे पाहूं नका. सर्व शरीरांत परमात्मा आहे हें पाहा! तसेंच आपल्याहि शरीरांत त्या ज्ञानस्वरूपी परमात्म्याला आत्मरूपानें पाहाण्यास शिका. आत्मा आणि परमात्मा हे एकच आहेत. आपला आत्मा परमात्मरूपानें सर्वत्र व्यापून राहिला आहे. अशा त्या आत्म्याचा साक्षात्कार करून घ्या; ब्रह्मानुभव बाणवून घ्या, म्हणजे तुमच्या मार्गांतील सर्व तऱ्हेचे अडथळे, सर्व तऱ्हेचे प्रत्यवाय आपोआप नाहींसे होतील. केवढी ही अद्भुत दृष्टी! केवढें हें विलक्षण सत्य! केवढी ही भव्य स्थिति! या स्थितीचें वर्णन करतां येत नाहीं, शब्द त्या स्थितीपर्यंत जाऊन पोहोंचत नाहींत; त्या दिव्यस्थितीचें वर्णन करतांना वाणी पंगू ठरते, त्याला इलाज नाहीं! परंतु ही वास्तविक स्थिति आहे. ही स्थिति आपल्याला प्राप्त व्हावी, असें तुम्हांला वाटत असेल, त्याबद्दल तुम्हांला तळमळ लागली असेल, तर तो आत्मानंद तुम्हांला मिळाल्याशिवाय राहाणार नाहीं.

खगोलज्योतिषासंबंधीं ग्रंथ वाचीत असतांना आकाशांतील निरनिराळ्या ताऱ्यांमधील अंतर किती असतें, या संबंधाची गणना केलेली आपल्याला आढळून येते. त्यावरून पाहिलें असतां आपली पृथ्वी ही आकाशांतील नक्षत्रांच्या मानानें बिंदुवत् आहे, जवळ जवळ शून्य आहे, असेंच म्हणावें लागतें. याच न्यायानें आपण प्रकाशांचे प्रकाश आहों, सुर्यांचेहि सूर्य, देवांचेहि देव, प्रभूंचेहि प्रभु आहों, असा तुम्हांला अनुभव आला म्हणजे आकाशांतील अनंत तारे, आकाशगंगेंतील कोट्यवधि नक्षत्रें हीं क्षुद्र आहेत, असें तुम्हांला दिसून येईल; व अशी स्थिति झाली म्हणजे जगांतील कोणत्याहि तऱ्हेचीं बुजगावणीं तुमच्या मनावर परिणाम करूं शकतील काय? आकाशांतील नक्षत्रांपुढें आपली ही पृथ्वी जर कःपदार्थ आहे, तर आत्मस्वरूपाच्या दिव्यस्थितीपुढें जगांतील दुःखें आणि चिंता सर्वथैव तुच्छ आहेत, असेंच तुमच्या अनुभवास येईल.

ज्याच्या वृत्तींत आत्मानुभव बाणून गेला आहे, अशा मनुष्याच्या मनावर जगांतील कोणत्याहि गोष्टीचा परिणाम होत नाहीं. आकाशांतील लक्षावधि सूर्य नाहींसे झाले, किंवा कोट्यवधि चंद्र अजिबात वितळून गेले, तरी त्याची आत्मज्ञानी मनुष्याला कांहींच किंमत वाटत नाहीं. अनंतकोटिब्रह्मांडाचा लय झाला तरी ज्ञानी हा एखाद्या पर्वताप्रमाणें अचल असतो! अशा मनुष्याला जगांतील दुःखांपासून आणि आपत्तीं-

पासून यत्किंचित्ही अपाय होण्याचा संभव नाहीं; ही केवढी आश्चर्याची गोष्ट! हें केवढें विलक्षण ऐश्वर्य ! हें तुमच्या आत्म्याचें ऐश्वर्य आहे. परंतु लोकांचें लक्ष या ऐश्वर्याकडे लागत नाहीं. आपण एखाद्या ल्हानशा पडद्याआड उभें असलों तर आकाशांत प्रकाशमान् होणारा सूर्य व त्याचा जगांत दिसणारा प्रभाव यांचा प्रत्यय आपल्याला येत नाहीं. आपल्या हृदयाकाशांतील आत्मसूर्याची स्थितिहि अशीच झाली आहे. ल्हानशा अज्ञानावरणामुळें त्या आत्मसूर्याचें वैभव आपल्या अनुभवास येत नाहीं. आत्मस्वरूपावरील हें आवरण नाहींसें करा, आणि आपल्या अनंत ऐश्वर्याचा अनुभव करून घ्या. तें अनंत ऐश्वर्यच तुमचें वास्तविक स्वरूप आहे. त्याचा अनुभव करून घेतलांत म्हणजे त्याचा प्रभाव सर्वत्र स्पष्टरीतीनें पडलेला तुम्हांला दिसून येईल.

राम तुम्हांला असें सांगत आहे कीं, ' अहं ब्रह्मास्मि ' याचा तुम्हीं अनुभव करून घ्या. म्हणजे हेंच जग तुम्हांलां नंदनवनाप्रमाणें सुखकारक वाटूं लागेल. मग तुम्हांला कोणीहि शत्रु राहणार नाहीं. भीति, चिंता, काळजी दुःख यांचें नांवहि शिल्लक राहणार नाहीं. वास्तविक स्थिति अशी आहे.

आपण जमिनीवर उभें असलों म्हणजे आपलीं घरें आपल्याला किती तरी उंच दिसतात; परंतु तेच आपण एखाद्या पर्वताच्या शिखरावर जाऊन पाहूं लागलों तर खालच्या वस्तु आपल्याला किती तरी ल्हान दिसतात. याच न्यायानें तुम्हीं आत्मज्ञान संपादन केलेंत, आध्यात्मिक ऐश्वर्याच्या शिखरावर आरूढ झालांत, म्हणजे शत्रु आणि मित्र, चांगलें आणि वाईट वगैरे क्षुद्र भेद तुमच्या दृष्टीला दिसेनासे होतील. असले भेद आपल्या दृष्टीला दिसतात, यामुळें आपल्या मनाला अस्वस्थता उत्पन्न होते. या भेदांच्या अतीत व्हा. आत्मानुभव करून घ्या, म्हणजे भेददृष्टीला जागाच राहाणार नाहीं. वेदान्ताच्या दृष्टीनें एकत्वाची स्थिति प्राप्त होणें, यालाच म्हणतात. फक्त ईश्वरच सत्य आहे. नामरूपात्मक जगत् केवळ माया होय! आत्मानुभवाची स्थिति आपल्या ठिकाणीं इतक्या उच्च दर्जापर्यंत जाऊन पोहोंचूं द्या कीं, त्यामुळें हें जग मिथ्या आहे, व ईश्वर किंवा परमात्मा हाच काय तो सत्य आहे, असें तुमच्या प्रत्ययास येईल. एखाद्या मनुष्याकडे, तो मनुष्य आहे या दृष्टीनें तुम्हीं पाहातां तेव्हां तुम्हीं केवढा भयंकर गुन्हा करीत असतां! तसें करण्यानें त्याच्यामधील परमात्मतत्त्वाचा तुम्हीं खून करीत आहां, असें म्हटलें तरी चालेल.

## परमात्मवध करूं नका !

मातृवध, पितृवध, मनुष्यवध वगैरे अनेक गुन्हे लोकांना माहीत आहेत; परंतु प्रत्येक मनुष्यामधील परमात्मतत्त्वाची ओळख न करून घेण्यानें परमात्मवध किंवा देववध होत असतो, ही गोष्ट लोकांच्या लक्षांत येत नाहीं. एखादा मनुष्य आपला शत्रु आहे किंवा मित्र आहे, आपला बाप, भाऊ किंवा मुलगा आहे असें तुम्हीं समजतां, तेव्हां असली भावना तुमच्या ठिकाणीं इतकी दृढ होऊन गेलेली असते कीं, तुम्हीं त्याच्यामधील परमात्म्याला ठार करतां, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं! मनुष्यांच्या बाह्य आकारांना, जगांतील भासमान होणाऱ्या वस्तूंच्या रूपाला फाजील महत्त्व देऊन त्यांतील ईश्वरी तत्त्वाला विसरणें म्हणजे आपल्या नाशाची तयारी करणें होय! अशा रीतीनें ईश्वरी तत्त्वाचा खून करणें हें भयंकर पातक असून त्याची उत्पत्ति आत्मस्वरूपाच्या अज्ञानापासून होते, व हें अज्ञानच जगांतील सर्व दुःखांच्या मुळाशीं आहे. या सत्य सिद्धान्ताचा लोकांनीं प्रत्यक्ष अनुभव करून घेतला, तर तो स्वप्नाप्रमाणें असत्य आहे, अशी त्यांची भावना होईल. परंतु वस्तुस्थिति अशी आहे; तिचा तुम्हीं अनुभव करून घ्या म्हणजे तुम्हीं पूर्ण सुखी व्हाल. आपल्या आध्यात्मिक ऐश्वर्याबद्दलच्या भावना दृढ करा. त्यांतच सदोदित राहात जा, म्हणजे आपण एका अद्भुत सृष्टीमध्यें राहात आहों, व सर्व तऱ्हेच्या सिद्धी आपलें दास्यत्व करीत आहेत, आकाशांतील सूर्य, चंद्र आणि तारे आपल्या सत्तेनें प्रकाशत आहेत, असें तुमच्या प्रत्ययास येईल. परंतु ही दिव्य स्थिति प्राप्त करून घेण्यासाठीं नेटाचे प्रयत्न केले पाहिजेत, हें लक्षांत ठेवा. जो मनुष्य आपल्या ठिकाणीं परमात्मभावना दृढ करून जगांतील सर्व वस्तूंशीं त्या दृष्टीनें तादात्म्य करून घेतो, त्याच्या सारखा सुखी मनुष्य दुसरा कोणताहि नाहीं. एखाद्या गुहेमध्यें शेंकडों वर्षे अंधःकार पसरला असला तरी त्याठिकाणीं दिवा आणल्याबरोबर गुहेंतील सर्व अंधार जसा एकदम नाहींसा होतो, त्याप्रमाणें आत्मज्ञान झालेल्या मनुष्याची स्थिति असते. मनुष्याला ईश्वरी साक्षात्कार झाला, परमात्मज्ञानाचा प्रकाश त्याच्या अंतःकरणांत उदय पावला, म्हणजे त्याच्या ठिकाणच्या सर्व कुवासना आणि पातकी संस्कार तत्क्षणीं नाहींसे होतात.

रामाचा स्वतःचा अनुभव असा आहे कीं, एखादा मनुष्य जेव्हां त्याच्या

पुढें येतो, तेव्हां राम त्याच्याकडे परमात्मदृष्टीनें जर पाहूं लागला तर रामाला दुःख होत नाहीं. परंतु त्या मनुष्याच्या शरीराकडे राम जर शरीर या दृष्टीनें पाहूं लागला, तर त्याला दुःख झाल्याशिवाय राहत नाहीं. जगांतील आपल्या बऱ्यावाईट अनुभवांवरून रामानें सांप्रत इतका बोध घेतला आहे कीं, आतां स्वप्नामध्येंहि त्याला एखादा मनुष्य दिसला, तरी त्याच्याकडे परमात्मदृष्टीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि दृष्टीनें तो पाहत नाहीं, व सर्वत्र ब्रह्मभावानें पाहूं लागल्यामुळें इतरांनांही तोच अनुभव आल्याशिवाय राहाणार नाहीं, अशी रामाची खात्री आहे.

## मजनूनचा वृत्तांत

मजनून या नांवाचा प्रेमानें वेडा झालेला एक मनुष्य होता. तो प्रेमी मनुष्यांचा राजा होय! कारण आपल्या प्रियतमेवर मजनूनप्रमाणें प्रेम आजपर्यंत कोणीहि केलें नाहीं. परंतु त्याचें प्रेम आपल्या प्रियतमेच्या—लैलीच्या शरीरावर जडलें होतें; तिच्या शारीरिक सौंदर्यावर तो आसक्त झाला होता, व यामुळें तिच्या वियोगाचें दुःख त्याला सहन करावें लागलें.

राम म्हणतो कीं, आपल्याला अमुक विषय प्राप्त व्हावे असें तुम्हांला मनापासून वाटत असेल, तर त्या विषयांच्या इच्छांचा तुम्हीं प्रथमतः त्याग केला पाहिजे. हें यशाचें रहस्य मजनून याला माहीत नव्हतें. परंतु तें कसेंहि असलें तरी त्याच्या इतका प्रेमी मनुष्य या जगांत आजपर्यंत कोणीहि झाला नाहीं. मजनूनची हकीकत अशी आहे कीं, त्याचें लहानपणापासून लैलीवर प्रेम जडलें होतें. परंतु लैलीच्या बापाला तें न आवडून त्यानें दुसऱ्याच एका तरुणाशीं तिचें लग्न लावलें. त्यामुळें मजनून हा अगदीं वेडा होऊन गेला. लैलीच्या प्रेमानें तो अंध झालेला होता, व ती आपल्या हातून गमावली असें पाहातांच तो आपल्या घरांतून निघाला, अरण्यांत भटकूं लागला. तेथें त्याच्या दृष्टीला एखादें गुलाबाचें फूल पडलें, तर ती आपली प्रिया लैली आहे असें वाटून तो त्याचें चुंबन घेई. एखादें सुंदर झाड दिसलें, तर ती आपली प्रिया आहे अशा भावनेनें तो त्याला कवटाळूं लागे. एखादी हरिणी दिसली तर तिच्या सुंदर नेत्रकटाक्षांकडे पाहून ती लैलीच आहे असा त्याचा ग्रह होऊन जाई. लैलीवरील त्याचें प्रेम इतक्या उत्कट दर्जापर्यंत जाऊन पोहोंचलें होतें कीं, त्याला सर्वत्र लैलीच दिसत असे! आतां त्याच्या प्रेमामध्यें दोष होता तो हा कीं,

भ्रामक शरीरावर त्याचें प्रेम जडलें होतें; व याबद्दल त्याला अखेरीस दुःख भोगावें लागलें.

राम म्हणतो कीं, मजनूनप्रमाणें प्रेम करण्यास शिका. परंतु तुमच्या प्रेमाचा विषय आत्मा–परमात्माच असला पाहिजे. सर्व जग सुखाकरितां धडपड करीत नाहीं काय? सुखप्राप्तीसाठीं वेडें बनलें नाहीं काय? व ईश्वर म्हणजे तरी काय? ईश्वर म्हणजे सुख–निरतिशय सुख; आनन्द हेंच ईश्वराचें स्वरूप आहे. परंतु हें ईश्वराचें स्वरूप त्या दुर्दैवी मजनूनला माहीत नव्हतें. हें सच्चिदानंदस्वरूप तुम्हीं ओळखा. या स्वरूपाचें ज्याला यथार्थ ज्ञान झालें, व तें मजनूनप्रमाणें झाडें, पशु आणि फुलें वगैरे वस्तूंमध्यें जो मनुष्य पाहूं लागला, त्याच्याइतका भाग्यशाली मनुष्य दुसरा कोणी नाहीं. असो; अशा रीतीनें दुर्दैवी मजनून आपल्या प्रियतमेचा शोध अरण्यांत करीत असतां अखेरीस थकून जाऊन जमीनीवर निश्चेष्ट पडला. मजनून घरांतून गेल्याचें ऐकून त्याच्या बापानें त्याचा शोध चालविला, व त्याचा शोध करण्यासाठीं अरण्यांत फिरत असतां मजनून ज्या ठिकाणीं पडला होता, त्याठिकाणीं त्याचा बाप येऊन पोहोंचला. त्यानें आपल्या मुलाला ओळखलें व त्याच्याजवळ जाऊन मजनूनच्या तोंडावरून हात फिरवून तो त्याला म्हणाला, "बाळा, तूं मला ओळखलें नाहींस?" परंतु मजनूनचें आपल्या बापाकडे लक्ष नव्हतें. तो आकाशाकडे शून्यदृष्टीनें एकसारखा पहात होता. त्याला आतां बापबिप कोणीच दिसत नव्हता. त्याच्या दृष्टीला आतां लैलीशिवाय जगांत कोणीहि दिसत नव्हतें. मजनूनचें आपल्याकडे लक्ष नाहीं असें पाहून तो त्याला म्हणाला, "माझ्या लाडक्या! मी तुझा बाप आहें, तूं मला अजून ओळखलें नाहींस हें कसें?" त्यावर मजनून म्हणाला, "बाप! बाप म्हणजे काय?" याचा अर्थ हा कीं, मजनूनला आपल्या लैलीशिवाय जगांत दुसरें कांहींच दिसत नव्हतें.

लैलीच्या शरीरावर मजनूनचें जितकें उत्कट प्रेम होतें, तितकें प्रेम आपल्या परमात्मस्वरूपावर जडणें, याचाच अर्थ ब्रह्मभाव होणें असा आहे. आपला बाप, आई किंवा स्त्री, तसेंच जगांतील सर्व वस्तु यांच्यामध्यें आपल्या स्वरूपाचा अनुभव घेणें, म्हणजेच सर्वत्र परमात्मभाव होणें–ईश्वराची भेट होणें होय.

मजनून जिवंत असेपर्यंत त्याची प्रियतमा त्याला भेटली नाहीं. पुढें मजनून याला ईश्वराच्या समोर उभें करण्यांत आलें असें वर्णन आहे. मजनूनला

उद्देशून ईश्वर म्हणाला, "मूर्खा, ऐहिक जड वस्तूवर तूं इतकें प्रेम कां केलेंस ? आपल्या प्रियतमेच्या क्षणभंगुर शरीरावर तूं जितकें प्रेम करीत होतास त्याच्या एक लक्षांश प्रेम माझ्यावर केलें असतेंस तर मीं तुला स्वर्गाचा अधिपती केला असता." यावर मजनूननें उत्तर केलें, "हे ईश्वरा ! तूं म्हणतोस तें ठीक आहे. परंतु मी तुझ्यावर प्रेम करावें असें जर तुला वाटत होतें, तर माझ्या लैलीचें रूप धारण करून तूं माझ्यापुढें कां आला नाहींस ? मी तुझी पूजा करावी, अशी जर तुझी इच्छा होती तर तूं माझ्यापुढें लैली होऊन यावयाचें होतेंस ! कारण, लैलीशिवाय मला या त्रिभुवनांत कोणीच पूज्य नाहीं." या मनुष्यानें ईश्वरावरहि ताण करण्याचा प्रयत्न केला ! परंतु राम म्हणतो कीं, मजनून प्रमाणें आत्मस्वरूपावर तुमचें इतकें प्रेम जडलें पाहिजे कीं, त्याशिवाय जगांत तुम्हांला कांहींहि दिसतां कामा नये.

## बाह्य आकारांवर प्रेम करूं नका

आतां यावर कदाचित् तुम्हीं असें म्हणाल कीं, याचा उपयोग काय ? आम्हीं आज ज्या स्थितींत आहों, त्या स्थितींत आम्हांला पूर्ण सुख वाटतें. मग आत्मानुभव करून घेण्यांत अर्थ काय ? परंतु यावर राम म्हणतो, असेल, सध्यांच्या स्थितींत तुम्हांला सुख वाटत असेल, नाहीं असें नाहीं. परंतु आत्मानुभव करून घेणें हेंच तुमचें ध्येय आहे, व त्याकडे तुम्हांला केव्हांना केव्हां तरी गेलेंच पाहिजे. मग उगाच उशीर करण्यांत हंशील काय ? रेंगाळत चालण्यांत अर्थ कोणता ? तुम्हांला जर या स्थितीपर्यंत केव्हां तरी जाऊन पोहोंचलें पाहिजे, तर मग चिखलांतून जाण्यांत फायदा कोणता ? आगगाडी, विद्युद्रथ किंवा आकाशयान यांचा मार्ग पतकरून आपल्या मुक्कामाला लवकर जाऊन पोहोंचणें हेंच श्रेयस्कर आहे. यासाठीं पायीं चालून जाण्याचा हट्ट धरून व्यर्थ वेळ गमावूं नका ! आपली भोंवतालची परिस्थिति पाहा, तिचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करा. म्हणजे आपण आपल्या अंतिम साध्याकडे जाऊन पोहोंचावें, अशी निसर्गाची योजनाच आहे, ही गोष्ट तुमच्या लक्षांत येईल. पुष्कळवेळां स्थिति अशी होते कीं, आपलें मन शांत आणि स्वस्थ असलें, चित्त निर्विकार असलें व अशा स्थितींत कांहीं वेळ गेला म्हणजे एखादी चांगली बातमी, आपल्याला सुखकारक किंवा हितकारक वाटणारी एखादी गोष्ट निःसंशय घडून येते. अशा तऱ्हेच्या मनाच्या शांत स्थितींत तुम्हीं कांहीं वेळ राहा, म्हणजे तुमचा एखादा मित्र तुम्हांला येऊन

भेटेल, तुमच्या प्रेमाचा एखादा विषय तुम्हांला प्राप्त होईल, किंवा एखादी आनंदकारक बातमी तुमच्या कानावर येईल. सामान्य मनुष्यांना असल्या व्यावहारिक गोष्टींचें महत्त्व वाटतें, ऐहिक लाभाचें त्यांना मोठें महत्त्व वाटतें. परंतु तुमचीहि स्थिति तशीच झाली, आपल्याला प्राप्त झालेल्या वस्तूंवर तुमची आसक्ति जडली, असल्या क्षणभंगुर वस्तूंचें तुम्हीं स्तोम माजवूं लागलां, तर ईश्वरी कायदा असा आहे कीं, अचानक रीतीनें तुमच्या प्रेमाचे विषय तुमच्या-पासून हिरावून नेले जातील!

हा ईश्वरी कायदा जरी पुस्तकांतून नमूद करून ठेवलेला नसला तरी तेवढ्या-मुळें त्याचें महत्त्व नाहींसें होत नाहीं. एखाद्या विषयावर तुमचें प्रेम जडलें व तो विषय तुमच्यापासून हिरावून घेतला गेला, म्हणजे दोन तऱ्हेची स्थिति होऊं शकते. कांहीं लोक अशा स्थितींत निराश व उद्विग्न होतात, व आपल्या दोषांचें खापर परिस्थितीवर लादूं पाहतात. पण अशा लोकांची स्थिति जास्त वाईट होत जाते, व त्यांच्यावर एकामागून एक संकटें येऊं लागतात. एखादें संकट कोसळल्यानंतर जे लोक आपल्या मनाची समता नाहींशी होऊं देतात, व परिस्थितीच्या नांवानें खडे फोडतात, आणि ऐहिक विषयांवरील आसक्ति काढून टाकण्याचा प्रयत्न करीत नाहींत, अशा लोकांच्या पाठीमागें दुःख-परंपरा लागल्याशिवाय राहात नाहीं. परंतु जे मनुष्य एखादें दुःख प्राप्त झाल्या-नंतर कांहीं वेळानें आपलें मन स्थिर करूं लागतात, चित्ताची विघडलेली घडी पुन्हां पूर्ववत् बसवूं लागतात, व अशा रीतीनें चित्त स्थिर व शांत करून विषयांबद्दल वैराग्य धारण करतात, त्यांचीं संकटें नाहींशीं होऊन त्यांना चांगले दिवस आल्याशिवाय राहणार नाहींत. परंतु पुढें चांगले दिवस आले म्हणजे मनुष्य मोहांत पडतात, आपल्या बाह्य परिस्थितीवर अवलंबून राहूं लागतात, विषयांवर आसक्त होतात व अशा रीतीनें पुन्हां आपल्यावर संकटपरंपरा ओढवून घेतात. दुःखांतून गटंगळ्या खातां खातां धर्माकडे मनुष्यांची प्रवृत्ति हळुहळु होत जाते, असें म्हणतात; व तें अक्षरशः खरें आहे.

## जगांतील दुःखांचा हेतु

आपण नेहमीं असें पाहातों कीं, दिवसापाठीमागून रात्र आणि रात्रीपाठीमागून दिवस, असा क्रम चाललेला असतो. सुख व दुःख यांचीहि स्थिति अशीच

आहे. दुःखाचा काळ हा दिवस आहे असें म्हटलें, तर सुखाचा काळ ही रात्र आहे, असें म्हणतां येईल. व अशा रीतीनें दुःखाचा दिवस संपल्यानंतर रात्रीच्या सुखाला प्रारंभ होतो, असा आपला नेहमींचा अनुभव आहे. व जोंपर्यंत आपण जगांतील वस्तुमात्रांना, वस्तूंच्या बाह्य आकारांना चिकटून राहात आहों, तोंपर्यंत सुखदुःखांचें हें रहाटगाडगें असेंच फिरत राहणार; त्यांत खळ म्हणून कधीं पडणार नाहीं. आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, आपल्याला संसारांत जीं सुखदुःखें भोगावीं लागतात, उच्च नीच स्थिति प्राप्त होते, त्यांतील हेतु काय ? हेतु हाच कीं, आपल्या चांगल्या वाईट स्थितीपासून आपण बोध घ्यावा; आणि आपल्या हृदयाकाशांतील आत्मसूर्याचा अनुभव करून घेऊन सुखदुःखादि सर्व द्वंद्वांच्या अतीत व्हावें.

आपण पृथ्वीवर राहात असल्यामुळें आपल्याला दिवस आणि रात्र यांचा अनुभव येतो, हें स्वाभाविकच आहे. परंतु सूर्याच्या ठिकाणीं नेहमीं दिवसच असतो. आपली ही पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत असल्यामुळें दिवस आणि रात्र यांची उत्पत्ति होते. परंतु सूर्यामध्यें रात्रीला जागाच नाहीं; त्या ठिकाणीं सदासर्वदा दिवस—ईश्वरी प्रकाशच असतो.

आपल्याला भोगावीं लागणारीं दुःखें, यातना आणि विपत्ति यांचा हेतु आपण आपल्या आत्मस्वरूपाचा अनुभव करून घ्यावा हाच आहे. आपण सर्व सूर्यांचेहि सूर्य आहों, ज्योतींचीहि ज्योत आहों, असा अनुभव करून घेतला, म्हणजे जगांतील सर्व तऱ्हेचीं दुःखें आणि यातना, तसेंच सर्व द्वंद्वें यांचा आपणांला स्पर्शहि होऊं शकणार नाहीं; आपण या सर्वांच्या अतीत होऊं.

## सुखदुःखांसंबंधाची उपपत्ति

आतां सुखदुःखादिकांमुळें आपली उन्नति कशी होते, असा प्रश्न उत्पन्न होतो. याचें उत्तर असें आहे कीं, आपल्याला सुख झालें, म्हणजे परमात्मभावनेशीं तद्रूप झाल्यामुळें किंवा चराचराशीं एकात्मता झाल्यामुळें सुख होतें, ही गोष्ट आपल्याला पटूं लागते. ईश्वरी नियमच असा आहे कीं, आपलें चराचराशीं तादात्म्य झाल्यामुळें सर्व सुखें आपल्या हस्तगत होतात. तसेंच जगतांतील आकारमात्रावर, भ्रामक आणि मायावी वस्तूंवर आपण अवलंबून राहूं लागलों, त्यांच्यावर आपण आसक्त झालों, म्हणजे दुःखाची उत्पत्ति झाल्याशिवाय राहात

नाहीं. ही गोष्ट दुःखाचे आघात होत असतां आपल्या हळूहळू प्रत्ययास येतें. अर्थात् परिणामीं दुःखरूप अशा भौतिक वस्तूंवर आपण अवलंबून राहूं नये, त्यांना सत्य मानून त्यांच्यावर आसक्त होण्यांत आपल्या कालाचा आणि बुद्धीचा अपव्यय करूं नये, हा बोध, दुःखांचे आघात आपल्याला करीत असतात. सुखदुःखांसंबंधाची ही उपपत्ति निश्चित आहे, व जगाच्या इतिहासाकडे या दृष्टीनें पाहिलें असतां हा सिद्धान्त सत्य आहे, ही गोष्ट तुम्हांला पटल्याशिवाय राहाणार नाहीं. प्रख्यात इंग्रजी कविवर्य शेक्सपिअर यानें 'वेनिस नगरचा व्यापारी' या नांवाचें एक नाटक लिहिलें आहे. त्यांत बॅसॅनियो व पोर्शिया यांच्या प्रेमासंबंधाचा जो वृत्तांत आला आहे, त्यावरून असें दिसून येतें कीं, जोंपर्यंत बॅसॅनियो पोर्शियेच्या सौंदर्यावर लुब्ध झाला होता, तोंपर्यंत तिला प्राप्त करून घेण्यांत त्याची निराशाच झाली. परंतु पुढें करंडकांची निवड करण्याची जेव्हां वेळ आली, तेव्हां बॅसॅनियोच्या मनाची स्थिति विलक्षण झाली. त्याची देहबुद्धि नाहींशी होऊन मनाच्या अत्युच्च स्थितीप्रत तो जाऊन पोहोंचला, असें वर्णन करण्यांत आलें आहे. आतां बॅसॅनियो हा परमात्मस्थितीप्रत जाऊन पोहोंचला होता, असें शेक्सपिअर यानें स्पष्टरीतीनें वर्णन केलेलें नाहीं, व कवींना अशा तऱ्हेचें वर्णन करतां येणेंहि शक्य नाहीं. परंतु तें कसेंहि असलें तरी वास्तविक स्थिति अशीच आहे. व शेक्सपियरच्या वर्णनांतहि ही गोष्ट अंधुकरीतीनें आली आहे. सारांश, देहबुद्धि नाहींशी होऊन मनुष्याचें चराचराशीं तादात्म्य झाल्याशिवाय सुखाची प्राप्ति होत नाहीं, असा उपदेश आपल्याला सुख करीत असतें. दुःखाचा उपदेश याच्या उलट आहे. ऐहिक वस्तु सत्य आहेत अशी आपण भावना करून घेऊं नये, हा धडा आपल्याला दुःखापासून मिळतो. जगांतील आकारमात्रावर अवलंबून राहणें म्हणजे ईश्वराला विसरणें, किंवा त्याला जणूं ठार करणें होय! सारांश, सुख आणि दुःख अशा दोहोंपासून आपल्याला सद्बोध घेतां येण्यासारखा आहे. सर्व लोकांना हें तत्त्व पटण्यासारखें नसेल, परंतु तेवढ्यावरून तें खोटें आहे, असें म्हणतां येईल काय? या तत्त्वाचा अनुभव करून घेतलेला नसल्यामुळें जगांतील लोक दुःखांत लोळत आहेत. म्हणून राम म्हणतो कीं, या तत्त्वाचा अनुभव करून घेऊन सुखी व्हा.

या देशाप्रमाणें हिंदुस्तानांत अद्याप यंत्रांचा प्रसार झालेला नाहीं. यामुळें हिंदुस्तानांतील लोक मातीचीं भांडीं हातांनीं बनवितात. मातीचा गारा करून

तो ते पायांनीं तुडवितात, व नंतर त्याच्यापासून भांडीं तयार करतात. एका चाकावर लांकडाचा एक ठोकळा असतो, त्यावर तो गारा ठेवून कुंभार चाक फिरवितो, व तें फिरत असतां एकीकडे तो आपल्या हातानें गाऱ्याला निरनिराळे आकार देतो. कुंभाराच्या चाकावरील लांकूड व त्याच्या हाताचे आघात यांचा मातीचीं भांडीं करण्याच्या कामीं जो उपयोग होतो, तसाच सुख आणि दुःख यांचा मनुष्यांचें शील बनविण्याच्या कामीं उपयोग होत असतो. सुख हें कुंभाराच्या चाकावरील लांकडी ठोंकळ्यासारखें आहे, व दुःख हें कुंभाराच्या हाताच्या थापट्यांप्रमाणें आहे. या दोहोंमुळें मनुष्यांमधील परमात्मभाव जागृत होऊन त्याला स्व-रूप येतें. ईश्वरी नियमच असा आहे कीं, तुम्हीं आपली उन्नति करून घेतलीच पाहिजे; दुःखरूपी संगीनीच्या माऱ्याचे आघात सोशीत असतां तुम्हीं आपलें पाऊल पुढें टाकलेंच पाहिजे! आपली प्रगति करून घेण्याचें तुम्हीं नाकारूं लागलां, तर तुमच्यावर दुःखांचा एकसारखा मारा होऊन तो तुम्हांला पुढें जाण्याला भाग पाडील. यासाठीं आपणांवर अधिकाधिक संकटपरंपरा कोसळूं नये असें जर तुम्हांला वाटत असेल, तर आत्मसाक्षात्कार करून घेण्यास विलंब लावूं नका. कारण, तेंच तुमचें ध्येय आहे.

———

## आत्मानंदमग्न राम

(चालः—राम स्मरावा राम)

शान्तिसुखालय राम खरोखर
शान्तिसुखालय राम।
महानंद दुखवी न कुणाला
मत्क्रम न करि विराम ॥ ध्रु० ॥
स्वीकारुनि मम वेष पावती
सुरनरखग आराम ॥ १ ॥
शब्दातीत असें सुख माझें
तेथ नुरे मुळिं काम ॥ २ ॥

येथें, तेथें, जेथें, तेथें,
तेथ न 'कोठें' नाम ॥ ३ ॥
आतां, संतत, अवकाशें, मग
तेथ न 'केव्हां' नाम ॥ ४ ॥
हें, तें, वा जें काय, कोणतें
न तया प्रश्नविराम ॥ ५ ॥
एक, पंचशत सर्वेहि जेथें
संख्या घे विश्राम ॥ ६ ॥
द्रष्टा, दृश्य, ज्ञानेंद्रियगण
त्यांत नसे मुळिं राम ॥ ७ ॥
होतें, आहे, होइल, होणें
क्रियापदा नच धाम ॥ ८ ॥
स्वत्व, मधुरतम सत्य मीच तें
मी, तूं, तो, न ललाम ॥ ९ ॥

---

तुमचें अवर्णनीय परमात्मस्वरूप तें हेंच. 'तत्त्वमसि' या सिद्धान्ताचा अनुभव करून घ्या. रामाच्या शरीराला लोक येऊन मान देऊं लागले म्हणजे त्याला संताप येतो; कारण, राम हा आनंदरूप आहे, व अशी स्थिति असल्या-मुळें, लोकांची स्तुति किंवा द्रव्य असल्या क्षुद्र गोष्टींची त्याला यत्किंचित्‌हि अपेक्षा नाहीं. राम ब्रह्मानंद भोगीत असल्यामुळें कीर्ति, यश किंवा धन यांच्यापाशीं तोंड वेंगाडण्याचें त्याला कारणच नाहीं. हा आत्मानंद तुम्हीं भोगूं लागा, म्हणजे ऐहिक कीर्ति व त्यापासून होणारें सुख क्षुद्र आहे, असा तुम्हांला प्रत्यय येईल.

## आशीर्वाद कीं शाप?

हिंदुस्तानांतील एका स्त्रीला नऊ मुलगे होते. एके दिवशीं तिच्या घरीं एक साधु आला, व तिनें त्याला मोठ्या आनंदानें भिक्षा घातली. तिचा आदरभाव पाहून साधूला मोठा आनंद झाला. व 'तुला सात पुत्र होतील,' असा साधूनें

तिला आशीर्वाद दिला. साधूचा तो आशीर्वाद ऐकतांच त्या स्त्रीला मोठा संताप आला; कारण तिला नऊ पुत्र होते, व साधूच्या आशीर्वादाप्रमाणें आपले दोन पुत्र मरणार, असा तिचा समज झाला. आपल्याला पुन्हां आशीर्वाद देण्यासंबंधानें तिनें साधूची विनंती केली. परंतु साधूनें पूर्वीचाच आशीर्वाद पुन्हां दिला. बाईचा संताप आतां अतिशय वाढला. इतक्यांत भोंवतालचे लोक त्याठिकाणीं जमले, व काय गडबड आहे, म्हणून चवकशी करूं लागले. साधूनें दिलेला आशीर्वाद वास्तविक आशीर्वाद नसून तो शापच आहे, असें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. रामाची स्तुति करणारे लोक त्याला या न्यायानें शापच देत आहेत असें वाटतें! कारण, तो नित्य अवर्णनीय आनंदाचा लाभ घेत आहे. तो आनंद तुम्हीं भोगूं लागा, म्हणजे जगांतील कोणत्याहि वस्तूंवर अवलंबून राहण्याचें तुम्हांला कारण उरणार नाहीं.

हिमालयावरील बर्फामध्यें उत्पन्न होणाऱ्या कमलाप्रमाणें हें शरीर एकान्तांत विकास पावो व कोणाच्याहि नजरेस न पडतां तें त्याठिकाणीं राहो; हें शरीर फांसावर चढविलें जावो किंवा तुरुंगांत पडो; समुद्राच्या लाटांमध्यें तें गडप होऊन जावो, किंवा उष्णकटिबंधांतील प्रखर किरणांमध्यें तें पोळलें जावो, किंवा त्याचें पाहिजे तें होवो; त्याची रामाला पर्वा नाहीं. त्याच्या आत्मानंदांत केव्हांहि व्यत्यय नाहीं. हा आनंद आपलासा करून घ्या, म्हणजे जगांतील सर्व तऱ्हेचे मोह आणि क्षुद्र अभिमान यांचा वाराहि तुम्हांला लागणार नाहीं.

सर्व प्रभूंचे प्रभु, देवांचेहि देव व्हा. याचा अर्थ आपण देवाधिदेव आहों, सच्चिदानंदस्वरूपी आहों. फक्त याचा अनुभव करून घ्या.

ॐ! ॐ!! ॐ!!!

---

# सुखसंवाद *

## आपण सर्व मुक्त होऊं !



प्रश्न:—महाराज, आपण नेहमीं म्हणत असतां कीं, आपण सर्व मुक्त होऊं; पण याचा अर्थ तरी काय ?

उत्तर:—खरें पाहूं गेलें तर 'आपण मुक्त होऊं,' हें म्हणणें तत्त्वदृष्ट्या चुकीचें आहे. वास्तविक आपल्याला भविष्यत्कालीं मुक्त व्हावयाचें आहे असें नसून आपण याक्षणींच मुक्त आहों. आपण पहिल्यापासूनच मुक्त आहों, बंधांत किंवा गुलामगिरींत आपण कधींच नव्हतों. त्याअर्थी 'आपण मुक्त होऊं' असें विधान केवळ तत्त्वदृष्टीनें पाहातां चुकीचें आहे. परंतु व्यावहारिकदृष्ट्या या विधानाचा अर्थ आत्मज्ञान होणें असा आहे. तुम्हांला माहीत असेल कीं, जगांतील सर्व लोक ज्या बद्धावस्थेंत आहेत आणि ज्यांतून ते मुक्त व्हावयाचे आहेत असें आपण समजतों, ती बद्धता मूळांतच खरी नव्हे. आपल्या चुकीच्या कल्पना, अज्ञान व विपरीत ज्ञान यांचा तो परिणाम आहे. खरोखर आपण बद्ध नाहीं, आणि सत्य ज्ञान व आत्मसाक्षात्कार यांचा उदय आपल्या ठिकाणीं झाला म्हणजे त्याक्षणीं अनादिकालापासून अनंत कालपर्यंत आपण मुक्तच आहों, आपली मुक्तता आपण कधीं गमाविली नव्हती, असें तुमच्या प्रत्ययास येईल; अशी वस्तुस्थिति असल्यामुळें आपली मुक्तता भविष्यत्कालीं व्यक्तता पावणार आहे, असें नसून आपण नेहमीं मुक्तच आहों, मुक्तता हा आपला जन्मसिद्ध हक्कच आहे, हें कधींहि विसरतां कामा नये.

## केवळ विस्मृति !

एका मनुष्याजवळ अत्यंत मौल्यवान् मोत्यांचा एक कंठा होता. एके दिवशीं अशी स्थिति झाली कीं, तो कंठा एकाएकीं हरवला. त्याबरोबर त्या गृहस्थाच्या मनाला मोठी काळजी लागून राहिली. त्यानें आपल्याकडून कंठ्याचा खूप शोध

---

* करी सूखसंवाद जो ऊगमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥
(श्रीसमर्थकृत, मनाचे श्लोक,)

करून पाहिला, पण व्यर्थ! तो एकसारखा तळमळ करूं लागला. इतक्यांत त्या मनुष्याच्या जवळच्या एका इसमानें त्याला सांगितलें "महाराज, ज्या कंठ्याचा शोध आपण करीत आहां, तो कंठा तर आपल्या कंठांतच आहे. मग आपण रिकामी वणवण आणि शोक कां करतां, हें मला समजत नाहीं. आपणांस वेडबीड तर लागलें नाहीं ना?" त्या इसमाचे हे शब्द ऐकतांच सदर गृहस्थाला एकदम स्मृति झाली. त्यानें आपल्या गळ्याला हात लावून पाहिला तो खरेंच, कंठा आपल्या गळ्यांतच आहे! तें पाहून त्या गृहस्थाला मोठा हर्ष आणि विस्मय वाटला. आतां खरें पाहूं गेलें तर तो कंठा त्या मनुष्याला सांपडला, असें म्हणतां येत नाहीं. कारण, तो कधीं हरवलाच नव्हता; फक्त त्याला कंठ्याची विस्मृति झाली होती. याच न्यायानें ज्याला आपण मी या नांवानें उल्लेखित करतों, तो आपला वास्तविक आत्मा भूत, भविष्य व वर्तमान अशा तिन्ही काळीं, आहे तसा कायम आहे; त्यांत बिलकुल फेरबदल झालेला नाहीं, आणि तो पुढें कधीं होणारहि नाहीं. पण मन, बुद्धि यांवरील अज्ञानाचें आवरण नाहींसें होईल तेव्हां हें ज्ञान होणार. सदरहू गोष्टींतील मनुष्याला कंठा सांपडला हें जितक्या दृष्टीनें खरें आहे, तितक्याच दृष्टीनें आत्म्याचें होणारें मुक्तत्व सत्य आहे! आपल्या प्रेमाचा विषय होऊन बसलेला कंठा कधींच हरवला नसून त्याची फक्त स्मृति होऊन तो आपणांस प्राप्त व्हावयाचा आहे!

**प्रश्नः**—आपल्या आत्म्याचें व्यक्तिविशिष्टत्व जन्मोजन्मीं कायम राहतें कीं काय?

**उत्तरः**—हें पहा, त्यासंबंधानें म्हणाल तर या प्रश्नाचें उत्तर आपण आत्मा या शब्दाचा जो अर्थ घेऊं त्यावर अवलंबून राहील. आत्मा या शब्दाचा तत्त्वतः अर्थ घेतला तर आत्म्याला—परमात्म्याला जन्ममृत्यु असणें शक्य नाहीं. अर्थात्, ज्याला जन्ममृत्यु नाहींत, त्याची परंपरा राहणें असंभवनीय आहे. परंतु आत्मा या शब्दाचे जे अनेक अर्थ आहेत, त्यांपैकीं सूक्ष्मशरीर अर्थात् जीव असा जर अर्थ घेतला, तर त्याला मात्र जन्ममृत्युपरंपरा आहे.

## याज्ञवल्क्याचा मैत्रेयीस उपदेश

याज्ञवल्क्याला मैत्रेयी व कात्यायनी या नांवांच्या दोन स्त्रिया होत्या. याज्ञवल्क्य हा मोठा श्रीमान् असून भरतखंडांतील अत्यंत ऐश्वर्यवान्

राजांपैकीं एकाचा (जनक राजाचा) तो राजगुरु होता. आपली सर्व मालमत्ता आपल्या दोघी स्त्रियांमध्यें वांटून आपण वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याचा त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें संपत्तीची विभागणी करून मैत्रेयीला आपला भाग घेण्याला त्यानें सांगितलें; पण मैत्रेयीनें आपला हिस्सा घेण्याचें नाकारलें. ती म्हणाली:—"महाराज ! मोक्ष मिळण्याला या ऐहिक ऐश्वर्याचा कांहीं उपयोग असता, तर एवढ्या मोठ्या संपत्तीचा त्याग करण्याला आपण खास तयार झालां नसतां. मग आपणांला निरुपयोगी वाटणारें असलें हें वैभव घेऊन मला तरी काय करावयाचें आहे ? "

मैत्रेयीनें पाहिलें कीं, आपला प्रियपति एवढ्या संपत्तीवर एकदम लाथ मारून अरण्याचा मार्ग धरण्याला तयार झाला कसा ? मनुष्य जेव्हां एका तऱ्हेचा आयुष्यक्रम सोडून दुसऱ्या तऱ्हेचा पत्करतो, तेव्हां ज्या मार्गाचा तो त्याग करीत असतो, त्यापेक्षां जो नवा मार्ग तो स्वीकारूं इच्छित असतो, त्यांत अधिक आनंद, अधिक सुख त्याच्या दृष्टीनें खास असलें पाहिजे. असा आपल्याशीं पोक्त विचार करून तिनें आपल्या पतीला विचारलें:—"ऐहिक ऐश्वर्यांत पारमार्थिक ऐश्वर्यापेक्षां ज्यास्त सुख आहे, किंवा याच्या उलट स्थिति आहे ?"

याज्ञवल्क्यानें उत्तर दिलें:—"श्रीमंतींत काय सुख असेल तें असो; पण एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं, खरें सुख, खरा आनंद, खरें स्वातंत्र्य त्यांत बिलकुल नाहीं. "

यावर मैत्रेयी म्हणाली, "तर मग आपणांपाशीं असें कोणतें धन आहे कीं, ज्याच्या योगानें ऐहिक तृष्णा आणि लोभ यांचे पाश तोडून आपण पूर्णपणें मुक्त झालां आहां ? तें अमृत काय आहे, हें मला कळूं द्या. तें प्राशन करावें, अशी माझी इच्छा आहे."

याज्ञवल्क्यानें आपलें सर्व ऐहिक धन आणि मालमत्ता कात्यायनीला देऊन टाकली आणि मैत्रेयीच्या वांट्याला सर्व पारमार्थिक संपत्ति आली. ही पारमार्थिक संपत्ति कोणती ?

### प्रेम आत्मनिमित्तक असतें

"न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवत्यात्मनस्तु

कामाय पतिः प्रियो भवति । न वा अरे जायायै कामाय जाया प्रिया भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति । "

( बृहदारण्यकोपनिषद्. )

वरील अवतरणाचे अनेक अर्थ आहेत. पं. मॅक्स मुल्लर यांनीं त्याचें भाषांतर एका तऱ्हेनें केलें आहे, व हिंदु लोक याचा अर्थ निराळ्या तऱ्हेनें करतात; आणि हे दोन्हीहि अर्थ आपापल्यापरी बरोबर आहेत.

कोणी याचा अर्थ येणेंप्रमाणें करतातः—"पत्नि पतीवर प्रेम करत्ये याचें कारण, त्याच्या अंगांत कांहीं विशिष्ट गुण असतात, किंवा त्याच्या ठिकाणीं अमुक तऱ्हेचा मोहकपणा असतो म्हणून नव्हे; तर पति हा पत्नीला आदर्शवत् भासतो, हें होय. ज्याप्रमाणें आरशामध्यें आपलें स्वतःचें प्रतिबिंब आपण पाहातों, त्याप्रमाणें पतीमध्यें पत्नि आपलें प्रतिबिंब पहात्ये. पत्नीचें पतीवर आणि पतीचें पत्नीवर, अशा रीतीनें परस्परांमध्यें जें प्रेम वास करीत असतें त्याचें रहस्य हेंच होय."

याचा दुसरा अर्थ असा आहे:—"पत्नि पतीवर जें प्रेम करत्ये तें पतिनिमित्त नसतें; पण तें तसें असलें पाहिजे; व तिनें पतीमध्यें आपला आत्मा पाहिला पाहिजे; परमात्मा या नात्यानें त्याच्यावर प्रेम करण्यास शिकलें पाहिजे."

तुम्हांला माहीतच आहे कीं, प्रेम हें परस्पर असावें लागतें; तसें नसेल तर एकानें दुसऱ्यावर प्रेम करणें शक्य नाहीं. यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं, आत्मप्रतिबिंब या दृष्टीनें, आपण दुसऱ्यावर म्हणजे आपल्या स्वतःवरच प्रेम करतों. दुसऱ्या करितां दुसऱ्यावर प्रेम, हें म्हणणें खोटें असून आपणांमधील परमात्मा—ईश्वर पाहाण्याचा आपला नेहमीं प्रयत्न चाललेला असतो.

जगांतील वस्तु आपणांला प्रिय कां होतात, या संबंधाची ही मोठी मजेदार कल्पना आहे. हिचा विचार करा, सूक्ष्मदृष्टीनें ती तपासून पहा, म्हणजे आपली सर्व आवड आत्मविषयक आहे, हें तुमच्या ध्यानांत येईल. परंतु या भावनांचा दुरुपयोग करूं नका. आपल्याला उन्नतीला नेणाऱ्या जिन्याचा दुःख आणि अज्ञान यांमध्यें अधःपतन करून घेण्याच्या कामीं उपयोग करूं नका. वरील कल्पना अनुभवाच्या कसोटीवर घांसून पाहा, म्हणजे आपल्या खऱ्या प्रेमाचा, खऱ्या सुखाचा, खऱ्या आनंदाचा झरा वास्तविक कोठें आहे, याचें ज्ञान

तुम्हांला होईल. आत्मा, परमात्मा, ईश्वर हाच आपल्या सर्व सुखाचा उगम होय. त्याचें ज्ञान संपादन करा आणि त्या योगानें मुक्त व्हा. आत्मानुभव करून घ्या, आणि सर्व ऐहिक वासनांना झुगारून द्या. क्षुद्र आणि नीच कामनांच्या जाळ्यांत गुरफटून न जातां ज्ञानाच्या उच्च वातावरणांत विहार करतां करतां शेवटीं परमात्म्याशीं पूर्ण तादात्म्य पावा.

" न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया-
भवन्त्यात्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवन्ति । "

'पुत्राकरितां पुत्र खास प्रिय नसतात; तर आत्म्याकरितां पुत्र प्रिय असतात.' पुत्रावरील आपलें प्रेमहि खरोखर आत्मविषयक असतें. आपलेच मुलगे पण ते जर आपल्यावर उलटून पडूं लागले, आपल्याला भंडावून सोडूं लागले तर आपण त्यांना घरांतून हांकून देतों, अर्थात् यावरून पुत्रावरील प्रीति वास्तविक कोणावर आहे, याचा विचार करा.

उदाहरणार्थ असें समजा कीं, आपल्या मुलाकरितां कांहीं कपडे पाहिजे आहेत. आतां हे कपडे आपण हौसेनें घेतों, हें खरें; पण ही कपड्यांची हौस कपड्यांनिमित्त नसून पुत्रानिमित्त असते. कपड्यांपेक्षां आपल्या पुत्रावर आपलें प्रेम अधिक असतें. याच न्यायानें आपलें पुत्रावरचें प्रेम हें खरोखर आत्मनिमित्तक प्रेम असतें. कारण, पुत्रापेक्षां आत्मा हा अधिक सुखाचा, आनंदाचा हेतु आहे.

" न वा अरे वित्तस्य कामाय वित्तं प्रियं भवत्यात्मनस्तु
कामाय वित्तं प्रियं भवति । "

'वित्ताकरितां वित्त खात्रीनें प्रिय नसून आत्म्याकरितां वित्त प्रिय आहे.'

आपण ईश्वराची प्रार्थना करतांना म्हणत असतों कीं, 'हे परमेश्वरा, तूं सर्वव्यापी आणि सुंदर आहेस; तूं अत्यंत दयाळु, सर्वांवर प्रेम करणारा, सर्व चराचराचा नियंता असून सर्व कर्तृत्व तुझें आहे.' अशा रीतीनें आपण नेहेमीं परमेश्वराला आळवतों. पण यांतील रहस्य काय ? रहस्य हेंच कीं, ईश्वर आपल्या गरजा भागवितो, आपणांमधील खऱ्या आत्म्याच्या उपयोगीं पडतो. आपलें ईश्वरावरील प्रेमहि वस्तुतः आत्मविषयकच आहे, हें लक्षांत ठेवा. परमात्मा हा सर्व सुखाचें उगमस्थान आहे, हें जाणून आत्मानुभव करून घ्या.

## कळसूत्री बाहुलीं

हिंदुस्तानांत कळसूत्री बाहुल्यांचा एक खेळ करीत असतात. त्यांत पडद्याआड एक मनुष्य बसतो, आणि तो कळसूत्री बाहुल्यांचीं सूत्रें आपल्या हातीं धरून त्यांच्या योगानें बाहुल्यांना नाचवितो. सदरहू खेळ पाहाण्यास आलेल्या प्रेक्षकांना बाहुलीं नाचतांना दिसतात, पण ज्या सूक्ष्म तारांनीं तीं बांधलेलीं असतात, त्या आणि त्यांचा चालक–पडद्याआड असलेला सूत्रधार हे प्रेक्षकांच्या नजरेला दिसत नाहींत. याच न्यायानें चराचरांतील सर्व स्थूल शरीरें हीं कळसूत्रीं बाहुलीं होत! सामान्य जनांना हें समजत नाहीं, आणि म्हणून या जड, स्थूल शरीरालाच ते आत्मा असें मानतात; यामुळें कर्मकर्तृत्वासंबंधानें याला खरें स्वातंत्र्य आहे, असें त्यांना वाटतें. याचा परिणाम स्वाभाविकपणें असा होतो कीं, त्यांचे स्नेही किंवा आप्तेष्ट यांनीं त्यांच्याशीं चांगलें वर्तन ठेवलें तर ते खुष होतात; पण तेंच त्यांच्याशीं कोणी विरोध करूं लागला, तर त्यांच्यावर प्रेम करण्याऐवजीं ते त्यांचा द्वेष करूं लागतात. कांहीं लोक या तऱ्हेचे असतात. दुसऱ्या तऱ्हेचे कांहीं लोक असतात, ते यांच्याहून वरच्या दर्जाचे होत. हे लोक जास्त बुद्धिमान्, तात्त्विक असून आध्यात्मज्ञानाकडे त्यांचा जास्त ओढा असतो. सूत्रधाराच्या हातांतील सूत्रें, सूक्ष्म तारा, ज्यांच्या योगानें कळसूत्री बाहुलीं नाचलीं जातात, त्यांचेंच या लोकांना मोठें कौतुक वाटतें. आपलीं शरीरें चाळविणारे कोणी देव असून ते दुसऱ्या कोणत्या लोकांत राहून आपल्या शरीरांना चाळवितात, असा यांचा समज असतो. परंतु आत्म्याचें खरें स्वरूप यांना समजत नसून सूक्ष्म शरीरालाच हे लोक आत्मा असें मानतात.

या दोन्ही वर्गांतील लोकांचें म्हणणें त्यांच्या त्यांच्या दृष्टीनें बरोबर आहे. ते कार्य आणि कारण पाहातात. सूक्ष्म सूत्र आणि त्याचा स्थूल शरीरावर होणारा परिणाम त्यांच्या दृष्टीला दिसतो. परंतु आपल्याला हें माहीत आहे कीं, बाहुल्यांना चाळविणारी शक्ति–पडद्याआड असणारा सूत्रधार म्हणजे देशकाल-निमित्तानें अपरिच्छिन्न असणारा जो सर्वांतर्यामी परमात्मा तो होय. आपणांमधील खरें अविनाशित्व, आत्यंतिक सुखाचें आगर तेंच होय. जें जें सर्व आहे तें तें तोच आहे; व तोच आत्मा होय.

या जगांतील आपले सर्व तऱ्हेचे व्यवहार—प्रपंचांतील सर्व प्रकारचे गुंतागुंतीचे संबंध हे मानवजातीला जणुं कांहीं उन्नतीचें शिक्षण देण्यासाठीं उत्पन्न केलेले आहेत; यांत लोकांना कांहीं विशिष्ट बोध देण्याचा कर्त्याचा हेतु आहे. या जगाच्या धांगडधिंग्याच्या पलीकडे आपण जावें, जगांतील सर्व कळसूत्री बाहुल्यांना आपल्या इच्छामात्रेंकरून नाचविणारा व पडद्याआडून हा सर्व खेळ करणारा जो परमात्मा, त्याचा साक्षात्कार करून घ्यावा, अशा जिज्ञासेची स्थिति ही पुढील उच्च पायरी—भूमिका होय. सारांश, जीवमात्राच्या शरीरावर व मनावर सत्ता चालविणारा जो ईश्वर—प्रेमस्वरूपी प्रभु, त्याची आपल्याला संवेदना व्हावी, त्याच्याशीं तद्रूप व्हावें, ही तळमळ आपल्या ठिकाणीं उत्पन्न झाली पाहिजे.

## आकारमात्रांत निराकार तत्त्व पहा

आपल्या एखाद्या मित्राला आपण पाहिला असतां त्याच्या बाह्य आकाराकडे न पाहातां त्याच्यांतील परमात्म्याला ओळखण्याला—प्रत्यक्ष पाहण्याला आपण शिकलें पाहिजे. आपल्या एखाद्या मित्राची विलक्षण शक्ति पाहिली म्हणजे त्या ठिकाणीं परमात्म्याला पाहण्याचा आपण अभ्यास केला पाहिजे. सर्वत्र परमात्मसंवेदनाचा इतका दृढ अभ्यास आपण केला म्हणजे मोह पडण्याचा, मनःक्षोभ होण्याचा, दुःखें भोगण्याचा आपणांवर कधींहि प्रसंग येणार नाहीं. सामान्य मनुष्यें कळसूत्री बाहुल्यांचा खेळ पाहण्यास गेलीं असतां, तीं फक्त जड बाहुलींच पाहतात; त्याचप्रमाणें आत्मज्ञानी मनुष्य जगांतील आकारमात्रांमधील वस्तूला-ब्रह्मालाच पाहातात. त्यांच्या या ज्ञानदृष्टीचें अवलंबन करून सर्व मनुष्यांच्या कृतींच्या मागें असणाऱ्या ईश्वराला पाहण्यास शिका, परमात्म्याचा साक्षात्कार करून घ्या आजि आपण तोच आहों, हें प्रत्यक्ष अनुभवून पाहा. सर्व वस्तूंचे आकार व रंग जितक्या कळकळीनें आपण पाहातों, तितक्याच कळकळीनें आणि तीव्रतेनें हें तत्त्व अनुभूत करून घ्या.

ब्रह्म तं परादाद्योऽन्यत्रात्मनो ब्रह्म वेद ।
क्षत्रं तं परादाद्योऽन्यत्रात्मनः क्षत्रं वेद ।
लोकास्तं परादुर्योऽन्यत्रात्मनो लोकान्वेद ।
देवास्तं परादुर्योऽन्यत्रात्मनो देवान्वेद ।

भूतानि तं परादुर्योऽन्यत्रात्मनो भूतानि वेद ।
सर्वं तं परादाद्योऽन्यत्रात्मनः सर्वं वेद ।
इदं ब्रह्मेदं क्षत्रमिमे लोका इमे देवाः ।
इमानि भूतानीदं ँ सर्वं यदयमात्मा ॥
( बृहदारण्यकोपनिषद्. अ. २, चतुर्थ ब्राह्मण ६. )

" जो आत्म्याव्यतिरिक्त अन्य ठिकाणीं ब्राह्मण आहेत असें समजतो, त्याला ब्राह्मण सोडून जातात. जो आत्म्याहून निराळ्या ठिकाणीं क्षत्रिय असतील असें मानतो, त्याला क्षत्रिय सोडून देतात. जो आत्म्यापलीकडे ( स्वर्गादि लोक असतील असें जाणतो, त्याला ते सर्व लोक सोडून जातात. जो आत्म्याहून भिन्नत्वानें देव असतील अशी कल्पना करतो, त्याचा सर्व देव त्याग करतात. जो ब्रह्माला सोडून भूतांचें अस्तित्व मानतो, त्याला सर्व भूतें पराङ्मुख होतात. ब्रह्माशिवाय कोणतीहि वस्तु असेल, अशी ज्याची भावना असते, अशाला प्रत्येक वस्तु सोडून जाते. हा ब्राह्मणवर्ण, हा क्षत्रियवर्ण, हे लोक, हे देव, हीं भूतें, हें सर्व, सर्व कांहीं आत्मा—ब्रह्म आहे. "

सदरहू उताऱ्यांत परमात्म्याचें अतिशय स्पष्ट आणि विशद भाषेनें वर्णन केलेलें आहे. त्यांतील कल्पना तुमच्या हृदयांत पूर्णपणें प्रतिबिंबित झाल्या म्हणजे आपण मुक्तच आहों, असा तुम्हांला प्रत्यय येईल ; आणि तुम्हीं आपला मुक्तपणाचा जन्मसिद्ध हक्क परत मिळवून घ्याल. " हा ब्राह्मणवर्ण, वेद, हें सर्व ब्रह्म होय. "

तुम्हीं कोणत्याहि जड वस्तूवर विश्वासून किंवा अवलंबून राहाल, तर ईश्वरी नियम व वेद असें सांगतात कीं, तुमची निराशा झालीच पाहिजे ! जड विषयांपासून सुख प्राप्त करून घेण्याच्या सर्व इच्छांच्या पलीकडे तुम्ही असलें पाहिजे. ईश्वरी कायदा असा आहे. समजा, एखाद्या बड्या मनुष्याकडे—मोठ्या राजाकडे—जाऊन ( त्याच्यापासून कांहीं प्राप्ति व्हावी, या हेतूनें ) त्याच्या बाह्य आकारावर—व्यक्तिविशेषावर आपण अवलंबून राहिलों, तर वेद म्हणतो कीं, एखाद्या मोडक्या तोडक्या काटकीच्या आधारानें उभें राहण्यासारखें तें तुमचें कृत्य आहे ; व त्यांत तुम्हांला

अपयश आल्यावांचून निःसंशय राहाणार नाहीं. तें तुमचें कृत्य म्हणजे पातकच होय. कारण, त्या मनुष्यामधील सत्तत्त्व-परमात्मत्व-यांच्यापेक्षां तुम्हांला त्याच्या शरीराचें महत्त्व ज्यास्त वाटतें; सद्वस्तुपेक्षां असद्वस्तूचें तुम्हीं प्रस्थ माजवतां; आणि अशा रीतीनें परमात्म्यावर एका प्रकारें मिथ्यात्वाचा आरोप करतां, असें होतें. मूर्तिपूजेचें निंद्य स्वरूप तें हेंच होय. कारण, (आकारमात्रामधील निराकार अशा ) परमात्म्याची-ईश्वराची उपासना करण्याऐवजीं एखाद्याच्या बाह्य आकारावर-शरीरावर ( स्वसुखार्थ ) अवलंबून राहणें ही खरीखुरी मूर्तिपूजा-बाह्य आकाराची पूजा होय. व अशा ( मानवी आकाराचें स्तोम माजविणाऱ्या ) कृत्याचा परिणाम दुःख आणि यातना यांत व्हावा, यांत नवल काय ? ईश्वरी नेमानेम अशा तऱ्हेचा आहे. आपण आपले सर्व ऐहिक व्यापार व व्यवहार करीत असतां त्यांत आत्मत्व-परमात्मस्वरूप पाहण्यास शिका;प्रपंचांतील सर्व व्यवहार गौण आहेत, तें केवळ एक स्वप्न आहे, अशा दृष्टीनें सर्व गोष्टी चालू द्या;आपलें बाह्यतः दृग्गोचर होणारें जें व्यक्त स्वरूप त्याच्यापेक्षां आंतल्या सत्तत्त्वाचें महत्त्व कितितरी ज्यास्त आहे, अशी श्रद्धा-भावना राखा. आपल्या एखाद्या मित्राच्या तसबिरीचें आपल्याला जें एवढें महत्त्व वाटतें, तें त्या तसबिरीसाठीं नव्हे, तर मित्रासाठीं होय ; तसबिरीवरील प्रेमाचें कारण मित्रावरील प्रेम हेंच होय. जगांतील कोणतीहि वस्तु पाहतांना त्या वस्तूमधील सत्तत्त्वाकडे नेहेमीं ज्यास्त लक्ष देत जा. असें केल्यानें आपले सर्व व्यवहार आणि ऐहिक व्यापार सुरळीतपणानें, शांतपणानें व अस्खलित चालतील. नाहीं तर घांसाघाशी, विरोध व मनःसंताप उत्पन्न होण्यास चुकणार नाहीं, असा सिद्धान्त आहे. *

एका खेड्यांत एक मोठी दुराग्रही स्त्री होती. तिच्यापाशीं एक कोंबडा होता. त्या खेड्यांतील लोक तिची नेहेमीं चेष्टा करीत; कोणीकडून तरी तिला त्रास द्यावा, असा त्यांचा क्रम असे. लोकांच्या छळानें त्रस्त होऊन संतापानें ती बाई लोकांना म्हणाली, "तुम्हीं मला नेहेमीं त्रास देऊन अगदीं भंडावून सोडलें आहे; पण याद राखून ठेवा, याबद्दल सूड उगवल्याशिवाय मी कदापि राहाणार नाहीं." पहिल्या पहिल्या प्रथम लोकांनीं तिच्या या बडबडीला भीक घातली नाहीं.

---

* सेवकू मानवीयांचे कष्टती बहुतांपरी ।
सेविला देव देवांचा तेणें मी धन्य जाहलों ॥ श्रीसमर्थ.

तेव्हां ती बाई म्हणाली, "लोक हो, पक्कें लक्षांत ठेवा. मी तुमचें उट्टें काढल्या-शिवाय आतां राहात नाहीं!" "आम्हांला तूं एवढी धमकी देत आहेस तर तूं आमचें वांकडें काय करशील तें सांग पाहूं?" असा लोकांनीं प्रश्न केला, तेव्हां ती बाई मोठ्या ऐटीनें बोलली, "तुम्हांला शासन करण्यासाठीं तुमच्या खेड्यावर मी सूर्याला उगवूं देणार नाहीं!" लोकांनीं विचारलें, "हें तूं करणार कसें?" ती म्हणाली, "माझा कोंबडा आरवला म्हणजे सूर्योदय होतो. पण तुम्हीं माझा पिच्छा पुरवण्याचें व्रत पत्करल्यामुळें मी आपला कोंबडा घेऊन येथून दुसऱ्या गांवाला निघून जात्यें; व मग पाहत्यें तुमच्या गांवावर सूर्य कसा उगवतो तो!"

कोंबडा ओरडल्यानंतर सूर्य उगवत असे, ही गोष्ट खरी. पण कोंबडा ओरडण्याचा व सूर्योदय होण्याचा कांहीं नित्य कार्यकारणसंबंध आहे, अशांतला अर्थ नाहीं. कोंबडा ओरडला नाहीं म्हणजे सूर्योदय होण्याचें थोडेंच राहाणार आहे! असो. बाईनें धमकी दिल्याप्रमाणें खरोखरच ती तें खेडें सोडून दुसऱ्या खेड्यांत गेली; व त्याठिकाणीं कोंबडा ओरडला व सूर्योदय झाला. परंतु या गांवीं सूर्य जसा उगवला, तसाच ती बाई जो गांव सोडून आली होती, त्या गांवींहि उगवला. याच न्यायानें आपल्या मनांतील इच्छा—वासना सदरहू गोष्टींतील कोंबड्याच्या आरवण्यासारख्या, आणि इच्छित वस्तु प्राप्त होणें हें सूर्योदयासारखें आहे. आपल्या इच्छांच्या विषयांवर परमात्मसूर्याची सत्ता असून त्याच्या सत्तेनें त्या नियंत्रित झालेल्या आहेत. दिवस आणि रात्र, सकाळ आणि संध्याकाळ घडवून आणण्याचें सामर्थ्य त्या अनंत, सर्वशक्तिमान् व सर्वव्यापक अशा आत्म-सूर्याचेंच आहे. आपले यच्चयावत् ऐहिक व्यापार त्याच्या सत्तेंत नियमित केले जातात. आपल्या सर्व इंद्रियांची चालना व नियंत्रणा त्याच्या शक्तीनें होते. आपल्यामधील अहंवृत्ति, सर्व सूर्यांचा सूर्य, प्रकाशांचा प्रकाश असा जो परमात्मा, त्याच्या ताब्यांत आहे, हें ध्यानांत ठेवा.

बहुतेक लोकांची अशी समजूत आहे कीं, आपले सर्व व्यापार आपल्या इच्छा-शक्तीमुळें होतात. परंतु हा समज खास चुकीचा आहे. या गैरसमजुतीच्या घोंटाळ्यां-तून सुटण्याची खटपट करा. थोडेंसें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां, वस्तुस्थिति काय आहे हें तुमच्या लक्षांत येईल. आतां सांगितलेल्या गोष्टींतील कोंबड्याला आरवतां आलें तें सूर्याच्यच प्रेरणेमुळें होय. कोंबड्याचे डोळे प्रकाशित करणें व त्याला

ओरडण्याला प्रवृत्त करणें, ही शक्ति सूर्याची. तसेंच पहांट होते तीहि त्याच्याच सत्तेनें व कोमल प्रकाशानें. या न्यायानें एका बाजूला जगांतील चैतन्ययुक्त वस्तु आणि दुसऱ्या बाजूला आपली मनःस्थिति, अशा सर्वांवर सत्ता चालविणारा, सर्वांचा नियंता म्हणजे सर्व सूर्यांचा सूर्य, ज्योतींमधील ज्योति*असा आत्मा—परमात्मा होय. त्याचें ज्ञान संपादन करून घेऊन मुक्त व्हा. भलतेच आरोप आणि भलतींच विधानें करूं नका. विषयांना स्वतंत्र रीतीनें अस्तित्व आहे, ही कल्पना डोक्यांतून काढून टाका. वस्तु स्वतंत्ररीतीनें दुःख आणि क्लेश देण्याला समर्थ आहेत, हा समज खोटा आहे हें जाणून, याचा अनुभव घ्या, आणि जगतांतील वस्तुमात्र हा केवळ एक विनोद आहे, फक्त एक अद्भुत नाटक आहे, अशा दृष्टीनें पाहूं लागा. या नाटकांत एखादा मनुष्य क्लिओपॅट्रा किंवा मॅकबेथ यांची भूमिका घेतो, पण एवढ्यामुळें तो मनुष्य आत्महत्या करणारा किंवा खुनी होतो, असें मुळींच नाहीं. कारण, तो मुळीं राणी किंवा राजा नाहीं, तर फक्त तें सोंग दाखविणारा, एका विशिष्ट नांवाचा एक मनुष्य आहे. अशाच दृष्टीनें तुम्हीं आपल्या क्रिया करा. पण त्या करतांना आपल्या परमात्मभावनेचें अनुसंधान तुटूं देऊं नका. ' अहं ब्रह्मास्मि ' या आपल्या शाश्वत व अचल सुखस्वरूपाचा—आनंदस्वरूपाचा अनुभव घ्या, आणि त्याचें विस्मरण होऊं देऊं नका. व शेवटीं त्याच्याशीं तन्मय होऊन मुक्त व्हा.

" स यथा दुन्दुभेर्हन्यमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय दुन्दुभेस्तु ग्रहणेन दुन्दुभ्याघातस्य वा शब्दो गृहीतः ॥ ७ ॥"

( बृहदारण्यकोपनिषद्. )

" ज्याप्रमाणें दुन्दुभीवर आघात केला गेला असतां प्रत्यक्ष तींमधून उत्पन्न होणारा शब्द पकडतां येत नाहीं; पण दुन्दुभीला किंवा तिच्यावर आघात करणाऱ्याला पकडलें म्हणजे शब्दाला पकडल्यासारखें होतें, " त्याचप्रमाणें सर्व विषय पकडावयाचे ( उपभोगावयाचे ) असल्यास, ते ज्याच्या सत्तेंत दिसतात आणि ज्याच्या इच्छामात्रेंकरून होतात, त्याला पकडला—वश करून घेतला म्हणजे काम झालें.



* ज्योतिषामपि तज्ज्योतिः ॥ गीता, अ १३ । १७

"स यथा शङ्खध्मस्य ध्मायमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय शङ्खस्य तु ग्रहणेन शङ्खध्मस्य वा शब्दो गृहीतः ॥ ८ ॥"

(बृहदारण्यकोपनिषद्.)

"ज्या प्रमाणें शंख वाजविला असतां शंखाचा आवाज प्रत्यक्ष पकडतां येत नाहीं, पण शंख किंवा शंख वाजविणारा मनुष्य पकडला म्हणजे शब्द पकडल्याप्रमाणेंच होतें," त्याचप्रमाणें जो (ज्ञानी) ब्रह्मभूत झाला—जो ब्रह्माशीं तद्रूप झाला, त्याच्या सर्व कामना आणि वासना तृप्त झाल्या, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मग त्याला जगांतील कोणीहि मनुष्य फसवूं शकणार नाहीं.

"स यथा सर्वासामपां ९ समुद्र एकायनमेव ९ सर्वेषां ९ स्पर्शानां त्वगेकायनमेव ९ सर्वेषां गन्धानां नासिके एकायनमेव ९ सर्वेषां रसानां जिव्हैकायनमेव ९ सर्वेषां रूपाणां चक्षुरेकायनमेव ९ सर्वेषां शब्दानां श्रोत्रमेकायनमेव ९ सर्वेषां संकल्पानां मन एकायनमेव ९ सर्वासां विद्याना ९ हृदयमेकायनमेव ९ सर्वेषां कर्मणा ९ हस्तावेकायनमेव ९ सर्वेषामानन्दानामुपस्थ एकायनमेव ९ सर्वेषां ९ विसर्गाणां पायुरेकायनमेव ९ सर्वेषामध्वनां पादावेकायनमेव ९ सर्वेषां वदानां वागेकायनम् ॥ ११ ॥"

(बृहदारण्यकोपनिषद्.)

"ज्याप्रमाणें सर्व पाण्याचा ओघ समुद्राकडे जातो, सर्व स्पर्शज्ञान त्वचेकडे जातें, सर्व गंधांचें ज्ञान नाकांना होतें, सर्व रसज्ञान जिव्हेला होतें, रूपाचें ज्ञान चक्षूंना होतें, शब्दांचें कानांना होतें, सर्व संकल्पांचें केंद्रस्थान मन, विद्यांचें हृदय, कर्मांचें हात, आनंदाचें उपस्थ, विसर्गाचें पायु, गतीचें पाय, वेदांचें वाणी." त्याचप्रमाणें सर्व जग आणि जगांतील विषय यांचें केंद्रस्थान परमात्मा होय—म्हणजे या सर्वांची उत्पत्ति, स्थिति आणि लय परमात्म्यामध्येंच असतात. *

"स यथा सैंधवखिल्य उदके प्रास्त उदकमेवानुविलीयेत न हास्योद्ग्रहणायेव स्यात् यतो यतस्त्वाददीत लवणमेवैवं वा अर इदं महद्भूतमनन्तमपारं विज्ञानघन एव एतेभ्यो भूतेभ्यः समु-

* सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ गीता, अ. ११।४०.

त्थाय तान्येवानुविनश्यति न प्रेत्य संज्ञास्तीत्यरे ब्रवीमीति होवाच याज्ञवल्क्यः ॥ १२ ॥" (बृहदारण्यकोपनिषद्.)

'ज्याप्रमाणें मिठाचा खडा पाण्यांत टाकला असतां तो पाण्यांत विरघळून जातो, व मग तो बाहेर काढतां येणें शक्य नाहीं; तथापि पाण्यामध्यें त्याचें अस्तित्व आहे, हें पाण्याच्या चवीवरून समजतें. त्याचप्रमाणें हे मैत्रेयी ! सर्व जीव तत्त्वतः अनंत, अपार, आणि केवल ज्ञानस्वरूपी असूनहि पंचमहाभूतांपासून उत्पन्न होऊन मेल्यानंतर त्यांच्यामध्यें लीन होतात व मरणोत्तर चैतन्य निघून गेलें म्हणजे त्यांचें नांवहि मागें राहात नाहीं. येणेंप्रमाणें याज्ञवल्क्य बोलला."

मनुष्यानें या सिद्धान्ताचा एकदां साक्षात्कार करून घेतला व तो त्यांच्याशीं तद्रूप झाला म्हणजे मग तो नामरूपात्मक जगतावर अवलंबून राहात नाहीं.

"सा होवाच मैत्रेय्यत्रैव मा भगवानमूमुहन्न प्रेत्य संज्ञास्तीति ।"

त्यानंतर मैत्रेयी म्हणाली:—"भगवन्! आपण म्हणालांत कीं, मरणोत्तर जीवाचें नांवहि उरत नाहीं. पण या आपल्या भाषणानें मी गोंधळून गेल्यें आहें." मैत्रेयीच्या मनांत अशी शंका उत्पन्न झाली कीं, आत्म्यापासून जर सर्व प्रकारचीं दुःखें उद्भवतात, नानातऱ्हेच्या विपत्ती आणि यातना संभवतात, व शिवाय आपलें जीवदशेंतील व्यक्तिविशिष्टत्वहि नष्ट होणार, तर मग मोठा अनर्थच कोसळला म्हणावयाचा. असा विचार मनांत आणून ती म्हणते:-"असला हा अनर्थ काय कामाचा? मृत्यु, विनाश, प्रलय हीच जर जीविताची अखेर असेल तर त्याची एवढी प्रतिष्ठा ती काय? मला तें मुळींच नको. सर्वच नष्ट होणार, तर हें जीवित मला नको."

## अद्वैतस्थिति

"स होवाच न वा अरेऽहं मोहं ब्रवीम्यलं वा अर इदं विज्ञानाय ॥ १३ ॥ यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं जिघ्रति तदितर इतरं पश्यति तदितर इतर ँ शृणोति तदितर इतरमभिवदति तदितर इतरं मनुते तदितर इतरं विजानाति यत्र वा अस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कमभिवदेत्तत्केन कं मन्वीत तत्केन कं विजानीयाद्येनेद ँ सर्वं विजानाति तं केन विजानीयाद्विज्ञातारमरेकेन विजानीयादिति ॥ १४ ॥"

यावर याज्ञवल्क्यानें उत्तर दिलें:–"मैत्रेयी ! तुला मोह–भ्रम उत्पन्न होण्यासारखें मी बोललों नाहीं, तर तुला विज्ञान व्हावें, या उद्देशानेंच मीं भाषण केलें आहे; कारण, ज्यावेळीं द्वैत भासतें, त्यावेळीं एकानें दुसऱ्याला पाहाणें, वास घेणें, श्रवण करणें, नमस्कार करणें, विचार करणें, ज्ञान होणें वगैरे गोष्टी संभवतात. परंतु सर्व आहे तें तें ब्रह्म आहे, असा अनुभव आल्यानंतर कोणी कोणाला पाहावयाचें ? तदनंतर वास घेणें, ऐकणें, नमस्कार करणें, विचार करणें, ज्ञान होणें या गोष्टी होणार कशा ? ज्या आत्म्याच्या–ब्रह्माच्या योगानें आपल्याला वस्तुमात्राचें ज्ञान होतें त्याला कशाच्या योगानें जाणावयाचें ? मैत्रेयी, जें स्वतः ज्ञानस्वरूपी आहे, त्याचें ज्ञान दुसऱ्या कशानें होणार ?"

न ऐकणें दोन गोष्टींमुळें संभवतें. मनुष्य बहिरा व मुका असला तर त्याला ऐकूं येणें शक्य नाहीं; किंवा आपल्याबाहेर दुसरें कांहींच नाहीं, अशी स्थिति झाली म्हणजेहि शब्द ऐकणें संभवत नाहीं. हीच स्थिति दर्शनासंबंधाची. आपण अंधळे असलों तर पाहाण्याची क्रिया होणें अशक्य आहे, किंवा आपल्या व्यतिरिक्त पाहाण्याला दुसरी वस्तूच नसली तरीहि पाहाण्याची क्रिया होण्याला अवकाश नाहीं. गंध ग्रहण करण्याला हाच न्याय लागूं पडतो. घ्राणेंद्रिय नसलें तर आपल्याला वास घेतां येणें शक्य नाहीं, किंवा वास घेण्याला जर दुसरी वस्तूच नाहीं, तर वास तरी घेणार कशाचा ? मैत्रेयीला शंका आली ती अशी कीं, दर्शनश्रवणादि क्रिया जर आत्म्याच्या–चैतन्याच्या योगानें होतात, आणि पाण्यांत मिठाचा खडा विरघळून जातो त्याप्रमाणें चैतन्याची स्थिति होऊन त्याला कशाचेंहि ज्ञान संभवत नसेल, तर मग आपण अंध, बधिर झाल्यासारखें होणार, असें म्हणण्याला काय हरकत आहे ? परंतु मैत्रेयी हिला उद्भवलेल्या शंकेचें समाधान असें आहे:–ब्रह्मज्ञान संपादन झाल्यानंतर इंद्रियज्ञान नष्ट होतें असें नव्हे ; तर भूमा–ब्रह्म–याचा अनुभव आल्यानंतर त्याच्याशिवाय दुसरें कांहीं नसल्यामुळें पाहण्याला कांहीं उरतच नाहीं. तसेंच अद्वैतज्ञानानंतर श्रवणेंद्रिय नष्ट होतें म्हणून ऐकूं येत नाहीं, असा अर्थ नव्हे ; तर श्रवण करण्याला ब्रह्माव्यतिरिक्त दुसरें कांहीं शिल्लक राहात नाहीं हें होय ; द्वैताची संकुचित बुद्धि नष्ट झाली म्हणजे श्रवणाला विषयच उरत नाहीं. मग कोणत्याहि विषयाचें ज्ञान करून घ्यावयाचें आहे, अशी स्थितीच राहात नाहीं. विचारशक्ति नाहींशी झाल्यामुळें विचार करण्याचा विषय शिल्लक उरत नाहीं, असा याचा

अर्थ नव्हे; तर आत्म्याव्यतिरिक्त दुसरी वस्तूच जगांत नसल्यामुळें विचार तरी कशाचा करावयाचा? दुसरी गोष्ट अशी कीं, जें जें आहे असें भासतें, तें तें अनंत परमात्माच असल्यामुळें आपल्याला होणाऱ्या जगरूपी भासाचें आणि त्यांतील विषयांचें कारण तो परमात्माच असला पाहिजे; आत्मा नसता तर दर्शनश्रवणादिकांचा भास आपल्याला कधींहि झाला नसता. आत्म्याच्या सत्तेमुळेंच आपल्याला पाहातां येतें आणि आत्म्याच्या सत्तेमुळेंच श्रवण करतां येतें.

या अनुभवाच्या स्थितीपर्यंत मन जाऊन पोहोंचलें म्हणजे विचाराचा प्रांतच संपतो; विचाराला तदनंतर वावच राहात नाहीं. आपले सर्व विचार आणि कल्पना ज्याच्या सत्तेनें चालतात, अशा त्या आत्म्याच्या अनिर्वचनीय स्थितींत विचाराला अवकाश राहात नाहीं.

## आत्म्याचें ज्ञान म्हणजे काय?

कल्पना करा कीं, आपल्याजवळ एक चिमटा आहे; आतां त्या चिमट्याच्या दोन्ही बाजूंवर आपण आपला हात घट्ट दाबून धरला म्हणजे आपल्याला त्या चिमट्याच्या योगानें पाहिजे ती वस्तु उचलतां येते; परंतु त्या चिमट्याला मागें वळून इतर वस्तूंप्रमाणें आपल्या हाताला धरून ठेवतां येणार नाहीं. व याचें कारणहि उघड आहे. चिमट्यावर हाताची सत्ता असल्यामुळें त्या चिमट्याला मागें वळून आपला हात पकडतां येणें शक्य नाहीं. आपली बुद्धि, मन किंवा मेंदु हाहि एक प्रकारचा चिमटा आहे. परंतु याची स्थिति सामान्य चिमट्याहून निराळी आहे. सामान्यतः चिमट्याला दोन बाजू असतात; परंतु या चिमट्याला तीन बाजू आहेत. कां, केव्हां आणि कोठें, अथवा स्पष्ट रीतीनें सांगावयाचें असल्यास देश, काल आणि निमित्त ह्या कल्पना म्हणजे आपल्या बुद्धिरूपी चिमट्याच्या तीन बाजू असून, त्यांच्या योगानें आपल्याला सर्व विषयांचें ग्रहण करतां येतें. आतां एखाद्या पदार्थाचें किंवा वस्तुस्थितीचें पूर्ण ज्ञान होणें ह्याचा अर्थ काय? असा प्रश्न उत्पन्न होतो. या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं, बुद्धिरूपी चिमट्याच्या तिन्ही बाजूंनीं एखाद्या विषयाला दृढ पकडून ठेवणें. एखादी गोष्ट कां झाली, ती केव्हां झाली, आणि कोठें झाली, या प्रश्नांचीं उत्तरें आपणांला मिळालीं म्हणजे त्या गोष्टीचें आपल्याला ज्ञान झालें, असें आपण समजतों. एखादा पदार्थ जणूं काहीं आपल्या बुद्धिरूपी आवाराच्या आंत आला म्हणजे त्याची

आपणांला बरोबर कल्पना झाली, असें आपण मानतों. बाह्य जगांतील वस्तु आपण बुद्धीनें ग्रहण करतों. त्यांच्यावर बुद्धि आपला ताबा चालविते. परंतु आपली बुद्धि ही स्वतंत्र नाहीं. तिच्यावरही ताबा चालविणारी एक अनंत आणि अचिंत्य अशी शक्ति आहेच; व त्या शक्तीच्या योगानें आपले सर्व व्यापार नियमित केले जातात. आपली बुद्धि स्वतंत्र असती तर ती झोंपेमध्येंहि कार्यक्षम झाली असती. परंतु झोंपेमध्यें आपली बुद्धि आत्म्याच्या सत्तेंत स्वस्थ पडलेली असते, ही गोष्ट आपणांस माहीत आहे. अर्थात् बुद्धीला स्वतंत्र कर्तृत्व नाहीं. आपल्यापेक्षां श्रेष्ठ अशा परमात्म्याच्या सत्तेंत ती आपला व्यापार करीत असते. अशा स्थितींत आपलें नियंतृत्व करणाऱ्या परमात्मशक्तीला ग्रहण करण्याचें काम तिच्यानें होणें शक्य नाहीं. जगांतील वस्तूंसंबंधानें कां, केव्हां आणि कोठें, हे प्रश्न तिला करतां येतात, व त्यांचीं उत्तरेंहि तिला मिळूं शकतात. परंतु आत्म्यासंबंधानें असले प्रश्न बुद्धीला करतां येणार नाहींत, व त्यांचीं उत्तरेंहि तिला मिळूं शकणार नाहींत. आत्मा हा बुद्धीच्या अतीत असल्यामुळें, तिच्या आटोक्याच्या बाहेर असल्यामुळें आत्म्याला ग्रहण करण्याचें–त्याचें ज्ञान संपादन करण्याचें, बुद्धीमध्यें सामर्थ्य येणें शक्य नाहीं.

परंतु अशी स्थिति असली तरी समुद्राच्या पृष्ठभागावरील बुडबुडे फुटून त्यांना समुद्राशीं एकरूप होतां येतें, त्याचप्रमाणें बुद्धीला आत्मस्वरूपाशीं तद्रूप होतां येणार नाहीं असें नाहीं. जगांतील वस्तूंप्रमाणें निराळेपणानें राहून परमात्म्याचें ज्ञान बुद्धीला करून घेतां येणार नाहीं; परंतु यावरून तिला एकरूपतेनें परमात्म्याशीं तादात्म्य करून घेतां येणार नाहीं असें नाहीं. अशा त्या आत्म्याचें–सत्तत्त्वस्वरूपी समुद्राचें ज्ञान करून घ्यावें, त्याचा अनुभव करून घ्यावा; याचा अर्थ इतकाच कीं, बुद्धीनें परमात्म्यांत लीन व्हावें असें आहे. हा परमात्मा, हें 'अहं ब्रह्मास्मि' दिक्कालनिमित्तादिकांच्या अतीत असून, त्याचा निर्देश ॐ या शब्दब्रह्मानें केला जातो. ॐ याचा अर्थ 'मी आहें,' 'अहं ब्रह्मास्मि' असा आहे; व या मंत्राचा जप करीत असतां जगांतील कोणत्याहि वस्तूसंबंधानें विचार करतां कामा नये. ॐ शब्द उच्चारतांना आपण दुसऱ्या कोणत्या बाह्य शक्तीला बोलावीत आहों, अशी भावना करूं नका; तर 'अहं ब्रह्मास्मि' या स्थितीशीं तद्रूप व्हा; व अशा रीतीनें तद्रूप होण्याचा अभ्यास

करूं लागलांत म्हणजे मनाची चंचलता मोडून तें चैतन्यसमुद्रांत पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें हळूहळू लीन होऊं लागेल. आत्मसाक्षात्काराचा मार्ग हाच होय. अनात्मवस्तूसंबंधाच्या सर्व कल्पनांचा निरास करीत जाऊन 'अहं ब्रह्मास्मि' या जिवंत भावनेंत मनाला मुरवून टाकण्याचा अभ्यास करणें हाच आत्मज्ञान संपादन करण्याचा आणि मोक्षाचा खरा मार्ग होय.

सर्व जगावर सत्ता चालविणारा, विश्वाचें नियंतृत्व आणि आधिपत्य करणारा परमात्मा सर्वत्र व्यापून राहिला आहे, या कल्पनेचा नेहेमीं निदिध्यास करा. देशकालनिमित्तांच्या अतीत असलेलें सत्तत्त्व जसें आपल्या शरीरांत आहे, तसेंच तें दुसऱ्याच्याहि शरीरांत आहे; तें अणूपेक्षां अणु आणि महतापेक्षां महत् असून सर्वत्र ओतप्रोत भरलेलें आहे, अशी दृढभावना करीत जा. अशा रीतीनें अभ्यास करूं लागलांत म्हणजे तुमच्या स्थितीमध्यें केवढें विलक्षण स्थित्यंतर होईल! आपलें स्वरूप सर्वव्यापी आहे, ही भावना तुम्हांला उन्नत करील; तुमच्या अंतःकरणांतील सर्व स्वार्थी इच्छा आणि आकांक्षा नाहींशा करून टाकील; सर्व तऱ्हेचें दुःख आणि चिंता यांचा नायनाट करील. तसेंच उद्विग्नता, त्रास, मत्सरादि सर्व विकार यांचा निरास करून तुमचें आध्यात्मिक ऐश्वर्य तुम्हांला प्राप्त करून देईल.

जगरूपी भ्रमाशीं तादात्म्य करून घेऊं नका; जगाचें आणि जगांतील सर्व वस्तूंचें आदिकारण जें आपलें सत्स्वरूप त्याच्याशीं तादात्म्य करून घ्या. बुद्धीचें देहाशीं झालेलें तादात्म्य नाहींसें करा. कार्याशीं तद्रूप होण्याचें आपल्याला कारण नाहीं. कारणाचा विचार करणें, त्याच्याशीं एकतानता पावणें, हेंच बुद्धीचें वास्तविक ध्येय असलें पाहिजे. व अशा रीतीनें बुद्धीची स्थिति होणें, आत्मचैतन्यावरील बुद्धिरूपी बुडबुडा फुटून सर्व पाणी एकरूप होणें, हीच परम आनंदाची स्थिति आहे. हें परमात्मस्वरूपा! आपलें आध्यात्मिक ऐश्वर्य ओळखून जगांतील व्यवहाराशीं असलेलें आपलें तादात्म्य नाहींसें करून टाक. सत्स्वरूप-परमात्मस्वरूप हेंच तुझें जें स्वरूप आहे तें जाण, त्याचें मनन कर, त्याचाच निदिध्यास कर आणि सर्व तऱ्हेचीं दुःखें आणि चिंता यांच्या अतीत हो!

ॐ! ॐ!! ॐ!!!

# वैराग्याचें सामर्थ्य

( गुरुवार, ता. ९ मार्च १९०३ रोजीं
दुपारीं झालेलें व्याख्यान: )



## वेदान्तावरील एक आक्षेप



कांहीं दिवसांपूर्वीं एका व्याख्यानानंतर रामाला असा प्रश्न विचारण्यांत आला होता की, 'तुम्हीं वैराग्याचें स्तोम कां माजवितां ? लोकांनीं आपल्या विषयवासना टाकून द्याव्या, आणि जगांतील ऐहिक विषयांवरील आसक्ति नाहींशी करावी, असा उपदेश कां करतां ? वेदान्ताचीं तत्त्वें प्रत्यक्ष व्यवहारांत आणिल्यानें भूतमात्रावरील मनुष्याचें प्रेम नाहींसें होतें. सर्व जग हें मिथ्या आहे, असा वेदान्ताचा उपदेश असल्यामुळे जगावरील प्रेम नाहींसें करून, मनुष्याला वेदान्त नीरस बनवितो.' या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं उपनिषदांतील कांहीं भागांचें भाषांतर राम आतां वाचून दाखवीत आहे.

"मनुष्यानें निरतिशय सुखाचा अनुभव करून घेतला म्हणजे त्याची कृति उदात्त होऊं लागते. त्याच्यामधून चांगुलपणाचा—चांगल्या कृतीचा प्रवाह आपोआप वाहूं लागतो, असा नियम आहे."* ज्याला निरतिशय सुखाचा अनुभव झालेला नसतो, त्याला जगाचें कल्याण करतां येणें शक्य नाहीं. जो स्वतः दरिद्री आहे, स्वतःकरतां अन्न मिळविण्याची ज्याला पंचाईत पडते, त्याला दुसऱ्यांची क्षुधा शांत करतां येईल काय ?

## निरतिशय सुख म्हणजे काय ?

शिष्यः—भगवन् ! ज्याला निरतिशय सुख असें म्हणतात, त्याचें स्वरूप समजावें अशी माझी इच्छा आहे.

---

* यदा वै सुखं लक्षतेऽथ करोति नासुखं लब्ध्वा सुखमेव लब्ध्वा करोति सुखं त्वेव विजिज्ञासितव्यमिति सुखं भगवो विजिज्ञास इति ॥ छान्दोग्योपनिषद्, अ० ७ खं २२.

गुरुः—*भूमा—अनंतत्व हेंच पूर्णसुख आहे. अल्पापासून पूर्ण सुख मिळणें कधींहि शक्य नाहीं. आपण सकुंचित आहों अशी जोंपर्यंत तुमची भावना आहे, तोंपर्यंत तुम्हांला पूर्ण सुख लाभणें शक्य नाहीं. कारण अनंतत्वामध्येंच खरें सुख आहे.

आतां याठिकाणीं असा प्रश्न उद्भवेल कीं, भूमा—ब्रह्म याचा आम्हांस अनुभव होईल कसा ? तें आम्हांला समजणार कसें ? परंतु राम म्हणतों कीं, भूमामध्यें पूर्ण सुख आहे, अल्पांत पूर्ण सुख असणें शक्य नाहीं, हे शब्द तुम्ही पाठ करा, त्यांच्यावर चांगलें मनन करा ; म्हणजे कांहीं कालानें त्यांतील तत्त्वांचें हृद्गत तुमच्या मनांत उतरल्यावांचून राहाणार नाहीं. आतां भूमा—अनंतत्व म्हणजे काय ? याचा आपण थोडा विचार करूं.

इंग्रजी भाषेमध्यें ‘ होल ’ असा एक शब्द आहे. या शब्दाचा अर्थ पूर्ण असा आहे. इंग्रजीमध्यें एखाद्या मनुष्याला ‘ तुम्हीं पूर्ण आहांना ? ’ अशा शब्दांनीं कुशल प्रश्न करण्याची चाल आहे. या शब्दांचा अर्थ तुमची ‘ प्रकृति चांगली आहे ना ? ’ असा आहे. हा ‘ होल ’ शब्द खरोखरच फार सुंदर आहे. जोंपर्यंत आपण अंश आहों असें तुम्ही मानतां, साडे तीन हात लांबीचे आणि सत्तर पाऊणशें शेर वजनाचें आहों, इतकीच तुमची स्वतःबद्दल कल्पना असते, हा अस्थिपंजरमय देह म्हणजेच आपण असें मानण्यापलीकडे तुमच्या विचाराची मजल जात नाहीं, तोंपर्यंत तुमची स्थिति बिघडलेली आहे, तुमचे अंश किंवा भाग पडले आहेत, तुम्हीं पूर्णांक नसून अपूर्णांक आहां, तुम्हीं धट्टेकट्टे आणि मजबूत नाहीं, असा तुमच्या म्हणण्याचा वास्तविक अर्थ होतो. डबक्यांत सांचलेल्या पाण्यांप्रमाणें तुमच्या मनाची स्थिति कुजलेली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. समुद्राच्या पाण्यापासून त्यांतील कांहीं पाणी अलग करून ठेवलें, निराळें झांकून ठेवलें तर कांहीं वेळानें तें खराब होईल, त्याला घाण येऊं लागेल. याच न्यायानें एखादा मनुष्य चांगला असो किंवा कसाहि असो; आपण अल्प आहों, मर्यादित आहों, देशकाल-निमित्तांनीं बद्ध झालेले आहों, लहानशा जागेंत कोंडले गेलों आहों, असें मानूं लागेल तर तो मजबूत आणि धडधाकट नाहीं ; तो ‘ होल ’ म्हणजे पूर्ण नाहीं. त्याच्यांत बिघाड झालेला आहे, व त्याला सुख मिळणें शक्य नाहीं, असा अर्थ होतो. असा

* यौ वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं भूमात्वेव विजिज्ञासितव्य भूमानं भगवो विजिज्ञास इति ॥ छान्दोग्योपनिषद्. अ. ७ खं. २३

मनुष्य पूर्ण सुखाला—खऱ्या सुखाला आंचवलाच म्हणून समजा. परंतु ही भावना टाकून देऊन आपलें स्वरूप व्यापक आहे, जें जें आहे तें सर्व आपणच आहों, सर्व जग आपणच आहों, या अनंतत्वाच्या भावनेंतच मनुष्य एकदां स्थिर झाला म्हणजे त्याचीं सर्वतऱ्हेचीं दुःखें, आधिव्याधि, चिंता आणि शोक अजिबात नाहींशीं होतात; व तो 'होल' म्हणजे पूर्ण होतो.

भावनेच्या योगानें सर्व तऱ्हेचे रोग नाहींसे करण्याची पद्धति अलीकडे सर्वत्र प्रचारांत येत चालली आहे. परंतु यांतील इंगितहि हेंच आहे. आपली प्रकृति चांगली आहे, आपल्याला कोणत्याहि तऱ्हेचा रोग होत नाहीं अशी दृढभावना तुम्हीं करा म्हणजे तुमचे सर्वतऱ्हेचे रोग नाहींसे झालेच पाहिजेत, हा सत्य सिद्धान्त आहे. याच न्यायाचें अवलंबन करून आपण पूर्ण आहों, सत्तत्त्व म्हणतात तें आपणच, परमात्मस्वरूप हेंच आपलें वास्तविक स्वरूप आहे, ही भावना तुम्हीं आपल्या अंतःकरणांत सदोदित बाळगा, त्याचा निदिध्यास करा, म्हणजे तुम्हीं आपल्या वास्तविक स्वरूपाप्रत—परमात्मस्वरूपाप्रत जाऊन पोहोंचल्याशिवाय कधीं राहाणार नाहीं.

शिष्यः—भूमा म्हणजे काय ?

गुरुः—संकुचितपणा तीन तऱ्हेचा आहे. कालाच्या योगानें येणारा संकुचितपणा, दिशांच्या योगानें येणारा संकुचितपणा, व कार्यकारणभावामुळें येणारा संकुचितपणा. भूमा—ब्रह्म होणें याचा अर्थ—आपला आत्मा हा पूर्ण आहे, हा देह म्हणजे आपण नसून देश, काल आणि निमित्त यांच्या पलीकडे असलेलें व्यापक स्वरूप—परमात्मस्वरूप हेंच आपलें वास्तविक स्वरूप आहे, असें ओळखणें, हा आहे. ज्याठिकाणीं आपल्या आत्म्याशिवाय दुसरें कांहींहि नाहीं असें मनुष्य जाणतो, त्याप्रमाणें सर्वत्र पाहातो व ऐकतो, अशा ठिकाणीं जाणें—अशा स्थितीप्रत जाऊन पोहोंचणें म्हणजेच भूमा किंवा ब्रह्मस्वरूप प्राप्त होणें होय. आपल्या व्यतिरिक्त—आत्मस्वरूपाव्यतिरिक्त जगांत दुसरें कांहीं आहे असें वाटणें, पाहणें किंवा ऐकणें म्हणजेच अल्प किंवा मर्यादित होणें होय.



पाहातांना, ऐकतांना किंवा जाणतांना आपल्या व्यतिरिक्त अन्यपणाची भावना

होणें म्हणजेच संकुचित होणें होय. उच्च मनोभूमिकेवर आरूढ होऊन आपणांस दुसऱ्या भूतात्म्यांना पाहतां येतें, कांहीं दिव्य ध्वनि ऐकू येतात, किंवा दूर अंतरावर होणाऱ्या गोष्टी प्रत्यक्ष जाऊन पाहातां येतात, असें कित्येकांचें म्हणणें असतें. परंतु हाहि शुद्ध संकुचितपणाच आहे! यावरून फार तर इतकेंच म्हणतां येईल कीं, सामान्य मनुष्यांपेक्षां हे लोक जास्त उच्च स्थितींत गेले आहेत. परंतु तें आत्मसाक्षात्काराचें लक्षण खास नव्हे; दुसऱ्या भूतात्म्याचें दर्शन घेणें, दिव्य ध्वनि ऐकणें, हें ब्रह्मानुभवाचें निदर्शक चिन्ह खास नव्हे. अमृताची–मोक्षाची स्थिति प्राप्त होणें, म्हणजेच सर्वत्र ब्रह्मभाव होणें होय. आत्म्याव्यतिरिक्त दुसरें कांहींहि नाहीं, असा पाहतांना, ऐकतांना नेहेमीं अनुभव घेत जाणें, ही स्थितप्रज्ञतेची–जीवन्मुक्ततेची खूण होय. भूमा—ब्रह्म हेंच अमृतत्व आहे, व जें जें अल्प आहे तें तें मर्त्य आहे, असा सिद्धान्त आहे.

शिष्य—भगवन्! हें भूमा असतें कोठें?

गुरुः—तें * आपल्या स्वतःच्या महात्म्यांत–मोठेपणांत नेहेमीं विलसत असतें. तें कोठें राहात असतें, या प्रश्नाचें हें उत्तर आहे. परंतु वास्तविक भूमाव्यतिरिक्त–ब्रह्माव्यतिरिक्त दुसरी कोणतीहि वस्तु जगांत नसल्यामुळें तें अमुक ठिकाणीं राहातें, त्याला अमक्या वस्तूचा आश्रय किंवा आधार आहे, असें वास्तविक म्हणतांच येत नाहीं.

याचा अर्थ असा कीं, भूमा–ब्रह्म हें देश आणि काल यांच्या अतीत आहे. अशा त्या ब्रह्माला देश आणि काल यांच्या संकुचित मर्यादेंत आणून सोडतां येणें शक्य नाहीं. अर्थात्, भूमा–ब्रह्म हें कोणत्या ठिकाणीं राहतें, कोणत्या वस्तूच्या आश्रयावर तें अवलंबून आहे, त्याला कोणाचा आधार आहे, असा प्रश्न करणें म्हणजे समुद्राच्या लाटांपैकीं, शेरभर लाटा आम्हांला आणून द्या, असें सांगण्यासारखें वेडगळपणाचें आणि हास्यास्पद आहे! समुद्राच्या लाटा

* यत्र नान्यत् पश्यति नान्यत् शृणोति नान्यत् विजानाति स भूमाऽथ यत्रान्यत् पश्यत्यन्यत् शृणोत्यन्यद्विजानाति तदल्पं यो वै भूमा तमृतमथ यदल्पं तन्मर्त्यं स भगवः कस्मिन् प्रतिष्ठित इति स्वे महिम्नि यदि वा न महिम्नीति ॥

छान्दोग्योपनिषद्, अ. ७ खं. २३

शेरांनीं आणि मणांनीं मोजतां येणें शक्य आहे काय? अर्थात् नाहीं. त्याचप्रमाणें भूमा–ब्रह्म हें कां, केव्हां आणि कसें? वगैरे प्रश्नांनीं आजमावतां येणें शक्य नाहीं. असल्या प्रश्नांनीं ब्रह्माचें स्वरूप समजणें शक्य असेल तर ब्रह्माचें ब्रह्मत्व म्हणजे व्यापकत्व नाहींसें होऊं लागेल.

रामाला असा प्रश्न विचारण्यांत आला होता कीं, सर्व विषयांच्या इच्छा आणि आसक्ति यांचा त्याग करण्यांचा वेदान्त उपदेश करतो; म्हणजे जगाचा द्वेष करावा, असाच वेदान्ताचा मथितार्थ आहे. परंतु वास्तविक स्थिति तशी नाहीं. वेदान्त म्हणतो कीं, विषयांवरील प्रीति, जडावरील आसक्ति काढून टाका; परंतु या तत्त्वाच्या खऱ्या अर्थाचा बोध लोकांना होत नाहीं. कारण, ते म्हणतात कीं, प्रेमाचा त्याग करणें म्हणजे ईश्वराचाच त्याग करण्यासारखें आहे. कारण, प्रेम म्हणजेच ईश्वर. परंतु लोकांची ही कल्पना किती गैर आहे! या देशांतील लोकांची प्रेमासंबंधाची कल्पना अगदीं विपरीत बनून गेलेली आहे. त्यांचें प्रेम वास्तविक पाहूं गेलें तर केवळ विषयासाक्ति–केवळ खुळेपणा होय.

प्रेम याचा अर्थ मूर्खपणा असाच व्यवहारांत समजला जातो. निदान हिंदुस्तानांतील लोक तरी असाच अर्थ करतात. अमुक अमुक मनुष्य प्रेमांत गुंतला आहे, प्रेमांत अडकला आहे, असें म्हणण्याची हिंदुस्तानांत वहिवाट आहे. व्यवहारांतील प्रेम हें खरें प्रेमच नव्हे. शुद्ध प्रेमाचा तो विपर्यास आहे, असें राम स्पष्टपणें सांगत आहे. सत्याची रामाला जितकी चाड आहे, तितकी दुसरी कशाचीहि नाहीं. व्यक्तिविषयक प्रेम हें खरें प्रेमच नव्हे. असलें प्रेम मनुष्यांना संकुचित करतें; मर्यादित करतें; तसेंच मनुष्याच्या प्रेमाचा विषय होऊन बसलेल्या पदार्थांनाहि तें संकुचित बनवितें; व असलें प्रेम करणें म्हणजे आपण आणि आपल्या प्रेमाचे विषय अशा दोघांनाहि अधोगतीला नेण्यासारखें आहे. असल्या प्रेमाला, जडावरील खुळेपणाच्या आसक्तीला आपण फांटा देण्यास शिकलें पाहिजे, असा वेदान्ताचा उपदेश आहे. परंतु यावरून खऱ्या प्रेमाचा आपण त्याग करावा, अशा प्रेमाला आपण फांटा द्यावा, असा वेदान्ताचा केव्हांहि आशय नाहीं.

## प्रेममय बना

प्रेमाचें स्वरूप स्पष्ट होण्यासाठीं आपण लहान मुलाचें उदाहरण घेऊं. लहान

मूल कधीं कोणावर प्रेम करतें काय? छे! छे! तें कोणावर कधींच प्रेम करीत नाहीं; तर तें स्वतः प्रेमस्वरूपी—प्रेममय असतें. या न्यायानें वेदान्त असें प्रतिपादन करतो कीं, तुम्हीं प्रेमी बनूं नका, तर स्वतःच प्रेममय बना. स्वतः प्रेममय बनणें म्हणजे सर्व आकर्षकतेचा केंद्र बनणें होय. मुलामध्यें जो चुंबकत्वधर्म, जी आकर्षकशक्ति आढळून येते, त्याचें कारण तें प्रेमी असतें असें नसून तें स्वयं प्रेमच असतें हें होय. लहान मुलाचें चित्त बाहेर कोठेंहि नसतें. बाह्य मनुष्यांबद्दल किंवा वस्तूंबद्दल त्याच्या चित्तांत आसक्ति नसते. परंतु मूल हें प्रेमाचा मूर्तिमंत पुतळा असतें, व यामुळें तें सर्वांचें चित्त आपणाकडे ओढून घेतें. वेदान्ताचेंहि सांगणें असें आहे कीं, तुम्हीं स्वतः प्रेममय बना म्हणजे तुम्हीं पूर्ण व्हाल; सर्व विश्वाला आकर्षून घेण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगांत येईल.

आपण स्वतः निरोगी बनण्याच्या आणि दुसऱ्यांना निरोगी बनविण्याच्या उपायांबद्दल लोक नेहेमीं चर्चा करीत असतात. परंतु आपल्या स्वतःला आणि दुसऱ्यांना संकुचित बनविणाऱ्या असल्या स्वार्थी उपायांना-आकांक्षांना मेहेरबानी करून अजीबात फांटा द्या, असे रामाचें तुम्हांला सांगणें आहे. सर्व तऱ्हेच्या इच्छा म्हणजे व्यक्तिविषयक प्रेम होय. जडावरील आसक्ति ती हीच. असल्या सर्व इच्छा झुगारून द्या. म्हणजे तुम्हीं शुद्धतेचे मूर्तिमंत पुतळे बनाल; व असें झालें म्हणजे आपलें शरीर सुस्थितींत ठेवण्याकरितां, निरोगी बनण्याकरितां निराळे उपाय करण्याचें कारणच नाहीं. तुम्हीं निरिच्छ बनलां, विषयांच्या अतीत स्थितीप्रत जाऊन पोहोंचलां, म्हणजे तुमची बुद्धि पूर्ण तेजानें झळकूं लागेल. आत्मज्ञान संपादन करणें, आत्मतेजाचें पावित्र्य अंगांत भिनून जाणें म्हणजेंच वेदान्तप्रतिपादित वैराग्य होय; पूर्णज्ञान अंगांत बाणणें हीच वैराग्याची सीमा होय.

लहान मुलामध्यें जें पावित्र्य असतें तें आपल्या अंगीं आणा. लहान मूल किती पवित्र असतें! तें परिस्थितीसंबंधानें पूर्णपणें उदासीन असतें; त्याला प्रतिकूल परिस्थितीची बिलकूल किंमत वाटत नाहीं. मुलाचा सुलतानीपणाही मोठा विलक्षण असतो! एखाद्या दांडग्या सशक्त मनुष्याच्या खांद्यावर स्वार होण्याला किंवा एखाद्या राजाच्याहि डोक्याचे केंस उपटण्याला त्या छोट्या सुलतानाला मुळींच दिक्कत वाटत नाहीं! त्याच्यामध्यें आकर्षणशक्ति तरी किती अद्भुत

असते! या सर्वांचें कारण काय, असा प्रश्न केला, तर पावित्र्य हेंच त्याचें उत्तर येईल. मुलाच्या अंगांतील पवित्रपणामुळें त्याच्या ठिकाणीं चुंबकत्वधर्म–दुसऱ्यांचीं मनें आपल्याकडे ओढून घेण्याची शक्ति असते; तसेंच त्याच्या अंगच्या सौंदर्याचें बीजहि त्याच्या निष्पापतेंत आहे. याच न्यायानें वेदान्त प्रतिपादन करतो कीं, लहान मुलाप्रमाणें बाह्य परिस्थितीसंबंधानें वैराग्यबुद्धि धारण करा, म्हणजे तुम्हीं मूर्तिमंत प्रेमच बनाल; व असें झालें म्हणजे सर्व जगताचें कल्याण करणाऱ्या क्रिया तुमच्या हातून स्वाभाविकपणेंच होऊं लागतील. उदात्त क्रियांचा प्रवाह तुमच्यांतून आपोआप वाहूं लागेल. सर्व जगाचें हित करावें असें तुम्हांला वाटत असेल, तर अगोदर तुम्हीं स्वतः सद्वृत्तीचे पुतळे बना; म्हणजे दिव्यांतून प्रकाश आपोआप बाहेर पडतो, त्याप्रमाणें तुमच्या अंतःकरणांतून प्रकाश–चैतन्य बाहेर पडूं लागेल.

## देहात्मबुद्धीची कात टाका!

सर्पाचे डोळे किती मोहक असतात! त्याच्यामध्यें आकर्षक शक्ति असल्यामुळें लहान लहान पक्षी त्याच्याकडे धांवूं लागतात, आणि अखेरीस त्याच्या भक्षस्थानीं पडतात. सर्पाच्या नेत्रांमध्यें ही आकर्षकता कशामुळें उत्पन्न होते? याचें कारण हेंच कीं, त्याच्या डोळ्यांमध्यें एकप्रकारचें बेफिकिरपणाचें तेज चमकत असतें, बाह्य परिस्थितीमध्यें तो बेपर्वा असतो; त्याला कशाचीच दिक्कत वाटत नाहीं. बाह्य परिस्थितीसंबंधानें बेफिकिर असणें ही सर्व सत्तेची, सर्व सामर्थ्याची, औषधावांचून रोग बरे करण्याच्या क्रियेची वगैरे सर्व गोष्टींचीं गुरुकिल्ली आहे. कित्येक वेळां साप आपल्या पोरांचें रक्षण करण्यासाठीं त्यांना आपल्या तोंडांत धरतो; परंतु पुष्कळ वेळां आपलीं पोरें तो खाऊन टाकतो. सर्पाची वीण मोठी विलक्षण असते; त्याच्यापासून एकेकावेळीं शेंकडों साप उत्पन्न होतात. हे सर्प जगूं लागले तर जगावर मोठी आपत्तिच ओढवेल! माणसांना जगाच्या पाठीवर राहाण्याला मोठी पंचाईत पडेल. ही आपत्ति टळावी, अशी निसर्गाची योजना आहे, व सापानें आपलीं स्वतःचीं पोरें खाणें ही ती योजना होय! सापाच्या ठिकाणीं देहासक्ति नसते. साप आपली कात टाकतो, पण त्याच्या ठिकाणीं तद्विषयक आसक्ति लवलेशहि नसते. याच न्यायानें राम प्रतिपादन करतो कीं, वेदान्तज्ञानाचा तुम्हीं

निदिध्यास कराल, देहात्मबुद्धीचा निरास कराल, देहबुद्धीची क़ात टाकून द्याल, व ' मी ब्रह्म आहें, परमेश्वर म्हणतात तोच मी आहें, ' या तत्त्वाचा मननिदिध्यासानें अनुभव करून घ्याल, तर तुम्हीं ब्रह्मच बनाल; तुमच्यामध्यें दांडगी आकर्षक शक्ति उत्पन्न होईल. वेदान्त म्हणतो कीं, ' अहं ब्रह्मास्मि ' या तत्त्वाचा तुम्हीं अनुभव करून घेतलांत, तुम्हीं पवित्रतेचे मूर्तिमंत पुतळे बनलां म्हणजे तुमच्या ठिकाणीं चुंबकत्वधर्म प्रतिबिंबित होईल; तुम्हीं प्रत्यक्ष प्रेमच बनाल व सत्कृत्यांचा प्रवाह तुमच्यामधून आपोआप वाहूं लागेल.

## प्रेमाचा निरास म्हणजे काय ?

दुसरी गोष्ट अशी कीं, तुमच्या अंतःकरणांत विषयासक्ति बद्धमूल झालेली असते. परंतु या विषयासक्तीला तुम्हीं प्रेम हें गोंडस नांव देतां! असें करण्यांत तुमची घोडचूक होत असते. तुम्हांला वाटत असतें कीं, आपण प्रेम करतों; पण वास्तविक विचार केला तर तुम्हीं प्रेम करीत नसून द्वेषच करीत असतां. वेदान्त जेव्हां असें प्रतिपादन करतो कीं, आपणांमधील प्रेमबुद्धीचा निरास करा, तेव्हां त्याचा अर्थ आपणांमधील द्वेषबुद्धीचा निरास करा, असा असतो; ही गोष्ट नीट समजावून घेतली पाहिजे. जेव्हां एखाद्या वस्तूंवर तुमचें प्रेम जडलेलें असतें तेव्हां तद्व्यतिरिक्त बाकीच्या जगाचा तुम्हीं द्वेष करतां, असा अर्थ होत नाहीं काय ? लहान मुलाच्या ठिकाणीं दुसऱ्यावर प्रेम करण्याची बुद्धि उत्पन्न झालेली नसते, त्यावेळीं तें केवळ प्रेमस्वरूपी असतें, त्याचें सर्व जगाशीं जणूं तादात्म्य असतें. मूल एक महिन्याचें असतें त्यावेळीं ते इतकें गोजिरवाणें असतें कीं, ज्याला त्याला तें हवें हवेंसें वाटतें; जो तो मनुष्य त्याला कडेवर घेतो आणि खेळवतों. याचें कारण, मूल हें प्रेमस्वरूपी असतें हें होय. पण पुढें कांहीं दिवसांनीं मूल मोठें झालें, त्याला चांगलें समजूं लागलें, इतर वस्तूंकडे त्याचें मन ओढ घेऊं लागलें म्हणजे काय स्थिति होते ? आईबापांवरील त्याचें प्रेम त्या मानानें कमी होऊं लागतें, बहिणी आणि बरोबरचे सोबती यांच्याकडे त्याचें चित्त लागतनासें होतें. पूर्वींच्या मित्रांचा त्याला तिटकारा येतो, व सर्व जगाचा वीट येऊन जातो. तारुण्यावस्थेंत मनुष्य आपल्या कामधंद्यावर जातो, परंतु त्याचें चित्त कामाकडे नसतें; तो समुद्रावर फिरावयास जातो, पण फिरण्याचाहि त्याला कंटाळा येतो; या वेळीं ज्या तरुणीवर त्याचें प्रेम जडलेलें असतें तिच्याशिवाय त्याला दुसरें

कांहीं सुचत नाहीं. अहोरात्र तिची मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढून हलत नाहीं. तरुणीच्या प्रेमापुढें त्याला जगाची पर्वा वाटत नाहीं. असला मनुष्य आपल्या तरुण स्त्रीवर प्रेम करीत आहे असें तुम्हीं म्हणतां; पण वास्तविक तो सर्व जगाचा द्वेषच करीत नसतो का? एखाद्या वस्तूवर तुम्हीं प्रेम करीत असतां त्यावेळीं तुम्हीं बाकीच्या सर्व जगाचा द्वेष करीत असतां; सर्व जगापासून आपणांस अलग करीत असतां. अशी स्थिति असल्यामुळें वेदान्त म्हणतो कीं, सर्व व्यक्तिविषयक प्रेम याचा अर्थ सर्व जगापासून विभक्त होणें, अलग होणें; व ही स्थिति कुजलेल्या पाण्यासारखी असते. अशा रीतीनें राहून आत्महत्या करूं नका, असें वेदान्त तुम्हांला सांगत आहे. तुम्हीं आपल्या अंगच्या सर्व शक्तीचा उपयोग, चित्त निर्विषय करून सर्व जगाशीं तादात्म्य करून घेण्याकडे करावा, असा वेदान्ताचा कटाक्ष आहे; व यासाठीं विषयासक्तीच्या अतीत व्हा, असा उपदेश करून तुम्हीं मनुष्यजातीला भूषणभूत व्हा, असें वेदान्त आग्रहानें प्रतिपादन करतो.

जगांतील सर्व महात्म्यांनीं व्यक्तिविषयक प्रेमाला अजिबात फांटा देऊन पवित्र आणि उदात्त आचरणांत आपल्या आयुष्याची कालक्रमणा केली, ही गोष्ट खरी नाहीं काय ? ख्रिस्तानें स्वतः लग्न केलें होतें काय ? अर्थात् नाहीं. जगांतील इतर साधुपुरुषांनीं आणि महात्म्यांनीं तरी विवाहबंधनानें आपणांस अडकावून घेतलें होतें काय ? नाहीं. यावरून राम विवाहसंबंधाच्या विरुद्ध आहे, असा अर्थ कोणीहि समजूं नये. रामाच्या म्हणण्याचा अर्थ इतकाच आहे कीं, तुम्हीं आपल्या अंगीं परमात्मभावना बाणवून घ्या; सर्व चराचराशीं आपल्या चित्ताची तादात्म्यवृत्ति करून घ्या. कांहीं सत्पुरुषांनीं विवाह केला होता, नाहीं असें नाहीं; परंतु त्यांचा तो संबंध कोणत्या तऱ्हेचा होता, हें लक्षांत ठेवा. स्त्रीशीं विवाह केला असूनहि त्यांचें चित्त पूर्णपणें निरासक्त असे, त्यांना मुलेंबाळें झाली असूनहि तद्विषयक बंधन त्यांच्या ठिकाणीं मुळींच नसे. आपलीं शरीरें ज्या ठिकाणीं असतात, त्याठिकाणीं आपण वास्तविक राहात नसून आपलीं मनें ज्याठिकाणीं असतात त्याठिकाणीं आपण राहतों. अशी स्थिति असल्यामुळें कुटुंबांत राहूनहि त्यांना सत्याशीं—परमात्मस्वरूपाशीं तद्रूप होऊन राहतां येत असे. अशा रीतीनें आपलें यथार्थ स्वरूप ओळखून अखिल मानव जातीचे कल्याणकर्ते व्हा, असा वेदान्ताचा तुम्हांला उपदेश आहे.

## त्यागाचें महत्त्व

अमेरिकेंत प्रसिद्ध होणाऱ्या अलीकडच्या बहुतेक वाङ्मयांत औषधावांचून रोग बरे करण्याच्या अनेक युक्त्या, मूर्च्छनाशास्त्र, अदृश्य वस्तूंचें ज्ञान करून घेण्याची पद्धति, वगैरे अनेक प्रकारांची टिमकी वाजविण्यांत येत असलेली दिसून येते. शरीराला होणारे नाना तऱ्हेचे रोग औषधावांचून बरे करून, शरीर सुस्थितींत राखण्याचे अनेक मार्ग या वाङ्मयांत सांगितलेले असतात. हें सर्व ठीक आहे व यांतील हेतुहि स्तुत्य आहे, याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. परंतु असल्या लेखकांपैकीं कांहीं थोडे अपवाद सोडून दिले तर बाकीच्या सर्वांसंबंधानें असें म्हणणें भाग आहे कीं, वेदान्ताच्या–सत्याच्या सिद्धान्तांना विरोधी अशा तत्त्वाच्या आधारावर त्यांच्या सर्व प्रतिपादनाची इमारत उभारण्यांत आलेली आहे. त्यांच्या विवेचनाला स्वार्थि बुद्धीचा आधार असतो. मालकीच्या, स्वामित्वाच्या भावनेचेंच असल्या विचारसरणीनें पोषण होत असतें. मी आणि माझें, या क्षुद्रबुद्धीचें स्तोम असल्या विवेचनांतून माजविलें जातें. या लोकांचा हेतु उदात्त आहे, परोपकाराच्या उदार बुद्धीनें ते प्रेरित झाले आहेत, ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. परंतु या लोकांच्या विचारसरणींत जें व्यंग आहे व जे दोष आहेत, तसल्या दोषांचा आपल्याला स्पर्शहि होऊं नये, इतकेंच नव्हे तर आपण यशस्वी व्हावें, सर्व सामर्थ्यांचें नियंतृत्व आपणांकडे यावें, असें जर तुम्हांला वाटत असेल तर या लोकांची विचारसरणी सदोष आहे, सत्याशीं विसंवादी आहे, ही गोष्ट विसरूं नका. एखादी इच्छित वस्तु प्राप्त करून घेण्याचा खरा मार्ग म्हटला म्हणजे त्या इच्छेला अजिबात फांटा देणें हाच आहे. वस्तुस्थिति अशी आहे त्याला इलाज काय ? हा सत्य सिद्धान्त राम तुमच्यापुढें मांडीत आहे, त्यांतील सत्य तुम्हीं स्वानुभवानें पारखून घ्या. याशिवाय तुमच्या ज्या निरनिराळ्या कल्पना असतील, त्यांचा अवलंब करून पहा. परंतु शेवटीं रामाचेच शब्द खरे आहेत, असें अनुभवांतीं तुम्हांला पटल्याशिवाय राहणार नाहीं.

कोणतीहि वस्तु प्राप्त होण्याला तिचा अगादर त्याग झाला पाहिजे. ज्याला खरें जीवित पाहिजे असेल त्यानें प्रथम जीविताचा त्याग करावयाला तयार झालें पाहिजे ! या देशांतील बहुतेक सर्व लेखक या तत्त्वाच्या विरुद्ध प्रतिपादन करतात. तुम्हांला जर खरें यश प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर तुमच्य

ठिकाणीं चुंबकीय धर्म एकवटले पाहिजेत. चुंबकधर्म तुमच्या ठिकाणीं आल्याशिवाय खरें यश तुम्हांला प्राप्त होणार नाहीं. चुंबक व्हावयाचें म्हणजे काय? व चुंबक होण्याला काय केलें पाहिजे? असा प्रश्न या ठिकाणीं उत्पन्न होतो.

## चुंबकीय धर्म

या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं राम एक उदाहरण देत आहे. कल्पना करा कीं, याठिकाणीं एक वस्तु आहे. विद्युत्शास्त्राप्रमाणें त्या वस्तूमध्यें धन आणि ऋण विद्युत्प्रवाह आहेत, नाहींत असें नाहीं; त्याचें फक्त मिश्रण झालेलें आहे. परंतु चुंबकाची स्थिति याच्याहून निराळी असते. त्याच्यामध्येंहि धन आणि ऋण विद्युत्प्रवाह असतात, पण ते विभागले गेलेले असतात. धनविद्युत्-प्रवाह एका टोंकाला जाऊन एकवटलेला असतो, आणि ऋणविद्युत्प्रवाह चुंबकाच्या दुसऱ्या टोंकाला जाऊन बसलेला असतो. व या स्थितीमुळें चुंबका-मध्यें सामर्थ्य उत्पन्न होतें; इतर वस्तूंना आकर्षण करून घेण्याची शक्ति येते. ही स्थिति मोझेस याच्या दंडाप्रमाणें आहे. तुम्हांला माहीत आहे कीं, बाय-बलांतील 'जुन्या करारांत' मोझेससंबंधाची हकीकत आहे. त्यांत मोझेस ह्यानें आपल्या हातांतील दंडाचा तांबड्या समुद्राला स्पर्श केला, व त्यामुळें तो समुद्र दुभंग झाला, अशी हकीकत आहे. याच तऱ्हेनें आपण उदाहरणाकरितां घेतलेल्या वस्तूमध्यें दोन्ही बाजूला दोन टोंकें आहेत, परंतु त्या वस्तूमध्यें चुंबकधर्म येण्यासाठीं त्या दोन्हीं टोंकांमध्यें विद्युत्संचार झाला पाहिजे. या न्यायानें आपणांमध्यें विद्युत्संचार झाला म्हणजें आपणहि चुंबक बनूं; आणि जगांतील सर्व वस्तूंचें आकर्षण करून घेण्याचें सामर्थ्य आपणांमध्यें येईल. आतां वेदान्त म्हणजे काय, असा प्रश्न या ठिकाणीं उत्पन्न होतो. या प्रश्नाचें उत्तर हें कीं, वेदान्त ही एक काठी आहे. तो मोझेसचा दिव्य दंड आहे. जगांतील लोकांना वैराग्याचा उपदेश करून सत् आणि असत् आत्म आणि अनात्म वस्तूंना विभक्त करून तो मोझेसच्या दंडाचें कार्य करतो; मनुष्यामध्यें विवेक जागृत करून तो उदात्त वृत्तींना उद्बोधित करतो; पशुवृत्तींना झुगारून देऊन मनु-ष्यांमधील परमात्मभावनेचें वर्चस्व स्थापित करतो. आपणांमधील संकुचित भावनांमुळें, प्रकृतीच्या प्रभावामुळें आपणांमधील विषयासक्ति उत्पन्न झालेली

असते, हें लक्षांत ठेवा. इच्छा ही नेहमीं परिच्छिन्नालाच असणार. अपरिच्छिन्नाला-अनंताला कोणत्याहि तऱ्हेची इच्छा असणें संभवनीय आहे काय? अर्थात् नाहीं. अपरिच्छिन्नाला इच्छा होणार कशी ? इच्छा याचा अर्थच मुळीं परिच्छिन्नता, मर्यादितपणा, संकुचितपणा असा आहे. अपरिच्छिन्नाच्या ठिकाणीं इच्छा असणें शक्यच नाहीं. अनंत हें अनंत असल्यामुळें, 'एकमेवाद्वितीयम्' असल्यामुळें, त्याच्याबाहेर दुसरें कांहीं नसल्यामुळें त्यानें इच्छा तरी करावी कशाची ? त्याला इच्छा करण्याला कांहींच राहात नाहीं. जो मनुष्य मर्यादित आहे, 'मी' म्हणजे देह असें ज्याला वाटतें, त्यानें इच्छा करणें हें स्वाभाविक आणि सरळ आहे. अशादृष्टीनें विचार केला असतां आपणांमधील सर्वतऱ्हेच्या विषयांच्या कामना आणि वासना, विषयांवरील आपली आसक्ति, आपल्या प्रकृतीमुळें-आपणांमधील मायेच्या अंशामुळें उत्पन्न होते, असें म्हणणें भाग आहे. आपणांमधील सत्तत्त्व विषयवासनांच्या अतीत आहे. अर्थात् आपणांमधील विषयवासनेचा जो भाग आहे, ती आपणांमधील पशुवृत्ति, नीचवृत्ति आहे, हें ओघानेंच ठरतें. तर मग वेदान्ताचा उपयोग काय ? वेदान्ताचा उपयोग हाच कीं, तो या दोहोंना विभक्त करतो. चांगलें आणि वाईट, सत् आणि असत् याचें आपणांमध्यें मिश्रण होऊन गेलेलें आहे, व यामुळें आपण देह आहों असें आपल्याला वाटूं लागलें आहे. परंतु वेदान्तामुळें आपणांमधील मायेचा अंश निराळा केला जाऊन, बाजूला सारला जाऊन आपण परमात्मा आहों, ही भावना आपणांमध्ये दृढ केली जाते.

वेदान्त प्रतिपादन करतो कीं, 'सीझरचा भाग सीझरला द्या,' परंतु त्याजबरोबर परमात्म्याचा भाग परमात्म्याला किंवा रामाला द्या. याचा अर्थ हा कीं, तुम्हीं आपले व्यवहार, सर्व ऐहिक कर्तव्यें योग्य रीतीनें करा. परंतु त्यांना फाजील महत्त्व देऊन आपल्या स्व-स्वरूपाला पारखे होऊं नका; आपल्या या शरीराचें, आपल्या विषयवासनांचें नसतें स्तोम माजवूं नका. त्यांची वास्तविक किंमत ओळखा. तीं निखालस मिथ्या आहेत, याचा अनुभव करून घेऊन आपलें परमात्मत्व स्थापित करा; आपण देवाधिदेव आहों, सर्व प्रभूंचे प्रभु आहों, सच्चिदानंदस्वरूपी आहों, याचा अनुभव करून घ्या. आपण अनंतस्वरूपी असल्यामुळें, जें जें आहे तें तें सर्व आपणच असल्यामुळें आपल्याला कशाची

इच्छा असणार? जो सर्व कालामध्यें व्यापून राहिलेला नाहीं, जो मर्यादित बनलेला आहे, त्यानें इच्छा करणें बरोबर आहे, व त्याच्या इच्छा क्षणभंगुरच असणार! परंतु आत्म्याला कोणतीच इच्छा असणें शक्य नाहीं. कारण, सर्व चराचर त्याच्यामध्यें असतें. आपल्या वास्तविक स्वरूपाच्या दृष्टीनें पाहूं गेलें तर जगांतील सर्व पदार्थ, सर्व आनंद, सर्व ऐश्वर्य, मनुष्याचा इच्छेचा विषय होऊन बसणारी प्रत्येक वस्तु आपणच आहोंत, हा विचार सदोदित मनांत बाळगा. ॐ या मंत्राचा अखंड घोष चालवा, आणि ही भावना दृढ करा; व अशा रीतीनें तुम्हीं अभ्यास करूं लागलां म्हणजें तुम्हांला आपल्या स्वरूपाचा अनुभव झालाच पाहिजे. जशा भावना केल्यात तसे तुम्हीं झालां आहांत. आपण शरीर आहोंत अशी तुम्हीं आपली भावना करून घेतली आहे, त्यामुळें तुम्हीं शरीरच बनलां आहांत. 'मी परमात्मा आहें, तेंच माझें वास्तविक स्वरूप आहे,' असें मनन चालवा, ही भावना दृढ करा, म्हणजे ऐहिक इच्छांना आणि आकांक्षानां तुमच्या अंतःकरणांत थारा मिळणार कसा? अशा रीतीनें आपल्या अंगीं चुंबकत्वधर्म कसे आणावे, धन आणि ऋण विद्युत्प्रवाह कसे विभक्त करावे आणि परमात्मभावनेचा विद्युत्संचार शरीरांत कसा करून घ्यावा, याचा उपदेश वेदान्त करतो.

## आकर्षकतेचें रहस्य

पुष्कळवेळां लोक असें म्हणतात कीं, अमुक अमुक वक्त्याच्या अंगीं विलक्षण आकर्षकता आहे; लोकांचीं मनें आपणांकडे वेधून टाकण्याचें अद्भुत सामर्थ्य आहे. परंतु असल्या एकाच तऱ्हेची आकर्षणशक्ति आपल्या अंगीं यावी, असें तुम्हांला वाटतें असें नाहीं. एखाद्या मनुष्याला इतर लोकांच्या मनांत चाललेले विचार आपल्याला समजावे असें वाटतें; दुसरा एखादा मनुष्य सर्व जगाची संपत्ति आपणांकडे खेंचून आणावी, अशी इच्छा करतो; तर तिसरा एखादा मनुष्य सर्व सुंदर देखण्या मनुष्यांनीं आपल्या सौंदर्यावर मोहित व्हावें अशी इच्छा करतो! अशा रीतीनें जगांतील लोकांच्या भिन्न भिन्न इच्छा असतात. परंतु सर्व आकर्षकतेचें रहस्य वैराग्य हें आहे; त्याच्याशिवाय दुसरें कांहींहि नाहीं, हें तत्त्व विसरूं नका. मनुष्यानें पूर्ण निरोगी कसें व्हावें, या संबंधाचें विवेचन करणारीं पुस्तकें छापून काढण्यांत आपल्या कालाचा अपव्यय करूं नका! वैराग्याचें हें तत्त्व लक्षांत बाळगून त्याप्रमाणें तुम्हीं वागूं लागलां तर तुमच्यामध्यें विलक्षण

आकर्षणशक्ति उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. हें तत्त्व राम स्वानुभवावरून सांगत आहे, व त्याचप्रमाणें तुम्हीं वागूं लागा म्हणजे तुम्हांला तसाच अनुभव येईल. दुसऱ्या मनुष्याच्या मनांत चाललेले विचार आपल्याला समजावे, इतर लोकांच्या ठिकाणचें ज्ञान आपण आकर्षण करून घ्यावें, असें तुम्हांला वाटत असेल,तर तें काम ईश्वराची प्रार्थना केल्यानें होईल काय ? 'हे देवा ! सर्वशक्तिमान् परमेश्वरा ! हे ज्ञानस्वरूपी परमात्मन् ! मला ज्ञानसंपन्न कर !' अशा आशयाची प्रार्थना केल्यानें तुम्हांला ज्ञान प्राप्त होईल काय ? छे, छे, कधीं होणार नाहीं. जशा भावना करतों तसे आपण होतों, हें तत्त्व ध्यानांत बाळगा. 'मला ज्ञान प्राप्त होावो,' असा विचार मनांत आणल्याचा परिणाम काय होईल बरें ? परिणाम हा होईल कीं, ज्ञान प्राप्त होण्याच्या स्थितीपासून तुम्हीं विमुख व्हाल. ज्ञानाकरितां याचना करणें, ज्ञानाकरतां भिक्षा मागणें म्हणजे ज्ञानापासून आपण दूर जाण्यासारखें आहे ; व असें करण्यानें आपल्या अंतःकरणांत ज्ञानाचा प्रकाश कधींच पडणार नाहीं !

## ज्ञान आणि सामर्थ्य यांची प्राप्ति

एखादा मनुष्य गर्भश्रीमंत आहे अशी कल्पना करा ; अशा मनुष्यालाहि आपली वडिलोपार्जित मालमिळकत केव्हां प्राप्त होते ? त्याची आई मरेल तेव्हां तिजोरीच्या किल्ल्या त्याच्या हस्तगत होतात ! या साठीं आपल्या आईच्या मरणाची वाट पाहात त्याला पुष्कळ काळ कंठावा लागतो. या न्यायानें आपण जेव्हां ईश्वराची प्रार्थना करतों कीं, 'हे परमेश्वरा ! मी तुझा दास आहें, तुला शरण आलों आहें, माझी अमुक अमुक इच्छा पूर्ण करून माझ्यावर कृपा कर,' तेव्हां अशा मनुष्याला ईश्वर मरण्याची वाट पाहात बसावें लागेल ! परंतु ईश्वर कधीं मरतो काय ? कधींच नाहीं. अर्थात् अशा मनुष्याची इच्छा पूर्ण होणें कधींच शक्य नाहीं. ज्ञान प्राप्त होण्याचा हा वास्तविक मार्गच नव्हे. ज्ञानाचीच गोष्ट कशाला, जगांतील प्रत्येक इच्छेसंबंधानें स्थिति अशीच आहे. प्रार्थना करून, याचना करून, विनवण्या करून, 'भिक्षां देहि' करून जगांतलि कोणतीहि वस्तु कोणत्याहि मनुष्याला आजपर्यंत मिळालेली नाहीं.

हें विधान तुमच्या कानांना मोठें आश्चर्यकारक लागेल ; परंतु तत्त्वज्ञानानें तें सिद्ध झालेलें आहे. सामर्थ्य, सामर्थ्य म्हणजे काय ? सामर्थ्य याचा अर्थ

ज्ञानासंबंधाच्या इच्छेलाहि फांटा देणें असा आहे ; सर्वस्वाचा त्याग झाल्याशिवाय अंगीं सामर्थ्य येत नाहीं. जोंपर्यंत ज्ञानप्राप्तीची इच्छा तुमच्या अंतःकरणांत आहे, तोंपर्यंत तें ज्ञान तुमच्या हातावर तुरी देऊन जाईल! परंतु ईश्वराची प्रार्थना केल्यानें तरी तें तुम्हांला मिळेल काय? छे, मुळींच नाहीं. प्रार्थना करण्याच्या क्रियेनें तुम्हीं आपण होऊन ज्ञानाचा दरवाजा बंद करून टाकतां, ज्ञानाचा प्रकाश आंत येऊं देत नाहीं!

हा सिद्धान्त स्पष्ट करण्यासाठीं राम आतां एक मजेदार गोष्ट सांगत आहे. हिंदुस्तानांतील एका मनुष्याचें एका स्त्रीवर विलक्षण प्रेम जडलें होतें. तिला वश करून घेण्यासाठीं तो मनुष्य एका मंत्राचा जप करीत होता. या मंत्राचा उपदेश ज्या साधूनें केला तो त्या गृहस्थाला म्हणाला, ‘ बाबारे! या मंत्राचा जप करीत असतां एका गोष्टीबद्दल सावधगिरी बाळग.’ ती गोष्ट कोणती? असा गृहस्थानें प्रश्न केला असतां तो साधु म्हणाला, ‘ या मंत्राचा जप करीत असतां माकडाची कल्पना किंवा विचार तूं आपल्या डोक्यांत बिलकूल येऊं देऊं नको.’ साधूच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याचा निश्चय करून तो गृहस्थ जप करूं लागला. परंतु प्रत्येकवेळीं जप करण्यासाठीं तो मनुष्य बसला म्हणजे माकडाचें चित्र त्याच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभें राहीं. गृहस्थानें आपल्याकडून होती नव्हती तेवढी शिकस्त करून पाहिली, परंतु कांहीं केल्या जुळेना! व माकडाचीं कल्पना त्याच्या मनासमोरून नाहींशी होईना. जप करण्याला आरंभ करावा तों माकडाचीं मूर्ति आपली दत्त म्हणून उभी! यामुळें गृहस्थाला मोठा उद्वेग उत्पन्न झाला, व त्या साधूजवळ जाऊन तो त्याला म्हणाला, ‘ महाराज! माकडाची कल्पना आपल्या मनांत येऊं देऊं नकोस, असें आपण मला बजावलें नसतें, तर आपण सांगितलेल्या मंत्राचा जप मीं तेव्हांच केला असता, व माकडाची कल्पना माझ्या मनाला शिवली नसती. परंतु तुम्हीं मला इतकें बजावून सांगितलेंत यामुळें माझ्या मनांत एकसारखी माकडाचीच कल्पना येते. त्या माकडानें माझा पुरा पिच्छा घेतला आहे व तें मला सोडीत नाहीं!’ हाच न्याय ज्ञानाला लागू पडतो. अज्ञान बाजूला सारण्याच्या, त्याला झुगारून देण्याच्या प्रयत्नांत तुम्हीं आपल्या मनांत आज्ञानाला आणि दुर्बळपणाला कायमचें स्थान करून देतां.

## याचना कां करतां ?

सूर्यांमधून किंवा आकाशांतील नक्षत्रांमधून प्रकाशाचे किरण जसे आपोआप बाहेर येतात, तशीच ज्ञान्याची स्थिति आहे. वेदान्त म्हणतो कीं, ज्ञानाकरितांसुद्धां याचना करूं नका, ' भिक्षां देहि ' करण्याचें व्रत सोडून द्या, ज्ञानाची इच्छा नाहींशी करा, तिचा त्याग करा म्हणजे किती बहारीची स्थिति होते, तें पाहा तर खरें! सत्याचा निदिध्यास करा; मग ज्ञान प्राप्त होवो किंवा न होवो. 'मी सर्व चराचराचा सूर्य आहें, विश्वांतील प्रकाश तो मीच,' या भावनेचा निदिध्यास करा. असें झालें म्हणजे तुम्हीं दुसऱ्यांवर प्रेम करणारे न बनतां प्रत्यक्ष प्रेमच व्हाल, प्रेमस्वरूपी बनाल. तुम्हीं मूर्तिमंत प्रकाश असल्यामुळें प्रकाशाची, ज्ञानाची तुम्हांला याचना करण्याचें कारण नाहीं. ' मी देह किंवा मन नाहीं तर प्रत्यक्ष ज्ञानस्वरूप परमात्मा आहें, ' असें मनन चालूं द्या. आपण जीव आहों अशी कल्पना करून आपल्याला ज्ञान प्राप्त व्हावें, अशी आपण इच्छा करतों; परंतु आपण जीव नाहीं तर जीवाचे साक्षी आहों. आपणांस ज्ञान प्राप्त व्हावयाचें नसून आपण स्वयमेव ज्ञानस्वरूपी आहोंत, या तत्त्वाचें निरंतर मनन करा, त्याचा साक्षात्कार करून घ्या, म्हणजे निरिच्छतेच्या—निष्कामतेच्या स्थितीप्रत तुम्हीं जाऊन पोहोंचाल.

## सामर्थ्याची गुरुकिल्ली

एखाद्या गहन विषयासंबंधानें विचार करीत असतां रामाला पुष्कळ वेळां असा अनुभव आलेला आहे कीं, पुष्कळ वेळ विचार केला तरी मनांत घोळत असलेल्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर त्याला मिळत नसे. अशा रीतीनें बराच काळ गेल्यानंतर त्रासून जाऊन तो म्हणत असे कीं, आपल्याला ह्या प्रश्नाशीं काय करावयाचें आहे? या प्रश्नाचा विचार करण्याचें सोडून द्यावें म्हणजे संपलें ! परंतु असें केल्यावर दुसरा विचार मनांत येई कीं, ' ज्ञानाचा विचार—प्रश्न सुटण्यासंबंधाची इच्छा सोडून दे, तिचा अजीबात त्याग कर.' या विचारानंतर रामाचा प्रश्न आपोआप सुटे; त्याच्यापुढें असलेलें कोडें तेव्हांच उलगडे.

विश्वविद्यालयांतील वरच्या वर्गांत अध्ययन करीत असतां रामानें असा निश्चय केला होता कीं, प्रत्येक गोष्ट आपण स्वतःच्या प्रयत्नांनीं करावयाची. कोणताहि विषय शिकण्यासाठीं अध्यापकांच्या मदतीची वाट म्हणून पाहावयाची

नाहीं. रामानें हें स्वीकारलेलें व्रत खरोखर मोठें बिकट होतें. गणितशास्त्रांतील गहन सिद्धान्त अध्यापकांची मदत न घेतां सोडविण्याचा निश्चय करणें हें काम खरो-खरच धाडसाचें होतें. परंतु हा निश्चय रामानें केला होता; आणि गणितांतील सिद्धान्त सोडवितांना त्याला पुष्कळ वेळां अतिशय त्रास पडत असे. कित्येक वेळां संध्याकाळीं पांच वाजल्यापासून पाहाटेस चार पांच वाजेपर्यंत त्यानें आपल्याकडून प्रयत्नांची शर्थ करावी, परंतु हातीं घेतलेला सिद्धान्त म्हणून सुटूं नये, असा रामाचा अनुभव आहे. व अशा रीतीनें तासच्या तास चिंतनांत घालविल्यानंतर त्याचा जीव थकून जाई. सिद्धान्त न सुटल्यामुळें कित्येकवेळां तो इतका उद्विग्न आणि हताश होऊन जाई कीं, सुरी घेऊन आत्महत्या करावी, असाहि विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहात नसे. डोक्याला झालेला शीण किंचित् नाहींसा व्हावा, यासाठीं तो घराच्या वरच्या मजल्यावर गच्चीवर जाऊन बसे. परंतु त्यामुळें मनाला शांति न येतां त्याला असें वाटे कीं, आपण निश्चय केल्याप्रमाणें स्वतःच्या प्रयत्नानें सिद्धान्त सुटला नाहीं, तर जगून तरी काय करावयाचें? अशा रीतीनें मनाची स्थिति उदास होऊन जाई, व तो आपलें अंग जमीनीवर टाकून सर्व विचार सोडून देऊन स्वस्थ पडे.

चमत्काराची गोष्ट कीं, यानंतर लगेच त्या सिद्धान्ताचें उत्तर त्याच्या डोक्यांत येई. यावरून ही गोष्ट स्पष्टपणें दिसून येते कीं, आपण विचाराच्या अतीत झालों, म्हणजे विचार आकर्षण करण्याचें सामर्थ्य आपणांमध्यें येतें. या दिवसांतहि राम काय करतो? 'मी अमुक करीन, मी तमुक करीन, मी अमुक लिहीन, मी तमुक लिहीन;' अशा तऱ्हेच्या इच्छांना तो एकदम रजा देतो. व 'मी केवळ प्रकाशरूप आहें, आपल्या ऐश्वर्याचा मी केवळ उपभोग घेतों, निजानंदाचा अनुभव घेणें हेंच खरें यश आहे, बाकीच्या सर्व वस्तु मृगजल-वत् मिथ्या होत, व्यवहारदृष्टीनें जें यश म्हणून मानलें जातें तें जरी मला प्राप्त झालें तरीं त्याच्याशीं मला कांहींएक कर्तव्य नाहीं; कारण, आपल्या परमा-त्मस्वरूपाचा अनुभव यांतच सर्व आनंद सांठविलेला आहे,' असे विचार तो आपल्या मनांत दृढ करतो. ईश्वरी साक्षात्कार करून घेण्याचा प्रयत्न करा म्हणजे बाकीच्या सर्व गोष्टी तुमच्याकडे आपोआप चालून येतील. आपल्या हृदयांतील निजानंदाचें गुप्त भांडार आपल्या हस्तगत करून घ्या, म्हणजे बाकीच्या सर्व गोष्टी तुमच्या घरीं चालून येतील. मला जगांतील

कोणत्याहि वस्तूशीं कांहीं कर्तव्य नाहीं, माझ्यावर कोणतीहि जबाबदारी नाहीं, किंवा मला कशाचीहि भीति नाहीं. तूं अमुक कां केलेंस, असें मला विचारणारा कोणी नाहीं; मी कोणाचें कांहीं देणें लागत नाहीं, कारण मी परमात्मा आहें; केवल ज्ञानस्वरूपी आहें;' असा विचार नेहेमी करीत जा. जगापासून तुम्हांला कोणतें सुख मिळणार? सर्व सुखाचा, आनंदाचा प्रवाह तुमच्या हृदयांतून उत्पन्न होतो. तुमचा आत्मा—परमात्मा चिन्मय, आनंदस्वरूपी व सकल ऐश्वर्यानें युक्त आहे. या कल्पनेचा नेहेमी ध्यास करीत जा. अशारीतीनें तुम्हांला आपल्या स्वरूपाचा अनुभव झाला म्हणजे सर्व तऱ्हेच्या उच्च कल्पना आणि उदात्त विचार तुमच्या मनांत आपोआप उत्पन्न होऊं लागतील, असा सिद्धान्त आहे. अशारीतीनें तुम्हीं वागूं लागलां, ज्ञानाच्या इच्छेचाहि तुम्हीं त्याग केला म्हणजे इतरांच्या विचारांचें तुम्हांला आकर्षण करतां येईल. ही स्थिति ऋणविद्युत्प्रवाहासारखी आहे. त्याबरोबर आपण केवळ ज्ञानस्वरूपी आहों, सर्व ऐश्वर्यानें संपन्न आहों, अशी दृढ भावना करीत जा. ही स्थिति धनविद्युत्प्रवाहासारखी आहे.

एखादा मित्र आपणाला भेटावा, आपण संपत्तिमान् व्हावें असें तुम्हांला वाटत असेल, तर आरंभीं त्या इच्छेसंबंधाची आसक्ति मनांतून काढून टाका, आणि नंतर अशी भावना करीत जा कीं, 'मी परमात्मा आहें, सर्व प्रभूंचा प्रभु आहें, ज्योतींचीहि ज्योति आहें; सर्व सौंदर्य, सर्व सुख आणि आनंद मीच आहें; सर्व विश्वाचा अधिपति बिंबस्वरूपी परमात्मा मीच आहें;' ही भावना दृढ करीत जा, व आपल्या मनांतील इच्छेचा सर्वस्वी त्याग करा, व तुमच्या इच्छेचा विषय तुमच्यापुढें आला असतां त्याच्याकडे परमात्मभावनेनें पाहा. अशारीतीनें तुम्हीं अभ्यास करूं लागलां म्हणजे जगाच्या दृष्टीनें तुम्हीं पूर्ण यशस्वी व्हाल; परंतु तुमच्या स्वतःच्या दृष्टीनें तुम्हीं सर्व यशाच्या पलीकडे जाऊन पोहोंचलेले असाल.

एखाद्या ठिकाणची हवा सूर्याच्या उष्णतेनें विरळ झाली म्हणजे ती हवा वर जाऊं लागते, व त्याठिकाणीं पोकळी उत्पन्न होते; व बाहेरच्या प्रदेशांतील हवा त्याठिकाणीं जाऊन घुसते. याच न्यायानें तुम्हीं आपल्या इच्छेचा त्याग केलांत, परमात्मभावनेंत स्थिर झालांत म्हणजे तुमच्यांतील अहंकार नाहींसा होऊन तुमच्यामध्यें एक प्रकारची पोकळी उत्पन्न होते, व याचा परिणाम असा होतो कीं, जगांतील प्रत्येक पदार्थ तुमच्याकडे धावत येऊं लागतो. कित्येक शास्त्रज्ञांच्या मतें

चुंबकाची स्थिति ही जणूं अवकाशाची—पोकळीची स्थिति आहे. व तुम्हीं आपल्या ऐहिक इच्छा आणि आकांक्षा झुगारून दिल्यात म्हणजे तुम्हीं चुंबक बनतां. तुमच्यामध्यें एक प्रकारची पोकळी उत्पन्न होते; व असें झालें म्हणजे तुमच्या अंगांत विलक्षण आकर्षणशक्ति उत्पन्न होते.

## जडाचा त्याग

**प्रश्न:**—रोग बरे करण्यासाठीं किंवा होण्यासाठीं जडाचा त्याग करणें आवश्यक आहे कीं काय ?

**उत्तर:**—रोग बरे होण्याकरितां किंवा करण्याकरितां आपण निरोगी आहों, अशी भावना तुम्हीं केली पाहिजे. परमात्मभावनेव्यतिरिक्त तुम्हांला दुसरें कांहींहि दिसतां कामा नये. आपल्या परमात्मस्वरूपाचा निदिध्यास करा, म्हणजे रोग राहणार कसा ? अनामयत्व—निरोगीपणा, शक्ति वगैरे सर्व गोष्टी तुमच्याकडे धांवून येतील; परतु असें होण्यासाठीं सर्व इच्छांना फांटा देण्याला तुम्हीं शिकलें पाहिजे. आपल्याला ईश्वराचें दर्शन व्हावें, अशी इच्छा करूं नका. कारण, तुम्हीं सध्यांच ईश्वर आहां. ईश्वराचें दर्शन घडावें अशी इच्छा करणे म्हणजे ईश्वराला आपल्यापासून दूर झुगारून देण्यासारखें आहे ! जगाचें कल्याण करावें अशी तुम्हीं इच्छा करतां; परंतु तुमच्या मदतीची अपेक्षा करण्याइतकें जग दरिद्री बनलें आहे, अशी व्यर्थ कल्पना तुम्हीं कां करून घेतां ?

न्यूटन हा नेहमीं एकाग्र चिंतनांत गढून गेलेला असे. एकाग्र चिंतन याचा अर्थ ऐहिक स्वार्थी इच्छांच्या पलीकडे जाऊन पोहोंचणें असा आहे ; व न्यूटन याची स्थिति अशीच होती. आपल्यापुढें असलेल्या विषयांचें चिंतन करीत असतां न्यूटन याचा अहंकार पूर्णपणें नाहींसा होऊन जाई. व यामुळें न्यूटनला जगाचा उपकारकर्ता होतां आलें; मनुष्यजातीचें कल्याण करण्याचें सामर्थ्य त्याच्याठिकाणीं उत्पन्न झालें. कोणताहि शास्त्रीय सिद्धान्त सोडविण्याच्या वेळीं आपण यामुळें जगांवर उपकार करीत आहों, जगाला ज्ञानदान करून आपण त्याला कायमचे ऋणि करून ठेवीत आहों, असला क्षुद्र विचार त्याला कधीं शिवला नाहीं. तो केवळ आपल्या आनंदासाठीं काम करी. कामाशीं तद्रूप झाल्यामुळें आपल्याला आनंदाच्या स्थितींत राहातां येतें, या गोष्टीकडेच त्याचें लक्ष असे. व यामुळें त्याला जगाचा हितकर्ता होतां आलें. तुम्हींहि न्यूटनप्रमाणें वागण्यास

शिका. लोकांच्या निंदास्तुतीकडे बिलकुल लक्ष देऊं नका. जगाच्या दृष्टीनें जें यश म्हणून समजलें जातें, ती केवळ इंद्रियांची फसवणुक आहे. आपण 'एक-मेवाद्वितीयम्' असा परमात्मा आहों, आपण मूर्तिमंत यशच आहों, या भावनेशीं तुम्हीं तन्मय झालां, म्हणजे यश तुमच्यापुढें हात जोडून उभें राहील!

जडाचा त्याग केला पाहिजे कीं काय? असा प्रश्न आतां विचारण्यांत आला आहे, व त्याचें उत्तर 'होय' असें आहे. आपल्या परमात्मस्वरूपाची भावना दृढ करा म्हणजे जड राहणार कसें? जडाचा त्याग करा आणि परमा-त्मस्वरूपाची भावना दृढ करा. जडाचा त्याग करणें आणि परमात्मविषयक भावना दृढ करणें या वस्तुतः दोन गोष्टी नाहींत; त्या एकच आहेत. तसेंच आपला आत्मा प्रभु असून तो सर्वांचा साक्षी आहे, चंद्रसूर्यांना प्रकाशित करणारा आहे व तो बिंबस्वरूपी आहे, अशी भावना करीत जा. राम रस्त्यांतून चालत असतां तो असें मनन करतो कीं, या आकाशांतील सूर्यामध्यें केवढें सामर्थ्य आहे! आकाशांतील मेघ आणि दहिंवर यांची उत्पत्ति सूर्यापासूनच होते. कित्येक लोकांचें म्हणणें असें आहे कीं, या सर्वांचें कारण पृथ्वी हें आहे; परंतु हें मत बरोबर नाहीं. पाणी, मेघ, दहिंवर वगैरे सर्वांच्या उत्पत्तीला कारण सूर्यच आहे; त्या सर्वांना सूर्य उत्पन्न करतो व तो त्यांच्याकडे टवकारून पाहूं लागला म्हणजे मेघ आणि दहिंवर एकदम नाहींशीं होतात. आपण सूर्याप्रमाणें बिंबस्वरूपी आहों, अशी भावना दृढ करून, प्रतिबिंबामुळें उत्पन्न होणारें धुकें—अज्ञान नाहींसें करणें, ही आत्मसाक्षात्काराची श्रेष्ठ दर्जाची स्थिति आहे.

इकडील लोक म्हणतात कीं, मनुष्य हा ईश्वराचें प्रतिबिंब आहे; परंतु राम सांगतो कीं, आपण प्रतिबिंब आहों असें तुम्हीं मानूं लागा म्हणजे तुम्हीं नेहेमीं दुःखांत खितपत पडाल! तुम्हीं ईश्वराची प्रतिमा किंवा प्रतिबिंब नसून स्वयमेव ईश्वरच आहांत. सूर्याचें पाण्यामध्यें प्रतिबिंब पडलेलें असतें, व त्या प्रतिबिंबाच्या दृष्टीनें आकाशांतील सूर्य हा बिंब आहे, असें आपण म्हणतों. आत्मसाक्षात्काराच्या आरंभींच्या अवस्थेमध्यें आकाशांतील सूर्याप्रमाणें आपण बिंबस्वरूपी आहों, असा मनुष्याला अनुभव येतो.

डोळ्यांची उघडझांप चालली असतां राम असें चिंतन करतो कीं, आका-शांतील सूर्य, चंद्र, नक्षत्रें वगैरे सर्वांना मी व्यापून राहिलों आहें, त्यांना सामर्थ्य,

तेज आणि जीवन देण्याचें काम मीच करतों; मी त्यांचा आधार आहें; तीं सर्व माझीं प्रतिबिंबें असून मी त्यांचा साक्षी, बिंबस्वरूपी आहें. आत्मसाक्षात्काराची ही एक स्थिति आहे. या स्थितीचा तुम्हीं अनुभव करून घ्या, म्हणजे सर्व मत्सर, द्वेष, भीति वगैरे विकारांना तुमच्या अंतःकरणांत अवकाश मिळणार नाहीं; दुसरे लोक आपली संपत्ति हिरावून नेतील, या भीतीचा स्पर्शहि तुम्हांला होणार नाहीं.

मुलानें एखादें पुस्तक घेतलें, तर मुलाची आई त्याच्यावर रागावते काय ? नाहीं. याचें कारण काय ? कारण हें कीं, तें मूल व पुस्तक हीं आपलींच आहेत, अशी तिची भावना असल्यामुळें तिला रागावण्याला कांहीं कारण उरत नाहीं. या न्यायानें एखाद्या मनुष्यानें तुमच्यापासून कांहीं वस्तु चोरून नेली तर त्याबद्दल त्यांच्यावर रागावूं नका. कारण, तो चोर आणि तुम्हीं एकच आहां, व त्यानें जी वस्तु चोरून नेली ती जशी तुमची तशी त्याचीहि आहे. लोक ज्याला यश किंवा सुख असें म्हणतात तें प्रार्थना करून किंवा याचना करून मिळण्यासारखें असेल, परंतु तुमच्या दृष्टीनें तें खरें यश किंवा सुख नव्हे. सत्स्वरूपाचा साक्षात्कार करून घेणें हेंच तुमचें ध्येय आहे, व तें प्राप्त करून घेत असतां ऐहिक सुखें आणि मोह तुमच्यापुढें येऊन तुम्हांला भुरळ पाडूं लागतील, तर त्यांना तुम्हीं असें साफ सांगा कीं, 'सैताना ! तुझ्यापासून मी कोणत्याहि सुखाची अपेक्षा करीत नाहीं.' असें झालें म्हणजे तुम्हीं कितीतरी सुखी व्हाल ! प्रत्यक्ष स्वर्गच तुमच्या हातीं येईल, व तुम्हीं पूर्ण यशाचे वांटेकरी व्हाल.

आपण निरोगी व्हावें, आपले रोग नाहींसे व्हावेत असें तुम्हांला वाटत असेल, तर त्यासाठीं जडाचा त्याग करणें जरूर आहे काय ? असा तुमचा प्रश्न आहे. या प्रश्नाचें 'होय' असें उत्तर देण्यांत आलें आहे; परंतु या प्रश्नाचा दुसऱ्या एका दृष्टीनें विचार करण्यासारखा आहे, व त्या दृष्टीनें 'नाहीं' हें त्याचें उत्तर आहे. तुम्हीं आपल्या ठिकाणीं परमात्मभावना जागृत करा, व सूर्यानें धुक्याकडे किंवा दहिंवराकडे पाहिलें म्हणजे तें तत्काल नाहींसें होतें ही जी आत्मसाक्षात्काराची उच्च स्थिति म्हणून आतांच सांगण्यांत आली, तींत स्थिर व्हा, म्हणजे द्वैताला जागा राहाणार नाहीं, जड म्हणून कांहीं राहणार नाहीं. मग त्याग करावयाचा तो कसला ? आपल्याशिवाय जगांत दुसरें कांहींच नाहीं, या अन्वयज्ञानाच्या स्थिती-प्रत जाऊन पोहोंचलांत म्हणजे जडाचा आपोआप निरासच होतो.

## राजमार्ग स्वीकारा

प्राणायाम व श्वासोच्छ्वासाचे नियम यांसंबंधानें लोकांचा मोठा कटाक्ष असतो. परंतु राम म्हणतो कीं, 'अहं ब्रह्मास्मि' या तत्त्वाशीं तुम्हीं तद्रूप झालां म्हणजे श्वासोच्छ्वासाचें नियमन आपोआप होतें; त्यासंबंधानें निराळा अभ्यास करण्याचें कारण नाहीं. तुम्हीं ॐ या मंत्राचा जप करूं लागलां, व आपल्या स्वरूपाची भावना तुमच्या ठिकाणीं जागृत झाली म्हणजे प्राणवायु अनायासें स्थिर होतो, व त्याची क्रिया योगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सहज होऊं लागते. मग पूरक, कुंभक, रेचक यांचा स्वतंत्र अभ्यास करण्याची जरूर नाहीं. सारांश, आत्मानुभव हीच काय ती मुख्य महत्त्वाची बाब आहे. बाकीच्या सर्व गोष्टी त्याबरोबर आपोआप उत्पन्न होतील.

या देशांतील कांहीं लोकांना आपले नाक, डोळे, हनुवटी वगैरे अवयव सुंदर दिसावे असें वाटतें. परंतु राम म्हणतो कीं, कांहीं उपाय करून ही गोष्ट जरी सिद्ध झाली तरी त्यापासून तुम्हांला खरें सुख होणें शक्य नाहीं. जोंपर्यंत तुमच्या ठिकाणीं देहात्मभावना जागृत आहे, देहाच्या देखणेंपणामुळें जोंपर्यंत तुम्हांला सुख वाटत आहे, तोंपर्यंत तुम्हीं संकुचित आहां, व संकुचितपणांत— देहबुद्धींत खऱ्या सुखाचा लाभ होणें अशक्य आहे. कांहीं तऱ्हेचा अभ्यास करून आपल्या अंगांतील गूढ शक्ति जागृत करावी, व त्याच्या योगानें आपण संपत्तिमान् बनावें, असा कित्येक लोकांचा प्रयत्न असतो. परंतु अशा प्रयत्ना- पासून खरा फायदा न होतां तुम्हीं दुःखी आणि दुर्दैवीच राहाल, ही गोष्ट लक्षांत ठेवा. सुरूपता, सौंदर्य, संपत्ति, निरोगीपणा वगैरे गोष्टी प्राप्त व्हाव्या असें तुम्हांला वाटत असेल, तर वेदान्तांत सांगितलेल्या वैराग्याच्या तत्त्वाचा अंशतः अभ्यास करणें जरूर आहे. ज्या मानानें ऐहिक वस्तूंचा लाभ व्हावा असें तुम्हांला वाटत असेल, त्या मानानें वैराग्याचें तत्त्व अमलांत आणिलें पाहिजे. परंतु असल्या किरकोळ लाभानें खरें कार्य होणार नाहीं. मग अशा स्थितींत सामर्थ्याच्या केंद्रस्थानाकडे वळून तुम्हीं आत्मसाक्षात्कार करून कां घेत नाहीं? असें केल्यानें तुमच्या इच्छेचे सर्व विषय तुमच्याकडे चालून येती- लच, व याशिवाय सर्व तऱ्हेचा लाभ तुमच्या वरीं आपोआप चालत येईल. यासाठीं किरकोळ वस्तूंच्या लाभानें तुम्हीं संतुष्ट होऊं नका. तर राजमार्गाचा

अवलंब करून अत्यंत श्रेयस्कर अशी मोक्षस्थिति प्राप्त करून घ्या. मोक्षाकडे जाण्याचा अगदीं जवळचा मार्ग म्हटला म्हणजे मोक्ष आपल्या ठिकाणीं सध्यांच आहे, हें जाणून त्याचा अनुभव करून घेणें हाच आहे.

## श्रद्धा आणि अभ्यास

आत्मानुभव होण्याला दोन मार्ग आहेत; एक श्रद्धा आणि दुसरा अभ्यास. वेदान्त—तत्त्वज्ञानाचा तुम्हीं अभ्यास करूं लागलां म्हणजे तुमच्या मनांतील सर्व शंका निवारण होतील. वेदान्ततत्त्वज्ञानाचें सविस्तर विवरण लौकरच करण्याचा रामाचा विचार आहे. तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून आपलें काम होत नाहीं असें तुम्हांला वाटेल तर तें तत्त्वज्ञान आपला उद्धार करील, अशी निदान श्रद्धा ठेवा. श्रद्धेचें कार्य लहानसहान नाहीं. ख्रिस्ती मनुष्य बायबलांत सांगितल्याप्रमाणें आचरण करूं लागला म्हणजे ख्रिस्ताचें ज्ञान त्याच्या ठिकाणीं आलें, असें होत नाहीं; परंतु त्याच्या ठिकाणीं श्रद्धा असते, व श्रद्धा हेंच निःसंशय तारक तत्त्व आहे* यासाठीं राम म्हणतो कीं, ज्यांना पुरेसा वेळ असेल व वेदान्त—ग्रंथांची गोडी असेल त्यांनीं सदरहू ग्रंथांचें मननपूर्वक अध्ययन करावें. परंतु तसें करण्यास सवड नसेल तर रामावर—ईश्वरावर, आपल्या आत्म्यावर निदान दृढ श्रद्धा तरी ठेवावी. आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याला याशिवाय दुसरा मार्गच नाहीं.

---



* श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः गीता. अ. १७।३

# आरण्यक संवाद



## विवाहाचा आदर्श



एका देशांतील राजपुत्र त्या देशच्या राज्यपदावर आरूढ झाला. तो मोठा विद्वान, उदार आणि पराक्रमी होता. गादीवर येऊन बरेच दिवस झाले तरी तो विवाह करीना. हें पाहून लोकांना मोठी चिंता उत्पन्न झाली. राजानें विवाह केला नाहीं, तर गादीला पुढेंमागें कोणी वारस मिळणार नाहीं, असा विचार मनांत येऊन विवाह करण्याविषयीं राजाचें मन वळविण्याकरितां लोकांनीं आपल्याकडून शिकस्त केली व राजानेंहि शेवटीं लोकांचा फार आग्रह पाहून त्यांची विनंति मान्य केली. परंतु आपल्या पसंतीला येईल त्या मुलीशीं आपण विवाह करूं, अशी त्यानें अट घातली. ज्या देशासंबंधानें ही गोष्ट सांगितली जात आहे, त्यांत स्वयंवराची कल्पना लोकांना मान्य नव्हती. पूर्वपरंपरेच्या चालीरीतींप्रमाणें विवाह झाला पाहिजे, केवळ वराच्या इच्छेप्रमाणेंच वधु पसंत केली जाऊं नये, अशी त्या ठिकाणची चाल होती. राजाची ही विलक्षण अट पाहून दरबारी लोकांना मोठें आश्चर्य वाटलें; परंतु राजाची ती अट आपण मान्य केली नाहीं तर तो जन्मभर अविवाहित स्थितींत राहील अशी धास्ती पडल्यामुळें, राजाच्या म्हणण्याला रुकार देणें त्यांना भाग पडलें. राजानें लगेच विवाहोत्सवासंबंधाची जय्यत तयारी करण्याबद्दल आपल्या अधिकाऱ्यांना आणि दरबारी लोकांना हुकूम केला।

हुकुमाप्रमाणें सर्व राजधानी विवाहोत्सवाच्या आनंदानें गजबजून गेली. सर्व नगर शृंगारण्यांत आलें व लोक आपआपले उंची पोषाख चढवून उत्कृष्ट रीतीनें शृंगारलेल्या गाड्यांतून आणि घोड्यांवरून राजवाड्याकडे जाऊं लागले. राजाचीं सर्व सैन्यें राजवाड्याभोंवतीं जमा झालीं. इतक्यांत राजाची स्वारी एका हत्तीच्या अंबारींत बसून राजवाड्यांतून बाहेर पडली. सैन्याचा अर्धा भाग पुढें निघाला होता व अर्धा भाग स्वारीच्या पाठीमागून चालला होता. अमुक एका विशिष्ट

रस्त्यानें जावयाचें, असा राजानें पूर्वी हुकूम केलेला नसल्यामुळें राजा सांगेल त्याप्रमाणें लोकांची मिरवणूक चालली होती. राजधानीबाहेर गेल्यानंतर मोठमोठ्या अरण्यांतून मिरवणूक जात होती, हें पाहून लोकांना मोठें आश्चर्य वाटलें. ते आपसांत म्हणूं लागले, 'काय हो, राजाला वेड तर लागलें नाहीं ना! हा विवाहसमारंभासाठीं निघाला आहे, मग त्यासाठीं रानांतून जाण्याचें काय कारण? रानांतील एखाद्या सरोवराशीं किंवा झाडाच्या बुंध्याशीं लग्न करण्याचा याचा विचार आहे कीं काय?' परंतु आपसांत कुजबुजण्याशिवाय लोक तरी काय करणार? राजा हुकूम करील त्याप्रमाणें रानावनांतून बिचारे पुढें पुढें चालले होते. अखेरीस रानांतील एका जागीं ते जाऊन पोहोंचले. त्याठिकाणीं एक सुंदर सरोवर दिसत होतें. सरोवराच्या कांठीं एक लहानशी झोंपडी होती व तेथून कांहीं अंतरावर एक सुंदर बगीचा होता. बगीच्यांतील एका झाडावरून एक झोंपाळा लोंबत होता व त्यावर एक वृद्ध मनुष्य बसला होता. लोकांनीं जेव्हां हा देखावा पाहिला, तेव्हां ते म्हणूं लागले, 'आमचे राजेसाहेब ह्या म्हाताऱ्या मनुष्याशीं लग्न करणार कीं काय?' त्यावेळीं राजाची अर्धी सेना त्या बगीच्या पलीकडे गेली असून राजाचा हत्ती त्याठिकाणीं येऊन पोहोंचला. त्या बगीच्यांत येतांच राजानें आपल्या सैन्याला त्याठिकाणीं थांबण्याचा हुकूम केला. इतक्यांत एक लावण्यसंपन्न कुमारिका त्याठिकाणीं येऊन पोहोंचली व झोंपाळ्याला झोंके देऊन आपल्या त्या वृद्ध बापाची सेवा करूं लागली.

राज्यपदावर आरूढ होण्याच्या पूर्वीं राजा त्या अरण्यांत अनेक वेळां येऊन गेला होता. त्याठिकाणीं ती नयनमनोहर कुमारिका आपल्या पित्याची अत्यंत पूज्यभावानें सेवा करीत असल्याचा देखावा त्यानें बरेच वेळां पाहिला होता, व यामुळें त्या कुमारिकेबद्दल त्याला मोठें कौतुक वाटे. ती कुमारिका नित्य नियमानें आपल्या घरांतील झाडलोट करी, घरांतून पाणी आणून ती बापाला स्नान घाली व नंतर त्याच्या भोजनाची सर्व व्यवस्था करून त्याला आपल्या हातानें नेहेमीं अन्न खाऊं घाली. परंतु त्यांतल्या त्यांत विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, इतकें कावाडकष्टाचें काम नेहेमीं करीत असूनहि तिची आनंदी मुद्रा कधींहि भंग पावली नाहीं. तिच्या मुखावरील तजेला व टवटवी कधीं कमी झाली नाहीं. एखादा पक्षी आनंदानें लकेऱ्या मारीत रानांतून फिरत असतो, त्याप्रमाणें तिच्या चित्ताची समाधानवृत्ति, लीलेनें पडणाऱ्या तिच्या पावलांमध्यें प्रतिबिंबित होत असे.

त्या कुमारिकेची ती आनंदी मुद्रा पाहून राजपुत्राच्या मनांत तिच्याबद्दल प्रेम उत्पन्न झालें, व ' लग्न करीन तर याच कुमारिकेशीं करीन, ' असा त्याचा ठाम निश्चय झाला होता. त्या कुमारिकेनेंहि राजपुत्राला घोड्यावर बसून उपवनांत येतांना पूर्वीं अनेकवेळां पाहिलें होतें. परंतु हत्तीच्या अंबारींत बसलेला व सर्व तऱ्हेच्या ऐश्वर्यानें आणि वैभवानें युक्त असलेला तो राजा पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. आपल्या उपवनांत पूर्वीं अनेकवेळां आलेला राजपुत्रच या ठिकाणीं राजवेषानें आला आहे, ही गोष्ट तिला माहीत नसल्यामुळें " या सर्व देखाव्याचा अर्थ काय ?" असा तिनें पित्याला प्रश्न केला. त्यावर तो वृद्ध गृहस्थ म्हणाला:—" हा राजा स्वयंवर करण्यासाठीं निघाला आहे व त्याचा हा सर्व परिवार आहे !" या सुमारास राजा आपल्या हत्तीच्या अंबारींतून खालीं उतरला, व त्या वृद्ध गृहस्थाजवळ येऊन त्याला साष्टांग नमस्कार करून व त्याचे पुढें हात जोडून मोठ्या विनयानें उभा राहिला. तो वृद्ध गृहस्थ राजाला म्हणाला, " हे ताता ! तुझी काय इच्छा आहे, तें मला सांग." त्या वृद्ध गृहस्थाचे ते प्रेमळपणाचे उद्गार ऐकून राजाचा चेहेरा प्रफुल्लित झाला, व आपलें मनोगत त्याला उघडें करून दाखविलें असतां आपली इष्टकार्यसिद्धि होईल, अशी आशा वाटून तो म्हणाला, "महाराज, आपण मला आपला जामात करावेंत अशी माझी अंतःकरण-पूर्वक इच्छा आहे." राजाची ही विनंति ऐकून म्हाताऱ्याची चित्तवृत्ति प्रसन्न झाली, परंतु राजाची परीक्षा करण्याच्या उद्देशानें तो त्याला म्हणाला, " बा राजा, तूं हें काय म्हणतो आहेस ? मी काय, एक क्षुद्र मनुष्य आहें. माझ्यांसारख्या भिकाऱ्याच्या मुलीशीं तुझ्यासारख्यानें लग्न करण्याची इच्छा करावी, हें खरो-खर अनुचित आहे. तूं काय करीत आहेस, याचा आपल्याशीं नीट विचार कर. त्यावर तो राजा म्हणाला, " माझें ह्या मुलीवर प्रेम जडलें आहे, व करीन तर हिच्याशींच लग्न करीन, असा माझ्या मनाचा ठाम निश्चय होऊन गेला आहे. मग याउपर आपली मर्जी." " असें असेल तर माझी कांहीं हरकत नाहीं," असें त्या वृद्धानें राजाच्या भाषणावर उत्तर केलें. हा वृद्ध म्हणजे कोणी सामान्य मनुष्य नव्हता. वेदान्तज्ञानांत मुरून गेलेला असा तो एक सत्पुरुष होता, व त्याच्या सहवासांत राहिल्यामुळें त्याची कन्याहि वेदान्ती बनलेली होती. आपल्या कन्येशीं विवाह करण्याचा राजाचा दृढ निश्चय आहे असें पाहून आपली कन्या त्या वृद्धानें राजाला अर्पण केली. वरदक्षिणा देण्याला त्या वृद्धाजवळ मुळींच संपत्ति नव्हती

परंतु कन्येची पाठवणी करतांना त्यानें तिला कांहींच देऊन ठेविलें नाहीं असें नाहीं. राजानें एका मोठ्या करंडकामध्यें मौल्यवान् वस्त्रें व अलंकार आणिले होते. तीं उंचीं वस्त्रें परिधान करून त्यावर अलंकार घालण्यास राजानें तिला सांगितलें, व त्याप्रमाणें केल्यानंतर ती राजाबरोबर जाण्यास सिद्ध झाली. तेव्हां तिचीं पूर्वींचीं फाटकीं तुटकीं वस्त्रें त्या करंडकांत घालून त्या वृद्धानें आपल्या कन्येची पाठवणी केली. वृद्ध गृहस्थाला नमस्कार करून जाण्यापूर्वीं त्याची सेवा करण्यासाठीं राजानें आपला एक नोकर त्याच्याजवळ ठेवून दिला.

राजाची स्वारी तेथून निघाली, ती आपल्या सेना परिवारासह राजधानींत तडक परत आली. दरबारी लोकांना राजाचें हें स्वयंवराचें कृत्य पसंत पडलें नाहीं. राज्यांतील सरदार आणि बडेबडे जमीनदार यांच्या मनांतून राजानें आपल्या किंवा आपल्या नातेवाईकांच्या कन्यांपैकीं एखादीबरोबर विवाह करावा असें होतें. राजानें ही भिकाऱ्याची मुलगी केलेली पाहून त्यांना अतिशय वाईट वाटलें, व ते तिला पाण्यांत पाहूं लागले. परंतु त्या नव्या राणीचा स्वभाव इतका चांगला होता, व तिच्याठिकाणची नम्रता आणि मोहकता इतकी कांहीं विलक्षण होती कीं, तिनें सर्वांचीं अंतःकरणें भारून टाकलीं. जे जे लोक अंतर्यामीं तिचा द्वेष करीत ते ते पुढें तिच्यावर बाह्यतः प्रेम करूं लागले. राणीची वृत्ति अत्यंत शान्त आणि प्रसन्न होती. आपल्या भोंवतालची परिस्थिति कितीहि बिघडली तरी त्याचा तिच्या मनावर यत्किंचित्‌हि परिणाम होत नसे. प्रसंगांत डगमगून जाणें हें तिच्या गांवींहि नव्हतें. विवाह होऊन एकदोन वर्षें झाल्यानंतर तिला एक कन्या झाली. ही कन्या आपल्या मातेप्रमाणेंच अत्यंत सुस्वरूप होती. कन्यारत्न झालेलें पाहून राजा आणि राणी अशा दोघांचाहि आनंद गगनांत मावेनासा झाला. पुढें ती कन्या तीन चार वर्षांची झाली असेल नसेल, तोंच एके दिवशीं राजा आपल्या राणीच्या महालांत आला, व मोठ्या चिंतातुर मुद्रेनें म्हणाला "प्रिये, आपल्यावर एक मोठा प्रसंग येऊन गुदरला आहे! राज्यामध्यें लौकरच बंड उद्भवण्याचा संभव आहे." "आपल्या राज्यांत सर्वत्र शांतता नांदत असतां व जिकडे तिकडे लोक सुखी असतां एकाएकीं बंड उत्पन्न होण्याचें कारण काय?" असें तिनें राजाला विचारलें असतां तो म्हणाला, "प्रिये, याचें कारण फार नाजुक आहे. राज्यांतील मोठमोठ्या सरदारांच्या मनांतून मीं त्यांच्यापैकीं

एखाद्या कुलीन आणि नांवाजलेल्या घराण्यांतील कन्येशीं विवाह करावा असें फार होतें; परंतु त्यांच्या विनंतीला मान न देतां मीं तुझ्याशीं लग्न केलें, ही गोष्ट त्यांच्या मनाला लागून राहिली व त्यांचा क्रोधाग्नि भडकला. आतां आपल्याला मुलगी झालेली असल्यामुळें त्यांच्या संतापाला तर पारावार नाहींसा झाला आहे. लोकांचा संताप नाहींसा करण्यासाठीं काय तोड काढावी, यासंबंधानें मीं पुष्कळ विचार करून पाहिला; परंतु आपल्या या कन्येला जिवंत ठेवून, क्षुब्ध झालेलें लोकमत शांत करण्याचा मला कोणताहि उपाय दिसत नाहीं. यासाठीं आपल्या मनाला कितीहि वाईट वाटलें तरी आपल्या कन्येला जगांतून नाहींशी करावी हाच एक उपाय मला दिसतो. कारण, प्रजानुरंजन करणें हें राजाचें पवित्र कर्तव्य आहे, व हाच मुख्य राजधर्म आहे; मग त्यासाठीं आपलें कितीहि नुकसान होवो!' राजाचें भाषण ऐकतांच अत्यंत शांत आणि गंभीर स्वरानें राणी म्हणाली, "मग त्यांत काय आहे? मी आपल्या इच्छेच्या कधींच बाहेर नाहीं. मी आपल्या अरण्यांतील झोपडींतून या राजवाड्यांत आलें आहें, ही गोष्ट खरी; परंतु राज्यसुखाचा उपभोग करून घ्यावा, हा विचार माझ्या मनाला आजपर्यंत कधीं शिवला नाहीं. माझी इच्छा ती कसली ? ज्या मंगल दिवशीं मी आपली झाल्यें त्या दिवशींच मीं सर्वस्व आपल्याला अर्पण केलें आहे. माझी इच्छा अशी आतां कोणतीच राहिली नाहीं! जी आपली इच्छा तीच माझी इच्छा! जी गोष्ट आपल्याला योग्य वाटते, ती शिरसावंद्य करणें हाच माझा धर्म आहे. आपले हेतु परिपूर्ण करावे, व कायावाचामनेंकरून आपली सेवा करावी, इतकेंच माझें कर्तव्य आहे. ही कन्या लोककल्याणासाठीं मारून टाकावी असें आपल्याला वाटत असेल, तर त्याला माझी बिलकुल हरकत नाहीं; कारण. ही कन्या माझी, असल्या ममत्वाच्या कल्पनेला माझ्या अंतःकरणांत वावच राहिलेला नाहीं." आपल्या प्रियतमेचें हें भाषण ऐकून राजाला परम आश्चर्य वाटलें, व मध्यरात्री-नंतर त्यानें ती कन्या नाइलाजास्तव मारेकऱ्यांच्या हातीं दिली, व तसें केल्याचें पुन्हां राणीला येऊन सांगितलें. परंतु राणीच्या मनाला त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं. तिची वृत्ति पूर्वींप्रमाणेंच निश्चल, शांत आणि प्रसन्न होती. जणूं कांहीं आपल्यावर दुःखाचा डोंगर कोसळला आहे, ही गोष्ट तिला माहीतच नव्हती! यालाच वेदान्त म्हणतात. बाह्य प्रतिकूल परिस्थितीचा मनावर यत्किंचित्‌हि परिणाम न होणें, संकटांत खचून न जातां

वृत्तीची शांतता केव्हांहि भंग न पावणें, हीच वेदान्त अंगीं बाणल्याची खूण होय !

राजानें कन्येला मारेकऱ्यांकडून मारून टाकल्यानंतर राज्यांतील लोक आतां खूष होतील असें त्याला वाटलें, व त्याप्रमाणें त्यानें राणीला येऊन सांगितलें.पुढें एक वर्ष लोटल्यानंतर राजाला मुलगा झाला. हा मुलगा इतका सुंदर होता कीं, त्याच्यावर सर्वांचें प्रेम जडलें;पण मुलगा पांचसहा वर्षांचा झाल्यानंतर मागचेंसंकट पुन्हां उद्भवण्याचा संभव दिसूं लागला. राष्ट्रांतील लोक बंडाळी माजवून राष्ट्रांतील शांतता नाहींशी करणार असें त्याला वाटूं लागलें, व त्याप्रमाणें तो राणीकडे येऊन म्हणाला, "प्रिये ! काय करावें ? राज्यांत यादवी माजण्याचा पुन्हां रंग दिसत आहे. राष्ट्रांतील शांततेचा भंग होऊन जिकडे तिकडे रक्तपात होणार अशी भीति वाटूं लागली आहे. लोकांचीं मनें शांत करण्यासाठीं आपल्या पुत्राचा बळीं देणें अवश्य आहे, असें माझें मत झालें आहे; पण यावर तुझें काय म्हणणें आहे तें सांग." राजाचें भाषण ऐकून राणीच्या मनाला यत्किंचित्हि खेद झाला नाहीं, व तिच्या आनंदी वृत्तींत तिळमात्र फरक पडला नाहीं. ती राजाला म्हणाली, "मग एवढेंच ना ? माझा आत्माच राष्ट्ररूपानें नटलेला आहे ! व्यक्तिविषयक संकुचित भावना माझ्या ठिकाणीं मुळींच शिल्लक राहिलेली नाहीं. आकाशांत आपल्या दिव्य तेजानें नित्य विलसणाऱ्या दिनमणीप्रमाणें माझी स्थिति आहे. नेहेमीं दान करावें, सर्वस्वाचा त्याग करावा, स्वतःकरितां कशाचीहि याचना करूं नये, प्रतिग्रहाची कधींहि अपेक्षा करूं नये, हेंच आपलें कर्तव्य आहे. सूर्य आपल्या प्रकाशाचा नेहमीं त्याग करतो व सर्व चराचराला जीवन देतो. परंतु जगापासून तो कशाची तरी अपेक्षा करतो का ? हाच सूर्याचा कित्ता आपण गिरविला पाहिंजे. विषयावरील आसक्ति आपण मनांतून काढून टाकली, कोणत्याहि विषयाबद्दल ममत्वबुद्धि धारण केली नाहीं, म्हणजे आपल्या सुखाचा भंग कालत्रयींहि होणें शक्य नाहीं. सूर्य सदोदित प्रकाशांचा त्याग करीत असतो, परंतु त्यामुळें त्याच्या स्वतःच्या प्रकाशरूपतेंत कधींहि कमीपणा येत नाहीं. आपणहि याचप्रमाणें वागलें पाहिजे; म्हणजे जगांतील कोणत्याहि परिस्थितीमुळें आपल्या आनन्दवृत्तीचा भंग होणार नाहीं." राणीचे हे उद्गार ऐकून राजालाहि आश्चर्य वाटलें ! त्यानें

आपल्या पुत्राला नाइलाजास्तव पूर्वीप्रमाणें मारेकऱ्यांच्या स्वाधीन केलें. पुढें कांहीं वर्षे लोटल्यानंतर त्याला आणखी एक मुलगा झाला, पण त्याचीहि व्यवथा त्यानें पूर्वीप्रमाणेंच केली.

आपलीं तीन मुलें मारेकऱ्यांच्या हातून मारली गेलीं, परंतु त्याबद्दल राणीच्या चित्ताला यत्किंचित्‌हि खेद झाला नाहीं, याचें कारण काय ? असा प्रश्न तुमच्या मनांत उत्पन्न होईल. याचें उत्तर असें आहे कीं, विवाह झाल्या दिवसापासून रोज फुरसतीच्या वेळीं राणी आपल्या महालांत जाई, व आपल्या अंगावर परिधान केलेलीं उंचीं वस्त्रें काढून ठेवून अरण्यांतून येतांना आपल्या बरोबर आणलेल्या फाटक्या तुटक्या चिंध्या ती आपल्या अंगावर घाली व अशारीतीनें पोषाख करून ' अहं ब्रह्मास्मि ' या तत्त्वाचा दररोज निदिध्यास करी; भिकाऱ्याच्या वेषांत राहून आपणांमधील परमात्मतत्वाचा अनुभव करून घेण्याचा तिचा अभ्यास नित्यशः चालू असे.

' ज्याच्या डोक्यावर राजमुकुट असतो, त्याच्या चित्ताला स्वस्थता कशी ती मिळत नाहीं, ' असें शेक्सपिअर म्हणतो. राणीला ही गोष्ट पूर्णपणें माहीत होती, व राज्ञीपणावर आरूढ होण्यांत सुखाचा लवलेशहि नाहीं, ही गोष्ट ती जाणत होती. आपण राजवैभवाचा उपभोग घेत आहों, असें तिला कधींहिं वाटत नसून, आपली मुळची स्थिति ती विसरली नाहीं. अरण्यांत आपल्या पित्याच्या सन्निध सरोवराच्या कांठीं ती जशी आनंदानें गाणीं म्हणत असे, त्याचप्रमाणें राजवाड्यांतहि तिची तीच स्थिति होती. अरण्यांतील तिचें स्वातंत्र्य आणि स्वच्छंदवृत्ति ती राजवाड्यांत कोंडली गेल्यामुळें नाहींशी झाली होती; परंतु राजवाडा हा तुरुंग आहे, अशी तिची भावना असल्यामुळें राजवाड्यांतील ऐषआरामांत ती कधींच दंग झाली नाहीं. आपल्या भोंवतालच्या चैनीच्या वस्तूंवर ती आसक्त झाली नव्हती; आपल्या परिस्थितीचे आपण साक्षी आहों, या उच्च भावनेमुळें तिनें आपली वृत्ति विषयांपासून अलिप्त राखिली होती. आपल्या भोंवतालच्या क्षुद्र मायाजाळांत वृत्तीला गुरफटवूं न देतां, तिला परमात्मभावनेंत मुरवून टाकण्याचा तिनें अभ्यास केला होता. अशा रीतीनें चित्त शुद्ध करण्याचा अभ्यास केल्यामुळें, तिचें चित्त निर्भय आणि निरासक्त झालें होतें. आपल्यावर कोणत्याहि तऱ्हेची जबाबदारी आहे, कर्तव्यकर्म करण्याला आपण बांधले गेलों

आहों, आपला कोणाशीं नात्यागोत्याचा संबंध आहे वगैरे क्षुद्र विकारांना तिच्या मनांत थारा मिळेनासा झाला होता, व तिची आनंदवृत्ति अखंड राहाण्याचें बीज यांतच होतें. तुम्हीं जेव्हां निराश झालां असाल, उदासीनता आणि उद्विग्नता यांचा तुमच्या मनावर पगडा बसला असेल, तेव्हां आपल्या नात्यागोत्याचे संबंध, विषयांवरील आसक्ति, मनांतील सर्व तऱ्हेच्या इच्छा, कामना आणि आकांक्षा यांना फांटा देण्याचा प्रयत्न करीत जा. आपण स्वतंत्र आहों, मुक्त आहों, अशी दृढ भावना करीत जा. अशा तऱ्हेचा अभ्यास राणीनें केला होता, व राजवाड्यांतील राजविलासांत लोळत असतां, तिच्या मनाची प्रसन्नवृत्ति कायम राहूं शकली. यांतील इंगित हेंच होय !

एके दिवशीं रात्रीं राजा राणीच्या महालांत येऊन म्हणाला, " आजपर्यंत आपल्या मुलांना आणि मुलींना आपण मारेकऱ्यांकडून मारविलें, परंतु इतक्यानें आपल्यावरील संकटपरंपरा टळूं शकत नाहीं. राज्याला कोणी वारस असावा, याकरितां एखादा मुलगा दत्तक घेण्याला मी तयार आहें, परंतु एवढ्यानेंहि लोकांचें समाधान होऊं शकत नाहीं, याला काय करावें ? मीं आपल्याकडून पुष्कळ विचार करून पाहिला, परंतु पुन्हां विवाह करण्याशिवाय लोकांचीं क्षुब्ध झालेलीं मनें शांत करण्याचा मला दुसरा कोणताहि उपाय दिसत नाहीं. मोठा प्रसंग येऊन गुदरला आहे ! काय करावें, हेंच मला समजत नाहीं. " यावर लगेच राणी म्हणाली, " नाथ ! यांत एवढा विचार करण्याचें कारण तें काय ? जी आपली इच्छा तीच माझी. जें आपल्याला कर्तव्य वाटतें तें आनंदानें तडीस नेणें हेंच माझें काम आहे. आपण खुशाल पुन्हां विवाह करावा. आपल्या विवाहाला मी मोठ्या संतोषानें संमति देतें ; त्यांत मला मुळींच वाईट वाटत नाहीं. आतां सुखासंबंधानें म्हणाल तर पति, पुत्र किंवा पिता यांच्यापासून सुख मिळणें शक्य आहे, असें मला कधींच वाटलें नाहीं. सर्व सुखांचा झरा मनुष्याच्या अंतःकरणांत वहात असतां, सर्वांच्या हृदयांत अधिष्ठित असणारा परमात्मा सुखाचें खरें उगमस्थान असतां, मनुष्यानें बाह्य विषयावर सुखासाठीं अवलंबून राहावें, याच्यापेक्षां आश्चर्यजनक आणि खेदजनक गोष्ट जगांत दुसरी कोणती आहे ? " राणीचें हें भाषण ऐकून राजा आश्चर्यचकित झाला. तो म्हणाला, " प्रिये ! मीं पुन्हां विवाह केल्यानंतर तूं येथें राहावेंस हें जरी मला इष्ट वाटलें तरी तें अखेरीस कितपत श्रेयस्कर होईल, हा

मोठा प्रश्न आहे. परंतु तूं येथून निघून जा, असें मी तरी तुला कोणत्या तोंडानें म्हणूं? प्रजानुरंजन करण्यासाठीं पुन्हां विवाह करणें मला नाइलाजानें भाग पडत आहे, परंतु त्यामुळें माझें तुझ्यावरील प्रेम यत्किंचित्‌हि ढळलें आहे असें नाहीं." यावर राणी पुन्हां म्हणाली, "आपल्याला इतकें वाईट वाटण्याचें कारण नाहीं. मी येथें राहिल्यापासून आपल्याला त्रास होईल, हें मी जाणून आहें; व आपल्याला त्रास व्हावा असें मी केव्हांहि करणार नाहीं. माझें काय? मी जशी अरण्यांतून आलें तशी पुन्हां परत जाईन." येणेंप्रमाणें भाषण करून राणीनें आपल्या अंगावरील उंचीं वस्त्रें काढून ठेविलीं, आणि आपलीं पूर्वाश्रमांतील फाटकीं वस्त्रें धारण केलीं. नंतर राजाची परवानगी घेऊन ती आपल्या पित्याकडे परत गेली. राजवाडा सोडतांनां तिच्या मनाला मुळींच हळहळ वाटली नाहीं. तिची वृत्ति पूर्वीप्रमाणेंच प्रसन्न व शान्त होती. पित्याकडे गेल्यावर त्यानें तिचें मोठें आनंदानें स्वागत गेलें; झाल्या गोष्टीबद्दल त्यालाहि मुळींच वाईट वाटलें नाहीं. नंतर राजाचा नोकर त्या ठिकाणीं होता, त्याला त्यानें परत राजाकडे पाठवून दिला.

या गोष्टीला बरेच दिवस होऊन गेले. एके दिवशीं राजा शिकारीस गेला असतां त्या अरण्यांत गेला व चार गोड शब्द बोलून आपल्या पूर्वींच्या राणीचें सांत्वन करावें या उद्देशानें त्या उपवनांत गेला. परंतु तेथें जाऊन पहातो तों त्याच्या दृष्टीला राणीचा चेहेरा पूर्वीप्रमाणेंच हंसतमुख दिसला, व आपल्या सांत्वनाची तिला अपेक्षा नाहीं असें त्याला दिसून आलें. तो आपल्या त्या पूर्वींच्या राणीला म्हणाला, "माझ्या भावी राणीचें स्वागत करण्यासाठीं तूं राजवाड्या-पर्यंत आलीस तर मला मोठा आनंद होईल." त्यावर राजाच्या म्हणण्याला रुकार देऊन ती तेथून निघाली, व राजवाड्यापर्यंत येऊन पोहोंचली. राजधानींतून जात असतां तिच्या चेहऱ्यावरील आनंदाची मुद्रा पूर्वीप्रमाणेंच कायम होती, व राजधानींतील मोठमोठ्या स्त्रियांनीं जेव्हां तिला रस्त्यांतून जातांना पाहिलें तेव्हां तिची निरभिमानी, शांत व प्रफुल्लित वृत्ति पाहून त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. जुनी राणी व नववधु यांच्या मुलाखतीसंबंधानें अशी योजना करण्यांत आली होती कीं, नववधूनें आपल्याबरोबर सोनें, रत्नें आणि माणकें यांचे उंची अलंकार घेऊन सामोरें यावें, व अशा रीतीनें थाटानें स्वागत करावें. पूर्वी ठरल्याप्रमाणें नववधु व राजधानींतील सरदारदरकदारांच्या स्त्रिया, आपआपल्या लवाजम्यानिशीं जुन्या

राणीचें स्वागत करण्यासाठीं मोठ्या थाटानें आल्या. नववधूची व राणीची दृष्टादृष्ट होतांच, राणीनें मोठ्या आदरानें आणि प्रेमानें तिचें स्वागत केलें, व तिला मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. नववधूबरोबर आलेल्या राजधानींतील स्त्रियांना तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून अतिशय आश्चर्य वाटलें; परंतु जुन्या राणीच्या वर्तनांत प्रतिबिंबित झालेलें दिव्य प्रेम आणि प्रसन्नवृत्ति पाहून, नववधूच्या सौंदर्यापेक्षांहि जास्त आश्चर्य वाटलें. नववधूनें आपल्या बरोबर आपल्या दोघां लहान भावांना आणिलें होतें. अशा रीतीनें भेटीचा समारंभ झाल्यानंतर ती सर्व मंडळी राजवाड्याकडे परत फिरली. त्याठिकाणीं यावेळीं मोठ्या थाटाची मेजवानी व्हावयाची होती. त्यासाठीं राजधानींतील मोठे सरदार, मानकरी वगैरे मंडळी जमा झाली होती. मेजवानीच्या वेळची सर्व व्यवस्था ठेवण्याचें काम जुन्या राणीकडे सोंपविण्यांत आलें होतें. मेजवानीसाठीं जमलेल्या लोकांनीं जुन्या राणीची शांत आणि स्थिरवृत्ति जेव्हां पाहिली, तेव्हां त्यांच्या अंतःकरणाला द्रव आला, आणि त्यांच्या नेत्रांतून अश्रूंचा प्रवाह वाहूं लागला. आपल्या दुष्ट वर्तनामुळें राणीची अशी दुर्दशा झालेली पाहून त्यांना आपल्या वर्तनाबद्दल पश्चाताप झाला. परंतु पुढें मेजवानीच्या थाटांत दंग झाल्यामुळें त्यांना झाल्या गोष्टीचा विसर पडला. पुढें मेजवानीचा समारंभ आटोपला; जुन्या राणीनें सर्व लोकांची विचारपूस केली, व सर्वांचा निरोप घेऊन ती राजाला म्हणाली, "महाराज! आजच्या सारख्या मंगल प्रसंगीं आपण मला बोलावून आणलें, याबद्दल मला मनापासून आनंद होत आहे. असे प्रसंग पुढें आल्यास आपण मला कळवीत जा, म्हणजे आपलें सर्व काम टाकून महाराजांच्या सेवेसाठीं हजर राहण्यास मी कधींहि चुकणार नाहीं." राणीचे हे उद्गार ऐकून तेथें जमलेल्या लोकांच्या अंतःकरणाला पाझर फुटला, व ते मोठ्यानें रडूं लागले. ते म्हणाले, 'आम्हांला पूर्वीं वाटत होतें, परंतु तूं एखाद्या भिकाऱ्याची मुलगी खास नाहींस. तूं प्रत्यक्ष देवताच असून, आमचें कल्याण करण्यासाठीं भूतलावर अवतीर्ण झाली आहेस!' असे उद्गार काढून लोकांनीं नववधूजवळ जाऊन आपल्या आजपर्यंतच्या निंद्य आणि गर्हणीय वर्तनाबद्दलचा पाढा वाचला. जुन्या राणीचीं मुलें मारेकऱ्यांकडून मारविण्याला भाग पाडून आपण त्या निरपराधी देवीचा दुष्टपणानें कसा छळ केला, यासंबंधाचा समग्र वृत्तांत त्यांनीं सांगितला, व आपल्या अपराधाबद्दल राजाजवळ जाऊन तिची क्षमा मागितली. जुन्या राणीचा वृत्तांत ऐकून, नववधूलाहि दुःखाचा

उमाळा आला; व ती म्हणाली, "देवी! तुझे मुलगे आणि मुली यांचा दुष्टपणानें खून करण्यांत आला व अशा निरपराधी मुलांच्या रक्तांतून मी राज्ञीपदावर आरूढ होत आहें, याबद्दल मला अत्यंत खेद होत आहे." असें म्हणून ती राजाची निर्भर्त्सना करूं लागली. यावेळीं सर्व लोकांच्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह चालला होता. तो सर्व देखावा पाहून राजाला गहिंवर आला, आणि एका उच्चासनावर विराजमान होऊन तो सर्वांना उद्देशून म्हणाला, "सरदार दरकदार लोक हो! मद्भगिनींनो! याठिकाणीं जमलेला हा देखावा एरोखरच अपूर्व आहे. तुमच्या सर्वांच्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह चालला आहे, परंतु याठिकाणीं जमलेल्या लोकांमध्यें ज्याच्या डोळयांतून अश्रु येत नाहींत, असें मनुष्य एकच आहे व तें म्हटलें म्हणजे राणी सरोजिनीच होय! तुम्हांला आपल्या पूर्वीच्या वर्तनाबद्दल पश्चात्ताप होत आहे, परंतु मी तुम्हांला दोष देऊं इच्छित नाहीं. कारण, तुम्हीं माझी लेंकरें आहांत. तुमच्याप्रमाणें माझ्याहि नेत्रांतून अश्रु चालले आहेत, परंतु ते दुःखाश्रु नसून आनंदाश्रु आहेत; व तुमचे सर्वांचे अश्रुहि आनंदाचे होवोत, अशी मी ईश्वराजवळ प्रार्थना करतों." यानंतर राणी सरोजिनिकडे वळून तो म्हणाला, "देवी! या माझ्या राज्यामध्यें तुझ्यासारखी धन्य तूंच आहेस!" आतां नववधू म्हणून जी कुमारिका ह्या ठिकाणीं आली होती, ती व तिचे धाकटे भाऊ हीं शेजारच्या एका राजाचीं मुलें होतीं. ती त्याची औरस संतति नव्हती; तर तीं मुलें त्याला सांपडलेलीं होतीं, व त्यांच्या ठिकाणचें दिव्य सौंदर्य आणि राजतेज पाहून त्या राजानें त्यांचें मोठ्या प्रेमानें पालनपोषण केलें होतें. हीं मुलें वास्तविक राजा आणि राणी सरोजिनी यांचींच अपत्यें होत! या मुलांना मारून टाकण्याचा राजानें जेव्हां हुकूम दिला, तेव्हां मारेकऱ्यांना दया येऊन त्यांनीं त्या मुलांना शेजारच्या देशांतील राजाच्या स्वाधीन केलें व तीं राजबिंडीं मुलें पाहून त्या राजानें मुलांचें दयार्द्र अन्तःकरणानें संगोपन केलें; वगैरे हकीकत जेव्हां लोकांना सांगण्यांत आली, तेव्हां त्यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला व त्यांचे दुःखाश्रु हे आतां आनंदाश्रु बनले. ही सर्व हकीकत समजल्यानंतर त्या नववधूशीं लग्न करणें राजाला अर्थात् अशक्य होतें. राजाला परम हर्ष झाला, राणी सरोजिनीलाहि हा वृत्तांत ऐकून ईश्वरी लीलेबद्दल मोठें कौतुक वाटलें. सरोजिनी ही अखेरीस राणी झाली, व तिचे मुलगे राज्याचे वारस झाले हें पाहून लोकांनाहि मोठा हर्ष झाला. यावरून ईश्वर हा किती

दयाळू आहे व मनुष्य संकटांत सांपडला असतां तो आपल्या सत्त्वाला जागा राहिला, तर अखेरीस त्याच्यावर आलेल्या संकटांचा परिहार करून ईश्वर त्याचें कसें रक्षण करतो, हें यावरून दिसून येतें.

प्रत्येक स्त्रीनें आपल्या पतीला अशा रीतीनें सर्वस्व अर्पण केलें पाहिजे. हिंदुस्थानांत पतिव्रता आणि पत्निव्रत हे शब्द प्रसिद्ध आहेत; व त्यांचा अर्थ हा कीं, पत्नीनें प्रत्येक बाबतींत आपल्या पतीच्या अंकित रहावें, पति हा प्रत्यक्ष ईश्वर आहे असें मानून त्याची इच्छा ती आपली इच्छा, अशा तादात्म्यभावनेनें त्याच्याशीं वर्तन करावें. पतीनेंहि पत्नीबरोबर परमात्मभावनेनें वागावें. स्वार्थी विचारांचा पगडा त्यानें आपल्या मनावर कधींहि बसवून घेऊं नये. सारांश, पतिपत्नीनें परस्परांवर परमात्मभावनेनें प्रेम करण्यास शिकावें. सदरहू गोष्टींतील सरोजिनीच्या ठिकाणीं जसा परमात्मभाव बिंबून गेला होता, त्याप्रमाणें सर्व स्त्रीपुरुषांची स्थिति असली पाहिजे व अशा रीतीनें सर्व स्त्रीपुरुष परस्परांशीं वागूं लागतील तर त्यांच्यामध्यें खरें प्रेम नांदूं लागेल व स्वर्गसुखाचा अनुभव तीं ह्या पृथ्वीवरच घेऊं लागतील !





# आजकालचीं पुस्तकें

—ग्रंथांमध्यें द्रष्ट्यांचें तत्वज्ञान, महात्म्यांच्या आयुष्याचें सारसर्वस्व व राष्ट्रीय जीवनाचा आवेश प्रकट होतो. वाङ्मयाच्या महामंदिरांत सत्य, सरस्वती व स्वातंत्र्य यांचें अखंड पूजन चाललेलें असतें. सारस्वत हा स्वातंत्र्याचा झेंडा व प्रगतीचा ताम्रपट आहे. म्हणून ग्रंथसंग्रहाइतका बहुमोल ठेवा दुसरा कोणताच नाहीं. ग्रंथसंग्रहालय हेंच खरें आधुनिक विश्वविद्यालय होय.

गणेश महादेव आणि कंपनीचीं

आजपर्यंत

# प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें

---

## श्री० नाथमाधव यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या

**स्वराज्याचा श्रीगणेशा:**—(इ.स.१६४६ ते १६४८.) श्रीशिवाजीराजांनीं तोरणा किल्ल्यावर स्वराज्याचें तोरण लावलें व तेथें सांपडलेल्या खजिन्याच्या जोरावर दुसऱ्या किल्ल्यांचें काम सुरू करून जो स्वातंत्र्याचा पाया घातला, तो सर्व वृत्तांत या कादंबरींत अत्यंत हृदयंगम रीतीनें रंगविला आहे. परस्त्रीला माते-समान मानणाऱ्या महाराजांनीं सुभेदाराच्या लावण्यसंपन्न व तरुण सुनेला वस्त्रा-लंकार देऊन परत पाठविलें, हा अंतःकरण उचंबळविणारा प्रसंग या कादंबरींत आला आहे. बजाजी निंबाळकर मुसलमान झाला होता, त्याला हिंदुधर्मांत परत घेऊन राजांनीं स्वराज्य व स्वधर्म यांचें निकटवर्तित्व किती उत्कृष्ट रीतीनें व सप्रमाण सिद्ध केलें, तें या कादंबरींत मनोहर शब्दांत रंगविलें आहे. दुय्यम कथानकहि अत्यंत चित्तवेधक आहे. किंमत २। रुपये.

---

**स्वराज्याची घटना:**—(इ.स.१६४८ते१६६२.) केवळ धाडसाच्या जोरावर तोरणा किल्ला काबीज करण्यासारखीं कार्यें किती तरी सरदारांच्या हातून झालीं व त्यानंतरहि ते केवळ सरदारच राहिले; पण शिवाजीराजांना स्वराज्य उभा-रावयाचें होतें. राजद्रोहाच्या भीतीनें स्वराष्ट्राशीं द्रोह करण्यांत पातक नाहीं असें मानणारे लोक, त्याचप्रमाणें स्वहितापुढें स्वराज्याची मातब्बरी न दिसणारे अदूर-दृष्टि लोक त्या काळींहि जे महाराष्ट्रांत होते, त्यांचा बीमोड केल्याशिवाय स्वराज्य-वृक्ष फोंफावणार नाहीं हें शिवाजीराजांना उमजत होतें. विधायक कार्याच्या आरंभीं होणारी घटना विघातक असते. जावळीवर मोऱ्यांचा वध, अफजुल-

खानाचा वध, बाजी घोरपड्याचा वध, वगैरे थरारून सोडणारे अनेक प्रसंग या कादंबरींत चटकदारपणें रेखाटले आहेत. किंमत २। रुपये.

---

**स्वराज्याची स्थापना**:—( इ. स. १६६२ ते १६७४.) वारीकसारीक संकटांनीं न डगमगतां वीर पुरुष कार्यसिद्धीचा मार्ग तसाच आक्रमण करीत राहिला, कीं त्याचा कस पाहण्याकरितां परमेश्वर त्याच्यावर महान् संकटांचा घाला पाठवितो. शिवाजी राजांवर दक्षिणेंतील बादशाहांनीं पाठविलेले लहान-मोठे सरदार फजीत पावून परत येत आहेत हें पाहून जगदीश्वर होऊं पाहणाऱ्या दिल्लीश्वरानें मिर्झा राजे जयसिंगांना दक्षिणेंत पाठवून राजांना कैद करून दिल्लीस आणलें. राजांनीं तुरुंगाचीं त्याचप्रमाणें शहाजादीच्या गोड शब्दांचीं बंधनें तोडून दक्षिणेंत परत येऊन स्वराज्याचा उद्योग पुनः अधिक जोमानें हातीं घेतला, हें हृदयंगम कथानक या कादंबरींत सजविण्यांत आलें आहे. पुण्यांतील शाइस्तेखानावरील हल्ला, सुरतेची लूट, गड आला पण सिंह गेला, छत्रसालाची भेट वगैरे मनोवेधक प्रसंग या कादंबरींत आले आहेत. किंमत २। रुपये.

---

**स्वराज्याचा कारभार**:—( इ. स. १६७४ ते १६८० ) राज्याभिषेकानंतर शिवाजी महाराजांनीं राज्यव्यवस्थेचें काम हातीं घेतलें. त्यावेळीं त्यांनीं जी मांडणी केली त्याच पद्धतीनें मराठशाहीचा कारभार चालला. कालमानाप्रमाणें व राज्यविस्तारावरोवर त्यामध्यें फरक करावे लागले हें खरें, पण त्या नियमाबद्दल ढिलाई झाली तेव्हांच मराठशाहीची घडी विस्कटली. हीं तत्वें कोणतीं तें इतिहासकारांनीं नमूद केलें आहे; पण तींच तत्वें कशीं व कां अमलांत आणलीं व त्यांचे फायदे काय झाले, हे विशिष्ट प्रसंग आधाराला घेऊन लेखकानें स्पष्ट करून दाखविलें आहे. शिवाजी राजांचा काळ होईपर्यंतचा मजकूर आलेला असल्यामुळें ही कादंबरी हृदयस्पर्शी झाली आहे. किंमत २। रुपये.

---

**स्वराज्यावरील संकट**:—( इ. स. १६८० ते १६८९ ) संभाजीराजांच्या कारकीर्दीचा हृदयद्रावक वृत्तांत या कादंबरींत आला आहे. नुकत्याच स्थापन झालेल्या स्वराज्याच्या गादीवर असला राजा आल्यामुळें महाराष्ट्राची कशी धूळधाण उडाली हें लेखकानें कुशलतेनें दाखविलें आहे. मदिरेच्या निशेंत गुंग होऊन नाचरंगांच्या आधीन झाल्यामुळें संभाजीच्या निधड्या शौर्याचा महा-

राष्ट्राला मुळींच उपयोग झाला नाहीं, व स्वराज्याच्या गादीवर येणाऱ्या राजावर केवढी मोठी जबाबदारी असते व त्या पदासाठीं सर्व सुखांचा होम करणें किती जरूर आहे हें संभाजीच्या कारकीर्दीवरून स्पष्ट झालें. शिवाजी राजांच्या कारभारामुळें महाराष्ट्रांत स्वामिनिष्ठा कळसाला पोंचली होती; संभाजीच्या क्रूरपणाच्या कसोटीला ही स्वामिनिष्ठा कसदार ठरली तेव्हांच राजाराम महाराजांच्या अमदानींत महाराष्ट्राला पुनः स्वराज्य प्राप्त झालें. या कादंबरींत स्वामिभक्तीचा कडेलोट त्याचप्रमाणें फितुरीचा कळस लेखकानें स्फूर्तिदायक व हृदयद्रावक रीतीनें रंगविला आहे. **किंमत २। रुपये.**

---

**स्वराज्याचें परिवर्तनः—**(इ. स. १६८९ ते १७००.) छत्रपती श्रीशिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या हिंदुपदपादशाहीचा संभाजी महाराजांच्या कारकीर्दींत जवळ जवळ विध्वंसच झाला होता; पण संभाजी महाराजांनीं साऱ्या हयातींत केली नाहीं एवढी राष्ट्रसेवा आपल्या आत्मसमर्पणानें केली व वीरात्मा अजिंक्य आहे हें जगाच्या निदर्शनास आणलें. त्यांच्या रक्ताभिषेकानें महाराष्ट्राचें चैतन्य जागृत झालें. राजाराम महाराजांच्या कारकीर्दींत कर्तीं माणसें उत्पन्न झालीं. या काळांत संताजी घोरपडे व धनाजी जाधव यांचेसारखे रणझुंजार, खंडोबल्लाळ चिटणिसांसारखे स्वामिभक्तीचे पुतळे व प्रल्हाद निराजीसारखे मुत्सद्दी पुढें आले व त्यांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रानें अलौकिक व अपूर्व अशीं महत्कार्यें केलीं व आपली धर्मनिष्ठा व राष्ट्राभिमान जगाच्या निदर्शनास आणून हिंदुपदपादशाहीची भक्कम पायावर संस्थापना करून स्वराज्याचें परिवर्तन घडवून आणलें. संकटकालांतल्या पार्श्वभूमीवर हा इतिहास तेवढा उठावदार दिसला नसता म्हणूनच कीं काय कोण जाणे, विधात्यानें या परिवर्तनाच्या काळांतही संकटकालीन मनोवृत्तीचीं नीच माणसें उत्पन्न करून स्वार्थ व निष्ठा यांमधील द्वंद्व कितीही तीव्र असलं तरी शेवटीं तत्वाचाच विजय होतो हें अधिक स्पष्टपणें सिद्ध करून दाखविलें. राष्ट्रसेवेसाठीं झटणाऱ्या वीरांच्या कृतींचा स्फूर्तिदायक वृत्तांत या द्वंद्वामुळें हृदयद्रावक झालेला असून त्यामुळें कथानकाला विशेष रंग चढलेला आहे. **किंमत २। रुपये.**

---

**स्वराज्यांतील दुफळीः—**(इ. स. १७०० ते १७०७.) राजाराम महाराजांच्या मृत्यूनंतर मराठशाहींत कांहीं राम राहिला नसेल या कल्पनेनें मराठी

राज्य धुळीला मिळविण्याचा अवरंगजेबानें निश्चय केला व त्याचा सेनापति झुल्पिकारखान हा मराठ्यांचे किल्ल्यांमागून किल्ले काबीज करूं लागला; पण अवरंगजेबाबरोबरच मराठे सरदारही हट्टाला पेटून व धनाजीच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं बादशहाला जेरीस आणलें व शाहू महाराजांना बंधमुक्त करण्याची आकांक्षा त्यांच्या मनांत जागृत होऊं लागली. इकडे महत्वाकांक्षी ताराबाईनें मुत्सद्यांच्या इच्छेविरुद्ध आपल्या मुलाला राज्याभिषेक करून राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतल्यामुळें झालेल्या अव्यवस्थेनं मराठशाहींत फाटाफूट झाली. दक्षिण हातीं येत नाहीं आणि मराठ्यांशीं झगडण्यांत आपला सारा जन्म फुकट गेला हें पाहून अवरंगजेबाच्या मुलांनीं शाहू महाराजांना बंधमुक्त केलें व दक्षिणेंत आल्यावरोबर महाराजांनीं अक्कलकोटचा राजवंश निर्माण केला, येथपर्यंतचा इतिहास या कादंबरींत आला आहे. आतांपर्यंतच्या कादंबऱ्यांप्रमाणेंच ही कादंबरीहि अत्यंत चित्तवेधक झाली आहे. किंमत २॥ रुपये.

---

## श्री० नाथमाधव यांच्या पुढील कादंबऱ्या

| | |
|---|---|
| १ स्वराज्याची पूर्वपीठिका | सन १६०० ते १६४४ |
| ९ स्वराज्याची दुही | ,, १७०७—१७०८ |
| १० स्वराज्याचें संरक्षण | ,, १७०८—१७१३ |
| ११ स्वराज्याचें संवर्धन | ,, १७१३—१७२० |
| १२ स्वराज्याचें एकीकरण | ,, १७२०—१७२८ |
| १३ स्वराज्याचें दृढीकरण | ,, १७२८—१७३३ |
| १४ स्वराज्याची मीमांसा | ,, १७३३—१७३७ |
| १५ स्वराज्याचा दरारा | ,, १७३७—१७३९ |

१६ स्वराज्याचें सौंदर्य, १७ स्वराज्याची प्रतिष्ठा,
१८ स्वराज्यांतील समृद्धि, १९ स्वराज्याचा विस्तार,
२० स्वराज्यावरील गंडांतरें, २१ स्वराज्याचा घात,
२२ स्वराज्याची दुर्दशा, २३ स्वराज्याचें मालिन्य,
२४ स्वराज्यांतील यादवी, २५ स्वराज्यांतील फुटाफूट,
२६ स्वराज्यावरील विपत्ति, २७ स्वराज्यावरील आघात,
२८ स्वराज्याचा विध्वंस, २९ स्वराज्यांतील हाहाःकार,
३० स्वराज्याची इतिश्री.

**अजिंक्य तारा**:—(लेखक—श्री. **नारायण हरी आपटे**.) रायगडावर शिवछत्रपतींनीं राजधानी स्थापन केली त्यावेळीं त्यांचें वरचसें राज्य डोंगरी मुलुखांत होतें. राजाराम महाराजांच्या अमदानींत मराठ्यांचें राज्य पुन्हां मोकळ्या मैदनांत स्थापन होऊं लागलें होतें. नव्या राज्याला साजेशा सोईस्कर जागीं नवी राजधानी स्थापावी हा राजाराम महाराजांचा हेतु त्यांच्या निधनानंतर ताराबाईसाहेबांनीं सिद्धीस नेला. सातारचा किल्ला अजिंक्यतारा मराठ्यांनीं काबीज केल्यानंतर तेथेंच बालराजा शिवाजी यांचा राज्यारोहणसमारंभ झाला. अजिंक्यतारा काबीज करण्याच्या कारस्थानाचा वृत्तांत या कादंबरींत रंगविण्यांत आला आहे. श्री. आपटे यांची भाषा साधी पण चटकदार असून कथानक मांडण्याची व रंगविण्याची त्यांची हातोटी अतिशय मार्मिक आहे. श्री.आपटे यांच्या सर्वच कादंबऱ्या लोकप्रिय आहेत पण त्या सर्वांत अजिंक्य-तारा ही कादंबरी विशेष रंगली आहे आणि अत्यंत लोकप्रिय झालेली आहे-आवृत्ति दुसरी. **किंमत १॥ रुपया.**

---

**शृंगेरीची लक्ष्मी**:—(लेखक—प्रो. **चिंतामण गंगाधर भानु**.) प्रो. भानु यांच्या तात्विक व ऐतिहासिक ग्रंथांच्या लोकप्रियतेची साक्ष सर्वांना पट-लेली आहेच. प्रोफेसरसाहेबांनीं लिहिलेली ही पहिली ऐतिहासिक कादंबरी महा-राष्ट्रापुढें मांडण्याची संधि आम्हांला लाधली आहे. 'शृंगेरीची लक्ष्मी' ही नाना फडणविसांच्या काळांतील रहस्यपूर्ण कथा आहे. शृंगेरीच्या मठाच्या संरक्षणासाठीं नायिकेनें केलेल्या कारस्थानांची हकीकत अत्यंत मनोवेधक आहे. मुख्य कथेच्या ओघांतच लेखकानें पेशवाईंतील समाजस्थितीहि कौशल्यानें रंगविली आहे. **किंमत २ रुपये.**

---

**कुठें ?**—(लेखिका—श्री. **सौ. कमलाबाई सोहनी**.) सामाजिक कादं-बऱ्या लिहिण्याची दिशा जवळ जवळ ठरून गेलेली असल्यामुळें आज प्रसिद्ध होणाऱ्या बहुतेक सर्व कादंबऱ्या एकाच ठशाच्या निघतात, आणि म्हणूनच त्या अगदीं नीरस वाटतात. या कादंबरींत लेखिकेनें नव्या लेखनपद्धतीचा पुरस्कार केलेला असल्यामुळें आरंभापासून शेवटपर्यंत वाचकाचें मन अगदीं वेधून राहतें. शिक्षण घेत असतांना तरुण कुमारिकांच्या चित्तांत उत्पन्न होणारे विचार व विकार पुरुषांना रंगवितां येत नाहींत; मुलींच्या संभाषणाचा ओघ, त्यांचे

मनोविकार, त्यांचीं ध्येयें वगैरे विषय रंगविण्यांत लेखिकेनें विशेष कौशल्य दाखविलें आहे. **किंमत १ रुपया.**

---

**मराठशाहीची ढाल:**—(लेखक-श्री. ल. ना. जोशी.) संभाजी महाराजांच्या कारकीर्दीत मराठशाहीवर प्राणसंकटच आलें होतें असें म्हटलें तरी चालेल. महाराजांच्या अमानुष वधानंतर स्वराज्याच्या नाशासाठीं यवनांनीं इतकी कडेकोट तयारी केली होती कीं, त्या धामधुमींत मराठशाहीचें तक्त रायगडाहून जिंजीला न्यावें लागलें. गादीच्या संरक्षणासाठीं जिवावर उदार झालेले मराठे वीर यवनांच्या सैन्याला थोपवून धरण्यासाठीं आटोकाट प्रयत्न करीत होते. या वीरांचें नेतृत्व संताजी घोरपडे व धनाजी जाधव यांच्याकडेच होतें हें निर्विवाद आहे. त्यांनीं आपल्या निधड्या छातीच्या ढालीवर मोंगलांचे सगळे आघात थोपवून धरले, इतकेंच नव्हे तर त्यांच्या छाप्याच्या भीतीमुळें मोंगलांना आपल्या घोड्यांना पाणी पाजण्यासहि वेळ मिळेनासा झाला. पैकीं वीरशिरोमणि संताजीचें स्फूर्तिदायक चरित्र श्री. जोशी यांनीं या कादंबरींत अत्यंत कुशलतेनें रंगविलें आहे. कादंबरी वाचतांना वाचकांचें हृदय तल्लीन होऊन जाईल यांत संशय नाहीं. श्री. जोशी यांचा लेखक या नात्यानें महाराष्ट्रास बराच परिचय असल्यामुळें त्यांची शिफारस करण्याचें कारण नाहीं. **किंमत १॥ रुपया.**

---

**राक्षसी रणसंग्राम:**—(लेखक-श्री. ल. ना. जोशी) शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींतील एका अत्यंत रम्य कथानकावरून ही कादंबरी लिहिलेली आहे. नेताजी पालकर हा शिवाजी महाराजांचा उजवा हात होता. राजकार्यासाठीं त्यानें स्वतःची तयारी कशी केली व राजकार्यांत तो कसा प्रविष्ट झाला याचा हृदयंगम वृत्तांत या कादंबरींत आलेला आहे. सदरहू पुस्तक हें मॅक्मिलन साहेबांच्या 'इन वाइल्ड मराठा बॅटल' या सुप्रसिद्ध कादंबरीचें रूपांतर आहे. रूपांतर करतांना आर्यसंस्कृतीला साजतील असे बरेचसे फेरफार करण्यांत आले आहेत. या कादंबरींत एका तरुणाच्या राष्ट्रकार्यप्रवेशाची कथा असल्यामुळें प्रत्येक महाराष्ट्रीय तरुणानें हें पुस्तक अवश्य वाचावें एवढीच आमची थोडक्यांत शिफारस आहे. **किंमत १ रुपया.**

**मानस-पूजा**:--सामाजिक कादंबरी-( लेखक-श्री. **प्रभाकर श्रीपाद कोल्हटकर**, बी. ए. ) स्त्रीशिक्षणाचा प्रसार आपल्या देशांत सपाट्यानें होत आहे ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. पण शिकलेल्या मुलीचें लग्न करतांना तिच्या आवडी निवडीकडे न पहातां तिचें लग्न वाटेल त्याच्याशीं लावून आपल्या जबाबदारींतून मोकळे होणारे आईबाप लाखांनीं मोजण्याइतके आहेत. अशा वेळीं शिकलेली मुलगी आपल्या वल्लभाची 'मानस-पूजा' करून जन्मभर जो अपूर्व स्वार्थत्याग करते त्याची कल्पना हीः कादंबरी वाचून येईल. देशांत प्रसन्न व संतुष्ट माता निर्माण होण्यास सध्यांच्या विवाहाच्या चालींत कालमाना-प्रमाणें फेरफार करणें किती अवश्य आहे ह्याची खात्री 'चांद'ची-कादंबरी-तल्या नायिकेची--हृदयद्रावक हकीकत वाचून होईल.

तसेंच हल्लींच्या विकट परिस्थितींत महत्वाकांक्षी तरुणांना ध्येयप्राप्तीच्या मार्गांत कशा अडचणी येतात आणि पुढाऱ्यांच्या गडबडीमुळें त्यांची कशी दिशाभूल होते हें पहावयाचें असल्यास कादंबरी-नायक-विश्राम याच्या वृत्तां-तानें तें सहज समजेल.

समाजांतील तरुण मुलें व मुली यांच्या प्रश्नाकडे पुढाऱ्यांचें लक्ष जावें या हेतूनें श्री. प्र. श्री. कोल्हटकर बी. ए. यांनीं वरील कादंबरी मुद्दाम लिहिली आहे. या कादंबरीस 'निष्प्रेम आयुष्य,' 'कैद्याचीं मुलें,' 'गरिबांची दुनिया' व 'समाजसेवा' या चार उत्कृष्ट गोष्टीही जोडलेल्या आहेत. **किंमत १। रुपया.**

---

**गौरीशंकर**:—(सामाजिक कादंबरी)--(लेखक- श्री. **वि. दा. हडप** ) या कादंबरींत—"कोणतीहि सुधारणा करून राष्ट्राला संपन्न दशा आणायची झाली तरी त्या सुधारणेचा पाया बहुजनसमाजाच्या अंतःकरणांत पडला पाहिजे व म्हणू-नच त्याचा उगम शहरांतून खेड्याकडे असा 'आधीं कळस मग पायारे' या प्रका-रचा न होतां खेड्यांतून शहरांकडे असाच झाला पाहिजे. ही सुधारणा करतांना ब्राह्मण-ब्राह्मणेतर, स्पृश्य-अस्पृश्य, हिंदु-मुसलमान असल्या भेदभावांपासून समाजसेवकानें दूर राहिलें पाहिजे व 'जो लोककल्याण। साधावया जाण। घेई करीं प्राण। त्या सौख्य कैचें॥' हें ब्रीदवाक्य समजून कर्मयोगी बनलें पाहिजे "—ह्या ध्येयानुसार एक कर्मयोगी तरुण व तरुणी यांनीं एका खेड्याची नमुनेदार सुधारणा कशी केली, व त्यांतच त्याचा अत्यंत कल्याणप्रद शेवट

कसा झाला याचें परिणामकारक व हृदयद्रावक शब्दचित्र पहावयास मिळेल. किंमत १॥ रुपया.

---

**सुख-स्वप्नः**—(लेखक-श्री. **वाग्भट नारायण देशपांडे** बी. ए. एल्. एल्. बी. )निबंध टीका व लघुकथा या साहित्यविभागांत श्री. वाग्भट देशपांडे यांचा दर्जा किती मोठा आहे याची साक्ष अनेक विद्वानांनीं व रसिकांनीं दिलेली आहे. त्यांच्या लघुकथांपैकीं पांच कथा या सुख-स्वप्नांत संग्रहित केल्या आहेत.

स्त्रियांना शिक्षण मिळून त्या अधिक सुसंस्कृत व नवीन जीवनक्रमाचें आकलन करण्यास समर्थ होतील तर समाजांत काय फरक होईल, कौटुंबिक जीवनांत कोणत्या नव्या सुखाची भर पडेल आणि स्त्री ही आपल्या पतिपुत्रबंधूंना सहाय्यिका व मार्गदर्शिका होईल याचीं कल्पनाचित्रें या सुखस्वप्नांत लेखकांनीं रंगविलीं आहेत. सुसंस्कृत स्त्रीच्या प्रेरणेमुळें पतीचा आयुष्यक्रम यशस्वी होतो, ती सुखकाळीं संसाराचें आभरण व विपत्काळीं आधार असते आणि पतीच्या अंगीकृत कार्यांत केवळ सहानुभूतीच नव्हे तर प्रत्यक्ष मदतहि देऊं शकते, हीं तत्वें या गोष्टीमध्यें प्रत्यक्ष स्वरूपांत दाखविलेलीं आहेत.

या पुस्तकाला सुप्रसिद्ध लेखिका व आदर्श आर्यस्त्री श्री. कमलाबाई देशपांडे जी. ए. यांनीं मार्मिक प्रस्तावना लिहिली आहे. **किंमत १। रुपया**

---

## श्री० गो. स. सरदेसाई बी. ए. यांच्या रियासती

**मराठी रियासत, मध्यविभाग १:**—(इ.स. १७०७ ते १७४०.) बाळाजी विश्वनाथ व बाजीराव या दोन पेशव्यांची कारकीर्द या भागांत आलेली आहे. आजतागाइत या दोन पेशव्यांबद्दल संशोधित झालेली सर्व माहिती या ग्रंथांत संकलित केलेली असून जागोजाग अस्सल ऐतिहासिक कागदपत्रांचे आधार दिलेले आहेत. हिंदुपदपादशाहीची कल्पना मराठ्यांच्या अंतःकरणांत जागृत होऊन दिल्लीवरील मराठ्यांची पहिली मोहीम याच काळांत झालेली असल्यामुळें हा भाग अत्यंत स्फूर्तिदायक झाला आहे. या काळांत उदयाला आलेल्या मराठे सरदारांच्या हकीकती, वंशावळी वगैरे अत्यंत उपयुक्त माहिती दिलेली असून त्या काळच्या मोहिमांना नकाशा, थोरल्या बाजीरावसाहेबांचा एक दुर्मिळ

फोटो व त्यांच्या हस्ताक्षराचा ब्लॉक दिलेला आहे. अनेक वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या मराठी रियासतीची ही द्वितीयावृत्ति आहे; पण पहिली व दुसरी या आवृत्तींमध्यें जमीन अस्मानचा फरक आहे. अर्थात् प्रथमावृत्ति ज्यांच्या संग्रहीं आहे त्यांनाहि हें पुस्तक एकाद्या नव्या ग्रंथाइतकेंच नव्या माहितीनें भरलेलें आहे असें दिसून येईल. मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास करणारांस हा ग्रंथ अपूर्व वाटेल, इतकेंच नव्हे तर सर्वसाधारण वाचकांसहि हा इतिहास कादंबरी-सारखा मनोरंजक वाटेल अशी आमची खात्री आहे. पूर्ण कापडी बांधणी. **किंमत ३ रुपये.**

---

**मराठी रियासत, मध्यविभाग ३:**—(पानिपत प्रकरण) पानिपताएवढी मोहीम मराठी अमदानींत झाली नाहीं व पानिपताएवढें अपयशही मराठ्यांना आलें नाहीं. हा अंतःकरण उचंबळविणारा प्रसंग या ग्रंथांत सांगोपांग सांगि-तला आहे. मराठ्यांचे व शत्रूंचे सरदार अमुक अमुक प्रकारचें वर्तन कां करते झाले, त्याचीं कारणें पूर्वपरिस्थितींत व त्यांच्या स्वभावघटनेंत किती होतीं याचाहि विचार लेखकानें केलेला आहे. रघुनाथरावाच्या उत्तरेकडील पहिल्या स्वारीपासून नानासाहेब पेशव्यांच्या मृत्यूपर्यंतचा इत्थंभूत वृत्तांत यांत आला आहे.शाहुकालीन प्रसिद्ध घराण्यांच्या हकीकती यांत दिल्या असून, सदाशिवराव-भाऊंचा उत्तरेकडील प्रवासमार्गाचा नकाशाहि जोडला आहे. आजवर उपलब्ध झालेल्या सर्व साधनांचा पूर्ण विचार करून श्री. सरदेसाई यांनीं हा अत्यंत महत्वाचा ग्रंथ निर्माण केला आहे. स्वदेशी इतिहासाचा अभिमान ज्यांच्या रोमरोमांत भिनलेला आहे असे मराठे, लेखकाच्या श्रमाचें चीज करतील अशी आमची खात्री आहे. ग्लेज कागद, पूर्ण कापडी व सोनेरी बांधणी. **किंमत २। रुपये.**

---

**मराठी रियासत, मध्यविभाग ४:**—(इ. स. १७६१ ते १७७२.) पानिपतच्या पराभवामुळें मराठशाहीच्या ठिकऱ्या उडाल्या, भीमथडी घोड्यांना अटकेचेंच काय पण काबूल, कंदाहार, रूमशामचें पाणी पाजण्याची महत्वाकांक्षा मनांत बाळगणारे मराठे याउप्पर आपल्या कंगाल देशांत शेतकी करीत स्वस्थ राहतील या विचारानें उत्तरहिंदुस्थानांतील मुसलमानी राज्यकर्ते स्वस्थ झाले होते; पण असल्या पराभवामुळें बसलेला धक्का सहन करण्यास मराठशाही समर्थ आहे, इतकेंच नव्हे तर पूर्वीपेक्षाहि अधिक [illegible] हिंदु[illegible]शाहीच्या

कल्पनेला मूर्त स्वरूप देण्याचा आणखी एक प्रयत्न करण्यास उत्सुक आहे, हें जगाच्या निदर्शनास आणून देण्याचें कार्य थोरल्या माधवरावांनीं केलें. ईश्वरकृपेनें ते थोडीं वर्षे अधिक जगते तर त्यांचें हें सुखस्वप्न कदाचित् तडीलाहि गेलें असतें; पण त्यांचा अकालीं मृत्यु झाला, नारायणरावांचा खून झाला व राघोबादादांनीं अस्तनींत निखारे पेटविले, त्यामुळें सर्वत्र हाहाःकार उडाला. मराठशाहीच्या पुनर्घटनेचा स्फूर्तिदायक, त्याचप्रमाणें हृदयद्रावक वृत्तांतहि यांत आलेला असल्यामुळें सदरहू ग्रंथ अत्यंत हृदयस्पर्शी झालेला आहे. श्री. देसाई यांची ऐतिहासिक विवेचनपद्धति किती मार्मिक असते व त्यांनीं आपल्या ग्रंथांत नमूद केलेली माहिती किती भरपूर व मौल्यवान् असते हें आतां मराठी वाचकांना पूर्णपणें माहीत झालेलें असल्यामुळें, रियासतीच्या या विभागाची वेगळी शिफारस करण्याचें मुळींच कारण नाहीं. रियासतीचा हा विभाग अगदीं प्रथमच प्रसिद्ध होत असल्यामुळें या भागांत आलेली माहिती वाचकांपुढें अगदीं नव्यानेंच येत आहे. बांधणी पूर्ण कापडी, **किंमत ३ रुपये.**

---

**मुसलमानी रियासत, भाग पहिलाः**—(आवृत्ति तिसरी, १५२६ पर्यंत.) या मुसलमानी रियासतीची आवृत्ति वऱ्याच दिवसांपूर्वी खलास झाल्यामुळें आतां ही तिसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्यांत आली आहे. पूर्वीच्या आवृत्तींत मुसलमानी अमदानीचा संपूर्ण इतिहास दिलेला असल्यामुळें पुस्तक वापरण्यास बोजड झालें होतें; म्हणून हा ग्रंथ आतां दोन भागांत पुरा करावयाचें ठरविलें आहे. या पहिल्या भागांत मुसलमानी धर्माच्या स्थापनेपासून हिंदुस्थानांतील मोंगल बादशाहीच्या स्थापनेपर्यंतचा इतिहास आला आहे. मुसलमानांनीं काबीज केलेल्या हिंदू राज्यांचा इतिहास व त्यांच्या वंशावळी दिलेल्या असल्यामुळें मध्ययुगीन भारतानंतरच्या काळाचा अभ्यास करणारांस आणि विद्यार्थ्यांप्रमाणेंच सर्वसाधारण वाचकांनाहि हा विभाग उपयुक्त व मनोरंजक वाटल्यावांचून राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. कापडी सोनेरी बांधणी, **किंमत ३ रुपये.**

---

**मुसलमानी रियासत, भाग दुसराः**—(आवृत्ति तिसरी, इ. स. १५२६ ते १८०३ पर्यंत) छापत असून लवकरच प्रसिद्ध होईल. **किंमत ३॥ रुपये.**

**ब्रिटिश रियासत, पूर्वार्धः**—आशिया व युरोप या दोन खंडांचा संबंध कसा आला व त्या संबंधाचें स्वरूप कसें उत्क्रांत होत गेलें, याचें ज्ञान करून घेणें हें प्रत्येक देशाभिमानी मनुष्याचें कर्तव्य आहे. व्यापारामुळेंच हिंदुस्तानाला सुवर्णभूमि हें नांव मिळालें होतें. पाश्चात्यांनीं हा व्यापार काबीज करण्यासाठीं जी निकराची चढाओढ मांडली तींत ब्रिटिश लोक अखेर यशस्वी झाले. त्यांनीं प्रथम आमच्या व्यापाराच्या व कारागिरांच्या नाड्या हातीं घेतल्या व मग त्या आंखडत्या व्यापारामागून आमचीं राज्यें त्यांच्या हातीं गेलीं. हा सर्व प्रकार कसा झाला याचें विस्तृत व साधकबाधक प्रमाणांचें विवेचन या पुस्तकांत केलेलें आहे. पाश्चात्यांच्या व्यापाराचा इतिहास, पोर्तुगीज व डच लोकांची अमदानी, फ्रेंच, निजाम व मराठे, सिराजुद्दौला व क्लाइव्ह वगैरे महत्वाचे विभाग या पुस्तकांत आलेले आहेत. प्रौढ विद्यार्थ्यांनीं हें पुस्तक जरूर संग्रहीं ठेवावें. हल्लीं सर्व शाळांमधून हा काळ शिकविण्यांत येत असल्यामुळें, विद्यार्थ्यांना विषय नीट समजावून देतां यावा म्हणून प्रत्येक शिक्षकानें या पुस्तकाचा अवश्य अभ्यास करावा. आफ्रिका खंडास वळसा देऊन पाश्चात्य कसकशा मार्गानें वसाहती करीत आले हें दर्शविणारा जगाचा नकाशा व तत्कालीन प्रमुख पुरुषांचीं चित्रें पुस्तकास जोडलीं आहेत. सोनेरी कापडी बांधणी, **किंमत ३॥ रुपये.**

मराठी रियासत, पूर्वार्ध ( दुसरी आवृत्ति. )
मराठी रियासत, उत्तरार्ध, भाग १ ला.
मराठी रियासत, उत्तरार्ध, भाग २ रा
ब्रिटिश रियासत, उत्तरार्ध

**हीं पुस्तकें निघणार आहेत**

---

**श्रीएकनाथ-चरित्रः**—( लेखक–श्री. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.) संसाराच्या रोजच्या अडचणींनीं गांगरलेल्या मनुष्याला संतांचीं पवित्र चरित्रें वाचून समाधान प्राप्त होतें; संतांच्या संगतींत मनुष्याच्या मनावर जमलेला मळ नाहींसा होतो. श्री. पांगारकरांच्या प्रेमळ व अधिकारी लेखणींतून निघाल्यामुळें हें चरित्र अत्यंत बहारीचें वठलें आहे. वारकऱ्यांची भाविकता, आधुनिक काव्य, चरित्रें व चर्चा यांच्या वाचनानें उत्पन्न होणारी सुशिक्षित रसिकता व

ऐतिहासिक सत्यासत्याचा कांटेतोल विचार करणारी चिकित्सकता हे तीनहि गुण या चरित्रांत उत्कृष्ट रीतीनें प्रकट झालेले असल्यामुळें, या एकनाथ-चरित्रानें महाराष्ट्रवाङ्मयांत कायमचें स्थान मिळविलें आहे. जागोजाग नाथांच्या प्रेमळ काव्यांतील उतारे सटीक दिलेले असल्यामुळें सदर चरित्र विद्यार्थ्यांना व साहित्यभक्तांना अत्यंत महत्वाचें वाटेल यांत शंका नाहीं. एकनाथ हे खऱ्या जिव्हाळ्याचे अस्पृश्योद्धारक होते याविषयीं अत्यंत महत्वाच्या आख्यायिका चरित्रकारांनीं दिल्या आहेत. आबालवृद्धांना आणि सर्व दर्जाच्या व सर्व मतांच्या लोकांना आवडेल असा हा ग्रंथ असल्यामुळें, तो घरोघर वाचला जावा अशी आमची खास शिफारस आहे. **किं. १२ आणे.**

---

**भक्तिमणिमालाः**—( लेखक—ह. भ. प. ल. रा. **पांगारकर**, बी. ए. ) भागवत हा भक्तिप्रधान ग्रंथ सकलसंतमान्य व अत्यंत लोकप्रिय आहे. भक्ति-प्रेमाचीं रहस्यें अमृतमधुरवाणीनें प्रकट करणारा भागवताच्या जोडीचा दुसरा ग्रंथ नाहीं. भागवत हा ग्रंथ इतक्या योग्यतेचा आहे तरी त्याची ग्रंथसंख्या फार मोठी असल्यामुळें त्याचें पठण करणें भाविकांना फार जड जातें, म्हणून ह. भ.परायणांनीं हा ग्रंथ भाविकांसाठीं तयार केला आहे.भागवतांतून निवडून काढलेल्या सुभाषितांचें गोड व सोपें भाषांतर मूळ श्लोकांना जोडलेलें असून, शिवाय महाराष्ट्रीय साधुसंतांचीं वचनें जागोजाग दिलेलीं असल्यामुळें, मणिमाला अत्यंत मौल्यवान् झाली आहे. सार्थ सुभाषितसंग्रह—या दृष्टीनें संस्कृताचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना व भक्तिप्रेमानें ओथंबलेल्या पवित्र वचनांचा संग्रह या दृष्टीनें भाविकांना हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे यांत. शंका नाहीं. **किंमत १॥ रुपया.**

---

**स्वामी रामतीर्थ यांचे समग्र ग्रंथ, खंड १ लाः**—( लेखक—'विहारी' कर्ते कै. भा. वि. फडके, बी.ए. व कै. दा. वा. बर्वे, बी.ए.) ( नवी आवृत्ति ) हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनाची व संघटनेची चळवळ नव्या जोमानें सुरू झालेली आहे. हिंदुधर्माच्या चैतन्याचें रहस्य वेदांतांत आहे हें निर्विवाद आहे. उपनिषदादि प्राचीन ग्रंथांमध्यें या वेदान्ताचीं तत्वें स्पष्ट केलेलीं आहेत; पण या ग्रंथांतील विषयांची मांडणी तत्ववेत्त्याशिवाय इतर सर्वसाधारण लोकांना सुगम होण्यासारखी नसल्यानें अव्वल इंग्रजी अमदानींतील पिढ्या या वेदान्ताला पारख्या

झाल्या होत्या. हिंदुसमाजांत व्यावहारिक वेदान्त व नवचैतन्य निर्माण करावयाची चळवळ स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांच्या नेतृत्वाखालीं सुरू झाली. त्यांनीं केलेलें लोकजागृतीचें कार्य अनेकविध होतें. त्यांत त्यांनीं केलेलें वाङ्मयात्मक कार्य आज विशिष्टतेनें आपल्या उपयोगी पडेल.

'स्वामी रामतीर्थांचे समग्र ग्रंथ' मूळ इंग्रजींत संकलित केलेले आहेत. महाराष्ट्र-वाचकांना स्वामीजींच्या जिवंत वाणीचा लाभ मिळावा म्हणून कै. फडके व कै. वर्वे यांनीं या ग्रंथाचें भाषांतर मराठींत आणण्याचा अवाढव्य उद्योग हातीं घेतला. स्वामिजींच्या समग्र लेखांच्या प्रथमावृत्तीचे बारा भाग निघाले होते. स्वामिजींच्या ओजस्वी लेखांनीं महाराष्ट्र-वाचक इतके मोहून गेले होते कीं, प्रत्येक भाग निघतांच तो खलास होई. बरींच वर्षें दुर्मिळ झालेल्या या चैतन्यपूर्ण वाङ्मयाची पुनरावृत्ति काढण्याचें काम आम्ही हातीं घेतलें असून पूर्वींच्या बारा भागांतील मजकूर आतां सहा भागांत पुरा होणार आहे. प्रत्येक खंडाची किंमत २॥ रुपये. तूर्त तीन खंड तयार आहेत.

---

**जोसेफ मॅझिनीः—**( लेखक—श्री. सदाशिव आत्माराम जोगळेकर, एम्.ए.) इटलीची राज्यक्रान्ति हा आधुनिक इतिहासांतील अत्यंत अद्भुत काल होय. देशवीरांच्या आत्मसमर्पणामुळें अत्यंत स्फूर्तिदायक, आणि ऑस्ट्रियाच्या जुलमामुळें अत्यंत करुण आणि परस्परविरोधी तत्वांच्या व व्यक्तींच्या झगड्यामुळें अत्यंत बोधप्रद अशा या क्रान्तीचा संपूर्ण इतिहास मराठींत उपलब्ध नव्हता. मॅझिनीनेंच या क्रान्तीचा पाया घातला व त्याच्या चरित्रांत या क्रान्तीचा इतिहास समग्र गोंवतां येतो. मॅझिनीच्या चरित्राशीं निगडित झालेला इटलीच्या क्रान्तीचा इतिहास वाचावयास मिळेल अशीच या चरित्राची मांडणी केलेली आहे. मॅझिनीच्या जीवनाला आरंभ झाला त्या वेळीं इटलीच्या राष्ट्रीय जीवनांत धुगधुगी मात्र राहिलेली होती, म्हणून पहिल्या भागांत चरित्राला प्राधान्य व राष्ट्रीय उत्क्रांतीला दुय्यम स्थान दिलेलें आहे. इटलीचें राष्ट्रीय जीवन जसजसें जोरदार होत चाललें तसतसें मॅझिनीच्या वैयक्तिक जीवनाला दुय्यम स्थान दिलेलें आहे. मॅझिनीचे विचार त्याच्याच शब्दांत प्रसंगानुरोधानें दिलेले आहेत. धर्म, नीति, राजकारण व राष्ट्रधर्म या विषयांवरील त्याचे विचार साररूपानें एकत्र करून शेवटीं वेगळ्या प्रकरणांत दिलेले आहेत.

इटलीच्या स्वातंत्र्यसाधनाचा संगतवार इतिहास भूमिकेंत दिला आहे. चरित्राची विभागणी पुढील प्रकरणांत केलेली आहे.

या चरित्राला दे० तात्यासाहेब केळकर यांनीं प्रस्तावना लिहिलेली असून महाराष्ट्रांतील सर्व वृत्तपत्रकारांनीं सदरहू चरित्राची एकमुखानें प्रशंसाच केलेली आहे. मजबूत निमकापडी बांधणी. **किंमत १॥ रुपया.**

---

**महात्मा गांधी यांचें चरित्रः**—( लेखक–श्री. **सीताकांत.** प्रस्तावना लेखक–बॅ. मुकुंद रामराव जयकर, एम्. एल्. सी. ) श्री. सीताकान्त यांचे लेख समजण्यास सोपे असून मोठे उत्साहदायक असतात. मुळांतच सात्विक प्रवृत्तीच्या लेखकाला महात्मा गांधींच्या चरित्रासारखा विषय मिळाल्यामुळें हा ग्रंथ किती सरळ वठला असेल हें वेगळें सांगणें नलगे. हें चरित्र केवळ भाविक अंधभक्तीनें लिहिलेलें नसून त्यामध्यें महात्माजींच्या जीवनाची समतोल चर्चा केलेली आहे व बॅरिस्टर जयकर आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं, हेंच या चरित्राचें वैशिष्ट्य आहे. **किंमत २। रुपये.**

---

**निकोलाय लेनिनः**—( लेखक–श्री. रा. गो. भिडे, प्रस्तावनालेखक–दे. भ. दा. वि. गोखले, बी. ए. एलएल्. बी. ) बोल्शेव्हिझम् म्हणजे कामकरी व गोरगरीब यांचा उद्धार; बोल्शेव्हिझमूचें उच्चाटन करण्यासाठीं जगांतील सर्व सत्ताधारी व भांडवलवाले एकजूट झालेले आहेत; त्यांची ही जूट उलथून टाकून गोरगरिबांची परस्परांच्या साहाय्यासाठीं व उद्धारासाठीं एकजूट निर्माण करण्यासाठीं कार्ल मार्क्स व त्याच्या पंथांतील लोकांनीं अभूतपूर्व चळवळ केली. युरोपियन राज्यांमध्यें सर्वांत अधिक अनियंत्रित सत्ता रशियन झारच्या हातीं असल्यामुळें तेथेंच ही चळवळ अत्यंत आवेशानें सुरु झाली व ती लेनिननें यशस्वी करून लोकशाही स्थापन केली. लेनिनच्या तोडीचा विद्वान् व कार्यकर्ता पुरुष या शतकांत झालाच नाहीं असें म्हटलें असतां फारशी हरकत नाहीं. श्री. भिडे यांनीं हें चरित्र अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. बोल्शेव्हिझमूचीं तत्वें कसकशीं उत्क्रांत होत गेलीं हें त्यांनीं रूसो, मार्क्स वगैरे समाजसत्तावाद्यांच्या तत्वांसह सुसंगतपणें दाखविलें आहे. परिशिष्टमध्यें रशियन लोकशाहीचा मूलभूत कायदा व घटना दिलेली असल्यामुळें आधुनिक राज-

कारणाचा अभ्यास करणारांना हें पुस्तक फार मनोरंजक व महत्वाचें वाटेल यांत शंका नाहीं. जगांतील सर्व चळवळींमध्यें प्रमुख अशा या चळवळीची माहिती मिळविणें आजच्या काळीं अत्यंत अवश्य आहे. **किंमत १२ आणे.**

---

**वीर वैरागीः**—(भाषांतरकार–. दे. भ. ग. दा. सावरकर.) मराठे, रजपूत व शीख या तीन जातींनीं आपल्या मर्दुमकीच्या जोरावर हिंदुस्थानच्या इतिहासांत अढळ स्थान मिळविलें आहे. मुसलमानी सत्तेबरोबर झालेला शिखांचा लढा अत्यंत त्यागमय व हृदयस्पर्शी आहे. या इतिहासांतील एक प्रमुख नेता जो 'वीर वैरागी' त्याचें चरित्र पंजाबचे प्रख्यात दे. भ. प्रो. भाई परमानंद, एम्.ए. यांनीं हिंदी भाषेंत लिहिलें आहे. मूलतः उज्वल असलेला हा विषय भाईसाहेबांनीं अत्यंत जिव्हाळ्यानें सजविला आहे. हें अशा या ग्रंथाचें भाषांतर केलेलें असल्यामुळें तें किती श्रेष्ठ दर्जाचें असेल हें निराळें सांगणें नकोच. शिवाय या पुस्तकास, दे. भ. वॅ. विनायकराव सावरकर यांची ताजी मूळ कविता– **'अमरमृत'**–ही जोडलेली आहे. चौदा वर्षांच्या घोर शिक्षे-नंतर व तपश्चर्येनंतर सावरकरबंधूंची महाराष्ट्रसरस्वतीस ही पहिलीच सलामी आहे. तीन हद्दपार देशभक्तांच्या लेखण्यांचा हा त्रिवेणीसंगम या ग्रंथांत झालेला असल्यामुळें हा ग्रंथ प्रत्येकानें संग्रहीं ठेवावा. **किंमत फक्त १ रुपया.**

---

**स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें**—(लेखक–स. आ. जोगळेकर, एम्. ए.) आयर्लंडांतील क्रांतिकारक दे. टेरेन्स् मॅक्स्विनी याच्या–प्रिन्सिपल्स् ऑफ फ्रीडम–या निबंधसंग्रहाचें हें भाषांतर आहे. क्रांतिकारक वाङ्मयांत मॅझिनीचीं 'मानवी कर्तव्यें' आणि मॅक्स्विनीचीं 'स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें' अग्रगण्य आहेत; पैकीं 'मानवी कर्तव्या'चें भाषांतर आम्हीं पूर्वीच प्रसिद्ध केलें असून तें अत्यंत लोक-प्रिय झालेलें आहे. आतां 'स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें' प्रसिद्ध होत आहेत. मानवी कर्तव्यें व जोसेफ मॅझिनीचें चरित्र या प्रसिद्ध ग्रंथांचे लेखक श्री. जोगळेकर, यांनींच या मूलतत्त्वांचें भाषांतर केलेलें आहे एवढेंच सांगितलें असतां या ग्रंथाची वेगळी शिफारस करावयास नको. मूळ ग्रंथांतील जोम व हृदयस्पर्शी भावना कायम ठेवून, अस्सल बरहुकूम भाषांतर करण्यांत श्री. जोगळेकरांचा हात खंडा आहे. सदरहु पुस्तकास—दे. **अण्णासाहेब भोपटकर** एम्. ए. एल्एल्. बी. यांनीं प्रस्तावना लिहिलेली आहे.

'मानवी कर्तव्या'प्रमाणेंच प्रत्येक महाराष्ट्रीयानें 'स्वातंत्र्याचीं मूलतत्वें' एकवार तरी वाचल्यावांचून राहूं नये अशी आमची आग्रहाची शिफारस आहे. **किंमत १॥ रुपया.**

---

**मानवी कर्तव्यें**:—( प्रस्तावनालेखक दे. भ. डॉ.ना.दा. **सावरकर.** ) लेखक–इटालियन राज्यक्रान्तीला प्रेरणा देणारा द्रष्टा देशभक्त जोसेफ मॅझिनी याच्या 'ड्यूटीज ऑफ मॅन' या निबंधसंग्रहाचें श्री. जोगळेकर यांचे हें भाषांतर अत्यंत सरस वठलें असल्याबद्दल महाराष्ट्रांतील अनेक वृत्तपत्रकारांनीं व विद्वानांनीं वाखाणणी केली आहे. मॅझिनीच्या तत्वज्ञानाचें सारसर्वस्व या निबंधांत ग्रथित झालेलें आहे. इतिहासाचें सिंहावलोकन करून मॅझिनीनें निर्माण केलेलीं हीं तत्वें त्रिकालाबाधित असल्यामुळें जगांतील अत्युत्कृष्ट ग्रंथांत या मानवी कर्तव्यांची गणना करण्यांत येते. क्रांतिकारकांत मॅझिनी जसा अग्रगण्य तसेंच क्रांतिकारक वाङ्मयांत मानवी कर्तव्यें हें पुस्तकही अग्रगण्य होय. स्वतः मॅझिनी अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा नागरिक असल्यामुळें, या निबंधांत त्यानें नागरिकत्वाचें उत्कृष्ट विवेचन केलें आहे.आणि म्हणूनच हें पुस्तक प्रत्येक कुटुंबांत वाचलें जावें. इटलीसाठीं लढणाऱ्या राष्ट्रवीरांच्या तरवारीच्या अग्रस्थानीं झळकणारीं हीं उज्वल व सात्विक तत्वें आचरणांत आणणारे तरुण निर्माण होण्यास हें पुस्तक विद्यार्थीदशेंतच अवश्य वाचलें जावें. भाषांतरास डॉ. सावरकरांची स्फूर्तिदायक व विस्तृत प्रस्तावना जोडलेली आहे. **किंमत १ रुपया.**

आवृत्ति दुसरी. सुंदर कापडी बांधणी.

( या पुस्तकास इंदूरच्या महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळाकडून बक्षीस मिळालेलें असून, मध्यप्रांतसरकारनें हें पुस्तक बक्षिसासाठीं व लायब्रऱ्यांसाठीं आणि मुंबई सरकारनें बक्षिसासाठीं, लायब्रऱ्यासाठीं व टेक्स्ट बुक म्हणून लावण्यासाठीं मंजूर केलेलें आहे. )

---

**हिंदुत्व**:—(लेखक–**मराठा**. भाषांतरकार–डॉ. **सावरकर**) हिंदु संघटना हा आजकालचा अत्यंत महत्वाचा प्रश्न आहे. पूर्वीं मुसलमानी अम्मल चालू असतांना श्री. शिवाजी महाराजांनीं हिंदूंची संघटना करून त्यांचें क्षात्रतेज जागृत केलें. हिंदुधर्मीयांच्या ठिकाणीं दिसून येणारा विस्कळीतपणा व शारी-

रिक, बौद्धिक व धार्मिक ऱ्हास दूर होऊन स्वधर्माचें. तेज व सामर्थ्य वृद्धिंगत होण्यास हिंदुसंघटनेचीच जरूरी आहे.

हिंदुत्वाची तेजस्वी परंपरा व चैतन्य यांची महति गाण्यासाठीं 'मराठा' यांनीं इंग्रजींत लिहिलेल्या 'हिंदुत्व' या उत्कृष्ट ग्रंथाचें हें मराठी भाषांतर डॉ. सावरकर यांनीं केलेलें असल्यानें तें किती सरळ वठलें असेल हें सांगणें नकोच.

**स्वामी श्रद्धानंदजींचे उद्गार:**—" या पुस्तकाच्या लेखकाला ही स्फूर्ति झाली तरी कोणत्या वेळीं ? वेळ प्रभातकाळाचीच असली पाहिजे. अशी दिव्य संदेशाची स्फूर्ति इतर वेळीं होणें शक्य नाहीं." **किंमत १ रुपया.**

---

**निवडक लेख:**—( लेखक-श्री. ना. गो. चापेकर बी. ए. एल्‌एल्‌. बी. रिटायर्ड फ. स. जज्ज, ) या लेखांपैकीं 'वैदिक धर्म,' ( लेखांक चार ) 'रामायण,' 'ऐतरेय ब्राह्मण,' 'संतांची कामगिरी' वगैरे लेख धार्मिक प्रवृत्तीच्या वाचकांच्या ज्ञानांत भर टाकतील; तर 'मराठी मासिकें,' 'मराठी भाषेवरील सावट' वगैरे लेखांमध्यें महाराष्ट्र भाषेचा अभ्यास करणारांना महत्वाची माहिती मिळेल. हिंदुस्तानची चलनपद्धति हा विषय फार महत्वाचा आहे; या विषयावर प्रस्तुत संग्रहामध्यें सहा लेख घातले आहेत. चलनपद्धतीच्या गुंतागुंतींत गुरफटून गेलेल्या वाचकांची या लेखांमुळें बरीच सोडवणूक होईल. विशिष्ट विषयांचा अभ्यास करणारांना हे लेख बोधप्रद वाटतील. त्याचप्रमाणें सामान्य वाचकांचें चित्त आकर्षित करून घेतील असेहि लेख या संग्रहांत घातले आहेत. एकूण प्रौढ विद्यार्थ्यांना या लेखांमध्यें शास्त्रशुद्ध माहितीचें आगरच सांपडेल यांत शंका नाहीं. शाळांमधून विषय शिकवीत असतांना विद्यार्थी अनेक प्रश्न उपस्थित करतात व प्रौढ विद्यार्थ्यांचे पुढेंहि अनेक शंका उभ्या राहतात; त्यांच्या शंकानिरसनासाठीं अशीं पुस्तकें शाळांच्या ग्रंथसंग्रहामध्यें, त्याचप्रमाणें सार्वजनिक वाचनालयांमध्येंहि असणें अत्यंत अवश्य आहे. कापडी बांधणी, **किंमत २॥ रुपये.**

---

**विनोद सागर:**—( लेखक-कॅप्टन लिमये, ) तरंग पहिला:–लघुकथांनीं वाचकांचें मनोरंजन करण्यांत व विनोदी लेखांनीं त्यांना हंसविण्यांत कॅ. लिमये यांचा हातखंडा आहे. त्यांच्या लेखनकौशल्याबद्दल वेगवेगळ्या साहित्यभक्तांनीं

त्यांची शिफारस केलेली आहे. महाराष्ट्रांतील अनेक नियतकालिकांत वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले व कांहीं अप्रसिद्ध असे सुमारें वीस निवडक लेख संकलित स्वरूपांत वाचकांचे सोईसाठीं आम्ही प्रसिद्ध केले आहेत. सर्व सुशिक्षित वर्गास तसेंच विनोद व शुद्ध भाषा या दृष्टीनें सर्व विद्यार्थ्यांना हें पुस्तक फारच प्रिय होईल अशी आमची खात्री आहे. **किंमत १ रुपया.**

---

**थालिपीठः**–(लेखक–**श्री. गणेश सदाशिव मराठे** एम्.ए. ॲक्च्युअरी.) नाट्यकला-रुक्कुठार या सुप्रसिद्ध विनोदी टीकात्मक ग्रंथाचे कर्ते श्री. मराठे यांचें नांव मराठी वाचकांच्या परिचयाचें आहे. श्री. कोल्हटकरांचे सुदाम्याचे पोहे व श्री. गडकरी यांची रिकामपणाची कामगिरी यांच्या तोडीचें हें थालिपीठ श्री. मराठे यांनीं तयार केलें आहे. श्री. मराठे यांची लेखनपद्धति अगदीं स्वतंत्र असून त्यांचें थालिपीठ सर्वांना खुमासदार वाटेल अशी आमची खात्री आहे. यामध्यें निरनिराळ्या रुचींचे पदार्थ एकत्र केलेले आहेत. यांत विलायतविहार आहे, सुंठकेसर आहे व थोडेंसें लोणीहि आहे; इतकेंच नव्हे तर थालीपिठाची रुची वाढावी म्हणून सुरवातीस एक पेढा वाढलेला असून शेवटीं तांबूलहि दिलेला आहे. यांत ८ चित्रें दिलीं आहेत. सुंदर छपाई, अँटिक कागद, मोहक बांधणी, **किंमत १॥ रुपया.**

---

**ग्रेटब्रिटनची शासनपद्धतिः**–(लेखक–**रंगनाथ विष्णु ललित** बी.ए. एल्एल्.बी.) दे.भ. चिंतामणराव वैद्य आपल्या प्रस्तावनेंत म्हणतातः–"जगतांतील राष्ट्रांच्या राज्यपद्धतींत इंग्लंडांतील शासनपद्धति श्रेष्ठ आहे; तिची तपशीलवार माहिती हल्लींच्या काळीं प्रत्येक सुशिक्षित मनुष्यास असणें अवश्य आहे. श्री. ललित यांनीं केलेला हा ग्रंथ फारच उपयुक्त आहे." सदरहू पुस्तक सोप्या भाषेंत लिहिलेलें असून मराठी वाचकांच्या सोईसाठीं त्यांनीं नेहमींच्या परिचयांतील प्रतिशब्द वापरले आहेत. अमेरिकेचे प्रेसिडेंट वुड्रो वुइल्सन यांच्या ग्रंथाच्या आधारानें हा ग्रंथ तयार केलेला असल्यामुळें यांतील माहिती साधार आहे. इंदूरच्या मराठी साहित्योत्तेजक परिषदेनें सदरहू पुस्तकास बक्षिस दिलेलें असल्यामुळें त्याच्या उत्कृष्टपणाची दुसरी हमी द्यावयास नकोच. **किंमत १० आणे.**

**संगीत नवजीवनः**—( लेखक—श्री. कृ. ला. अम्बोडकर ) समाजाला नेहमीं अनेक प्रकारचे रोग जडलेले असतात. अर्धवट शिक्षणामुळें स्वैरपणा अंगीं आलेल्या स्त्रिया संधि व कुसंगति यांची जोड मिळतांच बेफाम होतात; त्याचप्रमाणें समाजसेवक या बड्या नांवाखालीं लपणारे बदमाष लोक आपल्या नीच हेतूच्या पूर्ततेसाठीं स्त्रियांच्या भावनाप्रधान मनोवृत्तीचा कसा फायदा घेतात व सुजनांच्या उदाहरणानें मन पुन्हां ताळ्यावर आलें म्हणजे उच्च मनोवृत्तीचे स्वार्थत्यागी खरेखुरे समाजसेवक कसे निर्माण होतात, हें या नाटकांत श्री. अम्बोडकरांनीं हृदयंगमपणें रंगविलें आहे. **किंमत १० आणे.**

---

**संगीत सैतानी संक्रांतः**—(ले.—विनायक रामचंद्र चौगुले ) राजा हा परमेश्वराचा प्रतिनिधि आहे ही भावना भिनलेली असल्यामुळें राजनिष्ठा हा प्रजेचा महत्वाचा गुण होय अशीच सर्वांची ठाम समजूत असते. ह्या भावनेच्या अस्तित्वामुळेंच राजांना जणूं काय स्वैरपणाचा सनदशीर हक्कच प्राप्त होतो राजाला एकदां जुलूम करावयाची चटक लागली कीं, ती निसर्गतःच अमर्याद होते; पण प्रजेच्या सहनशीलपणाला मर्यादा असते; स्वाभिमान व स्वसंरक्षण या भावनांचा राजनिष्ठेशीं विरोध उत्पन्न झाला कीं, त्या झगड्यांत नेहमीं प्रजेचाच विजय होतो यांत संदेह नाहीं. दुर्गुणी राजाविरुद्ध बंड उभारणें हा राजद्रोह राजाच्या प्रजाद्रोहानंतरच उत्पन्न होतो. कठीण प्रसंगीं प्रजेला आपल्या पित्याविरुद्ध—राजाविरुद्ध बंड पुकारावें लागतें; त्याचप्रमाणें कधीं कधीं सद्वृत्तनी पुत्रालाहि आपल्या दुर्गुणी पित्याविरुद्ध बंड उभारावें लागतें. राजनिष्ठा व स्वाभिमान आणि पितृभक्ति व सत्यनिष्ठा यांमध्यें उत्पन्न होणारा हा विरोध श्री. चौगुले यांनीं या नाटकांत अत्यंत कुशलतेनें रंगविला आहे. सात फोटोसह **किंमत १ रुपया.**

---

**माधवानुजः**—( लेखक—कै. डॉ. का. ह. मोडक, कल्याण. ) गेल्या पंधरा वर्षांत मराठी कवितेला नवें वळण लागलें आहे. त्यापूर्वीची कविता बालबोध वळणाची विनयवती व जीवाला समाधान देणारी होती. हल्लींची कविता उत्तान व उच्छृंखल असून तिजमुळें मनांतील विकार मात्र जागृत होतात. माधवानुजांची कविता जुन्या बालबोध वळणाची आहे. त्यांची भाषा सरळ असून अर्थ-

बोध सहज होतो. हल्लींच्या कवींची कविता मात्र वाचावी, त्यांच्या चरित्राकडे पाहूं नये असाच प्रकार बहुधा असतो. उच्छृंखल तरुणांनीं तशाच तरुणांसाठीं लिहिलेले उत्तान प्रलाप असें त्यांच्या कवितांचें वर्णन करावें लागेल. पण श्री. माधवानुज हे कवितेपेक्षां चांगले होते. त्यांनीं आपली कविता सभ्य कुटुंबांसाठीं लिहिलेली असल्यामुळें ती वाचतांना, ऐकतांना व समजावून देतांना कोणासहि शरम वाटणार नाहीं.

शाळांमधून विद्यार्थ्यांना कविता शिकवितांना येणारी मुख्य अडचण म्हणजे विषय शृंगारिक असल्यास त्याची फोड कशी करावयाची हीं होय; पण प्रस्तुत पुस्तकांतील उतारे शिकवितांना अशी अडचण उपस्थित होणें शक्य नाहीं, म्हणून प्रत्येक शाळेच्या ग्रंथसंग्रहालयांत 'माधवानुज' ठेवणें अत्यंत जरूर आहे. माधवानुजांच्या कवितेचा हा गुण जाणूनच शाळाखात्यानें त्यांच्या कांहीं स्फुट कविता मराठी क्रमिक पुस्तकांमध्यें घातल्या आहेत. **किंमत २ रुपये.**

---

**गोमांतकः**—( कवि–" **महाराष्ट्रभाट** " ) हिंदुस्थानांत हिंदवी साम्राज्य स्थापन करणें ही मराठ्यांची राजकीय व धार्मिक महत्वाकांक्षा होती. धार्मिक व राजकीय जुलुमानें गांजून गेलेल्या मराठ्यांच्या हृदयांत ' हर हर महादेव 'चा धर्म उद्भूत झाला. महाराष्ट्रांतल्या लोकांनीं एकजूट होऊन मुसलमानांचा जुलूम उलथून पाडला पण गोमांतकांतील हिंदूंवर धार्मिक जबरदस्तीचा जो कहर गुदरला त्यापुढें मुसलमानांचा जुलूम कांहींच नव्हता असें म्हणावें लागतें.

गोमांतकांतील जुलूमजबरदस्तीला बळी पडलेल्या एका हिंदी कुटुंबाची करुण-कहाणी या काव्यांत ग्रथित केलेली आहे. काव्याचा आरंभ अत्यंत करुणरसांत होऊन त्याचा परिपोष वीररसांत होत गेलेला आहे. गोमांतकांत निर्माण झालेल्या एका हिंदी वीराला भवितव्यतेच्या प्रवाहांत देशोदेशीं भटकावें लागतें व शेवटीं तो अटक-पानिपतच्या रणसंग्रामांत प्रसिद्धीस येऊन अमर होतो, असा ह्या काव्याचा कथाभाग आहे.

पानिपतच्या रणसंग्रामावर 'महाराष्ट्रभाट' हे एक महाकाव्य लिहीत आहेत; 'गोमांतक' हा त्या काव्यांतील एक भाग आहे. असें असलें तरी हा भाग कथानकदृष्ट्या स्वयंपूर्ण आहे. सुंदर कापडी बांधणी. **किंमत २ रुपये.**



---

# गणेश महादेव आणि कंपनीचीं पुस्तकें

| | किं. रु. आ. |
|---|---|
| **कादंबऱ्याः--** | |
| १ स्वराज्याची पूर्वपीठिका | २-४ |
| २ ,, श्रीगणेशा | २-४ |
| ३ ,, घटना | २-४ |
| ४ ,, स्थापना | २-४ |
| ५ स्वराज्याचा कारभार | २-४ |
| ६ स्वराज्यावरील संकट | २-४ |
| ७ स्वराज्याचें परिवर्तन | २-४ |
| ८ स्वराज्यांतील दुफळी | २-४ |
| ९ स्वराज्याची दुही | २-४ |
| १० अजिंक्यतारा | १-८ |
| ११ शृंगेरीची लक्ष्मी | २-० |
| १२ कुठें ? | १-० |
| १३ मराठशाहीची ढाल | १-८ |
| १४ राक्षसी रणसंग्राम | १-० |
| १५ गौरीशंकर | १-८ |
| **गोष्टीः—** | |
| १६ मानसपूजा | १-४ |
| १७ सुख-स्वप्नें | १-४ |
| **नाटकें:--** | |
| १८ सं. नवजीवन | ०-१० |
| १९ ,, सैतानी संक्रांत | १-० |
| **काव्य-ग्रंथः--** | |
| २० गोमांतक | २-० |
| २१ माधवानुज | २-० |
| **ऐतिहासिकः—** | |
| २२ मु. रियासत (भा. १) | ३-० |
| २३ मु. रियासत( भा. २ ) | ३-८ |
| २४ म. रियासत म. वि. १ | ३-० |
| २५ ,, ,, ,, २ | ३-० |
| २६ ,, ,, ,, ३ | २-४ |
| २७ ,, ,, ,, ४ | ३-० |
| २८ ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध | ३-८ |
| **धार्मिकः--** | |
| २९ श्रीएकनाथचरित्र | १-२ |
| ३० भक्तिमणिमाला | १-८ |
| ३१ स्वामी रामतीर्थ खं. १ | २-८ |
| ३२ ,, ,, २ | २-८ |
| ३३ ,, ,, ३ | २-८ |
| पुढील ३ खंड क्रमशः निघतील. | |
| **निबंध वगैरेः---** | |
| ३४ मानवी कर्तव्यें | १-० |
| ३५ निवडक लेख | २-८ |
| ३६ ग्रेटब्रिटनची शासनपद्धति | -१० |
| ३७ हिंदुत्व | १-० |
| ३८ विनोदसागर, तरंग १ ला | १-० |
| ३९ स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें | १-८ |
| ४० थालिपीठ | १-८ |
| **चरित्रें:--** | |
| ४१ महात्मा गांधी | २-४ |
| ४२ निकोलाय लेनिन | ०-१२ |
| ४३ जोसेफ मॅझिनी | २-० |
| ४४ वीर वैरागी | १-० |

श्री

# तुकारामाच्या अभंगांची

# चर्चा

## खंड १ ला. अभंग १–३५०

हा ग्रंथ

तुकाराम–चर्चा–मंडळाच्या टिपणांवरून

के. प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन बी. ए.

इंग्रजी व मराठी भाषांचे माजी अध्यापक, फरग्युसन कॉलेज, पुणें.

व

प्रो. गणेश हरी केळकर एम्. ए.

इंग्रजी भाषेचे अध्यापक, फरग्युसन कॉलेज, पुणें;

यांनीं तयार केला आहे.

---

प्रकाशकः—माधव रामचंद्र जोशी बी. ए.

घ. नं. २९९, नारायण पेठ, पुणें.

किंमत दोन रुपये.

( नमुन्याचें पान सोबत जोडलें आहे. )

पुणें प्रार्थना समाजाच्या विद्यमानें गु. डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या धुरीणत्वाखालीं कांहीं वर्षें चाललेल्या तुकाराम-चर्चा-मंडळाच्या टिपणांवरून तुकारामाच्या अभंगांची एक सार्थ व सटीप आवृत्ति तयार करण्याचें काम प्रो. गणेश हरी केळकर एम. ए. यांनीं अंगावर घेतलें आहे व तिचा पहिला खंड आज प्रसिद्ध होत आहे. मंडळानें अजमासें १८०० स्फुट अभंगांची चर्चा केली होती, त्यांपैकीं ३५० अभंग या खंडांत आले आहेत व याप्रमाणें ते छापावयाला पांच सहा भाग लागतील. राहिलेल्या अभंगांचीहि याप्रमाणेंच चर्चा करण्याचा संपादकांचा विचार आहे. पाठभेद, अर्थ, चर्चा, कठीण शब्दांचा कोश, या अंगांचा या आवृत्तींत समावेश केला आहे. क्राऊन षोडशपत्री अजमासें ४०० पानांच्या कापडी बांधणीच्या प्रत्येक भागाची किंमत फक्त रुपये दोन.

---

३२

मज दास करी त्यांचा ।
संतदासांच्या दासांचा ॥ १ ॥
मग होत कल्पवरी ।
सुखें गर्भवास हरी ॥ २ ॥
नीच वृत्ति काम ।
परी मुखीं तुझें नाम ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवे ।
माझे संकल्प वेचावे ॥ ४ ॥

**पाठभेद**—नाहींत.

**अर्थ**—साधुसंगतीचा महिमा गात असतांना तुकाराम म्हणतात—संतांचे जे दास आहेत, त्यांचे चेले, नोकरचाकर, त्यांच्या दासांचा दास जरी मला केलेंस तरी मला चालेल.

तसें केल्यावर मग कल्पाचे कल्प जरी मला गर्भवास घडला तरी सुखानें घडो. वाटेल तितकें हलकें काम करीत असलों तरी एक गोष्ट पाहिजे. तुझें नांव मुखीं पाहिजे म्हणजे तें हलकें कामही चालेल. माझे सगळे संकल्प, मनोरथ, हे सगळे त्या संतदासांच्या सेवेला व त्या द्वारानें परमेश्वराच्या सेवेला खर्च व्हावे एवढाच माझी इच्छा आहे.

**चर्चा**—च० ३ नीच वृत्ति काम—उपजीविकेचें साधन हलकें, आणि इतर व्यवसायही हलके असले तरी मला चालतील.

वृत्ति = उपजीविकेचा व्यवसाय.

काम = इतर कामधाम.

**शब्द**—होत—होवोत, होऊत, होत, होऊं देत, झाले तरी चालतील. वेचावे—वेचणें—खर्च करणें, वेचन.

**शेरा**—संत समागमाची उत्कट इच्छा.

---

३२

सदा तळमळ ।
चित्ताचिये हळहळ ॥ १ ॥
त्याचें दर्शन न व्हावें ।
शव असतां तो जिवें ॥ १ ॥
कुशब्दाची घाणी ।
अमंगळविली वाणी ॥ ३ ॥
नेणे शब्द पर ।
तुका म्हणे परउपकार ॥ ४ ॥

पाठभेद—च० २ जिवें–जिवे.

च० ४ नेणे–नेणें.

परउपकार–उपकार.

अर्थ—अभंग दुर्बोध आहे.—

ज्याच्या चित्ताची नेहमीं तळमळ चालते, जो नेहमीं मनांत हळहळत असतो, ज्याला समाधान नाहीं अशा माणसाचें दर्शन देखील नको. तो जिवंत असून मेल्यासारखाच. त्यानें कुशब्दाच्या घाणानें–हळहळींचे, दुःखाचे, शब्द तोंडानें काढून, तोंड अमंगळ केलें इतकेंच. त्याला हळहळींखेरीज, असमाधानाखेरीज, दुसरा शब्दच माहीत नाहीं. तो परोपकार जाणत नाहीं (अर्थातच त्याला त्याचें समाधान नाहीं).

किंवा

अभंग तुकारामांनीं स्वतःला उद्देशूनच लिहिला आहे असें धरून शेवटचा चरण मुख्य कल्पावा म्हणजे अर्थ असा होईल.–

ज्याच्या चित्ताला कधीं समाधान नाहीं...अशाचें दर्शन नको–तो जिवंत असूनही प्रेतच. पण नको. मीं असले कुशब्द वापरून आपली वाणी अमंगळ मात्र केली; आपल्याला दुसरा शब्द नको, दुसरें कांहीं मी जाणत नाहीं. एकच जाणतों तें म्हणजे परोपकार.

चर्चा—च० १ चित्ताचिये हळहळ.

**डा. भांडारकरांनीं** सुचविलेला अर्थ. ढेंकर आली म्हणजे जेवण खासें झालें असें दिसतें, नाहीं तर कच्चें, उगाच कुंथाकुंथी. ढेंकर येते तेही बोलच, आणि कुंथाकुंथींचेही बोलच. पण एक अनुभवाचे, अंतरीं घाले-ल्याचे आणि दुसरे कोरडे, रुचिविण, फोल. गन्हांच्या ज्या अनेक परी होतात त्या चाखाव्या, पण उगाच कोरडे बकाणे भरूं नयेत. अनुभवाच्या परी घ्याव्यात; पण वरवरचें शब्दावडंबर नसावें. अनुभवाचें तें तेव्हांच दिसतें. त्याला शब्दकथन लागत नाहीं. हातच्या कांकणाला आरसा नको.

१ **चर्चा**०—च० १—२. ढेंकरेनें समाधान दिसतें, पण असत नाहीं. तेव्हां ढेंकर व कुंथाकुंथी दोन्ही फुकटच. हेंही बोलच व तेहि बोलच. दोन्ही कोरडे फोल. प्रत्यक्ष रुचि पाहिजे.

च० २ "हेहि बोल. तेही बोल," मला अजून वाटतें कीं सामान्यतः सर्व शाब्दिक पंडितांस उद्देशून तुकारामांनीं हें म्हटलें आहे. सारेच कोरडे बोल. येथून तेथून सारेंच शब्दावडंबर. खऱ्या, जिव्हाळयाच्या शब्दापोटीं समाधान असतें, तेंच खरें. असा तुकारामांच्या म्हणण्याचा आशय दिसतो.

(वा ब. प.)

ढेंकर दिसते समाधानाची, पण तशी नसेलही. रा. का. बा. मराठे.

च० २ हेही बोल तेही बोल. एक वरवरचे, अननुभवी माणसाचे, दुसरे खरे, अंतरीं घालेल्याचे.—हें सर्व शाब्दिक पंडितांस—साधुसंतांचें खरें सत्व आंगीं नसणारांस, नुसत्या शब्दांचाच बखेडा माजविणारांस उद्देशून म्हटलें आहे खऱ्या सत्वापोटीं समाधान, शांति, असते तेंच खरें कांकण, त्याला आरसा नको.

च० ४ विल्हाळक=दाखविणारें-दर्शक. असा अर्थ असेल का ?

शब्द—काचें-कच्चें, खरें नव्हे तें, खोटें. फोल-फुकट. परी-प्रकार. फकेवरी-फके भरून, फक्यांनीं. विल्हाळक-दाखविणारें दर्शक.

**लक्ष्यप्रयोग**—ढेकरें ( पुल्लिंगीं ).

**शेरा**—नुसता वाद नको, कांहीं तरी सप्रमाण अर्थ हवा, कांहीं प्रत्यक्ष फळ पाहिजे असा भावार्थ. उगाच तंडणाऱ्या वारकऱ्यांस, किंवा ब्राह्मण भिक्षुकांस उद्देशून हा अभंग असेल का ?

वा. ब. प.

चर्चा—च० ३ भमलें चावळे=भ्रम झालेलें वेड लागलेलें माणूस बडबडतें तसें...मं. ठ.

शब्द—भ्रमलें-भ्रमलेलें माणूस. हेवा-हव्यास. चावळे-बडबडतें.

लक्ष्यप्रयोग—" आशाबद्धजन, काय जाणे नारायण " "आवडीचा हेवा पाहे.

---

४५

ढेकरें जेवण दिसे साचें ।
नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ॥ १ ॥
हेही बोल तेही बोल ।
कोरडे फोल रुचीविण ॥ २ ॥
गव्हाचिया होती परी ।
फकेवरी खाऊं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे असे हातींचें कांकण ।
तयासि दर्पण विल्हाळक ॥ ४ ॥

पाठभेद—च० ३ "फ़के वरी खाऊं नये" असा हा शब्द तोडून पाठ बहुतेक ठिकाणीं आहे, तो गौण वाटतो. ' फकेवरी ' म्हणजे नुसते कोरडे फके मारतात त्या प्रकारानें. " वरी " हें अव्यय.

अर्थ—जेवण बरें झालें कीं नाहीं हें समजावयाला कष्ट लागत नाहींत. ढेंकर आली कीं समजावें बरें झालें. कुंथाकुंथ झाली, मुद्दाम कुंथून ढेंकर काढावी लागली कीं समजावें, जेवण कच्चें झालें. २ त्याचप्रमाणें, ( अनुभवाचे ) तेही बोलच आणि ( वरवरचे ) तेही बोलच. ज्याला ज्ञानाचा अनुभव, आत्मप्रत्यय, आला असेल त्याचें बोलणें आणि नुसतें वायफळ बोलणें यांत वरवर पहाणाराला तरी फरक दिसत नाहीं. पण कोरडे बोल फुकट आहेत, त्यांना रुची नाहीं. ३ गव्हांचे पुष्कळ प्रकार होतात. पण उगाच कोरडे बकाणे भरून उपयोग काय ? तुकोबा म्हणतात, हातचें कांकण असेल त्याला आरशाचा काय उपयोग, त्याला आरसा कशाला ?

## माधव रामचंद्र जोशी यांनीं प्रसिद्ध केलेलीं

## कांहीं उत्तम पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| कै. रा. भि. जोशी कृत– | मराठी भाषेची घटना | ४–०–० |
| ,, ,, | प्रौढबोध व्याकरण | १–८–० |
| ,, ,, | मराठी शुद्धसिद्धी | ०–१०–० |
| ,, ,, | सुलभ अलंकार | ०–६–० |
| प्रो. ग. ह. केळकर कृत | लोकहितवादी यांचें चरित्र | ०–१२–० |
| कै. डॉ. वि. ब. भिडे कृत– | मानव शारिरशास्त्र | ६–०–० |
| कै. प्रिं. बा. ब. पटवर्धन कृत– | काव्य आणि काव्योदय | ०–१०–० |
| प्रिं. गो. चि. भाटे कृत– | उत्तर हिंदुस्थानचा प्रवास | ०–१२–० |
| | प्रेम कीं लौकिक | २–०–० |

पांच रुपयावरच्या मागणीस टपाल खर्च माफ.

## लवकरच प्रसिद्ध होतील.

| | | |
|---|---|---|
| प्रो. ग. ह. केळकर कृत– | तुकाराम चर्चा खंड २ रा. | २–०–० |
| डॉ. प. ल. वैद्य कृत– | बौद्ध धर्माचा अभ्युदय व प्रसार | १–८–० |
| कै. प्रो. वा. ब. पटवर्धन कृत– | Wilson Philological Lectures | Rs. 1–0–0 |

---

